# अनुक्रमणिका




| | | | पृष्ठ |
|---|---|---|---|
| | डॉ. के. ल. दप्तरी यांचें चरित्र | | (७) |
| | प्रस्तावना | .... | (१३) |
| १. | ईशोपनिषद् | .... | १–१४ |
| २. | केनोपनिषद् | .... | १५–३५ |
| ३. | कठोपनिषद् | .... | ३६–११४ |
| ४. | मुंडकोपनिषद् | .... | ११५–१६९ |
| ५. | प्रश्नोपनिषद् | .... | १७०–२१६ |
| ६. | तैत्तिरीयोपनिषद् | .... | २१७–२८३ |
| ७. | मांडूक्योपनिषद् | .... | २८४–२९६ |
| ८. | कौषीतक्युपनिषद् | .... | २९७–३९४ |
| ९. | ऐतरेयोपनिषद् | .... | ३९५–४७४ |
| | शुद्धिपत्र | .... | ४७५ |
| | उपनिषच्छ्लोकांची सूची | .... | ४८० |




# निवेदन

कै. डॉ. भाऊजी दफ्तरी यांच्या 'उपनिषदर्थव्याख्या" ह्या पुस्तकाचा पूर्वार्ध प्रसिद्ध करतांना आम्हाला आज आनंद होत आहे. आज दि. २२ नोव्हेंबर हा कै. भाऊजींचा जन्मदिवस आहे. ह्या तारखेसच पुस्तक प्रसिद्ध व्हावें अशी आमची मनीषा नारायण मुद्रणालयाच्या सहकार्याने फलद्रूप होऊं शकली. त्यांचा आणि आमचा स्नेह दिवसेंदिवस वृद्धिंगत व्हावा अशी आमची इच्छा आहे. या प्रकाशनाला साहित्य अकादमीने १००० रुपयांचें अनुदान दिलेलें आहे. त्याबद्दल त्यांना आमचे धन्यवाद आहेत. तरी अजूनहि ग्रंथप्रकाशनाचा आणखी सुमारें तीन हजार रुपयांचा खर्च आम्हाला भागवावयाचा आहे. जर महाराष्ट्रांतील संशोधनप्रिय मंडळी मनावर घेतील तर आम्हाला ती सहजऋण मुक्त करूं शकतील.

२२ नोव्हेंबर १९५९

ना. शु. नंदुरकर
दि. य. पंडित
प्र. ना. सुखठणकर
कार्यवाह,
डॉ. दफ्तरी ग्रंथ प्रकाशन समिति,
महाल, नागपूर नं. २



कै. डॉ. के. ल. ऊर्फ भाऊजी दफ्तरी

# कै. डॉ. के. ल. ऊर्फ भाऊजी दफ्तरी यांचें अल्प चरित्र

भाऊजी उर्फ डॉ. केशव लक्ष्मण दफ्तरी यांचा जन्म नागपूर येथे २२ नोव्हेंबर १८८० रोजीं झाला. मिडलस्कूलपर्यंतचें त्यांचें शिक्षण वर्धा जिल्ह्यांत आर्वी येथे झालें. पुढच्या शिक्षणासाठी त्यांना नागपूरला यावें लागलें. येथे त्यांचें नांव त्या काळीं नीलसिटी म्हणून ख्यात असलेल्या दादासाहेब धनवटे नगर विद्यालयांत दाखल करण्यांत आलें. येथून मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर त्यांनी कलकत्ता विद्यापीठाच्या आर्ट्स् आणि कायद्याच्या पदव्या अनुक्रमें १९०० आणि १९०४ सालीं मिळविल्या.

त्यांच्या काळांतील ते एक बुद्धिमान विद्यार्थी होते. आपल्या केशवची—भाऊजींची—कुशाग्रता पाहून त्यांच्या वडिलांनी कै. शिवदासपंत बालिंगे ह्यांच्या देखरेखीखाली त्यांच्या व्यासंग व्हावा म्हणून त्यांची आपल्याकडे रहाण्याची सोय केली. भाऊजींचे वडील त्यांचा व्यासंग अप्रतिहत चालू रहावा म्हणून पराकाष्ठेची दक्षता घेत असत. असा पिता आपल्याला लाभला हें परमभाग्यच होय असें भाऊजी नेहमी म्हणत.

याच काळांत भाऊजींचा संबंध श्री. केशवरावजी जोशी ह्यांच्याशी आला. हे नील सिटी हायस्कूलमध्ये शिक्षक असून शिस्त आणि स्वतंत्र विचारसरणी ह्याबद्दल त्यांनी ख्याति होती. ह्यांचा भाऊजींच्या विचारांवर चांगलाच ठसा उमटला आणि स्वोन्नति, स्वाभिमान असा राष्ट्रीय विचारांचें भाऊजींच्या मनांत बीजारोपण

झालें. परिणामतः सरकारी चाकरी करावयाची नाही असा त्यांचा ठाम विचार झाला व तो त्यांनी निर्धाराने पाळला.

शालेय अभ्यासक्रमाव्यतिरिक्त भाऊजींचें वाचन फार व्यापक होतें. आणि अनेक विषयांचा ते अभ्यास करीत असत. हायस्कूलमध्ये असतांनाच त्यांनी सिद्धान्त कौमुदीचीं दोन पुस्तकें संपविलीं होतीं. इंटरच्या वर्गांत प्रवेश करण्यापूर्वीच ज्योतिष, गणित, शरीरविज्ञान, अशा विषयांत त्यांचें पुरःसरण झालें होतें. त्यांच्या ज्ञानपिपासेचें हें लहानसें चिन्हच होय. १९०० सालीं बी. ए. झाल्यावर त्यांना मॉरिस कॉलेजमधे फेलोशिप मिळाली. त्यानंतर १९०१ ते १९०४ च्या काळांत त्यांनी स्थानिक पटवर्धन हायस्कूलमधे संस्कृत आणि गणित विषयाचे अध्यापक म्हणून काम केलें. पुढे कायद्याची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर प्रथम नागपूर आणि मग काटोल येथे त्यांनी व्यवसायासाठी वास्तव्य केलें. १९०५ ते १९२० हा काळ एका दृष्टीने महत्त्वाचा होय. कारण ह्याच काळांत त्यांनी ज्योतिर्गणित, वैद्यशास्त्र, धर्मशास्त्र ह्यांचा सखोल अभ्यास केला. १९२० सालीं कै. लोकमान्य टिळकांशीं विचारविनिमय करून करणकल्पलता ग्रंथ तयार करण्याचें काम अंगावर घेतलें आणि तो ग्रंथ कै. लोकमान्य टिळकांच्या पश्चात् १९२५ सालीं प्रसिद्ध झाला. ह्या ग्रंथाला एक हजार रुपयांचें पारितोषिक मिळालें होतें.

डॉ. भाऊजी दप्तरींनी वेगवेगळ्या विषयांवर अनेक ग्रंथ लिहिले आहेत. (१) धर्म, (२) प्राचीन भारतीय ऐतिहासिक कालनिर्णय, (३) भारतीय ज्योतिश्शास्त्र व त्याचा इतिहास आणि वैद्यक शास्त्रांतील त्यांचा अधिकार सर्वमान्य आहे. प्रारंभीं त्यांनी भारतीय युद्धकालनिर्णय म्हणून निबंध लिहून भारतीय युद्ध खिस्ताब्दपूर्व ११९७ ह्या वर्षी झालें असें सिद्ध केलें. एतच्छास्त्रविशारदांना तें एकदम मान्य झालें.

डॉ. दफ्तरी सुधारणावादी विचारसंप्रदायाचे होते. हिंदुधर्माचें त्याच्या प्रमाणग्रंथांतून जें रूप प्रकट होतें तें पूर्णतः विवेकाधिष्ठित असून त्याचें रूप सद्यःकालीन स्थितीशीं त्याच्या मूलतत्त्वांना धक्का न लावतां सहज जुळतें करून घेतां येणारें आहे असें त्यांचें मत होतें आणि हें मत त्यांनी ग्रंथाच्या मूळ संहितांचें परीक्षण करून ठरविलें होतें. ह्या परीक्षणांत त्यांना असें आढळून आलें की सनातनी आणि आधुनिक पंडितांनी ह्या ग्रंथावर जीं भाष्यें लिहिलीं आहेत तीं निराधार आणि एककल्ली असून त्यांचा उद्‌गम वैयक्तिक रुचि, सांप्रदायिक दृष्टि आणि पूर्वग्रहांतून झालेला आहे. त्यांच्या पाठीशीं विवेक आणि वस्तुनिष्ठ विचार नाही, असा त्यांनी निष्कर्ष काढला. म्हणून त्यांनी १९२६ मध्ये धर्मरहस्य, १९३७ मध्ये तात्त्विक मीमांसापद्धति, १९४० मध्ये धर्मविवादस्वरूप आणि जैमिन्यर्थदीपिका अशीं पुस्तकें लिहिलीं. धर्मविवादस्वरूपाला पांचशे रुपयांचें दक्षिण महाराष्ट्र साहित्य पुरस्कार समितिचें पारितोषिकहि मिळालें होतें. त्याचा धर्मशास्त्रावरील अधिकार निरपवाद मान्य झालेला असून अस्पृश्यतेसंबंधी सनातनी पंडितांचा महात्मा गांधीजींशीं जो वाद झाला त्यावेळीं भाऊजी गांधीजींचे सांगाती होते.

लो. टिळकांच्या आज्ञेनुसार तयार केलेल्या ज्योतिषशास्त्रावरील "करणकल्पलता" ग्रंथाशिवाय मराठीमध्ये पंचांगचंद्रिका आणि भारतीय ज्योतिःशास्त्रनिरीक्षण हीं पुस्तकें १९२९ सालीं लिहिलीं आहेत. पहिल्या पुस्तकामध्ये दिलेल्या सोप्या सूत्रांच्या साहाय्याने ग्रहस्थिति आणि इतर आकाशस्थ आश्चर्यांचें स्पष्टीकरण लाभतें. दुसरा ग्रंथ अधिक महत्त्वाचा आहे कारण त्यांत भारतीय ज्योतिःशास्त्रविषयक ग्रंथांचें समीक्षण असून त्यांच्यांतील आणि आधुनिक गणना पद्धतींतील जी भिन्नता आढळते तिचें निराकरण करण्याचा व एकवाक्यता दर्शविण्याचा प्रयत्न केला आहे. प्राचीन कालीं आकाश निरीक्षणाचीं उपकरणें अत्यल्प

असूनहि त्यांची गणनापद्धति बारीक होती. त्यांनी उपलब्ध झालेलीं फलितें आधुनिक पद्धतीने लाभलेल्या फलितांशीं फार जुळतीं आढळून येतात. ह्या प्राचीन ग्रंथांतून आढळणाऱ्या प्रमेयांच्या आणि फलिताच्या आधारें सिद्ध होणाऱ्या ग्रहपरिभ्रमणांच्या हिशेबांशीं आधुनिक पद्धतीने सिद्ध होणारे हिशोब फार जुळते आहेत हें त्यांनी ह्या ग्रंथांत प्रतिपादन केलें आहे. ह्याच ग्रंथांत भारतीय ज्योतिःशास्त्राच्या विकासाचा आढावा घेतलेला असून भारताबाहेर झालेल्या संशोधनाच्या आधाराशिवायच भारतीयांनी ह्या बाबतींत किती मजल मारली होती ह्याचें विवेचन केलें आहे.

भाऊजींच्या एतद्विषयक गाढ व्यासंगाने प्रभावित होऊन नागपूर विद्यापीठाने त्यांना १९४० सालीं किनखेडे व्याख्यान मालेंत Astronomical methods and its application to the chronology of Ancient India ह्या विषयावर इंग्रजींतून व्याख्यानें देण्यास आमंत्रण दिलें. त्यानंतर १९४४ सालीं बाटोडकर व्याख्यानमालेंत Social Institutions in Ancient India ह्या विषयावर व्याख्यानें देण्यास पुन्हा निमंत्रण देण्यांत आलें. ही दोन्ही व्याख्यानें नागपुर विद्यापीठाने ग्रंथरूपाने प्रकाशित केलीं आहेत. नागपूर विद्यापीठाने त्याचा व्याख्याते म्हणून सन्मान तर केलाच पण त्यांना एक सुवर्णपदक आणि सन्मान्य D. Litt. पदवी देऊनहि गौरव केला. ही गोष्ट १९४१ सालची आहे.

उपनिषदांवरील भाऊजींचा अधिकार प्रस्तुत ग्रंथाच्या रूपाने वाचकांसमोर आहेच. उपनिषदांचा अभ्यास श्रीमत् शंकराचार्यांनी करून केला होता व त्यानंतर मीच केला असे सहृदर्शनीं गर्वोक्तीने भासणारे उद्‌गार भाऊजी निकटवर्ती लोकांजवळ नेहमीच काढत.

यांही वर मूलगामी सांगण्याजोगें नसेल तर मी हातीं लेखणी धरीत नाही असें स्वतः भाऊजींनी एके ठिकाणीं नमूद केलें आहे.

याचा विशेष प्रत्यय त्यांच्या वैद्यकविषयक ग्रंथांत येतो. बाराक्षारांच्या साहाय्याने उपचार करण्यासंबंधीच्या ग्रंथाला त्यांनी सच्चिकित्सा-प्रकाशिका असें नांव ह्याच कारणासाठी दिलें. त्यांनी Bodily Reaction and Examination of different systems of medicine म्हणून एक अभिनव ग्रंथ लिहिला असून त्यांत शारीरक्रिया व प्रतिक्रियांचे नियम प्रस्थापित केले आहेत आणि या नियमांच्या आधारें सगळ्या चिकित्सापद्धतींचा परामर्श घेतला आहे. शेवटीं अतिशय तर्कशुद्ध रीतीने त्यांनी समचिकित्सा हीच रोग-परिहाराची एकमेव रीति असा निष्कर्ष काढला आहे. पुढे जाऊन बाराक्षार पद्धति म्हणजे समचिकित्सेचाच एक सुगम आणि संक्षिप्त प्रकार होय असें सुस्पष्ट प्रतिपादन केलें आहे.

मध्यप्रदेश सरकारने स्थापलेल्या होमिओपॅथिक व बायोकेमिक बोर्डाचे ते पहिले अध्यक्ष होते. ह्यांच्याच प्रयत्नांनी शल्यशास्त्रविरहित समचिकित्सेचा दोन वर्षांचा अभ्यासक्रम मध्यप्रदेश सरकारने मान्य केला. अशा प्रकारचा कायदा मध्यप्रदेश सरकारने करून या क्षेत्रांत भारतामध्ये अग्रेसर राहावला भाऊजींचेच प्रयत्न कारणीभूत झाले. त्यांनी नागपूरला या शास्त्राचें एक विद्यालय १९५४ सालीं स्थापन केलें आणि शेवटपर्यंत ते त्याचे प्राचार्य होते.

एकीकडे विद्याव्यासंगांत प्रगाढ गुंतलेला हा पुरुष वृत्तीने पूर्णतः राष्ट्रीय होता. १९२० च्या असहकारितेच्या चळवळींत त्यांनी वकिली सोडली ती कायमचीच. यानंतर त्यांनी कोर्टाचा उंबरठाहि कधी ओलांडला नाही. नंतर ते प्रदेश काँग्रेस कमेटीचे कोषाधिकारी होते. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर त्यांचें मत समाजवादाकडे झुकूं लागलें. त्यांनी "स्वतंत्र भारताचा पुढील मार्ग" म्हणून लिहिलेल्या पुस्तकांत राष्ट्र-स्वामित्वाचा पुरस्कार केला असून धनसंस्था जगाच्या आपत्तीला कारणीभूत आहे, असें प्रतिपादन केलें आहे. स्वातंत्र्योत्तर काळांत

भाऊजींनी मराठींतूनच लेखन केलें. कांहीं काळ Young Patriot पत्राचें संपादनहि त्यांनी केलें. नाशिकच्या संस्कृत कॉलेजचें प्राचार्यपद त्यांनी भूषविलें. १९२० सालीं राष्ट्रीय विद्यालयाचे प्राचार्य आणि १९३० मध्ये स्वराज्य विद्यालयाचे मुख्याध्यापक, धर्मनिर्णयमंडळाचे अध्यक्ष, प्रांतिक हरिजन सेवक संघाचे अध्यक्ष अशीं अनेक पदें त्यांनी भूषविलीं आहेत; पण ह्या अल्पशा चरित्रांत ह्या सगळयांचा परामर्श घेणें अशक्य आहे.

भाऊजींच्या गुणांवर व व्यक्तिमत्त्वावर प्रकाश टाकणारा त्यांचा विस्तृत चरित्रग्रंथ लिहून प्रसिद्ध करणें राष्ट्रीय दृष्टया अत्यंत आवश्यक आहे व तोहि भाऊजींशी प्रत्यक्ष संबंध आलेल्या विविध क्षेत्रांतील अनेक व्यक्ती हयात आणि उपलब्ध असतांना कांहीं उत्साही मित्रांनी हें काम अंगावर घेतल्यास एक महान् सत्कार्य केल्याचें श्रेय पदरीं पडेल ह्यांत शंका नाही.

विनीत

ना. धु. नंदुरकर

# प्रस्तावना



(१) पूज्य भाऊजींचीं उपनिषद्विषयक दोन अत्यंत महत्त्वाचीं पुस्तकें, औपनिषदिक जीवनसौख्य आणि Rationalistic and realistic interpretation of the Upanishads हीं प्रकाशित झाल्यानंतर केवळ एक दीड वर्षाच्या आंतच उपनिषदर्थव्याख्या हा त्यांचा तिसरा मौलिक ग्रंथ प्रकाशित करण्याचा सुयोग यावा ही एक भाग्याचीच गोष्ट समजली पाहिजे. याचें सर्व श्रेय त्यांचे सुपुत्र श्री. यादवराव व प्रो. बाळासाहेब दप्तरी आणि त्यांचे सहकारी श्री. नंदुरकर आणि श्री. वेळेकर यांस आहे.

(२) प. वा. भाऊजींचा उपनिषद्विषयक अधिकार फार मोठा होता. उपनिषदर्थव्याख्या हा ग्रंथ त्यांनी आयुष्यभर केलेल्या उपनिषदांच्या निदिध्यासनाचें फळ आहे. परंतु उपनिषदांचे इतर विद्वान् अभ्यासक आणि श्री. भाऊजी यांमध्ये मुळांतच एक फार मोठा फरक होता. आपल्याकडे श्रीमद् आद्यशंकराचार्यांची परंपरा इतकी दृढमूल झालेली आहे की, कोणताहि सामान्य अभ्यासक उपनिषदांचा अर्थ श्रीशंकराचार्यांनी जसा लावलेला आहे तसाच बहुधा करतो. याउलट श्री. भाऊजी कोणत्याहि परंपरेचे अंधभक्त कधीच नव्हते. त्यांच्या मतें श्रीशबरस्वामींनी काय किंवा श्रीमद् शंकराचार्यांनी काय एक फार मोठी घोडचूक केली होती आणि ती म्हणजे वेद हे अपौरुषेय किंवा ईश्वरनिर्मित आहेत असें मानणें. श्रीशबरस्वामी, श्रीशंकराचार्य आदि विद्वानांच्या या मूलतःच चुकीच्या

मतांमुळे हिंदुस्थानांतल्या धार्मिक आणि तत्त्वज्ञानविषयक विचारांना एक अत्यंत वाईट वळण लागलें आणि तेंच शेवटीं आपल्या अधोगतीला कारणीभूत झालें असें त्यांना वाटत असे. त्यांच्या मतें "प्रत्यक्षादिकांना अगम्य अशा वस्तूंचें शब्द हा ज्ञान करून देतो हा सिद्धान्तच अपसिद्धांत आहे. शब्द हा वक्त्याच्या मनांतील भावांचें मात्र ज्ञान करून देतो. त्या भावाप्रमाणे वस्तुस्थिति आहे किंवा नाही याचा बोध करून देणें हा शब्दाचा अधिकार नाही." [जैमिन्यर्थ-दीपिका, पान ५ ] "वेद अपौरुषेय किंवा ईश्वरनिर्मित आहेत म्हणून ते खरे आहेत असें जर म्हणणें असेल तर वेद अपौरुषेय आहेत किंवा ईश्वरनिर्मित आहेत या अर्थाचें जैमिनीचें सूत्र दाखवून त्या सिद्धान्ताचीं प्रमाणें ज्यांत दिलीं आहेत अशींहि जैमिनीचीं सूत्रें दाखविलीं पाहिजेत. तीं कोणासहि दाखवितां येणार नाहीत." [ जैमिन्यर्थ-दिपिका, पान ६ ]

(३) उपनिषदें वेदाचें अंग असल्यामुळे वेद हे ईश्वरनिर्मित किंवा अपौरुषेय आहेत या सिद्धांताचा उपनिषदांच्या अर्थनिर्णयावर फार मोठा परिणाम होतो. उपनिषदांतील प्रत्येक वाक्य सत्य म्हणजे वस्तुतंत्र असलेंच पाहिजे असें मानल्याबरोबर निरनिराळ्या उपनिषदांतील विधानांमध्ये एकवाक्यता असलीच पाहिजे. आणि त्यामुळे या एकवाक्यतेला अनुकूल असाच त्याचा अर्थ लावला पाहिजे असा आग्रह क्रमप्राप्तच येतो. कारण तसें न मानलें तर उपनिषदांतील सर्व वचनें सत्य म्हणजे वस्तुतंत्रहि आहेत आणि परस्परविरोधीहि आहेत हा अपसिद्धांत उत्पन्न होईल. या दुराग्रहामुळे परंपरानुसारी उपनिषदांचा अर्थ लावणाऱ्यांवर कांही विशिष्ट तार्किक मर्यादा येतात आणि त्यामुळे उपनिषदांच्या वचनांचा साधा, सरळ, वस्तुनिष्ठ असा अर्थ न होतां एकवाक्यतेच्या आग्रहामुळे कधी कधी अर्थांची न कळत

विलक्षण ओढाताण होते. श्री. भाऊजींवर अशा तऱ्हेचें कोणतेंहि कृत्रिम निर्बंध नसल्यामुळे त्यांनी लावलेले उपनिषद्-वचनाचे अर्थ सहजच बुद्धीला पटतात. आणि त्यांतून उपनिषद्कालीन परिस्थितीची आणि त्यांनी प्रतिपादन केलेल्या खऱ्या तत्वांची जाणीव होते.

(४) भाऊजींनी केलेल्या उपनिषद्-वचनांच्या अर्थांबद्दल प्रो. गोपाळ केशव गर्दे यांनी आपला स्पष्ट अभिप्राय असा दिलेला आहे की, " डॉ. दप्तरी याची बुद्धि Theory of Evolution व पाश्चात्य ग्रंथ यांच्या वचनाने पुनर्जन्माविषयी कांही सबळ पुरावा नाही अशा म्हणे संस्कृत झालेली असल्यामुळे त्यांनी उपनिषदांचा अर्थ आपल्या मनोभावनेप्रमाणे केला आहे, व तसें करतांना शब्दांची ओढाताण केलेली नाही इतकें मी म्हणूं शकतों. पण असा अर्थ केल्याने कांही ठिकाणी तीं उपनिषदांचीं वचनें परब्रह्माचें वर्णन करणारीं आहेत असें आजपर्यंतचे लोक मानत आले आहेत, तीं ब्रह्मविद् जीवाचें वर्णन करणारीं आहेत, असें मानावें लागतें. व त्यामुळे वाचणाऱ्याच्या मनोभावनेंत फरक होण्याचा संभव आहे. हा एक दोष किंवा गुण म्हणा, तो खेरीज करून या भाषांतरांत दुसरा कोणताहि दोष नाही " प्रो. गर्दे हे जुन्या परंपरेमध्ये वाढलेले होते ही गोष्ट जर लक्षांत ठेवली तर श्री. भाऊजींनी उपनिषदांचा अर्थ करतांना शब्दांची ओढाताण केली नाही या त्यांच्या अभिप्रायाचें किती महत्त्व आहे हें, निराळें सांगण्याची आवश्यकता नाही. उपनिषदांतील जीं वचनें परब्रह्मवर्णनात्मक आहेत असें आपण मानीत आलों आहोंत तीं खरोखर महाविज्ञजीवाचें वर्णन करणारीं आहेत असें मानल्याबरोबर त्या त्या उपनिषद्वचनांचा अर्थ किती सरळतेने करता येतो हें भाऊजींची अर्थव्याख्या पाहिल्यानंतर प्रत्येक बुद्धिवाद्याला सहज पटण्यासारखें आहे. आणि यांतच भाऊजींच्या विचारांचा खोलपणा आणि सौंदर्य आहे.

(५) आज वाङ्मयाच्या बाजारांत उपनिषदांचा परंपरेनुसार अर्थ करणारीं कितीतरी पुस्तकें आणि भाषांतरें उपलब्ध आहेत. त्यांमध्ये या मौलिक व तर्कसंगत अर्थव्यास्थेची भर पडल्यामुळे महामहोपाध्याय मिराशी यांनी म्हटल्याप्रमाणे, "एक वैचारिक खळबळ" महाराष्ट्रांतच नव्हे तर सबंध हिंदुस्थानांत उत्पन्न झाल्यास आश्चर्य नाही. सामान्य वाचकांच्या उपनिषद्विषयक विचारांनाहि या ग्रंथामुळे एक निराळें वळण लागेल आणि या दृष्टीने त्यांनाहि हा ग्रंथ अत्यंत उपकारक होईल यांत शंका नाही.

नवी दिल्ली
ता. ११-११-५८

वामन शिवदास बार्लिंगे

# उपनिषदर्थव्याख्या

## ईशोपनिषद्

ईशोपनिषद् हें शुक्लयजुर्वेदाचा शेवटचा भाग आहे. याज्ञवल्क्याने कृष्ण यजुर्वेद म्हणजे तैत्तिरीयसंहिता ओकून नंतर त्याने शुक्ल यजुर्वेद म्हणजेच वाजसनेय संहिता सूर्यापासून मिळविली व हा याज्ञवल्क्य वैशंपायनाचा शिष्य होता. वगैरे हकीकत वायुपुराण अध्याय ६१ मध्ये दिली आहे. वायुपुराण अध्याय ९९ मध्ये, पांडवांचा पणतू जनमेजय ह्याने वैशंपायनाच्या विरोधास न जुमानतां वाजसनेय ब्राह्मण स्थापन केले व वाजसनेयक ब्रह्म (वेद) प्रवृत्त केले असें सांगितलें आहे. ह्यावरून शुक्लयजुर्वेद अर्थात् ईशोपनिषद् जनमेजय पांडवांच्या राज्यात याज्ञवल्क्याने केलें असें ठरतें. पांडवांचें भारतीय युद्ध इ. सनापूर्वी ११९० ह्या काळीं झालें, व पांडवांचें निधन इ. सनापूर्वी ११७५ ह्या काळीं झालें हें मी दुसऱ्या ग्रंथांत सिद्ध केलेंच आहे. भारतीय युद्धाच्या वर्षीच जनमेजयाचा बाप परिक्षिती जन्मला. ह्यावरून जनमेजयाचा जन्म इ. सनापूर्वी सुमारें ११७० व त्याच्या राज्याचा आरंभ इ. सनापूर्वी सुमारें ११५० ठरतो. म्हणून ईशोपनिषद् इ. सनापूर्वी सुमारें ११५० ह्या काळीं याज्ञवल्क्याने केलें असें ठरतें.

**घटनेची योजनाः**—कर्म व ज्ञान ह्या दोहोंच्या संयोगानेच अमृताची म्हणजे आत्यंतिक सुखाची प्राप्ति होते हें सांगून कर्म कसें करावें व तें ज्ञान कोणतें हें सांगणें हीच ह्या उपनिषदाची घटनेची योजना आहे. ह्या उपनिषदास जें सांगावयाचें आहे तें त्यांत एकाच अध्यायांत अठरा श्लोकांत सांगितलें आहे.

### श्लोक १

ईशा वास्यमिदं सर्वं यत्किंच जगत्यां जगत् ।
तेन त्यक्तेन भुंजीथाः मा गृधः कस्यस्विद्धनम् ॥१॥

अर्थः—ह्या जगात जें कांही क्षणभंगुर आहे, तें सर्व ईश्वराने राहावयाचें म्हणजे ईश्वराच्या मालकीचें घन आहे. त्याचा म्हणजेच क्षणभंगुर अशा विषयसुखाचा किंवा परावलंबी सुखाचा त्याग करून तुम्हां आनंदाचा उपभोग घ्यावा. दुसऱ्याच्या (म्हणजे येथे ईश्वराच्या वर निर्दिष्ट केलेल्या) धनाची इच्छा करूं नकोस (कारण तसें करणाऱ्यास दंड होतो).

टिप्पणीः—"ईश" म्हणजे ईश्वर ह्याची येथे तृतीया केली आहे.

"वास्यं" हें वस् म्हणजे राहणें यापासून झालेलें आहे. ह्याचा अर्थ "राहावयाचें" असा आहे. ईश्वराने राहावयाचें म्हणजे ईश्वराच्या मालकीचें असा अर्थ आहे.

"जगत्" म्हणजे त्याला गति आहे तें म्हणजे जें चंचल—क्षणभंगुर आहे तें.

"तेन त्यक्तेन" म्हणजे त्याचा त्याग करून.

"भुंजीथाः"—हें आत्मनेपदाचें विधिलिङाचें रूप असल्यामुळे ह्याचा अर्थ "उपभोग घे" "आनंद प्राप्त करून घे" असाच केला पाहिजे. श्रीशंकराचार्यांनी पालन कर असा अर्थ केला आहे तो चूक

आहे; कारण भुज् आत्मनेपद = उपभोग घेणें; भुज् परस्मैपद = अवन करणें.

" कस्यस्वित् " म्हणजे " कोणाचेंही " म्हणजे " दुसऱ्याचें " असा भावार्थ आहे.

### श्लोक २

कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतं समाः ।
एवं त्वयि नान्यथेतोऽस्ति न कर्म लिप्यते नरे ॥२॥

अर्थः—(विषयसुखाचा त्यागच करावयाचा तर मग कर्मेंच करण्याची गरज नाही असेंही तूं समजूं नकोस.) कर्तव्यकर्में करीतच ह्या लोकीं शंभर वर्षे जिवंत राहण्याची इच्छा करावी. ह्याप्रमाणें वागल्याने म्हणजे मरेपर्यंत कर्तव्यकर्म केल्याने (एवम्) मनुष्य असा जो तूं त्या तुला (त्वयि नरे) कर्मांचा वासनारूपी लेप लागणार नाही. (कर्मांचा लेप होऊं नये ह्याकरितां) ह्याहून दुसरा मार्ग नाही. (इतः अन्यथा न अस्ति)

श्लोकाच्या द्वितीयार्धाचा अन्वयः—

एवम् त्वयि नरे कर्म न लिप्यते, इतः अन्यथा न अस्ति ।

टिप्पणें:—विषयसुखाचा त्यागच करावयाचा तर मग कर्मेंच करण्याची गरज नाही असें कोणाला वाटेल म्हणून कर्में मरेपर्यंत केलींच पाहिजेत असें सांगण्याकरितां हा श्लोक योजिला आहे. ह्यांतील " जिजीविषेत् " ह्या पदाचें स्वारस्य फार खोल आहे. हे लक्षांत असल्यामुळे, ह्या श्लोकाच्या पहिल्या अर्धाचा अर्थ " शंभरही वर्षे म्हणजे आयुष्य आहे तोपर्यंत कर्में करीतच जिवंत राहण्याची इच्छा करावी" असा आहे, "म्हणजे कर्में कधीच टाकूं नयेत." असा अर्थ आहे; व तो श्री शंकराचार्यांच्या मताच्या विरुद्ध आहे. म्हणून, त्यांनी, हा श्लोक अज्ञान्याकरितां सांगितला आहे व पहिला श्लोक

शान्याकरिता सांगितला आहे असें ग्रहण केलें आहे तें चूक आहे; कारण असें ग्रहण करण्यास कारण कांहीच नाही. "विशेषादर्शनं यावत्तावत्सामान्यदर्शनम्" म्हणजे जोंपर्यंत एखादें वचन एखाद्या विशिष्ट परिस्थितीसच लागू आहे असें दिसून येत नाही, तोंपर्यंत तें सर्वच परिस्थितीस लागू असतें, ह्या तत्त्वाचा श्रीशंकराचार्यांनी त्याग केला आहे. येथे हा श्लोक अज्ञान्यांसच लागू आहे किंवा ज्ञान्यांसच लागू आहे असें सांगणारा विशेषवाचक शब्द कोणताच नाही. म्हणून हा श्लोक ज्ञानी व अज्ञानी ह्या दोघांसही सारखाच लागू आहे. ह्याला "जिजीविषेत्" हें सनंत म्हणजे इच्छावाचक आहे हाच अतिशय पोषक पुरावा आहे. श्री शंकराचार्यांच्या मताप्रमाणे अज्ञान्यानेहि ज्ञानी होऊन कर्में टाकण्याचीच इच्छा करावी असें ठरतें. अर्थात् कर्म करण्याचीच तूं जन्मभर इच्छा कर हें त्याला सांगणें श्रीशंकराचार्यांच्याही मताच्या विरुद्ध आहे. म्हणून हें सनंत श्री शंकराचार्यांच्या सिद्धांताशीं जुळत नाही. म्हणून ते "यदिजिजीविषेत् शतं वर्षाणि तत्कुर्वन्नेव जिजीविषेत्" असा अर्थ करतात; पण त्याकरितां "यदिजिजीविषेत्त्" हे पदरचे शब्द त्यांना घालावे लागतात. असें करणें अर्थातच चूक आहे. इतर उपनिषदांच्या अर्थास अनुसरून ह्या उपनिषदांतील वचनांचा अर्थ मर्यादित करणें चूक आहे हें उघडच आहे.

कर्तव्यकर्म करीत असतां मरण येत असेल तर तें कर्म टाळावें असा ह्या श्लोकाचा अर्थ घेऊं नये. कारण तें कर्तव्यकर्म न करीत जिवंत राहणें होईल, आणि श्लोकांत तर कर्तव्यकर्म करीतच जिवंत राहणें हें अभिप्रेत आहे. कर्तव्यकर्में करण्याकरितां जिवंत राहण्याची इच्छा करावी, अर्थात् कर्तव्यकर्में केव्हाच टाकूं नयेत असा ह्या श्लोकांचा भाव आहे.

जैमिनीच्या मतें, ह्या श्लोकांत अभिप्रेत असलेलीं कर्में म्हणजे वेदोक्त अग्नीध्रनादि कर्में म्हणजेच अग्निहोत्र व यज्ञ, हीं होत. ह्या

अताचें व्याख्यानी ३।४ येथे खंडन करून हीं कर्मे वैकल्पिक ठरविलीं आणि शमदमादि कर्मे, प्राणधारणार्थक कर्म आणि आश्रमकर्मे हीं आवश्यक ठरविलीं. व्यासाचेंच मत ग्राह्य आहे. (व्याससूत्रें ३।४ वरील माझें विवरण पहा). एकंदरीत आवश्यक कर्तव्यकर्मे असा येथील कर्म शब्दाचा अर्थ आहे.

ज्ञानी मनुष्य कर्मेच करूं शकत नाही हा आक्षेपहि टिकूं शकत नाही. कारण ह्या उपनिषदाचा कर्ता जो याज्ञवल्क्य त्याने ज्ञानी झाल्यावरच जनकास उपदेश करण्याचें कर्म केलें. व्याससूत्र ४-१-१५ च्या भाष्यांत श्रीशंकराचार्यांनीहि, ज्ञानी देखील देहपातापर्यंत कर्मे करतो असें मान्य केलें आहे.

श्लोक ३

असुर्या नाम ते लोकाः अंधेन तमसा वृताः ।
तांस्तेऽप्रेत्याभिगच्छंति ये के चात्महनो जनाः ॥३॥

अर्थ—आत्मज्ञानामुळे होणारा जो आनंद त्याचा त्याग करणारे (आत्महनः) अर्थात् पहिल्या श्लोकांत टाकावयास सांगितलेल्या विषयग्रहणाच्या मागे लागलेले असे जे कोणी मनुष्य असतात त्यांना असुरांस प्राप्त होणारी (असुर्याः) गाढ अंधकाराने म्हणजेच अत्यंत दुःखाने व्यापलेली अवस्था (लोकाः) मरणापूर्वीच (अप्रेत्य) प्राप्त होते.

टिप्पणी:—"अप्रेत्य" असा पदच्छेद करावा, कारण त्याने उपपन्न असा फार सुंदर अर्थ होतो. बृहदारण्यकोपनिषदांतही हाच श्लोक थोडया फरकाने आलेला आहे. तेथील श्लोक असा—

अनंदा नाम ते लोका अंधेन तमसा वृताः ।
तांस्तेप्रेत्याभिगच्छंति अविद्वांसोऽबुधो जनाः ॥ ४-४-११

ईशोपनिषद् याज्ञवल्क्याने केलें व बृहदारण्यकोपनिषद् त्याच्या शिष्याने केलें हें त्या उपनिषदाच्या प्रकरणांत दाखविलें आहे. अर्थात् बृहदा-

रण्यकोपनिषदांतील हा श्लोकांत त्या शिष्याने ईशोपनिषदांतील या श्लोकाचाच अर्थ स्पष्ट करण्याकरिता हा श्लोकांत बदल केला असला पाहिजे. त्या बदलावरून ईशोपनिषदांतील श्लोकाचा अर्थ काय आहे तें समजून येतें. तें असें, आत्महन् म्हणजे अविद्वान् व अबुध् म्हणजे आत्म्याला न जाणणारा व त्यामुळे मूर्खपणा करणारा म्हणजे विषयसुखाच्या मागे लागणारा. अनंदाः म्हणजे आनंदरहित असा अर्थ आहे. ही अवस्था मरणापूर्वीहि असतेच म्हणून "अप्रेत्य" असा जो पदच्छेद मी करतो त्याला आधार मिळतो.

'लोक' म्हणजे 'अवस्था' हे उपनिषदांचा उपसंहार परिच्छेद २८ येथें दाखविलें आहे.

श्लोक ४–८

अनेजदेकं मनसो जवीयः ।
नैनद्देवाः आप्नुवन्पूर्वमर्षत् ।
तद्धावतोऽन्यानत्येति तिष्ठत् ।
तस्मिन्नपो मातरिश्वा दधाति ॥४॥

तदेजति तन्नैजति तद्दूरे तद्वन्तिके ।
तदंतरस्य सर्वस्य तदु सर्वस्यास्य बाह्यतः ॥५॥
यस्तु सर्वाणि भूतानि आत्मन्येवानुपश्यति ।
सर्वभूतेषु चात्मानं ततो न विजुगुप्सते ॥६॥

यस्मिन् सर्वाणि भूतानि आत्मैवाभूद्विजानतः ॥
तत्र को मोहः कः शोक: एकत्वमनुपश्यतः ॥७॥
स पर्यगाच्छुक्रमकायमव्रणम् ।
अस्नाविरं शुद्धमपापविद्धम् ॥
कविर्मनीषी परिभूः स्वयंभूः ।
याथातथ्यतोऽर्थान् व्यदधाच्छाश्वतीभ्यः समाभ्यः ॥८॥

अर्थः—हें आत्मतत्त्व एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं जाणारें असें नाही (अनेजत्). तें एकच (सर्व ठिकाणीं) आहे. अर्थात् तें मनापेक्षाहि वेगवान् आहे (असें म्हणतां येतें). पुढे पुढे धावणाऱ्या ह्या आत्मतत्त्वाला इंद्रियें [देवाः] पकडूं शकलीं नाहीत म्हणजे जाणूं शकलीं नाहीत. एकाच शरीरांत राहणारें [तिष्ठत्] हें आत्मतत्त्व धावणाऱ्या दुसऱ्या कोणाहेयाहि (मनाच्या रूपानें) अधिक पुढे जातें. त्याच्या करितांच [तस्मिन्] म्हणजे त्याला आनंदित करण्याकरितांच प्राण [मातरिश्वा] कर्मे [अपः] करतो [दधाति] ॥४॥ तें एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं (मनाच्या रूपानें) हालतें. परंतु वास्तविक तें हालत नाही. तें (जाणण्यास कठीण असल्यामुळे जणूं) दूर आहे. परंतु वास्तविक तें जवळच आहे कारण तें ह्या सर्वांच्या अंतरांतच आहे. [अंतर] ह्या सर्वांच्या बाहेरहि तें आहेच. ॥५॥ जो सर्वभूतें म्हणजे जीव आत्म्यांतच म्हणजे स्वतांमध्ये आहेत आणि सर्व जीवामध्ये आत्मा म्हणजे मी स्वतांच आहों असें पाहतो तो कोणाहि पासून स्वतःचें रक्षण करण्याची इच्छा करीत नाही म्हणजे कोणालाच भीत नाही किंवा कोणाचा द्वेष करीत नाही. ॥६॥ ज्या विद्वानाच्या दृष्टीने सर्व भूतें आत्माच बनले त्या एकत्व पाहणाऱ्या विद्वानाला कोणता शोक किंवा मोह होईल ? (होणार नाही हा भाव) ॥७॥ तोच आत्मा भोवताली म्हणजे चोहीकडे पसरला [पर्यगात्] (त्यामुळेच जग बनलें) तो आनंदरूपी तेजाने युक्त आहे [शुक्र]; तो शरीररहित आहे किंवा तो शरीर नव्हे, त्याला कधीच व्रण (जखम) होत नाही. त्याला स्नायु नाही. त्याला पाप कधीच लागत नाही म्हणून तो शुद्ध आहे. तो ज्ञानवान् आहे [कविः] तो बुद्धिमान् आहे [मनीषी]; तो स्वयंभू आहे म्हणजे स्वतांच आहे (म्हणजे त्याला दुसऱ्या कोणी उत्पन्न केलें नाही) तो सर्वांचा पराभव करणारा [परिभू] म्हणजे सर्वांना आपल्या कह्यांत ठेवणारा आहे. त्यानेच अनंत काळापूर्वी (शाश्व-

तीभ्यः समाभ्यः ) सर्व वस्तू जशा पाहिजेत तशा (याथातथ्यतः) करून ठेवल्या. ॥८॥

टिप्पणी—ज्या आत्मज्ञानाच्या अभावामुळे श्लोक ३ मध्ये वर्णिलेली दुर्गति प्राप्त होते तें आत्मज्ञान ह्या पाच श्लोकात सांगितलें आहे. ह्यात मुख्यतः आत्मा स्वतःच आनंद आहे. [शुक्रम्] आणि सर्वभूतीं एकच आहे ह्या गोष्टी सांगितल्या आहेत. आत्मा आणि जगन्निर्माता म्हणजे ईश्वर एकच होत असेंहि श्लोक ८ मध्ये सांगितलें आहे.

"अपः" = निघंटुमध्ये अध्याय २ च्या आरंभीच कर्मवाचक शब्द दिले आहेत. त्यामध्ये 'अपः' हा पहिलाच आहे. श्री शंकराचार्यांनीहि 'अप.' ह्याचा कर्म असाच अर्थ केला आहे.

उवटाचार्यांच्या भाष्यात 'विजुगुप्सते' ह्याऐवजी 'विचिकित्सति' असा पाठ आहे. त्याचा अर्थ 'आपण व दुसरा ह्यामध्ये भेद आहे असें मानण्याची चूक तो करीत नाही' असा होईल. (विचिकित्सति = चूक करतो) किंवा भेद आहे असा संशय घेत नाही असाहि उवटाचार्यांनुसार अर्थ घ्यावा.

श्लोक ९–११

अंधं तमः प्रविशन्ति येऽविद्यामुपासते ।
ततो भूय इव ते तमो य उ विद्यायां रताः ॥९॥
अन्यदेवाहुर्विद्यया अन्यदाहुरविद्यया ॥
इति शुश्रुम धीराणां ये नस्तद्विचचक्षिरे ॥१०॥
विद्यां चाविद्यां च यस्तद्वेदोभय सह ॥
अविद्यया मृत्युं तीर्त्वा विद्ययाऽमृतमश्नुते ॥११॥

अर्थ.—जे केवळ कर्मांची [अविद्या] उपासना करतात ते गाढ अंधकारात जातात. परंतु जे केवळ ज्ञानाची [विद्यायां] उपासना

फरतात, ते जणू त्या पेक्षाहि अधिक गाढ अशा अंधकारांत जातात. (हा अर्थ असमंजस आहे असेंच आजपर्यंतचे बहुतेक टीकाकार मानत आले. परंतु केवळ कर्माची उपासना करणारे पाश्चिमात्य लोक परस्परांशीं आज अत्यंत निकराने भांडत आहेत, व केवळ आत्मज्ञानाची उपासना करणारे भारतीय त्याच पाश्चिमात्यांचे गुलाम झाले होते हें पाहून तरी हा भ्रम नाहींसा होऊन ह्या श्लोकांतील सिद्धांत पटेल अशी मी आशा करतों. केवळ आत्मज्ञानांतच गढलेल्याची शरीरयात्रा देखील न चालल्यामुळे तो अधिक घोर अंधारांत पडेल. शरीरयात्रेकरितां त्याला दुसऱ्यावर अवलंबून राहावें लागेल व दुसऱ्याकडून मदत न मिळाली तर भुकतहानेने, शरीराने व मनाने तळमळत मरावें लागेल. केवळ कर्म करणारा निदान शरीराने तरी सुस्थितींत व सुखांत राहील, एकूण केवळ ज्ञानोपासकाचीच दुर्गति अधिक वाईट) ॥९॥ विद्येचें फळ दुसरें आहे आणि अविद्येचें फळ दुसरें आहे असें म्हणतात. हें आम्ही, ज्या शहाण्या लोकांनी आम्हांस सांगितलें त्यांपासून ऐकलें आहे. दोहोंची दोन भिन्न फळें आहेत व तीं दोनहि फळें मनुष्यास पाहिजेत. म्हणून कर्म आणि विद्या ह्यांचा समुच्चय केला पाहिजे, असा भावार्थ आहे. ॥१०॥ (तीं भिन्न फळें अशीं) विद्या व अविद्या म्हणजे कर्म हीं दोनहि जो एकदम [सह] जाणतो म्हणजेच ह्या दोहोंची जो एकदम उपासना करतो, तो कर्मांनी मृत्यूला टाळून (हीच गोष्ट स्पष्टपणें बृहदारण्यकोपनिषदांत यदिदमाहुः ...प्रयच्छति १।५।२ येथे सांगितली आहे) जीवंत राहतो, आणि ह्या रीतीने जिवंत असतांना विद्येने तो अमृताचा म्हणजे अत्यानंदाचा उपभोग मिळवितो. ॥११॥

टिप्पणी:—वर आत्मज्ञानाचें महत्त्व सांगून आत्मज्ञानहि सांगितलें. कर्महि करावें असें श्लोक १–२ मध्ये सांगितलें. आतां कर्म व ज्ञान ह्यांचें फळ कोणतें तें ह्या श्लोकांत सांगतात व त्यावरून

दोहोंचीहि आवश्यकता प्रतिपादतात ह्या श्लोकांतील "अविद्या" ह्या शब्दाचा अर्थ सर्व टीकाकारांनी "कर्म" असाच केला आहे; आणि संदर्भावरून तो तसाच ठरतो. ह्या श्लोकांमध्ये 'विद्या' व 'अविद्या' ह्यांचें फळ सांगितलें आहे. त्यांपैकीं 'विद्या' म्हणजे येथेंच सांगितलेलें आत्मज्ञान हा अर्थ उघड उघड निश्चित आहे. उवटाचार्यांनीहि हाच अर्थ घेतला आहे. अर्थात् "अविद्या" म्हणजे येथेंच सांगितलेली दुसरी गोष्ट जें कर्म तेंच असलें पाहिजे. "विद्या" म्हणजे "ज्ञान" असा सामान्य अर्थ आहे तरी तें "देवताज्ञान" होय असें श्रीशंकराचार्य म्हणतात तें चूक आहे. कारण ज्ञान ह्या मोघम शब्दावरून येथेंच *सांगितलेलें आत्मज्ञानच घेतलें पाहिजे हें उघड आहे. श्रीशंकराचार्यांनी* हा जो विशिष्ट अर्थ घेतला तो संन्यासप्रतिपादक उपनिषदांशीं समन्वय करण्याकरितां घेतला हें उघड आहे. "अविद्यया मृत्युं तीर्त्वा" ह्याचा अर्थ सनातनी लोक वेदोक्तकर्मांनी मनुष्य अजीबात मरणरहित होतो असा करतील. पण तो चूक आहे. कारण असें मरणराहित्य वेदांमध्ये कोठेंच सांगितलें नाही. उलट प्रजाच्या रूपानेच मनुष्य मरणरहित होतो असेंच सांगितलें आहे, असें आपस्तंब म्हणतो. त्याचें वाक्य असें आहे.

"अथाप्यस्य प्रजातिममृतमाम्नाय आह—
प्रजामनुप्रजायसे तदु ते मर्त्यामृतमिति"
(प्रश्न २ पटल ९ कंडिका २४ सूत्र १)

अर्थः—"हे मर्त्या, आपल्या संततीमध्ये तूं उत्पन्न होतोस हेंच तुझें अमृत म्हणजे मरणराहित्य होय." ह्या वचनाने वेदानें [आम्नायः] सांगितलें आहे की "संततिरूपानें जन्मणें हेंच मनुष्याचें मरणराहित्य होय." म्हणूनच वेदानें "प्रजाभिरग्ने अमृतत्वमश्याम" (अर्थः—संतति प्राप्त झाल्यानें आम्ही मरणराहित्य भोगावें) एवढेंच मागण्यास शिकविलें आहे. बृहदारण्यकोपनिषदांत १-५-२ येथेंहि एक वर्षपर्यंत

दुसऱ्या आहुति दिल्याने मनुष्य पुनःपुनः येणाऱ्या मृत्यूस जिंकतो असें कोणी म्हणतात तें खरें मानूं नये. कारण, ज्या दिवशीं हवन करतो म्हणजे इंद्रियांत अन्नाचें हवन करतो त्याच दिवशींचा मृत्यु [पुनर्मृत्यु = पुनःपुनः म्हणजे दररोज येणारा मृत्यु हा अन्नादिकांच्या अभावाने येतो.] जिंकतो असें स्पष्ट म्हटलें आहे. ब्रह्मवेत्ताहि मरतो असें तर अनेक ठिकाणीं सांगितलें आहे. विशेषतः बृहदारण्यकोपनिषत् ४।४।६–७ पहा. भगवद्गीता अध्याय २ येथील शेवटचा श्लोक "स्थित्वास्यामंतकालेऽपि ब्रह्मनिर्वाणमृच्छति" पहा. मुंडकोपनिषदांतील "ते ब्रह्मलोकेषु परांतकाले" (३।२।६–७) इत्यादि ह्यांतील "परांतकाले" हा शब्द हेंच सांगतो कीं ब्रह्मवेत्ताहि मरतो.

"अमृतम्" = "अमृत" म्हणजे आनंद असा अर्थ होतो असें उपनिषदाचा उपसंहार प्यारा २८ येथे दाखविलें आहे.

### श्लोक १२–१४

अंधं तमः प्रविशंति येऽसंभूतिमुपासते ॥
ततो भूय इव ते तमो य उ संभूत्यां रताः ॥१२॥
अन्येदेवाहुः संभवादन्यदेवाहुरसंभवात् ॥
इति शुश्रुम धीराणां येनस्तद्विचचक्षिरे ॥१३॥
संभूतिं च विनाशं च यस्तद्वेदोभयं सह ॥
विनाशेन मृत्युं तीर्त्वा संभूत्यामृतमश्नुते ॥१४॥

अर्थः—जे केवळ विनाशी वस्तूंची (असंभूति) उपासना करतात ते गाढ अंधकारांत जातात. परंतु जे केवळ अविनाशी [संभूति] वस्तूंची म्हणजे अविनाशी आत्म्याची उपासना करतात ते त्यापेक्षाहि गाढ अशा अंधकारांत जातात. ॥१२॥ अविनाशी वस्तूंचें फळ दुसरें आहे आणि विनाशी वस्तूंचें फळ दुसरें आहे असें म्हणतात. हें आम्ही, त्या शहाण्या लोकांनी आम्हांस सांगितलें त्यापासून ऐकलें

आहे. दोहोंची दोन भिन्न फळें आहेत व तीं दोनहि फळें मनुष्यास पाहिजेत म्हणून विनाशी व अविनाशी ह्या दोहोंच्या उपासनांचा समुच्चय केला पाहिजे असा भावार्थ आहे. ॥१३॥ (तीं भिन्न फळें अशीं) अविनाशी वस्तू व विनाशी वस्तू ह्या दोहोंनाहि जो एकदम [सह] जाणतो म्हणजे दोघांची उपासना एकदम करतो, तो विनाशी वस्तू उदाहरणार्थ, अन्न, पाणी, वस्त्र, घर, औषधें वगैरे ह्यांनी मृत्यूला तरून जातो म्हणजे जिवंत राहतो. आणि ह्या रीतीने जिवंत असतांना अविनाशी वस्तू जो आत्मा त्याने म्हणजे त्याविषयींच्या यथार्थ ज्ञानाने अमृताचा म्हणजेच अत्यानंदाचा, उपभोग मिळवितो. ॥१४॥

टिप्पणी:—श्लोक ९–११ वर जीं टिपणें आहेत तींच येथेहि वाचावींत. श्लोक ९ ते ११ च्या अर्थाप्रमाणेच ह्या श्लोकांचाहि अर्थ उपपन्न आहे हें उघड आहे.. कर्मानी विनाशी वस्तू प्राप्त होतात. आणि विद्येने अविनाशी वस्तू जो आत्मा त्याचें ज्ञान होतें हा संबंध लक्षांत ठेवला असतां श्लोक ९–११ नंतर श्लोक १२।१४ सांगण्याचें कारण समजेल.

श्लोक १५–१८

हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम् ॥
तत्त्वं पूषन्नपावृणु सत्यधर्माय दृष्टये ॥१५॥
पूषन्नेकर्षे यम सूर्य प्राजापत्य व्यूह रश्मीन् समूह ॥
तेजो यत्ते रूपं कल्याणतमं तत्ते पश्यामि ॥
योऽसावसौ पुरुषः सोहमस्मि ॥१६॥
वायुरनिलममृतं अथेदम् भस्मांतं शरीरम् ॥
ॐ क्रतो स्मर कृतं स्मर क्रतो स्मर कृतं स्मर ॥१७॥

अग्ने नय सुपथा राये अस्मान् ।
विश्वानि देव वयुनानि विद्वान् ॥
युयोध्यस्मज्जुहुराणमेनो ।
भूयिष्ठां ते नमउक्तिं विधेम ॥१८॥

अर्थः—सोन्याच्या झाकणाने म्हणजे चकाकून मोह पाडणाऱ्या विषयानंदाने सत्याचें म्हणजे आत्मानंदाचें तोंड झाकलें आहे म्हणजे आत्मानंदाचा मार्ग बंद केला आहे. हे पूषन् (आत्म्या) तें झाकण, सत्य हाच धर्म मानणारा जो मी त्याकरिता, दृष्टये म्हणजे ज्ञानाकरिता (म्हणजे त्या मला ज्ञान होण्याकरिता) तूं काढून टाक ॥१५॥ हे पूषन् (आत्म्या). (आत्म्याला पूषन् म्हणण्याचें कारण तोच प्राणाला पोषण म्हणजे शक्ति देतो), हे एकच असलेल्या ऋषे (ऋषि म्हणजे ज्ञानी), सर्वांचें संयमन करणाऱ्या यमा, आपल्या किरणांनी अज्ञानांधःकार पालविणाऱ्या सूर्या, प्रजापतीने म्हणजे आनंद नांवाच्या ब्रह्मदेवाने ज्याची पुरातन काळीं उपासना केली अशा आत्म्या, आपलीं ज्ञानरूपी किरणें चोहीकडे पसरीव, [व्यूह]. आपलें तेज चांगल्या रीतीने पसरीव, [समूह]. अशाकरितां की तुझें जें तेज म्हणजेच अत्यंत कल्याणकारक आनंदात्मक रूप तें मी पाहीन ॥ आणि तो तो (असौ असौ) जो (यो) पुरुष (शरीररूपी पुरांत राहणारा जीव) आहे तो तो मीच आहे म्हणजे सर्व जीव मीच आहे असेंहि पाहीन. ॥१६॥ मृत्युकाळीं वायु म्हणजे शरीरांतील प्राण न मरणाऱ्या [अमृत] अनिलांत म्हणजे सर्व जगांत वावरणाऱ्या वायुसंज्ञक शक्तींत जाऊन मिळतो. ('अयति' असा शब्द अध्याहृत घ्यावा लागतो शंकराचार्यहि येथे असा अध्याहार मानतात) आणि शरीराचा भस्मांतच अंत होतो म्हणजे मेल्यानंतर जीव पुनः जन्मत नाही असा भाव आहे. (बृहदारण्यकोपनिषद् ३।९।२८ पहा. तदनुसारच हा अर्थ करणें भाग आहे व केला आहे.) अर्थात् आनंदाच्या अनुभवाकरितां जिवंत

-राहणें हें कर्तव्य ठरतें व त्याकरितां सत्कर्म केलें पाहिजे. म्हणून हे [ॐ]क्रतो ! ( हे बुद्धे किंवा हे जीवा) चांगलें कर्म करण्याची [कृत] आठवण ठेव हे बुद्धे किंवा हे जीवा, चांगलें कर्म करण्याची आठवण ठेव. ॥१७॥ हे अग्ने ! सर्व विद्या, कला व शास्त्रें [वयुनानि] जाणणाऱ्या [विद्वान्] अग्ने ! आम्हास चांगल्या मार्गानें धनाकडे [राये] घेऊन जा आणि आमचे प्राण हरण करणाऱ्या कुटिल [जुहुराण] पापास (म्हणजे दारिद्र्यास, अन्नाद्यभावास), आमच्यातून [अस्मत्] युद्ध करून काढून टाक आम्ही तुला वारंवार पुष्कळ नमस्कार करतो

टिप्पणी—ज्ञान व कर्म दोनहि आवश्यक आहेत म्हणून आता श्लोक १५ ते १६ मध्ये ज्ञानाकरिता पूषाची म्हणजे आत्म्याची प्रार्थना केली आहे, व श्लोक १७ मध्ये कर्माची आवश्यकता दाखवून श्लोक १८ मध्ये कर्मांना धनाची आवश्यकता आहे म्हणून धनाकरिता अग्नीची म्हणजेच धन प्राप्त करून देणाऱ्या कर्मांसाठी आवश्यक असलेल्या सर्व विद्या व कला जाणणाऱ्या कर्मदेवतेची प्रार्थना केली आहे "क्रतु"—निघंटु ३।९ येथे प्रज्ञावाचक शब्दामध्ये 'क्रतु' आहे. म्हणून ह्याचा अर्थ बुद्धि किंवा बुद्धि ज्याला आहे तो जीव असाहि होईल ऐतरेयोपनिषदांत अध्याय ६ मध्ये जीववाचक शब्दांमध्ये "क्रतु" हाहि एक शब्द आहे

कर्म हेंच धन प्राप्त करून देऊ शकतें म्हणून "अग्नि" म्हणजे कर्म हें उघड आहे. अर्थात् येथील "अग्नि" ही कर्मदेवता मानली पाहिजे 'युयोधि'— 'युध्'चें पौन पुन्यदर्शक लोट् मध्यम पुरुषाचे रूप "योयुद्धि" व्हावें. त्याचा हा आर्षप्रयोग समजावा किंवा पाठभ्रष्ट समजावा.

---

# केनोपनिषद्

**काल व कर्ता**--हें सामवेदाचें उपनिषद् आहे. ह्याचा काल व कर्ता ह्याचा पत्ता लागत नाही, कारण ह्यात काल्पनिक व्यक्तीचें देखील नाव आलें नाही. पण हें छंदोबद्ध असल्यामुळे भगवद्गीतेच्या पूर्वीचें असावें. भगवद्गीतेच्या पूर्वी काही उपनिषदें झालीं होतीं हें निश्चित आहे; कारण भगवद्गीतेंतील "ऋषिभिर्बहुधा गीतं छंदोभिर्विविधैः पृथक्" (१३-४) ह्या वचनावरून निश्चितपणें दिसतें की काही छंदोबद्ध उपनिषदें भगवद्गीतेपूर्वी झालीं होतीं व "ऋषिभिः" ह्या बहुवचनावरून तीं कमीत कमी तीन तरी असावींत. आता छंदोबद्ध उपनिषदें बरोबर ईश, केन, कठ, मुंडक आणि प्रश्न एवढींच आहेत. त्यांपैकी ईश हें जनमेजयाच्या राज्यात झाल्याचें ईशाच्या प्रकरणात दाखविलेंच आहे. अर्थात् तें भगवद्गीतेनंतरचें ठरतें; कारण भगवद्गीता भारतीय युद्धानंतर तीन वर्षांच्या आतच तयार झाली असें मी "उपनिषत्कालनिर्णय" ह्या प्रकरणात दाखविलें आहे. इतर चार उपनिषदें म्हणजे केन, प्रश्न, कठ आणि मुंडक हीं भगवद्गीतेपूर्वीचीं ठरतात.

**घटनेची योजनाः**—पहिल्या श्लोकांत शिष्याचा प्रश्न आहे आणि नंतर सर्व त्याचें उत्तर आहे. उपनिषदाचे चार खंड आहेत. त्यांपैकी प्रथम खंडांत सर्व इंद्रियांच्या व्यापाराच्या बुडाशीं ब्रह्मच आहे असें सांगितलें आहे. दुसऱ्या खंडात त्या ब्रह्माचें ज्ञान व अनुभव कसा होतो तें सांगून त्यापासून अमृत (आनंद) कसें प्राप्त होतें तें

दाखविलें आहे. तिसरा खंड व चवथ्या खंडाचे पहिले पांच श्लोक ह्यांत जगातील व शरीरांतील सर्व व्यापार ब्रह्माच्या शक्तीनेच चालतात व त्या ब्रह्माचें ज्ञान मनुष्यास (जीवास) बुद्धीने होतें असें परोक्षवादाने सांगितलें आहे. खंड ४ श्लोक ६–८ ह्यात ब्रह्माची उपासना कशी करावी तें सांगितलें आहे. खंड ४ श्लोक ९ मध्ये त्या उपासनेचें फळ सांगितलें आहे.

ह्या उपनिषदाची भाषा बरीच दुर्बोध असल्यामुळे कोठे 'अन्वय'हि दिला आहे.

खंड १, श्लोक १

ॐ केनेषितं पतति प्रेषितं मनः ।
केन प्राणः प्रथमः प्रैति युक्तः ॥
केनेषितां वाचमिमां वदंति ।
चक्षुः श्रोत्रं क उ देवो युनक्ति ॥१॥

अर्थः—कोणी प्रेरणा केल्यामुळे प्रेरित झालेलें मन आपल्या विषयावर जाऊन पडतें. कोणी प्रेरणा केल्यामुळे [युक्तः] श्रेष्ठ [प्रथम] प्राण म्हणजे श्वासोच्छ्वास चालतो [प्रैति]. कोणी प्रेरणा केल्यामुळे ही वाणी मनुष्य बोलतात. डोळा आणि कान ह्यांना कोणता देव प्रेरणा करतो ? ॥१॥

टिप्पणी—"*प्रथमः प्राण.*"–प्रथम म्हणजे श्रेष्ठ. "*प्रथमः प्राणः*" म्हणजे सर्व प्राणामध्ये श्रेष्ठ. प्राण म्हणजे येथेंच सांगितलेले, प्राण, चक्षुष्, श्रोत्र, वाणी आणि मनस् हे पाच किंवा बृहदारण्यक ४।४।२ येथे सांगितलेले चक्षुष, घ्राण, रसनेंद्रिय, वाणी, श्रोत्र, मनस्, स्पर्शेंद्रिय हीं सात आणि स्वतः प्राण अशीं आठ (कारण तेथे ह्या पहिल्या साताना प्राण असें म्हटलें आहे आणि मुंडक २।१।८ येथेंहि त्याना सात प्राण असें म्हटलें आहे) किंवा प्रश्नोपनिषदांत ३।४-७-

येथे वर्णिलेले अपान, प्राण, समान, व्यान आणि उदान ( ह्यापैकी चक्षु श्रोत्रमुखनासिका ह्यात राहणारा प्राण हाच श्रेष्ठ आहे असा प्रश्नोपनिषदाचा भाव आहे) कालत्यादि प्रकारें प्रथम प्राण म्हणजे श्वासोच्छ्वास करणारा प्राण, कारण तो असेपर्यंतच शरीर जिवंत असतें.

ह्या उपनिषदात वर्णिलेल्या चक्षुर् श्रोत्र,मन, प्राण आणि वाणी ह्याना छांदोग्योपनिषद् ३।१३ येथें ब्रह्मद्वार म्हटलें आहे अर्थात् यांचेंच येथे वर्णन केलें आहे

खंड १, श्लोक २

श्रोत्रस्य श्रोत्रं मनसो मनो यद्वाचो ह वाच ।
स उ प्राणस्य प्राण चक्षुषश्चक्षुरतिमुच्य धीरा ।
प्रेत्यास्माल्लोकादमृता भवंति ॥२॥

**अर्थ**—श्रोत्रातील श्रोत्र म्हणजे श्रवणशक्ति, मनातील मन म्हणजे मननशक्ति, वाणींतील वाणी म्हणजे वाक्शक्ति, प्राणातील प्राण म्हणजे श्वसनशक्ति, डोळ्यातील डोळा म्हणजे दर्शनशक्ति तो आत्माच म्हणजे ब्रह्मच होय (स उ) त्याला शरीरापासून व इंद्रिया पासून सोडवून मेऊन [ अतिमुच्य ] म्हणजे तो ह्या शरीराहून व इंद्रियाहून भिन्न (वेगळा) आहे असें जाणून मेऊन शहाणे लोक [धीरा ] ह्या अज्ञानावस्थेंतून [अस्माल्लोकात] निघून जाऊन [प्रेत्य] आनंदाचा उपभोग घेणारे [अमृता ] होतात ॥२॥

**टिप्पणी**—"अस्मात् लोकात् —लोक म्हणजे अवस्था असा अर्थ उपनिषदात पुष्कळ ठिकाणीं आहे बृहदारण्यकोपनिषदात ४।३।२० येथे "अहमेवेद सर्वोस्मीति मन्यते सोऽस्य परमो लोक" ह्या वाक्यात 'लोक' ह्याचा अर्थ 'अवस्था' असाच होऊ शकतो. त्याच उपनिषदांत ४।३।३३ "अथ ये शत प्रजापतिलोक आनंदा- ॥ एको ब्रह्मलोक

आनंदो यश्च श्रोत्रियोऽवृजिनोऽकामहतः अथ एष एव परम आनंदः एष ब्रह्मलोकः सम्राट्' ह्यांतहि 'ब्रह्मलोकः सम्राट्' येथील लोक हा शब्द अवस्थावाचकच आहे. ज्ञानावस्थेला परम लोक किंवा ब्रह्मलोक म्हटलें तर तत्पूर्वीच्या अज्ञानावस्थेस 'हा लोक' 'अयम् लोकः' म्हणणें न्याय्यच आहे; म्हणून 'अस्माल्लोकात्' ह्याचा अर्थ 'हा अज्ञानावस्थेंतून' असा आम्ही केला आहे. श्री शंकराचार्यंहि असाच अर्थ करतात.

'अमृताः'—'अमृत' म्हणजे 'आनंदवान्' असाहि अर्थ होतो असें 'उपसंहार' त्यारा २८ येथे दाखविलें आहे.

खंड १ श्लोक ३

न तत्र चक्षुर्गच्छति न वाग्गच्छति नो मनो ।
न विद्मो न विजानीमो यथैतदनुशिष्यात् ॥
अन्यदेव तद्विदितादथो अविदितादधि ।
इति शुश्रुम पूर्वेषां ये नस्तद्व्याचचक्षिरे ॥३॥

अर्थ.—त्या ब्रह्माला डोळा पाहूं शकत नाही. वाणी त्याचें पूर्णपणें वर्णन करूं शकत नाही. आम्ही त्याला पूर्णपणें जाणत नाही [विद्मः]. शिष्याला तें कसें समजवून द्यावें हेंहि आम्ही जाणत नाही. ब्रह्म शिष्यास समजवून देणें फार कठीण आहे असा भाव आहे. तें आपणलेल्या वस्तूहून भिन्न [अन्यत्] आहे आणि न जाणलेल्या वस्तूहूनहि तें भिन्न [अधि] आहे. (म्हणजे तें पूर्णपणें ज्ञातहि नाही आणि पूर्णपणें अज्ञातहि नाही हा भावार्थ आहे) ज्यांनी आम्हास तें सांगितलें त्या जुन्या लोकांपासून [पूर्वेषां] हें आम्ही ऐकलें आहे. ॥३॥

टिपणी:—श्लोकाच्या पूर्वार्धाच्या भाषांतरांत "पूर्णपणें" हे शब्द घालण्याचें कारण असें आहे की उत्तरार्धाच्या भावार्थास अनुसरून तसें करणें आवश्यक आहे.

"इति शुश्रुम" इत्यादि शेवटच्या ओळीसारखीच ओळ ईशोपनिषदांतहि दहाव्या आणि तेराव्या श्लोकांत आहे. पण तेथें "पूर्वेषां" ह्या ऐवजीं "धीराणां" असा शब्द आहे. ह्यावरून दिसतें की केनांतील्च श्लोक ईशकर्त्यानें सुधारून घेतला. अर्थात् ईशोपनिषद् केनानंतरचें आहे.

खंड १ श्लोक ४ ते ८

यद्वाचानभ्युदितं येन वागभ्युद्यते
तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ॥४॥
यन्मनसा न मनुते येनाहुर्मनो मतम् ।
तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदम् यदिदमुपासते ॥५॥
यच्चक्षुषा न पश्यति येन चक्षूंषि पश्यति ।
तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ॥६॥
यच्छ्रोत्रेण न शृणोति येन श्रोत्रमिदं श्रुतम् ।
तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ॥७॥
यत्प्राणेन न प्राणिति येन प्राणः प्राणीयते ।
तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ॥८॥

अर्थः—जें वाणीकडून पूर्णपणें वर्णिलें जाऊं शकत नाहीं, पण ज्यामुळेंच मनुष्याकडून वाणी उच्चारली जाते तेंच ब्रह्म होय असें तूं जाण. ज्या ह्याची म्हणजेच प्रतीकाची म्हणजेच मूर्तीची लोक उपासना करतात हें ब्रह्म नव्हे. ॥४॥ ज्याचा मनानें पूर्णपणें विचार करतां येत नाहीं (मनुते) पण ज्यामुळेच मनाच्या विषयांचा [मनः] विचार केला जातो [मतम्] असें म्हणतात, तेंच ब्रह्म होय असें तूं जाण. ज्या ह्याची इत्यादि मागील श्लोकांप्रमाणें. ॥५॥ ज्याला मनुष्य डोळ्यानें पाहूं शकत नाहीं पण ज्यामुळेच डोळ्यांच्या विषयांना [चक्षूंषि] मनुष्य पाहूं शकतो तेंच ब्रह्म होय असें तूं जाण. ज्या ह्याची,

इत्यादि मागील श्लोकाप्रमाणे. ॥६॥ ज्याला मनुष्य कानानें ऐकूं शकत नाहीं पण ज्यामुळेच कानाच्या विषयांना [इदं श्रोत्रं] मनुष्य ऐकूं शकतो तेंच ब्रह्म तूं जाण. ज्या ह्याची इत्यादि मागील श्लोकांप्रमाणे. ॥७॥ ज्याचा वर ओढलेल्या श्वासानें [प्राणेन] वाव घेतां येत नाहीं [प्राणिति] पण ज्यामुळेच मनुष्याकडून श्वास [प्राणः] वर ओढल्या जातो [प्राणीयते] तेंच ब्रह्म तूं जाण; ज्या ह्याची इत्यादि मागील श्लोकाप्रमाणे. ॥८॥

टिप्पणीः—श्लोक ४ व ५ येथें "पूर्णपणें" हे शब्द घालण्याचें कारण असें की श्लोक ३ मध्ये आणि दुसऱ्या खंडातील श्लोक १।२ मध्ये सांगितल्याप्रमाणें ब्रह्म पूर्णपणें ज्ञातहि नाहीं. आणि पूर्णपणें अज्ञातहि नाहीं. रामानुजपंथीय रंगरामानुजाचार्यांनीहि "वेदवाण्या साकल्येन नोक्तं" असा "अनभ्युदितं" ह्याचा अर्थ केला आहे आणि "यन्मनसा न मनुते" ह्याचाहि असाच अर्थ केला आहे. आम्हीहि तसेंच केलें आहे.

आठव्या श्लोकाचा आम्ही केलेला अर्थ कित्येकांस चुकीचा वाटेल. पण तसा अर्थ करणें भाग आहे. कारण प्राण म्हणजे गंधज्ञानशक्ति एवढाच अर्थ घेतला तर त्याशीं प्राणाला प्रथमः म्हणजे श्रेष्ठः असें जें विशेषण पूर्वी लागलें आहे तें जुळत नाहीं. म्हणून प्राण म्हणजे श्वास असा अर्थ आम्ही घेतला आहे. "यत्प्राणेन न प्राणिति" ह्याचा अधिक चांगला अर्थ "जें श्वास वर ओढल्यानें जिवंत रहात नाहीं" असाहि करतां येईल; पण त्यांत एक अडचण आहे व ती हीच की मागील श्लोकांप्रमाणे "यत्" हें द्वितीयांत पद न घेतां तें येथे प्रथमांत घ्यावें लागतें. ही अडचण न मानली तर "जें श्वास वर ओढल्यानें जिवंत रहात नाहीं" हाच अर्थ जास्त सरस आहे. मनः, चक्षूंपि, श्रोत्रं ह्या पांचव्या, सहाव्या व सातव्या श्लोकांतील द्वितीय पादांतील शब्दांचा लक्षणेनें मनाचे विषय, डोळ्याचे विषय.

आणि श्रोत्राचे विषय असे अर्थ करावे लागतात हें उघड आहे. श्री शंकराचार्यांनीहि 'चक्षूंषि' म्हणजे 'चक्षुर्वृत्ती' असा अर्थ केला आहे.

## खंड २

### खंड २ श्लोक १-२

यदि मन्यसे सुवेदेति । दभ्रमेवापि नूनं त्वं वेत्थ ब्रह्मणो रूपम् ॥
यदस्य त्वं यदस्य देवेष्वथ नु मीमांस्यमेव ते मन्ये विदितम् ॥१॥

नाहं मन्ये सुवेदेति । नो न वेदेति वेद च ॥
यो नस्तद्वेद तद्वेद । नो न वेदेति वेद च ॥२॥

अन्वय --(हे शिष्य) यदि (ब्रह्म) सुवेद इति मन्यसे, अपि (=तदपि) त्वं ब्रह्मणो रूपं दभ्रमेव नूनम् वेत्थ ॥ अस्य (ब्रह्मणः) त्वं यत्, देवेषु अस्य (ब्रह्मण) यत्, तत् त्वं नूनं दभ्रमेव वेत्थ ॥ अथ नु (ब्रह्म) मीमांस्यमेव (इति मन्यसे), (तत्) ते (त्वया) (ब्रह्म) विदितम् इति मन्ये ॥१॥ "मन्ये (ब्रह्म) सुवेद" इति (यः) न आह, (ब्रह्म) न वेद इति (च यः) नो आह स (वेद) च ॥ नः यः तद्वेद तद्वेद (आह), नो (वेद) न वेद इति च (आह) (स) च वेद ॥२॥

अर्थ --हे शिष्या, 'मी ब्रह्म चांगलें (पूर्णपणें) जाणलें' असें जरी तू मानतोस, तरी देखील तू तें ब्रह्माचें रूप अल्पच [दभ्रमेव] जाणलेंस हें निश्चित आहे (नूनम्) ॥ त्या ब्रह्माचा तू कितवा भाग आहेस [यत्] आणि देवांमध्ये म्हणजे इंद्रियांमध्ये आणि अग्नि, वायु वगैरे शक्तींमध्ये त्या ब्रह्माचा कितवा भाग आहे [यत्] तें तू अल्पच जाणलेंस हें निश्चित आहे ॥ हे शिष्या, आता [अथ नु] जर तू असें मानशील की [मन्यसे] 'ब्रह्माची मला अजून मीमांसा (म्हणजे विचारच) करावयाची आहे म्हणजे मी ब्रह्म अजून जाणलें नाही,' तर मला वाटतें की तू तें ब्रह्म जाणलेंस ॥१॥ जो "मी ब्रह्म

पूर्णपणे जाणतो" असें आणि "मी ब्रह्म जाणत नाही" असें म्हणत नाही तो ब्रह्म जाणतो ॥ तसेंच आपणांपैकी जो "मी ब्रह्म जाणतों, "मी ब्रह्म जाणतों" आणि "मी ब्रह्म जाणत नाही", "मी ब्रह्म जाणत नाही" असें दोनहि म्हणतो, तो ब्रह्म जाणतो ॥२॥ ब्रह्म अंशतःच जाणतां येतें, असा भावार्थ आहे आणि तोच पुनः पुढील श्लोकांत सांगितला आहे.

खंड २, श्लोक ३

यस्यामतम् तस्य मतम् मतम् यस्य न वेद सः ॥
अविज्ञातम् विजानताम् विज्ञातमविजानताम् ॥३॥

अर्थ--ज्याला वाटतें की मी ब्रह्म जाणलें नाही [अमतम्] त्याने तें जाणलेलें असतें. आणि ज्याला वाटतें की मी ब्रह्म जाणलें त्याने तें जाणलेलें नसतें. ज्याला वाटतें की आपणाला ब्रह्माचें विशेष ज्ञान झालें [विजानताम्] त्याला ब्रह्माचें विशेष ज्ञान झालेलें नसतें आणि ज्यांना वाटतें की आपणाला ब्रह्माचें विशेष ज्ञान झालेलें नाही त्यांना ब्रह्माचें विशेष ज्ञान झालेलें असतें. (कारण ब्रह्माचें पूर्णपणें ज्ञान होऊं शकत नाही एवढें तरी त्याने जाणलें असतें.)

खंड २, श्लोक ४

प्रतिबोधविदितं मतममृतत्वं हि विंदते ॥
आत्मना विंदते वीर्यं विद्यया विंदतेऽमृतम् ॥४॥

अन्वय--प्रतिबोधविदितं (ब्रह्म) मतं (चेत्) अमृतत्वं हि विंदते ॥ आत्मना वीर्यं विंदते विद्यया अमृतम् विंदते ॥

अर्थ--प्रत्येक बोधाच्या वेळीं जाणलें जाणारें म्हणजे अनुभविलें जाणारें ब्रह्म जर [चेत्] विचार केलें गेलें तर, म्हणजे विचार करून तें दुःखरहित आहे असें ठरविलें गेलें तर, त्या तसें ठरविणाऱ्या मनुष्याला अत्यानंदाची [अमृतत्वम्] प्राप्ति होते. (बोध म्हणजे

जागृतीमध्ये जें जें अनेक वस्तूंचें किंवा कल्पनांचें ज्ञान होतें तें अशा प्रत्येक बोधाच्या वेळीं ब्रह्म अनुभवलें जातें हें उघड आहे. बोध जागृतींतच असतो. झोपेंत, मूर्च्छेत, किंवा निर्विकल्प समाधींत बोध नसतो व त्यामुळे त्यावेळीं ब्रह्माचा बोधहि नसतो (कठवल्ली ६।१ १२-१३ व त्यावरील आमचें विवरण पहा) बोधाशिवाय ब्रह्माचा अनुभव नाही आणि बोध जागृतींतच असतो आणि जागृति शरीराशिवाय असत नाही, म्हणून पुढील वाक्यात सांगितलें आहे की) शरीराने [आत्मना] वीर्य म्हणजे बोधशक्ति प्राप्त होते आणि बोधाच्या वेळीं विद्येने म्हणजे ब्रह्म दुःखरहित आहे ह्या ज्ञानाने अत्यंत आनंद [अमृत] प्राप्त होतो. (ईशोपनिषद् श्लोक ११ येथेहि हेंच सांगितलें आहे)

टिप्पणें—हा श्लोक फारच महत्त्वाचा आहे ब्रह्म कसें जाणलें जावें व आनंद कसा प्राप्त होतो हें म्हणजे उपनिषदाचें रहस्य ह्यात सांगितलें आहे. बोध जागृतींतच असतो मूर्च्छेत, झोपेंत किंवा निर्विकल्पसमाधींतहि एक प्रकारचा बोध असतो असें कोणी म्हणतील, पण तो बोध आहे असा बोध त्या अवस्थांत नसतो, म्हणून तो त्या अवस्थातील बोध "बोध" ह्या संज्ञेस पात्र नाही जागृतींतच बोधाच्या वेळींच, त्या बोधाहून बोद्धृ ब्रह्म (आत्मा) भिन्न आहे व तें दुःखरहित आहे असें ज्ञान होऊ शकतें आणि त्यामुळे आनंदाचा अनुभव प्राप्त होऊ शकतो

"आत्मना"—आत्मा म्हणजे शरीर असाहि अर्थ आहेच मनुस्मृति १२।१२ येथे "आत्मा" ह्याचा अर्थ "शरीर" असा आहे उपनिषदामध्ये "अध्यात्म" हा शब्द वारंवार येतो व तेथे त्याचा अर्थ "शरीरातील" असा असतो म्हणजे "अध्यात्म" ह्या शब्दातील "आत्मा" हा शब्द शरीरवाचक आहे असें ठरतें येथेहि 'आत्मा' हा शब्द शरीरवाचकच घेतला पाहिजे कारण तसें केल्याशिवाय

उपपन्न अर्थ निघत नाही श्री शंकराचार्य 'आत्मना' ह्याचा अर्थ 'स्वेन स्वरूपेण' असा करतात ते म्हणतात, "आत्मना स्वेन स्वरूपेण विंदते लभते वीर्यं बल सामर्थ्यं। धनसहायमंत्रौषधियोगकृत वीर्यं मृत्युं न शक्नोत्यभिभवितुमनित्यवस्तुकृतत्वात्। आत्मविद्याकृत तु वीर्यं आत्मनैव विंदते नान्येनेत्यतोऽनन्यसाधनत्वादात्मविद्यावीर्यस्य तदेव वीर्यं मृत्युं 'शक्नोत्यभिभवितुम्।" ह्यात "आत्मविद्येने मृत्यूस जिंकण्याचें सामर्थ्य मिळतें" असा श्री शंकराचार्यांचा अर्थ दिसतो पण "अविद्यया मृत्युं तीर्त्वा" असें ईशांत म्हटलें आहे त्याशीं तें विरुद्ध आहे.

### खंड २ श्लोक ५

इह चेदवेदीदथ सत्यमस्ति ।
न चेदिहावेदीन्महती विनष्टिः ॥
भूतेषु भूतेषु विचित्य धीराः ।
प्रेत्यास्माल्लोकादमृता भवन्ति ॥५॥

अर्थ—इह म्हणजे मरणापूर्वी जर तें ब्रह्म जाणलें तर सत्य वस्तू मिळविली असें होईल, नाहीतर मोठाच नाश होईल. सर्व प्राण्यामध्ये [भूतेषु भूतेषु] तें ब्रह्म आहेच असा निश्चय केल्याने [विचित्य] शहाणे लोक [धीरा] ह्या अज्ञानावस्थेंतून [अस्माल्लोकात्] निघून जाऊन [प्रेत्य] आनंदाचा उपभोग घेणारे होतात [अमृता भवन्ति] ॥५॥

टिप्पणी—खंड १ श्लोक २ वरील टिप्पणी पहा

'विचित्य' ह्याचा खरा अर्थ 'गोळाकरून' असा आहे 'सर्वभूतातून ब्रह्म गोळा करून' म्हणजेच, सर्वभूतात ब्रह्म आहे असें ठरवून.

खंड ३

ब्रह्म ह देवेभ्यो विजिग्ये
तस्य ह ब्रह्मणो विजये देवा अमहीयंत ।
त ऐक्षतास्माकमेवायम् विजयोऽ
स्माकमेवाय महिमेति ॥१॥
तद्धैषां विजज्ञौ तेभ्यो ह प्रादुर्बभूव
तन्न व्यजानत किमिदं यक्षमिति ॥२॥
तेऽग्निमब्रुवन् जातवेद
एतद्विजानीहि किमेतद् यक्षमिति ॥३॥
तथेति तदभ्यद्रवत्तमभ्यवदत्कोऽसी—
त्यग्निर्वा अहमस्मीत्यब्रवीत्
जातवेदा वा अहमस्मीति ॥४॥
तस्मिंस्त्वयि किं वीर्यम्
इत्यपीदं सर्वं दहेय यदिदं पृथिव्यामिति ॥५॥
तस्मै तृणं निदधावेतद्दहेति
तदुपप्रेयाय सर्वजवेन
तन्न शशाक दग्धुं स तत एव निववृते
नैतदशकं विज्ञातुं यदेतद्यक्षमिति ॥६॥
अथ वायुमब्रुवन् वायवेतद्विजानीहि
किमेतद् यक्षमिति ॥७॥
तथेति तदभ्यद्रवत्तमभ्यवदत्कोऽसीति
वायुर्वा अहमस्मीत्यब्रवीत्
मातरिश्वा वा अहमस्मीति ॥८॥

तस्मिंस्त्वयि किं वीर्यम्
इत्यपीद सर्वमाददीय यदिद पृथिव्यामिति ॥९॥
तस्मै तृण निदधावेतदादत्स्वेति
तदुपप्रेयाय सर्वजवेन
तन्न शशाकादातु स तत एव निववृते
नैतदशक विज्ञातु यदेतद् यक्षमिति ॥१०॥
अथेंद्रमब्रुवन् मघवन्नेतद्विजानीहि ।
किमेतद् यक्षमिति ।
तथेति तदभ्यद्रवत्तस्मात्तिरोदधे ॥११॥
स तस्मिन्नेवाकाशे स्त्रियमाजगाम
बहुशोभनामुमां हैमवतीम् ।
ता होवाच किमेतद् यक्षमिति ॥१२॥

**अर्थ**—ब्रह्माने देवाना जय मिळवून दिला त्या ब्रह्माने मिळवून दिलेल्या जयाने देवाना मोठेपणा प्राप्त झाला (त्यामुळे) देवाना वाटलें की आपणच हा विजय मिळविला आणि आपलाच हा मोठेपणा आहे ॥१॥ ब्रह्माने देवाना झालेला हा (गर्व) जाणला आणि त्याच्या पुढे तें ब्रह्म प्रकट झालें तेव्हा हा कोण यक्ष आहे तें देवानी ओळखलें नाही ॥२॥ व देव अग्नीला म्हणाले, 'हे जातवेदा, हा कोण यक्ष आहे तें तू जाणून घे "॥३॥ "होय मी तें करतो', असें म्हणून अग्नि ब्रह्माकडे गेला ब्रह्माने त्याला विचारलें, "तू कोण आहेस ? " अग्नि म्हणाला, 'मी अग्नि आहें मी जातवेद आहें" ॥४॥ ब्रह्माने विचारलें "त्या तुझ्या ठिकाणी कोणतें सामर्थ्य आहे" अग्नि म्हणाला, 'पृथ्वीवर जें काही आहे तें सर्व मी जाळू शकतो "॥५॥ तेव्हा ब्रह्माने त्याच्यापुढे गवताची काडी टाकली आणि "ही जाळ" असें ब्रह्म म्हणाले तेव्हा अग्नि आपल्या सर्व

शक्तीने त्या गवताच्या काडीवर धावला पण ती तो जाळूं शकला नाही. तेव्हा तो ब्रह्मापासून परत (देवाकडे) गेला आणि म्हणाला, "हा कोण यक्ष आहे तें मी जाणूं शकलों नाही". ॥६॥ नंतर ते देव वायूला म्हणाले, 'हे वायो, हा कोण यक्ष आहे तें तूं जाणून घे.' ॥७॥ 'होय, मी तें करतो' असें म्हणून वायु ब्रह्माकडे गेला. ब्रह्माने त्याला विचारलें 'तूं कोण आहेस?' वायु म्हणाला, 'मी वायु आहें. मी मातरिश्वा आहें.' ॥८॥ ब्रह्माने विचारलें, 'त्या तुझ्या ठिकाणीं कोणतें सामर्थ्य आहे?' वायु म्हणाला पृथ्वीवर जें कांही आहे तें सर्व मी उडवूं शकतों (हालवूं शकतों)' [आदादं] ॥९॥ तेव्हा ब्रह्माने त्याच्या पुढे गवताची काडी टाकली आणि "ही उडव" असें ब्रह्म म्हणालें. तेव्हा वायु आपल्या सर्व शक्तीने त्या गवताच्या काडीवर धावला. तो ती काडी उडवूं शकला नाही. तेव्हा तो ब्रह्मापासून परत (देवाकडे) गेला आणि म्हणाला, "हा कोण यक्ष आहे तें मी जाणूं शकलों नाही." ॥१०॥ नंतर ते देव इंद्राला म्हणाले, "हे इंद्रा, हा कोण यक्ष आहे तें तूं जाणून घे" "होय मी तें करतो." असें म्हणून इंद्र त्या ब्रह्माकडे गेला. त्याला पाहून [तस्मात्] किंवा त्याच्या समोर ब्रह्म दिसेनासें झालें. ॥११॥ पण त्याच आकाशांत एक स्त्री त्याला दिसली. तिचें नाम उमा; ती फार सुंदर [बहुशोभमना] आहे आणि तिने सोन्याचे दागिने घातले आहेत [हैमवती]. तिला त्याने विचारलें, "हा कोण यक्ष आहे?" ॥१२॥

## खंड ४

### खंड ४—१ ते ३

सा ब्रह्मेति होवाच ।
ब्रह्मणो वा एतद्विजये महीयध्वम् इति ॥
ततो हैव विदांचकार ब्रह्मेति ॥१॥

तस्माद्वा एते देवा अतितरामिवान्यान् देवान् ।
यदग्निर्वायुरिंद्रस्ते ह्येनन्नेदिष्ठं पस्पृशुः
ते ह्येनत्प्रथमो विदांचकार ब्रह्मेति ॥२॥

तस्माद्वा इंद्रोऽतितरामिवान्यान् देवान् ।
स ह्येनन्नेदिष्ठं पस्पर्श
स ह्येनत्प्रथमो विदांचकार ब्रह्मेति ॥३॥

अर्थः—उमा म्हणाली, 'अरे! तें ब्रह्म होय. ब्रह्माने विजय मिळवून दिल्यानेच तुम्ही मोठे झालां. त्यावरून इंद्राने तें ब्रह्म होय असें जाणलें. वरील हकीकत घडली तीवरून [तस्मात्] दिसून येतें की, अग्नि, वायु आणि इंद्र हे देव इतर देवांहून वरचढ आहेत, [अतितराम्] कारण ब्रह्माच्या अतिनिकट [नेदिष्ठं] जाऊन त्यांनी ब्रह्मास स्पर्श केला आणि ब्रह्म प्रत्यक्ष स्वतः (दुसऱ्याच्या सांगण्यावरून नव्हे) [प्रथमो] जाणून घेतलें. ॥२॥ वरील हकीकत घडली तीवरून [तस्मात्] दिसून येतें कीं इंद्र हा इतर देवांहून वरचढ आहे. कारण ब्रह्माच्या अतिनिकट जाऊन त्याने ब्रह्मास स्पर्श केला आणि ब्रह्म प्रत्यक्ष स्वतःच्या बुद्धीने (दुसऱ्याच्या सांगण्यावरून नव्हे) [प्रथमो] जाणून घेतलें. ॥३॥

टिप्पणी—वरील खंड ३, आणि खंड ४–१–३ ह्यांचा शाब्दिक अर्थ समजणें फारच सोपें आहे. पण हा परोक्षवाद आहे हें उघड आहे. हा परोक्षवाद उलगडला पाहिजे. असा थोडासा प्रयत्न श्री शंकराचार्यांनी केला आहे. ते उमा म्हणजे विद्या असें म्हणतात. इंद्रापुढे ब्रह्म तिरोधान पावलें ह्याचें कारण इंद्राचा इंद्र म्हणजे सामर्थ्यसंपन्न असल्याचा अभिमान अगदीच काढून टाकावा म्हणून ब्रह्माने तसें केलें, असेंहि श्री शंकराचार्य म्हणतात. पण हें बुद्धीस पटत नाहीं; कारण ह्यावरून जगांत घडणाऱ्या कोणत्या गोष्टीचा

निर्देश होतो तें कळत नाही. हा परोक्षवाद दोन विषयासंबंधानें उलगडावयाचा आहे एक अधिदैवतविषयासंबंधानें म्हणजे बाह्य जगासंबंधानें व दुसरें अध्यात्मविषयासंबंधानें म्हणजे शरीरासंबंधानें. अधिदैवतविषयांत अग्नि म्हणजे अग्निच आणि वायु म्हणजे वायुच. अधिदैवतविषयात इंद्र आणि उमा नाहीत. ते अध्यात्मविषयातच असूं शकतात. अध्यात्मविषयात अग्नि म्हणजे पचनशक्ति किंवा उष्णताशक्ति, वायु म्हणजे प्राणशक्ति किंवा श्वासोच्छ्वासशक्ति; इंद्र म्हणजे जीव किंवा अहंकार आणि उमा म्हणजे बुद्धि. "तेभ्यो ह प्रादुर्बभूव" (देवापुढे तें ब्रह्म प्रकट झालें) ह्याचा अर्थ तै० २।६ येथे म्हटल्याप्रमाणें "तत्सृष्ट्वा तदेवानुप्राविशत्" म्हणजे शरीर निर्माण करून त्यात ब्रह्मानें प्रवेश केला. इंद्रापुढे ब्रह्म तिरोधान पावण्याचें कारण जीव व ब्रह्म खरोखर एकच आहेत. जीवाला ब्रह्माचें ज्ञान करून देणारी बुद्धीच ("दृश्यते त्वग्र्या बुद्ध्या" कठ० ३।१२) आहे. व ती अहंकाराशिवाय असतच नाही. म्हणून ती जीवासमोर, म्हणजे अहंकारासमोर प्रकट झाली असें म्हटलें आहे तें योग्यच आहे. "तस्मिन्नेवाकाशे" म्हणजे त्याच अहंकाराच्या अवस्थेंत म्हणजे जागृत, सीव. हैमवती म्हणजे सोन्याचे दागिने म्हणजे अनेक विद्या धारण करणारी. ह्या परोक्षानें सांगितलेल्या गोष्टींचा उलगडा असा आहे— अग्नि हा शरीराबाहेर सर्व जाळूं शकतो; पण शरीरातील ब्रह्माजवळ पचनशक्तीच्या किंवा उष्णतेच्या रूपानें असतो तेव्हा त्यास गवताची काडीहि जाळता येत नाही. तसेंच वायू हा शरीराबाहेर सर्व काही वाहून नेतो, पण शरीरातील ब्रह्माजवळ श्वासोच्छ्वास रूपानें असतो तेव्हा त्यास गवताची काडीहि हालविता येत नाही. इंद्रापुढे म्हणजे जीवापुढे (अहंकारापुढे) तें ब्रह्म अंतर्धान पावलें; कारण तें त्याहून भिन्नच नाही त्यामुळे इंद्रास त्याचें ज्ञान झालें नाही. तेव्हा त्याच आकाशात म्हणजेच अहंकाराच्या अवस्थेंत (बुद्धि) [उमा] उत्पन्न झाली व तिने जीवास ब्रह्माचें ज्ञान करून दिलें. इंद्रास ब्रह्माचें ज्ञान

झालें म्हणून तो अग्नि व वायू ह्यापेक्षा मोठा; अग्नि आणि वायु हेहि इतर देवापेक्षा म्हणजे सूर्य, आकाश वगैरेपेक्षा मोठे, कारण सूर्य, आकाश वगैरे ह्यानी डोळे, कान वगैरेंत प्रवेश केला तरी ते शरीर जिवंत ठेवूं शकत नाहीत. अग्नि आणि वायु हेच शरीर जिवंत ठेवूं शकतात आणि जिवंत शरीरातच ब्रह्म जीवरूपाने असतें. म्हणून अग्नि आणि वायु ह्याचा ब्रह्माशीं शरीरात स्पर्श तरी होतो, म्हणून ते इतर देवापेक्षा मोठे. " प्रथमो विदाचकार " म्हणजे प्रत्यक्ष स्वत च्या बुद्धीने जाणता झाला, दुसऱ्याच्या सागण्यावरून नव्हे. एकूण ह्या आख्यायिकेचा अर्थ हाच की जीवच जागृतावस्थेत बुद्धीच्या साधनाने ब्रह्मास जाणूं शकतो. ऐतरेय ४।३ आ. ६ मध्येहि जीवास इंद्र म्हटलें आहे.

"यक्ष" हा शब्द येथे नपुंसकलिंगी मानला आहे. ह्याचा अर्थ पूज्य महद्भूत असा श्री शंकराचार्यांनी केला आहे. तसा अर्थ करण्यास हरकत नाही कारण ह्यात यज् म्हणजे पूजणें ही धातु असूं शकते किंवा "यक्ष" म्हणजे अद्भुतशक्तिसंपन्न भूत असाहि अर्थ घेण्यास हरकत नाही; कारण "यक्ष" नावाच्या जीवाविषयी अशीच कल्पना प्रसिद्ध आहे.

खंड ४, श्लोक ४-५

तस्यैष आदेशो यदेतद्विद्युतो व्यद्युतदा ३
इतीन्न्यमीमिषदा ३ इति इत्यधिदैवतम् ॥४॥
अथाध्यात्मं यदेतद् गच्छतीव च मनोऽनेन
चैतदुपस्मरत्यभीक्ष्णं संकल्पः ॥५॥

अर्थः—'आ' असा आवाज करून ही वीज प्रकाशते [व्यद्युतद्] आणि [इत्] 'आ' असा आवाजकरून ती लोप पावते,

[न्यमीमिषत्]. ती त्या ब्रह्माचीच माहिती देते [आदेशः]. ॥ अधिदैवतविषयाचा विचार झाला. ॥४॥ आता अध्यात्मविषयाचा विचार सांगतो. मन आपल्या विषयाकडे [एतत्] गेल्याप्रमाणें [इव] दिसतें, म्हणजे आपला व्यापार करतें, आणि संकल्प (म्हणजे इच्छाशक्ति) वारंवार [अभीक्ष्णं] आपल्या विषयाचें [एतत्] ह्या मनाच्या साधनानें [अनेन] स्मरण करतो; हें जें त्याचें करणें आहे [यत्] तें देखील त्या ब्रह्माचीच माहिती देते. ॥५॥ ब्रह्माच्या अस्तित्वाशिवाय आणि शक्तीशिवाय ह्या गोष्टी घडूं शकत नाहीत म्हणून ह्या गोष्टी 'ब्रह्म आहे' असें दाखवितात, असा ह्याचा भावार्थ आहे.

टिप्पणी--'इत्यधिदैवतम्' ह्याच्या मागे एक 'इति' आम्ही जास्त घालून पाठ सुधरविला आहे; कारण त्याशिवाय अर्थ होत नाही.

'अथाध्यात्मं' ह्याच्यापुढे 'तस्यैव आदेशः' हे शब्द अध्याहृत घेणें भागच आहे, कारण त्याशिवाय अर्थच होत नाही.

'आ ३ इति' म्हणजे 'आ असा आवाज करून' हाच अर्थ विजेच्या वर्णनाशी चांगला जुळतो.

'आ इत्युपमार्थे' ह्या वाक्यांत 'आ' उपमार्थक आहे असें श्री शंकराचार्य म्हणतात, पण त्याला आधार कांहीच नाही.

'इत्'='इच्छन्दः समुच्चयार्थः' म्हणजे इत शब्दाचा अर्थ 'आणि' असा आहे असें श्री शंकराचार्य म्हणतात तें मान्य करण्यास हरकत दिसत नाही. छांदोग्य ३।१७ येथे 'इत्' हा शब्द आहे. तेथे त्याचा 'आणि' हा अर्थ जुळूं शकतो.

"अधिदैवत" आणि "अध्यात्म"—अध्यात्म म्हणजे शरीरांतील आणि "अधिदैवत" शरीराबाहेरील जगांतील, असे अर्थ उपनिषदांमध्ये सर्वत्र दिसून येतात. येथेहि ते अर्थ जुळतात. पचव्या वाक्यांत शरीराबाहेरील घडामोडींवरून ब्रह्माचें अस्तित्व दाखविलें आहे.

• चवथ्या वाक्यांत शरीराबाहेरील घडामोडीवरून ब्रह्माचें अस्तित्व दाखविलें आहे; आणि पाचव्या वाक्यात शरीरातील घडामोडीवरून ब्रह्माचें अस्तित्व दाखविलें आहे.

चवथ्या वाक्यात "विजेच्या प्रकाशाची उपमा ब्रह्माला दिली आहे" असें, बृहदारण्यक २।३।६ येथील वचनाचा आधार देऊन श्री शंकराचार्य म्हणतात, पण तें बरोबर नाही. कारण बृहदारण्यकांतील ती उपमा ब्रह्माला दिली नसून ब्रह्मांश जीवाला म्हणजे बृहदारण्यक २।३।५ येथे वर्णिलेल्या दक्षिणेऽक्षन् पुरुषाला दिली आहे (उपनिषदांचा उपसंहार प्यारा ३४ पहा) ह्यामुळेंहि 'आ' ह्याचा उपमा असा अर्थ करणें बरोबर नाही. "विद्युत." हें पदीचें एकवचन आणि प्रथमेचें बहुवचन होऊं शकतें. पण तें प्रथमेचें बहुवचन घेतां येत नाही कारण "व्यद्युतत्" आणि "न्यमीमिषत्" ही एकवचनी क्रियापदें आहेत म्हणून "व्यद्युतत्" म्हणजे "विद्योतनम्" आणि "न्यमीमिषत्" म्हणजे "निमेषनम्" असे अर्थ घेऊन 'विद्युत" हें पदीचें एकवचन मानावें. श्री शंकराचार्यांनी असेंच केलें आहे.

खंड ४। ६-९

तद्ध 'तद्वनं' नाम तद्वनमित्युपासितव्यम् ।
स य एतदेवं वेदाभि हैनं सर्वाणि भूतानि संवाञ्छन्ति ॥६॥
उपनिषदं भो ब्रूहीत्युक्ता त उपनिषद्
ब्राह्मीं वाव त उपनिषदमब्रूमेति ॥७॥
तस्यै तपो दमः कर्मेति प्रतिष्ठा वेदाः
सर्वाङ्गानि सत्यमायतनम् ॥८॥
यो वा एतामेवं वेदापहत्य पाप्मानमनन्ते
स्वर्गे लोके ज्येये प्रतितिष्ठति ॥९॥

अर्थ—तत् म्हणजे प्राणिजात (सर्वप्राणि) त्यांमध्ये वननीय[1] म्हणजे शोधनीय म्हणजेच शोधलें असता दिसणारें म्हणजे सर्व प्राण्यांचे ठिकाणीं असणारें म्हणून 'तद्वन' नावाचें असलेलें तें ब्रह्म, 'तद्वन' म्हणजे सर्व प्राण्यांच्या ठिकाणीं सापडणारें किंवा पूजनीय असें मानून त्याची उपासना करावी. म्हणजे सर्व प्राण्यांशीं अद्वैतबुद्धीने वागावें हें जो जाणतो अर्थात् ह्याप्रमाणे जो वागतो त्याची सर्वच भूतें इच्छा करतात म्हणजे तो सर्व भूतांना आवडतो ॥६॥ "हे गुरो [भो] उपनिषद् सांगा" असें त्या म्हटलेंस म्हणून [इति] तुला [ते] उपनिषद् सांगितलें [उक्ता] तुला आम्ही म्हणजे ब्रह्माचें ज्ञान करून देणारें उपनिषद् आम्ही सांगितलें [अब्रूम] येथे हा गुरुशिष्य संवाद संपला [इति] ॥७॥ त्या उपनिषदाची प्रतिष्ठा अशी आहे की ती (म्हणजे या उपनिषदांतील उपदेशाचा परिणाम असा झाला पाहिजे की तो उपदेश) ऐकणाऱ्याने तपस् (विषयानंदत्याग), दम (मनाने आत्मानंदाची भावना आणि अद्वैताची भावना) आणि कर्म (सत्कर्म) करावें

[1] वेद, वेदाचीं सर्व सहा अंगें आणि बुद्धीने ठरविलेलें सत्य हें तीन या उपनिषदाचे आधार [आयतनम्] आहेत (वेदवेदांगावरून दिसून येणाऱ्या सिद्धांतापेक्षा बुद्धीने ठरविलेलें सत्य जास्त प्रमाण आहे असें येथे सुचविलें आहे व हे वेदवेदांगांतील सिद्धांत आणि बुद्धीने ठरविलेलें सत्य ह्यामध्ये विरोध नाही असेंहि सुचविलें आहे ॥८॥ जो हें उपनिषद् ह्याप्रमाणे जाणतो अर्थात् ह्याप्रमाणें वागतो तो आपल्या सर्व पापाला टाकून देऊन सर्व अवस्थांमध्ये श्रेष्ठ [ज्येये] अंत न पावणाऱ्या [अनंते] आनंदाच्या अवस्थेंत [स्वर्गे लोके] प्रतिष्ठित होतो म्हणजे स्थिर राहतो ॥९॥

टिपणी—स्वर्गे लोके—"लोक" म्हणजे 'अवस्था' असा अर्थ होतो हें मागे खंड १ श्लोक २ च्या टिपणांत दाखविलेंच आहे

# कठोपनिषद्

ह्याच्या कालाचा व कर्त्याचा निश्चितपणें पत्ता लागत नाही. श्लोक १।११ मध्ये निर्दिष्ट केलेल्या उद्दालक आरुणीनें हें उपनिषद् केलें असेल ह्यातील काही श्लोक थोड्याबहुत फरकाने भगवद्गीतेंतहि आले आहेत म्हणून हें भगवद्गीतेपूर्वीचें असावें शिवाय केन, प्रश्न, कठ आणि मुंडक हीं भगवद्गीतेपूर्वीचीं होत हें केनोपनिषदाच्या प्रकरणात दाखविलेंच आहे.

**घटनेची योजना**—यम आणि नचिकेत ह्याच्या संवादाच्या रूपाने हें उपनिषद् लिहिलें आहे. ह्याच्या सहा वल्ली आहेत. पहिल्या वल्लींत प्रास्ताविक हकीकत आहे तींत यमाने नचिकेताला तीन वर देऊं केले व त्यांपैकी नचिकेताने दोन मागितले व यमाने दिले, असें सांगितलें आहे तिसराहि वर नचिकेताने मागितला आणि यमानें आढेवेढे घेतले तरी तोच वर मला पाहिजे असें नचिकेताने म्हटलें असेंहि ह्याच वल्लींत सांगितलें आहे पुढील पाच वल्लींत तो वर पूर्ण करण्याकरिता आत्मज्ञान सांगितलें आहे दुसऱ्या वराच्या हकीकतीकडे बहुतेक सर्वांनी दुर्लक्ष केलें आहे तिचें स्वारस्य "सत्कर्म करावें" असें आहे हें आम्ही दाखवूं दुसऱ्या वल्लींत आत्मज्ञानाची स्तुतीच बहुतेक आहे आणि तिसऱ्या वल्लींत मुख्य आत्मज्ञान आहे व पुढील तीन वल्लींत त्याचाच अनुवाद आहे

कठोपनिषदाच्या मूळच्या वल्ली तीन होत्या व शेवटच्या तीन वल्ली प्रक्षिप्त आहेत असें कोणी म्हणतात आणि त्याचें कारण असें

देतात की, तिसऱ्या वल्लीच्या शेवटीं, समाप्तिदर्शक दोन श्लोक आहेत, आणि ३।१०–११ व ६।७–८ हे श्लोक परस्परविरुद्ध आहेत. वास्तविक हे श्लोक परस्परविरुद्ध नाहीत, कारण इंद्रिय, अर्थ, मन, बुद्धि, महान्, अव्यक्त, पुरुष ह्या ३।१०–११ येथील परंपरेंतील 'अर्थ' ६।७।८ येथे फक्त गाळला आहे. सेवटपाने विरोध सिद्ध होत नाही. माझें मत असें आहे की, ग्रंथकर्त्यानें प्रथमतः पहिल्या तीनच वल्ली लिहून ग्रंथ समाप्त केला आणि त्याला त्यानेच मागाहून पुढील तीन वल्ली जोडल्या, हें मानणेंच मला अधिक चांगलें वाटतें. कारण (१) द्वितीयार्धांतील विचारहि प्रथमार्धांतील विचारांइतकेच मार्मिक व सुंदर आहेत आणि दोनहि अर्धांतील श्लोकहि सौंदर्यांत सारखेच आहेत. (२) चवथ्या वल्लींतील पहिल्या दोन श्लोकांचा विषय, तिसरीच्या शेवटच्या श्लोकांतूनच म्हणजे "निचाय्य तं मृत्युमुखात्प्रमुच्यते" ह्या शब्दांतूनच काढला आहे. ही मार्मिक योजना मूळ ग्रंथकर्त्याशिवाय इतरास सुचणें बहुतेक असंभवनीय आहे. (३) चवथ्या वल्लीच्या आरंभीं, ग्रंथारंभीं आरंभदर्शक काहीं तरी वाक्य असावें असें अगदीच नाही. ह्यामुळे मूळचे दोन स्वतंत्र ग्रंथ एकत्र जोडले गेले, ह्या कल्पनेचेंहि खंडन होतें. (४) नचिकेताच्या तिसऱ्या प्रश्नाचें उत्तर ५।६–७ येथेच आहे. म्हणून सर्व सहा वल्ली हा मूळचाच ग्रंथ होय अशीहि शंका घेण्याचें कारण नाही, कारण त्याच प्रश्नाचें उत्तर ३।७–८ ह्यांत आहेच.

सहाव्या वल्लीचा शेवटचा अठरावा श्लोक "मृत्युप्रोक्ताम्" इत्यादि प्रक्षिप्त आहे. कारण तो सतराव्यांत "तं विद्याच्छुक्रममृतं" या शब्दाची समाप्तिदर्शक द्विरावृत्ति केल्यानंतर आला आहे. शिवाय त्यांत ज्या योगाचें ६।१२–१३ येथे खंडन केलें आहे, तो योगविधि सांगितला आहे असें म्हटलें आहे. यावरून कोणीतरी गैरसमजानें तो प्रक्षिप्त केला असें दिसतें. प्रो. गर्दे यांचें मत भिन्न आहे. त्यांच्या मतें हा श्लोक प्रक्षिप्त मानण्याची गरज नाही; कारण "योगविधिं च

कृत्स्न" हा शब्दात "भोगाचें खडन ' [redacted] अर्थ घेऊं शकतो, मला हें ग्राह्य वाटत नाही हा श्लोक प्रक्षिप्त असो किंवा नसो यांत "कृत्स्न" ह्याऐवजी मूळ पाठ "कृत्त" म्हणजे "खडितम्" असा असण्याचा व पुढें गैरसमजानें तो "कृत्स्न" असा केला असण्याचा संभव आहेच.

कठोपनिषदांत ब्रह्म, जीव आणि जिवाच्या दोन गति फार उत्तम प्रकारें वर्णिल्या आहेत. यमानें ज्ञान सागितलें ह्या हकीकतींत परोक्षवाद आहे त्याचा अर्थ मृत्यूचा विचार केल्यानें हें ज्ञान झालें असा दिसतो येथें वाजश्रवस म्हणजे ब्रह्म, नचिकेता म्हणजे जीव) मृत्यूचें घर म्हणजे निद्रा, तीन रात्री म्हणजे निद्रेचेच आदि, मध्य व अंत हे भाग; तीन वर म्हणजे (१) निद्रेनंतर पुन मागची सर्व आठवण होणें, (२) कर्मज्ञान आणि (३) आत्मज्ञान होणें हे होत. "नाचिकेत शकेमहि" ३।२ (आम्ही नाचिकेताचें वर्णन करू शकतों- यावरूनहि नाचिकेत म्हणजे जीव हें स्पष्ट आहे.

"त्रियामा' म्हणजे रात्रि आणि रात्रि म्हणजेच झोपेचा काळ म्हणून झोपेचे तीन भाग व त्याना अनुरूप असे तीन वर कल्पिले ब्रह्माला आनदाचा उपभोग घेण्याची इच्छा होती हें "उशन्" ह्या परोक्षवादाचें विवरण सर्ववेदस ददौ" म्हणजे सर्व इंद्रियें उपभोगा- च्या कामीं लाविलीं "श्रद्धाविवेश' म्हणजे तो उपभोग घेता घेता जीवाला वाटलें की ह्या उपभोगापासून सुख नाही आणि सुखाचा दुसरा उपाय जाणण्याची उत्कट इच्छा [श्रद्धा] त्यास उत्पन्न झाली म्हणून तो म्हणाला हीं इंद्रियें [गाव] काही उपभोग घेऊन निर्बल झाल्यावर [दुग्धदोहा] पुन उपभोगास लावणारा मनुष्य दु खप्रचुर [अनदा] लोकास म्हणज अवस्थेस जातो म्हणून तू दुसरें काही तरी दे, मलाच कोणास तरी देऊन टाक

वाजश्रवस ---वाज म्हणजे अन्न खाण्याबद्दल ज्याची कीर्ति [श्रवस्] आहे असा प्राण किंवा ब्रह्म म्हणजे शरीरस्थप्राण त्याचाच पुत्र अहंकार, जीव किंवा मनस् होय

मृत्यु म्हणजे निद्रा असा अर्थ येथेच २ । २५ मध्ये केला आहे व त्याचा खुलासा आहे

"नचिकेताः"—नं नकारं अपायं चिकित्सति म्हणजे ब्रह्म-स्वरूपातील अभावाला जो दुरुस्त करतो तो म्हणजेच "जीव."

## वल्ली पहिली

### वल्ली १, श्लोक १-४

ॐ उशन् ह वै वाजश्रवसः सर्ववेदसं ददौ ।
तस्य ह नचिकेता नाम पुत्र आस ॥१॥

तं ह कुमारं संत दक्षिणासु नीयमानासु
श्रद्धाविवेश सोऽमन्यत ॥२॥

पीतोदका जग्धतृणा दुग्धदोहा निरिंद्रियाः ।
अनंदा नाम ते लोकास्तान्स गच्छति ता ददत् ॥३॥

स होवाच पितरं तत कस्मै मां दास्यसीति
द्वितीयं तृतीयम् ।

तं होवाच मृत्यवे त्वा ददामीति ॥४॥

अर्थः—यज्ञफलाची इच्छा करणारा [उशन्] वाजश्रवस नावाचा एक यजमान (यज्ञकर्ता) आपले सर्व धन [सर्ववेदसम्] देता झाला. त्याला नचिकेता नावाचा एक पुत्र होता ॥१॥ त्या चांगल्या मुलाला [संतं कुमारं] दक्षिणा नेल्या जात असतां बापाचें खरें हित करण्याची उत्कट इच्छा [श्रद्धा] उत्पन्न झाली. त्याला वाटलें की ॥२॥ ज्या पुनः पाणी पिणार नाहीत [पीतोदका] ज्या पुनः गवत खाणार नाहीत [जग्धतृणा] ज्यांचे पुनः दूध निघणार नाही [दुग्धदोहा] अशा दुर्बल झालेल्या [निरिंद्रियाः] गाई जो देतो, तो अनंद नावाच्या म्हणजे आनंदरहित अवस्थेस [लोका] जातो.

॥३॥ तो बापास म्हणाला, "हे बाबा माझें दान तू कोणास करतोस ?" तो मुलगा बापास, दुसऱ्याने व तिसऱ्यानेहि असें म्हणाला. तेव्हा बाप म्हणाला, " मी तुझें दान मृत्यूला करतों ". ॥४॥

टिप्पणी—उशन् म्हणजे कामयमान म्हणजे इच्छा करणारा. वेदसम् म्हणजे धनम्; "विदते" ह्या धातूपासून हा शब्द झाला आहे.

निरिंद्रिया. म्हणजे दुर्बल. इंद्रिय म्हणजे बल असा अर्थ आहेच (आपट्याचा कोश पहा)

पीतोदका—ह्याचा शब्दश: अर्थ "ज्यांनी पाणी प्यालें आहे त्या" असा होतो. पण "निरिंद्रियाः" ह्या विशेषणांमुळे भावार्थ "त्या पुनः पाणी पिणार नाहीत" असा होतो. "जग्धतृणाः" "दुग्धदोहा" ह्याचाही भावार्थ अशाच प्रकारचा आहे.

वल्ली १, श्लोक ५

बहूनामेमि प्रथम बहूनामेमि मध्यमः ।
किंस्विद् यमस्य कर्तव्यम् यन्मयाद्य करिष्यति ॥५॥

अर्थः—पुष्कळांमध्ये (परोक्षवादविवरणाने ब्रह्म, जीव, इंद्रियें व जगत् यामध्ये) मी (म्हणजे जीव) पहिला आहे, निदान मध्यम म्हणजे दुसरा तरी आहे. (जीव ब्रह्मापेक्षा श्रेष्ठ असें उपनिषदामध्ये पुष्कळ ठिकाणीं सांगितलें आहे त्याशीं हें जुळतें. जीव ब्रह्मापेक्षा श्रेष्ठ न मानला तरी तो ब्रह्माच्याच खालचा पण इतरांपेक्षा वरचा म्हणजे दुसरा तरी मानावाच लागतो. त्याशींही हें जुळतें.) इतका मी चांगला असूनहि माझा बाप मोझें दान यमाला करतो म्हणतो, तर यमास माझ्याकडून [मया] आज कोणतें कार्य [कर्तव्यम्] करून घ्यावयाचें आहे काय? यमास माझ्याकडून काही तरी मोठें कार्य करून घ्यावयाचें आहे असा भाव. ॥५॥

टिप्पणी —मुडक २।२।१-२ येथे जीवाला "सदसद्वरेण्य" आणि "वरिष्ठ प्रजाना" हीं विशेषणें लाविलीं आहेत त्यावरून, ब्रह्म, जीव इंद्रियें व जगत् ह्या सर्वामध्ये जीव श्रेष्ठ ठरतो, निदान ब्रह्माच्या खालचा म्हणजे दुसरा तरी ठरतो उपसहार प्यारे ६८, ४९ व ५७ पहा.

यमाचें मोठें कार्य म्हणजे जीवाला आत्मज्ञान करून देणें हेंच होय.

वल्ली १, श्लोक ६

अनुपश्य यथापूर्वे प्रतिपश्य यथापरे ।
सस्यमिव मर्त्य पच्यते सस्यमिवाजायते पुन ॥६॥

अर्थ—पूर्वीचे लोक [पूर्वे] कसे मरण पावले आणि पुढचेही लोक [परे] कसे मरण पावतील तें पहा (त्याचा विचार कर) सस्याप्रमाणेच मरणधर्मी [मर्त्य] मनुष्य मरतो [पच्यते] आणि सस्याप्रमाणेच पुन उत्पन्न होतो म्हणून हे मुला भिऊ नकोस हा भाव

टिप्पणी—हा श्लोक कोणी कोणास म्हटला हें निश्चितपणें समजत नाही हा मुलानें बापास म्हटला असेल किंवा बापानेंही मुलास म्हटला असेल बाप माझें मृत्यूला दान करणार व त्यामुळे मी मरणार असें भय मुलास वाटलें असें समजून तें भय नाहीसें करण्याकरिता बापानें मुलास हा श्लोक म्हटला हेंच मला जास्त समाधान वाटतें ■ त्याप्रमाणे मी अर्थ केला आहे परोक्षवादविवरणातही जीव शोपीं गेला तरी पुन जागा होतोच तेव्हा झोपीं जाण्यापासून भय कोणतेंच नाही असा भाव

वल्ली १, श्लोक ७—८

वैश्वानर प्रविशत्यतिथिर्ब्राह्मणो गृहान् ।
तस्यैता शांतिं कुर्वंति हर वैवस्वतोदकम् ॥७॥

आशाप्रतीक्षे संगतं सूनृतां च ।
इष्टापूर्ते पुत्रपशूंश्च सर्वान् ॥
एतद्वृङ्क्ते पुरुषस्याल्पमेधसो
यस्यानश्नन् वसति ब्राह्मणो गृहे ॥८॥

अर्थ—अग्नीप्रमाणे जाळणारा [ वैश्वानर ] हा ब्राह्मण अतिथि, हे यमा तुझ्या गृहांत आला आहे त्याची ही अशी शांति करतात, त्याला उदक वगैरे दे. ॥७॥ ज्याच्या घरीं ब्राह्मण उपाशी [ अनश्नन् ] राहतो, त्या बुद्धिहीन [अल्पमेधस ] मनुष्याच्या आशा, प्रतीक्षा सुसंगतीचें फळ, गोड बोलण्याचें फळ, इष्टापूर्तीचें फळ, पुत्र, पशु, ह्या सर्वांचा तो नाश करतो ॥८॥

टिप्पणी—बापाने यमाला नचिकेताचे दान केलें, तेव्हा नचिकेत यमाच्या घरीं गेला, पण तेव्हा यमच स्वतःच्या घरीं नव्हता-त्यामुळे नचिकेत तीन रात्रीं उपाशी राहिला यम परत आल्यावर त्याच्या मंत्र्याने वरील श्लोक यमास म्हटले, अशी हकीकत अध्याहृत मानावी लागते.

आशाप्रतीक्षे —श्री शंकराचार्य ह्याचें विवरण असें करतात. "अनिर्ज्ञातप्राप्येष्टार्थप्रार्थना आशा निर्ज्ञातप्राप्यार्थप्रतीक्षणं प्रतीक्षा ते आशाप्रतीक्षे।"

वल्ली १, श्लोक ९

तिस्रो रात्रीर्यदवात्सीर् गृहे मेऽ ।
-नश्नन् ब्रह्मन्नतिथिर्नमस्य ॥
नमस्तेऽस्तु ब्रह्मन् स्वस्ति मेऽस्तु ।
तस्मात्प्रति त्रीन् वरान् वृणीष्व ॥९॥

अर्थ—हे ब्राह्मणा, [ब्रह्मन्] ज्याअर्थी [यद्] नमस्कार

करण्यास योग्य अशा अतिथि तू असून माझ्या घरीं तीन रात्रीं उपाशी [ अनश्नन् ] राहिलास, त्या अर्थी तुला नमस्कार असो. आणि माझें कल्याण व्हावें म्हणून [ तस्मात् ] तू मला उपासाच्या एका रात्रीला एक वर याप्रमाणें [प्रति] तीन वर माग. ॥९॥

**टिप्पणी**—परोक्षवादविवरणात्, उपास म्हणजे कोणत्याच विषयाचा उपभोग न घेणें असें शोपेत होतेंच. या श्लोकांत यमाचें भाषण आहे

वल्ली १ श्लोक १०-११

शान्तसंकल्पः सुमना यथा स्यात् ।
वीतमन्युर्गौतमो माभि मृत्यो ॥
त्वत्प्रसृष्टं माभिवदेत्प्रतीत ।
एतत्त्रयाणां प्रथमं वरं वृणे ॥१०॥

यथा पुरस्तात् भविता प्रतीत ।
औद्दालकिर् आरुणिर्मत्प्रसृष्टः ॥
सुखं रात्रीः शयिता वीतमन्यु ।
स्त्वां ददृशिवान् मृत्युमुखात्प्रमुक्तम् ॥११॥

**अर्थ**—(नचिकेत म्हणाला) " हे मृत्यो, माझा पिता गौतम माझ्यासंबंधानें [माभि = मा अभि] शांतचित्त [शांतसंकल्प] प्रसन्न हृदय [सुमना ] आणि क्रोधरहित [वीतमन्यु ] होवो आणि त्या मला सोडल्यानंतर मी जेव्हा बापाकडे परत जाईन तेव्हा मला [त्वत्प्रसृष्टम् ] हा माझा पुत्र नचिकेतच होय असें ओळखून [प्रतीत ] तो माझ्याशीं बोलो. तीन वरांपैकीं हाच पहिला वर मी तुला मागतों " ॥१०॥ ह्यावर यम म्हणाला, ' तुझा बाप औद्दालकि आरुणि तुला ओळखून [ प्रतीत ] तुझ्याशीं पूर्वीसारखाच [ यथा पुरस्तात् ] होईल म्हणजे वागेल आणि क्रोधरहित होऊन [वीतमन्यु ] 'हा मी यमास देऊन

टाकलेला [मत्प्रसृष्ट] माझा पुत्र तीन रात्रीं केवळ मुखानें निजला [शयिता] होता' [अभूत्-अध्याहृत], असें [इति-अध्याहृत] मृत्यूच्या मुखांतून सुटलेल्या तुला पाहील म्हणजे मानेल. ॥११॥

**टिप्पणी**—औद्दालकिः आरुणिः—अरुणि, उद्दालक आणि श्वेतकेतु ह्यांचा निर्देश छांदोग्य ३।११।४; ६।१।१; ६।८।१; ५।३।१; ५।११। १–२ आणि बृहदारण्यक ६।२।१, ६।५।३ येथे आला आहे. आणि येथेहि कठांत आहे. गौतमाचा निर्देश येथे व छांदोग्य ५।३ येथेहि आहे, त्यावरून पुढील वंशावळी ठरते.




"नचिकेत" हें श्वेतकेतूचें दुसरें नांव असेल किंवा तो उद्दालकाचा दुसरा पुत्र असेल.

" उद्दालक एव औद्दालकिः " असें विवरण श्री शंकराचार्यांनी केलें आहे. तेंच आम्ही मान्य केलें आहे.

" मत्प्रसृष्ट सुखं रात्रीः शयिता " हें यमाचें वाक्य समजून श्री शंकराचार्यांनी अर्थ केला आहे. मीं तें उद्दालकाचें वाक्य मानून अर्थ केला आहे व तो अर्थ करतांना " शयिता " हें लृटाचें रूप न मानतां तृप्रत्ययांत कर्तृवाचक रूप मानलें आहे. ह्या माझ्या अर्थामध्ये "प्रसृष्टः" ह्याचा अर्थ "त्वत्प्रसृष्ट" आणि " मत्प्रसृष्ट " ह्या दोनही ठिकाणीं सारखाच करतां येतो. श्रीशंकराचार्यांच्या अर्थामध्ये "प्रसृष्ट" ह्याचे दोन ठिकाणीं दोन भिन्न अर्थ करावे लागतात. शिवाय माझा

अर्थ सदर्भाशी अधिक चांगला जुळतो कारण 'माझ्या शापाने पुढील काळात मुलाने निजावें' हा वरच नचिकेतान मागितला नव्हता

गोतम—येथे गोतमाचा मुलगा उद्दालक असा अर्थ आहे परोक्षवादविवरणात पुष्कळ गाई म्हणजे इंद्रियें त्याला आहेत असा प्राण किंवा ब्रह्म

वल्ली १, श्लोक १२-१३

स्वर्गे लोके न भय किंचनास्ति।
न तत्र त्व न जरया बिभेति॥
उभे तीर्त्वाशनायापिपासे।
शोकातिगो मोदते स्वर्गलोके॥१२॥

स त्वमग्निं स्वर्ग्यमध्येषि मृत्यो।
प्रब्रूहि त श्रद्धानाय मह्यम्॥
स्वर्गलोका अमृतत्व भजते।
एतद्द्वितीयेन वृणे वरेण॥१३॥

अर्थ—नचिकेत म्हणाला "स्वर्गलोकात म्हणजे शारीरिक सुस्थितीच्या अवस्थेंत, कोणतेंच भय नाही तथे मृत्यु (त्व) नाही आणि (जरा असली तरी) तिचें भय वाटत नाही तेथ भूक आणि तहान ह्या दोनहि तरून जातो म्हणजे भूक तहान लागली असता त्या तृप्त करण्यास अन्न आणि पाणी मिळतेंच त्यामुळ भूक तहानेन होणारा मृत्यू त्या अवस्थेंत नाही आणि जरा आली तरी तिचेंहि भय वाटत नाही म्हणून स्वर्गलोकात मनुष्य शोकाला जिंकून [शोकातिग] आनदात असतो ॥१२॥ हे मृत्यो, त्या शारीरिक सुस्थितीच्या अवस्थेस प्राप्त करून देणारा [स्वर्ग्य] जो अग्नि आहे त्याचें त्वा विचार करून ज्ञान करून घेतलें आहेस [अध्येषि] तर तुझ्यावर श्रद्धा ठेवणारा जो मी त्या मला तो सांग कारण स्वर्गातील लोकानाच

अमृतत्वाची म्हणजे आत्यंतिक आनंदाची म्हणजे ब्रह्मानंदाची प्राप्ती होते [भजते] हेंच मी दुसऱ्या वराने मागतों. ॥१३॥

टिप्पणी—स्वर्गलोक—लोक म्हणजे अवस्था हें केनात १–२ येथे दाखविलेंच आहे. स्वर्ग म्हणजे ब्रह्मानंदाची अवस्था असा अर्थ केनात ४–९ येथे आहे असें तेथे दाखविलें आहे पण येथे शारीरिक सुस्थिति असा गौण अर्थ घ्यावा लागतो कारण "स्वर्गलोका अमृतत्व भजते" ह्या वाक्यात स्वर्ग आणि अमृतत्व म्हणजे ब्रह्मानंदावस्था ह्या दोन भिन्न मानल्या आहेत. शारीरिक सुस्थिती तरी सामाजिक सुस्थितीशिवाय संभवत नाही म्हणून स्वर्गलोक म्हणजे सामाजिक सुस्थितीची अवस्था असाही अर्थ करता येतो. "अमृतत्व" म्हणजे आत्यंतिक आनंदाची अवस्था, ब्रह्मावस्था किंवा ब्रह्मलोक हें आता स्पष्टच आहे. "अविद्यया मृत्युं तीर्त्वा विद्ययाऽमृतमश्नुते" ह्या ईशातील वचनात जें सांगितलें आहे तेंच येथे तेराव्या श्लोकात सांगितलें आहे पुढील "मृत्यु" वरील टिप्पण पहा.

वल्ली १, श्लोक १४–१९

प्र ते ब्रवीमि तदु मे निबोध ।
स्वर्ग्यमग्निं नचिकेतः प्रजानन् ॥
अनन्तलोकाप्तिमथो प्रतिष्ठाम् ।
विद्धि त्वमेतन्निहितं गुहायाम् ॥१४॥
लोकादिमग्निं तमुवाच तस्मै ।
या इष्टका यावतीर्वा यथा वा ॥
स चापि तत्प्रत्यवदद् यथोक्तम् ।
अथास्य मृत्युः पुनरेवाह तुष्टः ॥१५॥
तमब्रवीत्प्रीयमाणो महात्मा ।
वरं तवेहाद्य ददामि भूयः ॥

तवैव नाम्ना भवितायमग्निः ।
सृकां चेमामनेकरूपां गृहाण ॥१६॥
त्रिणाचिकेतस्त्रिभिरेत्य संधिम् ।
त्रिकर्मकृत् तरति जन्ममृत्यू ॥
ब्रह्मजज्ञं देवमीड्यं विदित्वा ।
निचाय्येमां शान्तिमत्यन्तमेति ॥१७॥
त्रिणाचिकेतस्त्रयमेतद्विदित्वा ।
य एवं विद्वाँश्चिनुते नाचिकेतम् ॥
स मृत्युपाशान् पुरतः प्रणोद्य ।
शोकातिगो मोदते स्वर्गलोके ॥१८॥
एष तेऽग्निर्नचिकेतः स्वर्ग्यो ।
यमवृणीथा द्वितीयेन वरेण ॥
एतमग्निं तवैव प्रवक्ष्यन्ति जनास ।
तृतीयं वरं नचिकेतो वृणीष्व ॥१९॥

अर्थ —यम म्हणाला, "हे नचिकेता, स्वर्ग्य अग्नि जाणणारा मी तुला तो अग्नि सांगतो, ऐकून घे ॥ अनंत लोकाची म्हणजे ब्रह्मलोकाची प्राप्ति करून देणारा व प्राप्त झालेल्या त्या ब्रह्मलोकाला स्थिर ठेवणारा [प्रतिष्ठा] तो अग्नि गुहेंत म्हणजे आत्म्याच्या अंतर्यांत्च ठेवलेला आहे हें जाणून घे" ॥१४॥ नंतर यमाने त्याला जगाची उत्पत्ति करणारा [लोकादिम्] तो अग्नि सांगितला त्याच्या विटा [इष्टका] कोणत्या, किती व कशा आहेत तें यमाने सांगितलें ॥ आणि नंतर यमाने जें सांगितलें होतें तें नचिकेताने म्हणून दाखविलें [प्रत्यवदत] तेव्हा यम संतुष्ट होऊन नचिकेतास पुनः म्हणाला. ॥१५॥ तो महात्मा यम नचिकेतास प्रीतिपूर्वक [प्रीयमाण] म्हणाला,

"हा पुन दुसरा वर मी तुला देतों. तो हा--हा अग्नि पुढे तुझ्या नावानेच प्रसिद्ध होईल [भविता] अनेक रूपाची ही माळा [सृकाम्] ही तू घे ॥१६॥ तीन नाचिकेत नामक अग्नींची उपासना करणारा [त्रिणाचिकेत] व तीन प्रकारचीं कर्मे करणारा [त्रिकर्मकृत्] तीन गोष्टींशीं संधि पावून म्हणजे तीन गोष्टी मिळवून ह्या आयुष्यातील दोन प्रकारचे मृत्यू [जन्ममृत्यू] तरून जातो म्हणजे टाळतो ॥ ब्रह्मापासून झालेल्या व विद्वान् [ब्रह्मजज्ञम्] अशा देवाला म्हणजेच अग्नीला जाणून म्हणजेच त्याची उपासना करून, ही माळा [इमां सृकाम्] गोळा करून [निचाय्य] म्हणजेच मिळवून तो अत्यंत शांतीला म्हणजे दुःखरहित स्थितीला प्राप्त होतो ॥१७॥ जो तीन नाचिकेत अग्नींची उपासना करणारा [त्रिणाचिकेत] हीं तीन कर्मे [त्रयम् एतत्] जाणून घेऊन, त्यांनी त्या नाचिकेताग्नीची उपासना करतो [चिनुते] तो मृत्युपाशाला पुढेपुढे ढकलून [पुरतः प्रणोद्य] म्हणजे दीर्घ आयुष्य मिळवून दुःखाच्या पलीकडे जाऊन [शोकातिग] स्वर्ग लोकात आनंदाचा अनुभव घेतो [मोदते]. ॥१८॥ हे नचिकेता, त्या दुसऱ्या वराने मागितलेला, स्वर्ग प्राप्त करून देणारा हा अग्नि मी तुला सांगितला आहे ह्या अग्नीला लोक [जनास] "हा तुझाच अग्नि होय असें म्हणतील. आता तिसरा वर तू माग" ॥१९॥

टिप्पणी—"अग्नि"–हा अग्नि धनधान्यादि देणारी कर्मरूपी देवता होय म्हणजे कर्मच होय ईशोपनिषद् श्लोक १८ येथेहि हाच अर्थ आहे. अशनायापिपासा ह्यांना म्हणजे भूक तहान ह्यांना कर्मच जिंकू शकतात म्हणून हा स्वर्ग प्राप्त करून देणारा अग्नि कर्मच होय हें निश्चितपणें ठरतें आणि स्वर्गलोक म्हणजे शारीरिक सुस्थिति हेंहि ठरतें

"मृत्यु"—"मृत्यु" ह्याचा अर्थ जीविताचा अंत असा प्रसिद्धच आहे केव्हा केव्हा 'मृत्यू'चा अर्थ दुःख असाहि होतो हें

उपसंहार प्यारा २८ येथे दाखविलें आहे. वरील कांहीं श्लोकांमध्ये त्याचा अर्थ "जीवितान्त" असाच आहे. पण जीवितान्तहि तीन प्रकारचा आहे. (१) मूक वहानेने होणारा, (२) रोगानी होणारा आणि (३) केवळ वार्धक्याने होणारा. ह्या तीन प्रकारांपैकी वार्धक्याने होणारा जीविताचा अंत कशानेच टळत नाही. पण मूकवहानेने व रोगाने होणारा जीविताचा अंत कर्मांनी टळतो. ह्यालाच दररोजचा मृत्यु किंवा अकाल मृत्यु किंवा आयुष्यातील मृत्यु, म्हणता येतें. बृहदारण्यक १-५-२ येथे ह्यालाच "पुनर्मृत्यु" असें म्हटलें आहे. पंधराव्या श्लोकात "न तन्नत्वम्" ह्या शब्दांनी हेंच सांगितलें आहे की तेथे "अकाल मृत्यु" (जीवितान्त) नाही. श्लोक सतरावा येथे "जन्ममृत्यू" ह्याचा अर्थहि जन्मातील म्हणजे आयुष्यातील हे दोन अकाल मृत्यू असा आहे "जन्म" म्हणजे आयुष्य असाहि अर्थ होतोच. (आपट्यांचा कोश पहा.) मनुस्मृति ९-१०० आणि ५-३८ आणि भगवद्गीता ४-५ येथे "जन्म" ह्याचा "आयुष्य" (life) असाच अर्थ आहे.

त्रिकर्मकृत्:—तीन प्रकारचीं कर्में कोणतीं ह्याचा उलगडा बृहदारण्यक ३-१-७ येथील वचनाच्या सहाय्याने होतो. तेथे अग्नीच्या तीन ऋचा सांगितल्या आहेत व त्यांनी सर्व "प्राणभृत्" म्हणजे प्राण धारण करणारे मिळवितो असें म्हटलें आहे. त्यावरून प्राणधारणास आवश्यक अशा वस्तूंचे तीन वर्ग केले आहेत असें दिसतें. ते अन्न, वस्त्र आणि घर हे होत. ह्यानीच खरोखर "तरति जन्ममृत्यू" या वचनात सांगितलेल्या फळाची उपपत्ति लागते. (औषधि व पाणी यांचा अन्नामध्येच अंतर्भाव केला आहे हें लक्षात ठेवावें.) अर्थात् त्रिकर्मकृत् म्हणजे अन्न, वस्त्र आणि घर यास प्राप्त करून देणारीं कर्में करणारा असा अर्थ होतो. "त्रिभिरेत्य सन्धिम्"

म्हणजे "अन्न, वस्त्र आणि घर मिळवून" असा अर्थ होतो. "त्रिणाचिकेत" यांतील तीन नाचिकेत अग्नि म्हणजे अन्न, वस्त्र आणि घर प्राप्त करून देणारी कर्में असा अर्थ होतो.

सृंकाः--म्हणजे परोक्षवादविवरणांत विषयोपभोगपरंपरा असा अर्थ केला पाहिजे. वल्ली २ श्लोक ३ येथे हा शब्द आला आहे. तेथेहि हाच अर्थ जुळतो अल्पविषयोपभोगाशिवाय शरीराची व समाजाचीहि सुस्थिति असूं शकत नाही हें लक्षांत ठेवावें.

"मृत्युपाशान् पुरतः प्रणोद्य"--"आजचा मृत्यु उद्यावर ढकलून" असा याचा खरा अर्थ आहे, व शब्दशः तसा अर्थ होतोच. मृत्यु अजिबात टाळून मरणरहित कोणीच होऊं शकत नाही. फक्त जीविताचा काळ योग्य आचरणाने वाढवूं शकतो त्याशीं हें वचन जुळतें. ईशोपनिषद् श्लोक ११ यावरील टिप्पणांमध्ये "अविद्यया मृत्युं तीर्त्वा" यावरील टिप्पण पहा.

"अनंतलोकाप्तिमथो प्रतिष्ठा"--केनोपनिषदांतील शेवटच्या वाक्यात स्वर्गलोकाला म्हणजेच ब्रह्मलोकाला अनंत हें विशेषण लाविलें आहे हें लक्षात ठेवावें. त्यावरून अनंत लोक म्हणजे ब्रह्मलोक असें ठरतें. "प्रतिष्ठा" ह्या वर्णनावरून ब्रह्मलोक अग्नीवर म्हणजेच कर्मांवर प्रतिष्ठित आहे म्हणजे मनुष्य कर्मे करीत राहील तोंपर्यंतच ब्रह्मलोक म्हणजे अत्यानंदावस्था राहूं शकते हा अर्थ स्पष्ट आहे, व केवळ ज्ञानाने ब्रह्मलोक मिळतो म्हणणाऱ्यांनी लक्षात ठेवावा. उपसंहार प्यारा ४० अ पहा.

"विद्धि त्वमेतन्निहितं गुहायां"--कर्म करण्याची प्रवृत्ति जीवाच्या अंतरांतच आहे म्हणून असें म्हटलें आहे. "न हि कश्चित् क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत्" हें भगवद्गीतेचें वचनहि हेंच सांगतें.

"लोकादिमग्निम्"--जगाची उत्पत्ति तरी ब्रह्माच्या कर्मापासूनच होते म्हणून कर्मांना "लोकादि" म्हटलें आहे.

 

"इष्टकाः"–हा परोक्षवाद आहे हें उघडच आहे. ह्याचें विवरण काय हा प्रश्न आहे. कर्में योग्य रीतीने करण्यास जरूर त्या गोष्टी ह्यासच येथे इष्टका म्हटलें आहे हें उघड आहे. त्या गोष्टी, सुदृढ शरीर, यथार्थज्ञान, आणि इंद्रियवश्यता ह्या होत हें पुढे वल्ली ३ श्लोक ३–६ ह्यावरूनहि दिसून येतें.

"ब्रह्मजज्ञम्" कर्मे हें ब्रह्मापासून उत्पन्न झालें हें उघडच आहे, आणि कर्मे योग्य रीतीने करण्यास ज्ञानहि पाहिजेच म्हणून कर्मरूपी अग्नीस "ब्रह्मजज्ञ" हें विशेषण लाविलें आहे

एकूण श्लोक १२ ते १९ ह्याचें सार हेंच आहे की चांगलीं कर्में करून भूकतहान शांत करून शरीराची सुस्थिति साध्य करून, ती कायम ठेवावी. हेंच "अविद्यया मृत्युं तीर्त्वा" ह्या ईशोपनिषदातील वचनात सांगितलें आहे.

वल्ली १ श्लोक १२–१९ येथे प्रथम कर्मरूपी अग्नीची उपासना सांगून नंतर आत्मज्ञान सांगितलें. ह्यावरून ह्या उपनिषदांतहि कर्मांची व ज्ञानाची सांगडच (ज्ञानकर्मसमुच्चयच) प्रतिपादिली आहे हें उघड आहे. कठ ६।१२–१३ येथे ब्रह्मानुभव जागृतिशिवाय होऊं शकत नाही असें सांगितलें आहे जागृति, शरीर जिवंत असल्याशिवाय असू शकत नाही, आणि शरीर जिवंत असणें कर्मांशिवाय घडत नाही म्हणून कर्म आवश्यकच ठरतें.

वल्ली १ श्लोक २०–२२

येयं प्रेते विचिकित्सा मनुष्ये ।
अस्तीत्येके नायमस्तीति चान्ये ॥
एतद्विद्यामनुशिष्टस्त्वयाहम् ।
वराणामेष वरस्तृतीयः ॥२०॥

देवैरत्रापि विचिकित्सितं पुरा ।
न हि सुविज्ञेयमणुरेष धर्मः ॥
अन्य वरं नचिकेतो वृणीष्व ।
मा मोपरोत्सीरति मा सृजैनम् ॥२१॥

देवैरत्रापि विचिकित्सितं किल ।
त्वं च मृत्यो यन्न सुविज्ञेयमात्थ ॥
वक्ता चास्य त्वादृगन्यो न लभ्यः ।
नान्यो वरस्तुल्य एतस्य कश्चित् ॥२२॥

अर्थ —नचिकेत म्हणाला, " मनुष्य मेल्यानंतरहि तो असतो असें कोणी म्हणतात आणि तो नाहीसाच होतो [नायमस्ति] असें कोणी म्हणतात, हा जो मेलेल्या मनुष्याविषयीं [प्रेते] संशय [विचिकित्सा] आहे, त्या संशयाचें निराकरण [एतत्] तुझ्या शिकवणीवरून [त्वया अनुशिष्टः] मी जाणावें, [विद्याम्] हाच तीन वरांपैकी तिसरा वर होय " ॥२०॥ यम म्हणाला, " पूर्वीच्या काळीं देवांना म्हणजे शहाण्यांना देखील ह्याविषयीं संशयच होता. हा धर्म सूक्ष्म [अणु] असल्यामुळे ह्या संशयाचें निराकरण जाणणें सोपें नाही [न हि सुविज्ञेयम] म्हणून हे नचिकेता, दुसरा वर माग मला अडवूं नकोस हा वर मला [मा] सोडून दे [अतिसृज] ॥२१॥ नचिकेत म्हणाला, " हे यमा, देवांना देखील ह्याविषयीं संशय होता ही गोष्ट प्रसिद्ध आहे [किल] आणि हें समजणें सोपें नाही असें तूंच म्हणतोस आणि ह्या संशयाचें निराकरण सांगणारा [अस्य वक्ता] तुझ्यासारखा दुसरा मिळणार नाही. अर्थात् ह्या वराच्या बरोबरीचा [तुल्य] असा दुसरा कोणताच वर नाही " (म्हणून हाच वर तू मला दे असा भाव आहे.) ॥२२॥

वल्ली १ श्लोक २३-२५

शतायुषः पुत्रपौत्रान् वृणीष्व ।
बहून् पशून् हस्तिहिरण्यमश्वान् ॥
भूमेर्महदायतनं वृणीष्व ।
स्वयं च जीव शरदो यावदिच्छसि ॥२३॥

एतत्तुल्यं यदि मन्यसे वरम् ।
वृणीष्व वित्तं चिरजीविकां च ॥
महाभूमौ नचिकेतस्त्वमेधि ।
कामानां त्वा कामभाजं करोमि ॥२४॥

ये ये कामा दुर्लभा मर्त्यलोके ।
सर्वान् कामांश्छदतः प्रार्थयस्व ॥
इमाः रामाः सरथाः सतूर्याः ।
न हीदृशा लम्भनीया मनुष्यैः ॥
आभिर्मत्प्रत्ताभिः परिचारयस्व ।
नचिकेतो मरणं मानुप्राक्षीः ॥२५॥

**अर्थः—**यम म्हणाला, "अरे शंभर वर्षे जगणारे पुत्र माग, नातू माग, पुष्कळ पशू माग, हत्तीघोडे माग, सोने माग, पृथ्वीवरील मोठें राज्य [आयतनम्] माग आणि स्वतः तुझी इच्छा असेल तितकी वर्षें जिवत रहा ॥ २३॥ जर तो वर ह्याच्या बरोबरीचा आहे असें तुला वाटत असेल तर तूं धन माग आणि दीर्घायुष्य [चिरजीविकाम्] माग. तूं मोठ्या भूमीवर अस [एधि] म्हणजे राज्य कर. तुला सर्व काम प्राप्त होतील असें मी करतों. ॥२४॥ जे जे काम मर्त्यलोकीं दुर्लभ आहेत ते ते सर्व तूं तुझ्या मनास येतील तितके [छदत] मागून घे [प्रार्थयस्व]. ह्या रथावर बसणाऱ्या

[सरथा ] व वाद्य धारण करणाऱ्या [सतूर्या ] रमणीय स्त्रिया [रामाः] तू मागून घे. अशा स्त्रिया मनुष्यास मिळू शकत नाहीत [न लम-नीया ] मी दिलेल्या ह्या स्त्रियाकडून तू आपली सेवा करून घे [परिचारयस्व] परंतु, हे नचिकेता मरणाविषयी तू मला प्रश्न विचारू नकोस. ॥२५॥

टिपणें—" चिरजीविकाम्".-यमाने चिरजीविका म्हणजे दीर्घायुष्यच मागण्यास सांगितलें ह्यावरून यम मरणराहित्य देऊ शकत नाही, किंवा दुसऱ्या वरामध्ये सांगितलेल्या अग्नीच्या उपासनेनेहि प्राप्त होऊ शकत नाही असेंच सूचित होतें. म्हणून "न तत्र त्व" ह्या मागील श्लोक बारामधील वाक्यात " स्वर्गांत अकाल-मृत्यु नाही" असाच अर्थ घेतला पाहिजे ह्यामुळेच "जन्ममृत्यू" ह्या सतराव्या श्लोकातील शब्दातहि "दोन प्रकारचे अकालमृत्यु " असा अर्थ घ्यावा लागतो, कारण हेच कर्मानी तरता येतात.

मर्त्यलोक —स्वर्गाच्या म्हणजेच सामाजिक सुस्थितीच्या उलट अशी जी अवस्था ती सामाजिक सुस्थितीशिवाय चांगल्या स्त्रियाहि उपभोगास मिळू शकत नाहीत, कारण तशा स्थितींत त्याना आरोग्यकारक व सौंदर्यवर्धक पोषण आणि उत्तम शिक्षण हीं मिळू शकत नाहीत

"वृणि" हें अस् धातूचें आज्ञार्थांचें (लोटाचें) मध्यम पुरुषाचें एक वचन आहे

वल्ली १ श्लोक २६—२९

श्वोभावा मर्त्यस्य यदन्तकैतत् ।
सर्वेंद्रियाणां जरयन्ति तेजः ॥
अपि सर्वं जीवितमल्पमेव ।
तवैव वाहास्तव नृत्यगीते ॥ २६ ॥

न वित्तेन तर्पणीयो मनुष्य ।
लप्स्यामहे वित्तमद्राक्ष्म चेत्त्वा ॥
जीविष्यामो यावदीशिष्यसि त्वम् ।
वरस्तु मे वरणीय स एव ॥२७॥
अजीर्यताममृतानामुपेत्य ।
जीर्यन् मर्त्य क्वध स्थ प्रजानन् ।
अभिध्यायन् वर्णरतिप्रमोदान् ।
अतिदीर्घे जीविते को रमेत ॥२८॥
यस्मिन्निद विचिकित्सति मृत्यो ।
यत्सापराये महति ब्रूहि नस्तत् ॥
योऽय वरो गूढमनुप्रविष्ट ।
नान्य तस्मान्नचिकेता वृणीते ॥२९॥

**अर्थ** —नचिकेत म्हणाला, "हे मृत्यो [अतक] ज्या उपभोगाचें प्रलोभन त्वा मला दाखविलेंस ते मर्त्यांचे उपभोग उद्या राहणार नाहीत [श्वोभाव । श्व अभावो येषा ते ] कारण ते उपभोग सर्व इद्रियाचें हें तेज [एतत् तेज ] म्हणजे उपभोगसामर्थ्य क्षीण करतात [जरयति] आणि पूर्ण [सर्व] आयुष्य [जीवितम] देखील [अपि] थोडेंच आहे म्हणून तुझे घोडे, नृत्य आणि गीत तुझेंच असू दे [सतु हें अध्याहृत क्रियापद] म्हणजे मला देऊ नकोस ॥२६॥ वित्ताने म्हणजे धनाने मनुष्याची तृप्ति होत नाही आणि तें वित्तहि आम्ही तुला ज्या अर्थी पाहिलें म्हणजे तुला पाहून तुझ्यापासून कर्मरूपी अग्नीची उपासना शिकलो त्या अर्थी त्या उपासनेने आम्हास मिळेलच तें वराने पुन मागण्याची गरज नाही आयुष्यहि मागण्याची गरज नाही, कारण तू जेव्हा आम्हास आपल्या काबूत घेशील

म्हणजे मारशील [ईशिष्यसि] तोंपर्यंत आम्ही जिवंत राहणारच आहोंत. म्हणून मी तोच वर मागतो. ॥ २७ ॥ वुद्धयासारख्या न मरणाऱ्या [अमृतानां] व जरारहित [अजीर्यताम्] देवाजवळ आल्यानंतर [उपेत्य। "समीपम्" हें पद अध्याहृत मानून "समीपमुपेत्य" अशी रचना करावी व अर्थ करावा] म्हणजे त्यांच्याजवळून श्रेष्ठ प्रकारचें ज्ञान मिळविणें शक्य असतां ह्या पृथ्वीवर खाली राहणारा [क्वधःस्थः] जरामरणयुक्त [जीर्यन् मर्त्यः] व गीतरतिपासून म्हणजे गाणें व स्त्रियांचा उपभोग ह्यापासून होणारे आनंद [वर्णरतिप्रमोदान्] नश्वर आहेत असा विचार करणारा [अभिध्यायन्] कोणता जाणता मनुष्य दीर्घजीवितासच आनंद मानील ? ॥२८॥ ज्या विषयीं [यस्मिन्]-हा संशय घेतात [इदं विचिकित्संति] आणि जें मोठ्या भविष्यकालांत [सांपराये] म्हणजे मृत्यूनंतरच्या कालांत आहे, तें, हे मृत्यो आम्हांस सांग. हा जो गूढ विषयासंबंधीचा [अनुप्रविष्टः] वर आहे त्याहून भिन्न वर नचि-केत मागत नाही. ॥२९॥

टिप्पणें:—"सर्व":—छांदोग्यांत, २। ११–२०. येथे आणि ४। ११–१३ येथे 'सर्वमायुः' हे शब्द वारंवार आले आहेत. तेथे 'सर्व' ह्याचा अर्थ 'पूर्ण' असाच आहे. तदनुसारच येथेहि 'सर्व' ह्याचा 'पूर्ण' असा अर्थ केला आहे.

क्वधःस्थः—कुः एव अधः क्वधः। तत्र तिष्ठति सः क्वधः-स्थः।; 'क्व तदास्थः' असाहि दुसरा पाठ आहे असें श्री शंकराचार्य म्हणतात आणि 'कः तदास्थः' ह्यांचा जो अर्थ होईल तसा त्या पाठाचा अर्थ ते श्लोकाच्या पूर्वार्धाचें निराळें वाक्य मानून करतात.

'अभिध्यायन्' म्हणजे 'विचार करणारा' असा अर्थ आम्ही केला आहे. श्री शंकराचार्यांनीहि असाच म्हणजे "अनवस्थितरूप-

तया निरूपयन्" असा केला आहे. हाच अर्थ पुढे वल्ली दोन श्लोक ३ येथे जुळतो. प्रश्नोपनिषदांत पांचव्या प्रश्नांतहि 'अभिध्ये' ह्या धातूचा असाच अर्थ आहे.

'वर्णरतिप्रमोदान्' ह्यांतील 'वर्ण' ह्याचा, अर्थ मूळचा अकारादि अक्षरें असा आहे. गायनांत अर्थनिरपेक्ष अकारादि अक्षरेंच आनंद देतात म्हणून 'वर्ण' ह्याचा अर्थ गायन असा केला आहे. श्री गोपालयतींद्रटीकेंतहि हाच अर्थ केला आहे.

"सांपरायें" सं परायते म्हणजे जोराने पळतो म्हणजेच जोराने पळून जो वर्तमानकाळ व भूतकाळ यनतो तो भविष्य काळ असा मूळचा अर्थ असला पाहिजे. त्यावरूनच मृत्यूनंतरचा काळ असा अर्थ निघाला व तोच अर्थ येथे आहे. हा शब्द पुनः वल्ली २ श्लोक ६ येथे आला आहे. येथे त्याचा अर्थ भविष्यकाळ असाच आहे.

## वल्ली दुसरी

वल्ली २ श्लोक १-६

अन्यच्छ्रेयोऽन्यदुतैव प्रेयः ।
ते उभे नानार्थे पुरुषं सिनीतः ॥
तयोः श्रेय आददानस्य साधु भवति ।
हीयतेऽर्थाद्य उ प्रेयो वृणीते ॥ १

श्रेयश्च प्रेयश्च मनुष्यमेतः ।
तौ संपरीत्य विविनक्ति धीरः ॥
श्रेयो हि धीरोऽभिप्रेयसो वृणीते ।
प्रेयो मंदोऽयोगक्षेमाद्वृणीते ॥ २ ॥

स त्वं प्रियान् प्रियरूपांश्च कामान् ।
अभिध्यायन्नचिकेतोऽत्यस्राक्षीः ॥
नैतां सृंकां वित्तमयीमवाप्तः ।
यस्यां मज्जंति बहवो मनुष्याः ॥३॥

दूरमेते विपरीते विषूची ।
अविद्या या च विद्येति ज्ञाता ॥
विद्याभीप्सिनं नचिकेतसं मन्ये ।
न त्वा कामा बहवोऽलोलुपंत ॥४॥

अविद्यायामंतरे वर्तमानाः ।
स्वयं धीराः पंडितंमन्यमानाः ॥
दंद्रम्यमाणाः परियंति मूढा ।
अंधेनैव नीयमाना यथांधाः ॥५॥

न सांपरायः प्रतिभाति बालं ।
प्रमाद्यंतं वित्तमोहेन मूढम् ॥
अयं लोको नास्ति पर इति मानी ।
पुनः पुनर्वशमापद्यते मे ॥६॥

अर्थः—यम म्हणाला, "श्रेयस् म्हणजे हितकर हें प्रियाहून भिन्न [ अन्यत् ] असतें आणि प्रिय [प्रेयस्] हें श्रेयसाहून भिन्न असतें म्हणजे हितकर असतें तें प्रिय नसतें आणि प्रिय असतें तें हितकर नसतें; त्यांची फळेंहि भिन्न आहेत. [ नानार्थे ] तें दोनहि मनुष्यावर आपले पाश टाकतात म्हणजे मनुष्यास आपल्या आपल्याकडे ओढतात [ सीनीत ] अशा वेळीं जो श्रेयाचा स्वीकार करतो त्यानें कल्याण होतें परंतु जो प्रेयाची निवड करतो [वृणीते] त्याच्या

कल्याणाची हानी होते [अर्थात् हीयते] म्हणजे त्याला कल्याण प्राप्त होत नाही. ॥१॥ श्रेयस् आणि प्रेयस् हे दोनहि मनुष्याकडे येतात. तेव्हा शहाणा मनुष्य [धीरः] त्यांचे परीक्षण करून [संपरीत्य] त्यांमधील फरक पाहतो [विविनक्ति] आणि प्रेयसापेक्षा श्रेयसच पसंत करतो [अभिवृणीते] म्हणजे निवडतो. पण मंदबुद्धीचा मनुष्य शरीराची शक्ति वगैरे मिळविणें [योग] आणि त्याचें रक्षण करणें [क्षेम] ह्याकरितां काय केलें पाहिजे ह्याचा विचार न करितां [अयोगक्षेमात्] प्रेयसच पसंत करतो ॥२॥ त्या, त्वां [स त्वं] म्हणजे त्याला कामांचा लोभ मी दाखविला त्या त्वां; प्रिय आणि प्रियासारखेंच दिसणारे [प्रियरूपान्] जे काम त्यांचा विचार करून [अभिध्यायन्] हे नचिकेता, त्याग केलास [अत्यस्राक्षीः]. जीमध्ये पुष्कळ मनुष्य बुडतात अशी ही चालूं क्षणीं होणाऱ्या विषयसुखांची धनलेली [वित्तमयी] उपभोगपरंपरा [सृंका] त्वां स्वीकारली नाहींस [न अवाप्तः]. एकूण तुझी बुद्धि फार चांगली आणि सावध आहे असा भाव आहे. ॥३॥ जिला 'विद्या' असें म्हणतात [इति ज्ञाता] आणि जिला 'अविद्या' असें म्हणतात, ह्या दोन एकमेकींपासून दूर आहेत; त्यांचीं रूपेंहि एकमेकांच्या उलटीं आहेत [विपरीते], आणि त्यांचीं फळेंहि एकमेकांपासून भिन्न आहेत [विषूची]. नचिकेत हा 'विद्ये'ची इच्छा करणारा आहे असें मी मानतो. कारण हे नचिकेता, तुला हे पुष्कळ काम लोभवूं शकले नाहीत [अलोलुपंत]. ॥४॥ अविद्येमध्येच गुरफटून गेलेले [वर्तमानाः] स्वतालाच शहाणे आणि पंडित (म्हणजे शास्त्रार्थांचा अर्थ जाणणारे) मानणारे मूर्ख लोक [मूढाः], ज्यांचे वाट दाखविणारे आधळेच आहेत अशा आंधळ्यांप्रमाणे, दांदरत [दंद्रम्यमाणाः] म्हणजे ठेचा खात व पडतझडत फिरतच राहतात [परियंति] म्हणजे आपल्या मुक्कामास जाऊन पोचत नाहीत; म्हणजे अनेक दुःखें भोगतात आणि आनंदावस्थेस प्राप्त

होत नाहीत असा भाव आहे. ॥५॥ चालू क्षणीं प्राप्त होणाऱ्या सुखाच्या मोहाने [वित्तमोहेन] मूढ आणि चुकणाऱ्या मनुष्यास भविष्यत्काळ [सांपरायः] दिसत नाही [प्रतिभाति] म्हणजे त्या चालू क्षणाच्या सुखापासून (तात्कालिक सुखापासून) पुढच्या काळीं होणारें दुःख त्याला दिसत नाही. हीच चालू अवस्था [अयं लोकः] आहे आणि पुढील भविष्यत्काळची अवस्था [परः लोक] नाही असें मानणारा मनुष्य पुन. पुन. माझ्या म्हणजेच अखेरचें मरण जवळ आणणाऱ्या दुःखाच्या कचाट्यांत सापडतो. (तावडींत सापडतो). म्हणजे दुःखी होतो हा भाव आहे. ॥६॥

टिप्पणीः—"अयोगक्षेमात्" इतरानी 'योगक्षेमात्' असाच पदच्छेद केला आहे; परंतु 'अयोगक्षेमात्' असाहि पदच्छेद करता येतो आणि ह्यानेच अधिक सरळ अर्थ निघतो हें उघड आहे.

"वित्त"—इतरानी वित्त म्हणजे धन असा अर्थ केला आहे. पण त्याने श्लोकाचा सरळ व उपपन्न अर्थ निघत नाही म्हणून आम्ही 'वित्त' ह्याचा यौगिक अर्थ विचारात घेऊन त्यावरून 'सांपराय' ह्याच्या विरुद्ध असा अर्थ घेतला आहे कारण 'सांपराया' विरुद्ध असाच अर्थ 'वित्त' ह्या शब्दात अभिप्रेत असणें संभवनीय आहे व त्यावरून प्राप्त होणाराच श्लोकार्थ उपपन्न आहे इतर अर्थ उपपन्न नाहीत. धनापेक्षा चालू क्षणीं प्राप्त होणारें सुखच म्हणजेच तात्कालिक सुखच जास्त मोहक असतें म्हणून आमचा अर्थ जास्त उपपन्न आहे. शिवाय मृत्यूनंतरच्या अवस्थेविषयीं उपनिषदामध्ये जें केवळ कल्पनेनें सांगितलें आहे त्याला अनुसरून अर्थ करण्यापेक्षा मृत्यूपूर्वी-देखील जें प्रत्यक्ष दिसून येतें त्याला अनुसरून अर्थ करणें अधिक चांगलें म्हणूनहि 'सांपराय.' म्हणजे 'भविष्यकाळ' आणि 'वित्त' म्हणजे प्राप्त झालेलें म्हणजे चालू क्षणीं मिळणारें सुख असा अर्थ करणें योग्य आहे.

'अविद्या' म्हणजे विषयभोगप्राप्त्यर्थ करावयाचीं कर्में असा अर्थ आहे. अविद्येचें साध्य विषयभोगप्राप्ति असल्यामुळे येथे केलेली तिची निंदा योग्यच आहे. तथापि ती अजीबात टाकावी असा भाव नाही; कारण परिमित विषयभोगानेच दररोजचा मृत्यु टळतो म्हणूनच 'अविद्यया मृत्युं तीर्त्वा' असें ईशोपनिषदांत म्हटलें आहे. 'अविद्या' आणि 'विद्या' ह्याचा समुच्चय करावा असा भाव आहे. वेदोक्तयज्ञादिकर्मांचा अविद्येतच अंतर्भाव होतो. कारण त्यांचेंहि प्राप्तव्य विषयोपभोग हेंच आहे. म्हणूनच यज्ञादिकर्मांची निंदा मुंडक १ । २ । ७-११ येथे बहुतेक कठांतील शब्दांनीच आणि भगवद्गीतेंत 'यामिमां पुष्पितां वाचम्' इत्यादि श्लोकांत दुसऱ्या अध्यायांत केली आहे. यज्ञादि कर्मांनाच अग्नीचयनादि कर्में असें व्याससूत्रांत म्हटलें आहे आणि तीं करणें किंवा न करणें हें काम्य आहे असें म्हटलें आहे. ३।४।२५—२६ वरील आमचें विवरण पहा.

"सिनीतः":—सि धातूचा अर्थ आपट्यांच्या कोशांत 'ensnare' म्हणजे पाशानें बांधणें असा दिला आहे. पाशानें बांधल्यानंतर ओढण्याची क्रिया होते म्हणून 'ओढतात' असा अर्थ आम्ही केला आहे.

वल्ली २ श्लोक ७-१२

श्रवणायापि बहुभिर्यो न लभ्यः ।
श्रृण्वंतोऽपि बहवो यं न विद्युः ॥
आश्चर्यो वक्ता कुशलोऽस्य लब्धा ।
आश्चर्यो ज्ञाता कुशलानुशिष्टः ॥७॥
न नरेणावरेण प्रोक्त एष ।
सुविज्ञेयो बहुधा चिंत्यमानः ॥

अनन्यप्रोक्ते गतिरत्र नास्ति ।
अणीयान् ह्यतर्क्यमणुप्रमाणात् ॥८॥

नैषा तर्केण मतिरापनेया ।
प्रोक्तान्येनैव सुज्ञानाय प्रेष्ठ ॥
यां त्वमापः सत्यधृतिर्बतासि ।
त्वादृङ्नो भूयान्नचिकेतः प्रष्टा ॥९॥

जानाम्यहं शेवधिरित्यनित्यम् ।
न ह्यध्रुवैः प्राप्यते हि ध्रुवं तत् ॥
ततो मया नाचिकेतश्चितोग्निः ।
अनित्यैर्द्रव्यैः प्राप्तवानस्मि नित्यम् ॥१०॥

कामस्याप्तिं जगतः प्रतिष्ठाम् ।
क्रतोरानन्त्यमभयस्य पारम् ॥
स्तोमं महदुरुगायं प्रतिष्ठाम् ।
दृष्ट्वा धृत्वा धीरो नचिकेतोऽत्यस्राक्षीः ॥११॥

तं दुर्दर्शं गूढमनुप्रविष्टम् ॥
गुहाहितम् गह्वरेष्ठं पुराणम् ॥
अध्यात्मयोगाधिगमेन देवम् ।
मत्वा धीरो हर्षशोकौ जहाति ॥१२॥

एतच्छ्रुत्वा संपरिगृह्य मर्त्यः ।
प्रवृह्य धर्म्यमणुमेतमाप्य ॥
स मोदते मोदनीयं हि लब्ध्वा ।
विवृतं सद्म नचिकेतसम् मन्ये ॥१३॥

**अर्थ**--यम पुढे म्हणाला, "जो आत्मा पुष्कळांस ऐकण्या-सहि मिळत नाही व ऐकण्यास मिळाला तरी त्याचें ज्ञान पुष्कळांस होत नाही, त्याविषयीं कुशलपणें बोलणारा आश्चर्य आहे म्हणजे क्वचितच असतो. आणि कुशल मनुष्यानें शिकविलें तरी [अनुशिष्टः] त्या आत्म्याला जाणणारा [ज्ञाता] व मिळविणारा [लब्धा] हि आश्चर्यच आहे म्हणजे क्वचितच असतो. ॥७॥ पुष्कळ प्रकारांनी ज्याचा विचार करावा लागतो, अशा ह्या आत्म्याचें वर्णन हलक्या मनुष्यानें केलें असतां तो सोप्या किंवा चांगल्या रीतीनें जाणला जात नाही. दुसऱ्यानें वर्णन केल्याशिवाय (सामान्य बुद्धीच्या मनुष्यास) ह्याचें ज्ञान होत नाही; कारण अणूपेक्षांहि [ अणुप्रमाणात् ] लहान [ अणीयान् ] असलेल्या ह्या आत्म्याचें रूप तर्कं करण्यास कठीण आहे. ॥८॥ जें हें ज्ञान [यां मतिं] आतां तुला मजकडून मिळणार आहे [त्वं आपः] तें हें ज्ञान (सामान्य मनुष्यास) तर्कानें मिळूं शकत नाही. हें अत्यंत आवडत्या नचिकेता, दुसऱ्यानें अर्थात् श्रेष्ठ पुरुषानें सांगितलें तरच हें ज्ञान सहज आणि चांगलें होतें [सुज्ञानाय]. हे नचिकेता तूं खरोखरच [बत] सत्यनिष्ठ [सत्यधृतिः] आहेस. तुझ्यासारखा पुसणारा शिष्य आम्हास मिळावा. ॥९॥ धन [शेवधि] अनित्य म्हणजे अध्रुव (चंचल) आहे हें मी जाणतों आणि अध्रुव वस्तूंनी तें ध्रुव आत्मतत्त्व प्राप्त होऊं शकत नाही हेंहि जाणतों. म्हणूनच मी नाचिकेत अग्नीची उपासना करून अध्रुव वस्तूंनी [अनित्यैः द्रव्यैः] आवश्यक तेवढेंच [नित्यम्] म्हणजे आयुष्य म्हणजेच जिवंत राहणें आणि जागृतीची अवस्था एवढेंच मिळविलें, अधिक म्हणजे कामोपभोग मिळविण्याची हाव मी धरलीनाही असा भाव आहे. अर्थात् मी तुझा गुरु होण्यास योग्य आहे. ॥१०॥ (आणि तूं देखील माझा शिष्य होण्यास योग्य आहेस, कारण) हे नचिकेता, त्वां, (१) कामाची आप्ति म्हणजेच तृप्ति (२) जगाची

म्हणजेच जगांतील वस्तूंची प्रतिष्ठा म्हणजे स्थिरता (३) जीवनाचें [क्रतोः] आनंत्य (४) अभयाचा म्हणजेच आनंदाचा पार म्हणजे पैलतीर (५) मोठ्या कीर्तीचें [उरुगायम्] आणि स्तुत्य [स्तोमं] असें पूर्णानंदरूपी मोठें पद [ महत् ] आणि त्याची प्रतिष्ठा म्हणजेच स्थिरता अथवा शाश्वती [प्रतिष्ठां] ह्या पांच गोष्टींचा धैर्यानें [ धृत्या ] विचार करून [ दृष्ट्वा ] शहाणपणानें [ धीरः ] कर्मांनी प्राप्त होणाऱ्या अनावश्यक विषयोपभोगांचा त्याग केलास. म्हणजे (१) कामाची तृप्ति उपभोगांनी कधीच होत नाही. (२) जगांतील वस्तु स्थिर नाहीत. (३) परंतु जीव अनंत असल्यामुळे त्याच्या अनंत काळच्या आनंदाची तरतूद केली पाहिजे (४) म्हणून आनंदाचें परतीर पाहणें म्हणजेच आनंदाचें स्वरूप पूर्णपणें जाणून घेणें जरूर आहे (५) आणि जाणल्यानंतर तें पूर्णानंदाचें स्तुत्य, मोठ्या कीर्तीचें मोठें पद मिळविणें [प्रतिष्ठाम्] जरूर आहे असा विचार करून विषयोपभोगांचा त्वां त्याग केलास. ॥११॥ गह्वरांत म्हणजे दुर्गम प्रदेशामध्ये असल्यामुळे जाणण्यास कठीण [ गह्वरेष्ठः ], पुढे वल्ली ३ श्लोक १०-११ येथे वर्णिलेल्या गुहेंत ठेवलेला [गुहाहितं] वल्ली ६ श्लोक १७ येथे वर्णिल्याप्रमाणे गूढ अशा हृदयांत प्रवेश करून राहणारा [गूढमनुप्रविष्टं] जो पुराण म्हणजे अनादि देव (आत्मा, ब्रह्म) त्याचा जीवाशीं [अध्यात्म] त्याच्या (त्यां देवाच्या) संयोगाची [ योग ] प्राप्ति होईपर्यंत, [ अधिगमेन] विचार केल्यानें [मत्वा] हर्ष आणि शोक ह्यांचा शहाणा मनुष्य [ धीरः ] त्याग करतो, म्हणजे हर्षशोकापासून मुक्त होतो. ॥ १२ ॥ हें आत्मज्ञान ऐकून व त्याचें चांगल्या रीतीनें ग्रहण करून त्या ज्ञानाच्या साधनानें, धार्य म्हणजे धर्माचें साध्य जो आनंद त्यास देणाऱ्या, आत्म्यास, शरीरांतून वेगळें काढून [प्रवृह्य] म्हणजे शरीरापासून तो भिन्न आहे असें जाणून, त्या सूक्ष्म आत्म्यास [ एतं अणुं] मिळवून म्हणजे त्या

आनंद देणाऱ्यास [मोदनीयं] मिळवून आनंद पावतो [मोदते]. नचिकेताकरिता त्या आनंदाचें घर उघडें झालें आहे असें मला वाटतें. ॥१३॥

टिप्पणी:—यस्त्री ३ श्लोक १२ येथील "दृश्यते त्वग्र्यया बुद्ध्या सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभिः" ह्या वचनांत आत्मा श्रेष्ठ बुद्धीने जाणला जातो हें स्पष्ट सांगितलें आहे आणि तें येथील कांहीं श्लोकांत जें सांगितलें आहे त्याशीं विरुद्ध आहे. म्हणून जैमिनीय सूत्र "शास्त्रदृष्टविरोधाच्च" (१।२।२) प्रमाणें ह्या विरुद्ध वचनांपैकीं कोणतें तरी एक स्तुत्यर्थक म्हणजे प्रशंसा म्हणजे फुगवून सांगितलेलें आहे असें मानणें भाग आहे. कोणतेंहि ज्ञान प्रथमतः बुद्धीनेच होतें, आणि दुसऱ्यास कोणतेंहि ज्ञान सांगणारा पहिला मनुष्यहि तें ज्ञान बुद्धीनेच जाणतो म्हणून येथील श्लोकांतील वचनेंच प्रशंसा आहेत, म्हणजे फुगवून सांगितलीं आहेत असें मानलें पाहिजे. सामान्य बुद्धीच्या मनुष्यास स्वतःच्या बुद्धीने आत्म्याचें ज्ञान होत नाहीं हीच गोष्ट फुगवून "आत्मा अज्ञेय आहे," असें म्हटलें असलें पाहिजे, म्हणून आम्ही प्रशंसेचें स्वरूप काढून वर दिल्याप्रमाणें अर्थ केला आहे.

"अणुप्रमाणात्" येथील "प्रमाण" हा शब्द पुरावा (evidence, proof) ह्या अर्थाचा नाहीं; तो माप (measure) ह्या अर्थाचा आहे.

"नित्य":—नित्य म्हणजे नेहमीं राहणारा, ध्रुव, असा एक अर्थ आहे आणि आवश्यक असाहि दुसरा अर्थ आहे (आपट्यांचा कोश पहा). हा दुसरा अर्थ धर्मशास्त्रांत प्रसिद्ध आहे. दहाव्या श्लोकांत नित्य शब्द हा भिन्न ठिकाणीं ह्या दोन भिन्न अर्थांनी योजला आहे असें मानल्याशिवाय ह्या श्लोकांचा चांगला अर्थ लागत नाहीं.

"क्रतु" म्हणजे जीव हें ईशोपनिषदांतील श्लोक १७ च्या टिप्पणांत दाखविलें आहे. "स्तोमं महत् उरुगायं":—स्तोम म्हणजे स्तुत्य असा अर्थ श्री शंकराचार्य करतात. तदनुसार आम्हीहि केला आहे पण त्याचा कोणता तरी भिन्न अर्थ असावा असें वाटतें. आपट्यांच्या कोशाप्रमाणें हा शब्द विशेषण नसून नाम आहे. तो पुल्लिंगी असेल तर त्याचे स्तुति, यज्ञ वगैरे अर्थ, आणि नपुंसकलिंगी असेल तर त्याचे ढीग, धान्य वगैरे अर्थ दिले आहेत. त्यापैकी येथे एकहि जुळत नाही. "स्तोम" हा शब्द स्तु म्हणजे स्तुति करणें ह्या धातूपासून निघाला आहे व त्याचा यौगिक अर्थ कोणतीहि स्तुत्य गोष्ट असा होतो. धान्याप्रमाणेच किंबहुना अधिक, सुख हेंहि स्तुत्यच आहे तर मग 'स्तोम' ह्याचा सुख असाहि अर्थ असूं शकतो व तोच अर्थ येथे असेल असें वाटतें. तसें मानल्यास "स्तोमं महदुरुगायं" ह्याचा अर्थ "ज्याची फार स्तुति करतात [उरुगायं] तो मोठा [महत्]आनंद" असा होईल हाहि अर्थ आम्ही वर केलेल्या अर्थाहून भिन्न नाही.

"अध्यात्मयोगाधिगमेन":—"अध्यात्मा" म्हणजे 'जीव' हाच अर्थ उपनिषदामध्ये असतो, हें निश्चित आहे. 'अथदेवं', 'अथाध्यात्मम्' असे प्रयोग उपनिषदामध्ये वारंवार येतात. तेथे 'आत्मन्' शब्दाचा अर्थ 'शरीर' हाच सर्व मानतात. अर्थात येथेहि 'अधि आत्मनि शरीरे तिष्ठति सः अध्यात्मा जीवः' असाच अर्थ असला पाहिजे. तसा अर्थ घेऊन 'अध्यात्मयोगाधिगमः' ह्या समासाचा अर्थ आम्ही केला आहे. त्याच्या तृतीयाविभक्तीचा अर्थ लक्षण असा आम्ही मानला आहे. म्हणजे 'मत्वा' ह्यांतील मनन क्रियेचें अध्यात्मयोगाधिगम हें लक्षण आहे असें मानलें आहे.

"ज्ञाता, लब्धा":—सातव्या श्लोकांत हे दोन शब्द आले आहेत. ह्यावरून ब्रह्मज्ञान आणि ब्रह्मप्राप्ति ह्यांमध्ये उपनिषदें फरक

मानतात असें दिसतें. ब्रह्मज्ञान म्हणजे ब्रह्माचे गुण जाणणें. ब्रह्मप्राप्ति म्हणजे ते ब्रह्माचे गुण वर्तनांत येणें. जसें ब्रह्म हें शोकरहित आहे हें जाणणें ज्ञान होय आणि तें शोकराहित्य वर्तनांत येणें ही ब्रह्मप्राप्ति. हिलाच बाराव्या श्लोकांतील "अध्यात्मयोगाधिगमेन" ह्या शब्दांत 'योग' म्हटलें आहे. ब्यासमूत्रें, ४ । १ विशेषतः सूत्र १२ ह्यावरील आमचें विवरण पहा.

"हर्ष शोकौ":—ह्यांतील 'हर्ष' 'आनंदा'हून भिन्न आहे. 'हर्ष' हा परावलंबी म्हणजे बाह्य विषयप्राप्तीवर अवलंबून असतो. 'आनंद' हा बाह्य विषयप्राप्तीवर अवलंबून नसतो. ब्रह्मज्ञाच्या दृष्टीने जागृतींतील कोणतीहि शारीरदुःखरहित अवस्था 'आनंदच' होय. अनुकूलविषयप्राप्ति म्हणजे 'हर्ष'. प्रतिकूल विषयप्राप्ति 'दुःख' होय. खरोखर दुःख नसताहि दुःख मानणें म्हणजेच 'शोक'. 'नचिकेतसम्' ही द्वितीया विभक्ति 'प्रति' ह्या अध्याहृत अव्ययामुळे आलेली आहे.

वल्ली २ श्लोक १४

अन्यत्र धर्मादन्यत्राधर्मात् । अन्यत्रास्मात्कृताकृतात् ॥
अन्यत्र भूताच्च भव्याच्च । यत्तत्पश्यसि तद्वद ॥१४॥

**अर्थ**—नचिकेता म्हणाला, "अधर्मानें किंवा धर्मानेंहि आचरण न करणारे, केलेल्या म्हणजे कार्यरूप आणि न केलेल्या म्हणजे कारणरूप अशा वर्तमान जगाहून [अस्मात्] भिन्न आणि मागच्या काळच्या व पुढच्या काळच्या जगाहून भिन्न असें जे तुला दिसतें तें तूं मला सांग." परिणामवादाच्या दृष्टीने परिणामवादापूर्वीची जी अवस्था ती सांग असा भाव आहे.

**टिप्पणी**—हा नचिकेताचा चवथा प्रश्न नव्हे, तिसऱ्या प्रश्नाचा पोटप्रश्न आहे. म्हणजे तिसऱ्या प्रश्नाचें उत्तर चांगल्या रीतीने समजण्यास ह्या पोटप्रश्नाचें उत्तरहि समजलें पाहिजे.

"कृताकृत"—ह्याचा अर्थ श्री. शंकराचार्यांनी केला तसा आम्ही केला आहे. पण कारण व कार्य म्हणजे ब्रह्म आणि जग ह्याहून ब्रह्म भिन्न कसें असा प्रश्न येतो. त्याचें समाधानकारक उत्तर नाही. कारण म्हणजे सूक्ष्म जग आणि कार्य म्हणजे स्थूल असें कोणी म्हणतील तर तें बरोबर नाही; कारण सूक्ष्म आणि स्थूल हीं दोनहि ब्रह्माचीं कार्येंच होत. म्हणून कृत म्हणजे मनुष्यानें केलेलें आणि अकृत म्हणजे मनुष्यानें न केलेलें असे अर्थ आम्ही सुचवितों त्यांचा विचार करावा. "कृत्रिम" किंवा "कृतक" ह्यांचा जो अर्थ तोच "कृत" ह्याचा होऊं शकतो.

वल्ली २ श्लोक १५

सर्वे वेदा यत्पदमामनन्ति ।
तपांसि सर्वाणि च यद्वदंति ॥
यदिच्छंतो ब्रह्मचर्यं चरंति ।
तत्ते पदं संग्रहेण ब्रवीमि ॥ ओमित्येतत् ॥१५॥

**अर्थ**—"सर्व वेद ज्या पदाचें वर्णन करतात, ज्या पदाकरितां [यत्] तपश्चर्या सांगतात, जें पद मिळण्याच्या इच्छेनें ब्रह्मचर्याचें आचरण करतात, तें ओम् नांवाचें पद मी तुला थोडक्यांत [संग्रहेण] सांगतो." असें यम म्हणाला.

**टिप्पणी**—भगवद्गीता ८।११ येथें हा श्लोक सुधारून घेतला आहे. त्यावरून हें उपनिषद् भगवद्गीतेच्या पूर्वींचें ठरतें.

वल्ली २ श्लोक १६-१७—

एतद्ध्येवाक्षरं ब्रह्म एतद्ध्येवाक्षरं परम् ।
एतद्ध्येवाक्षरं ज्ञात्वा यो यदिच्छति तस्य तत् ॥१६
एतदालंबनं श्रेष्ठं एतदालंबनं परम् ।
एतदालंबनं ज्ञात्वा ब्रह्मलोके महीयते ॥१७॥

**अर्थ**—ओम् हा शब्दच [ अक्षरम् ] ब्रह्मवाचक आहे. हें कधीहि क्षय न पावणारें [ अक्षरम् ] ब्रह्मच सर्वांमध्ये श्रेष्ठ आहे. हें अक्षर ब्रह्म जाणल्यानें ज्याला जें पाहिजे तें मिळतें. ( कारण त्या ब्रह्मापासून आनंद प्राप्त झाल्यामुळे त्याला इतर कशाची इच्छाच रहात नाही, किंवा छांदोग्य, ८।२ च्या विवरणांत दाखविल्याप्रमाणे त्याच्या इच्छा इतर जीव पुरवितात ) ॥१६॥. हें ब्रह्मच आनंदप्राप्तीचा श्रेष्ठ उपाय [ आलंबनम् ] आहे, तें ब्रह्म आनंदप्राप्तीचा पर म्हणजे दूर असलेला म्हणजे आटो-क्याच्या पुष्कळ बाहेर असलेला अथवा सहज प्राप्त न होणारा उपाय आहे. तो उपाय जो कोणी श्रेष्ठप्रतीचा मनुष्य जाणतो तो ब्रह्मलोकांत मोठा होऊन राहतो किंवा पूजिल्या जातो (ब्रह्मलोक म्हणजे काय ह्याचें स्पष्टीकरण बृहदारण्यक ४।४।२३, ४।३।३२ किंवा ४।३।३३ येथे पहा. त्यावरून दिसतें की ब्रह्मलोक म्हणजे सर्वत्र अद्वैतदृष्टीने पाहणाऱ्या कामरहित मनुष्याची आनंदपूर्ण अवस्था. "केन" खंड १ श्लोक २ येथील "अस्माल्लोकात्" ह्यावरील टिप्पण पहा. किंवा महीयते म्हणजे पूर्ण आनंदाचा अनुभव घेतो असाहि अर्थ असेल.)

वल्ली २ श्लोक १८-१९—

न जायते म्रियते वा विपश्चित् ।  
नायं कुतश्चित् न बभूव कश्चित् ॥  
अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो ।  
न हन्यते हन्यमाने शरीरे ॥१८॥  
हंता चेन्मन्यते हंतुं हतश्चेन्मन्यते हतम् ।  
उभौ तौ न विजानीतो नायं हंति न हन्यते ॥१९॥

**अर्थ**—जाणणारा [ विपश्चित् ] म्हणजे चैतन्यवान् असा हा आत्मा जन्मत नाही किंवा मरतहि नाही. हा कोणापासून झाला असें नाही. हा आत्मा कोणी झाला [अयं कश्चित् बभूव] म्हणजे प्रथम एकप्रकारचा

असून नंतर दुसऱ्या प्रकारचा झाला म्हणजेच विकार पावला असें नाही. हा न जन्मणारा [अज] नेहमी राहणारा, क्षीण न होणारा [शाश्वत] आणि जुनाच [पुराणः] आहे. शरीर मारलें तरी हा मारला जात नाही. ॥१८॥ मारणाऱ्याला मी ह्याला मारीन [हंतुं] असें वाटत असेल आणि मारलेल्यास मी मारला गेलों असें वाटत असेल तर ते दोघेहि खरें काय आहे तें जाणत नाहीत [न विजानीतः]. कारण हा मारूं शकत नाही आणि मारलाहि जात नाही. ॥१९॥

टिप्पणें—भगवद्गीता २।१९–२० येथे हेच श्लोक सुधरून घेतले आहेत.

वल्ली २ श्लोक २०–२१

अणोरणीयान् महतो महीयान् ।
आत्मास्य जंतोर्निहितो गुहायाम् ॥
तमक्रतुं पश्यति वीतशोको ।
धातुप्रसादान् महिमानमात्मनः ॥२०॥
आसीनो दूरं व्रजति शयानो याति सर्वतः ।
कस्तं मदामदं देवं मदन्यो ज्ञातुमर्हति ॥२१॥

अर्थ—हा अणूपेक्षाहि लहान आहे (कारण तो शरीराच्या अत्यंत सूक्ष्म भागांत आहे) तो मोठ्यापेक्षाहि मोठा आहे. (कारण तो जगांत सर्वत्र आहे). तो ह्या जंतूचा म्हणजे जीवाचा आत्मा म्हणजे परमात्मा आहे आणि तो पुढे वल्ली ३ श्लोक १०–११ येथे वर्णिलेल्या गुहेंत ठेविला आहे. त्या बुद्धिरहित असलेल्या [अक्रतुम्] म्हणजे बुद्धिशिवायहि बुद्धिवंताप्रमाणे जगाची उत्पत्ति व नियमन करणाऱ्या आत्म्यास म्हणजे स्वतःच्याच मोठेपणास म्हणजे मोठ्या रूपास जीव, मन व बुद्धि ह्या धातु प्रसन्न म्हणजे स्वच्छ किंवा निर्मळ झाला असतां, पाहतो आणि शोकरहित होतो. ॥२०॥ झोपेंत असतांना [शयानः] हा आत्मा

स्वप्नानुभवाच्या वेळीं सर्वत्र फिरतो (बृहदारण्यक ४।३।१२ येथे हेंच सांगितलें आहे) आणि एकाच ठिकाणीं बसूनहि म्हणजे जागृतींतहि (जागृतींतच मनुष्य बसूं शकतो म्हणून "आसीनः" ह्याचा अर्थ जागृतींत असा होतो. शिवाय "शयानः" ह्याशीं "आसीनः" हा शब्द प्रतियोगी असल्यामुळे त्याचा जागेपणीं असा अर्थ करावा लागतो.) मनाने दूर जातो म्हणजे मनाने दूरचे देखावे पाहतो किंवा कल्पितो, जो मदामुळे म्हणजे स्वतःच्या आनंदातिशयामुळे अमद आहे म्हणजे विषयानंदांत शिरण्याची चुकी करीत नाही, त्या आत्म्याला माझ्याइतका बुद्धिमान् नसलेला [मदन्यः] कोणता मनुष्य जाणूं शकेल? जाणूं शकत नाही असा भाव आहे ॥२१॥

टिप्पणी—"अक्रतुम्"—"अक्रतुः" असाहि पाठ पुष्कळ ठिकाणीं आहे पण एका ठिकाणीं "अक्रतुं" असा आहे. (अडयारप्रत पान ८३ पहा.) "क्रतु" हा शब्द प्रज्ञावाचक शब्दांमध्ये निघंटुमध्ये दिला आहे. क्रतु म्हणजे प्रज्ञा म्हणजेच बुद्धि असा अर्थ घेऊन आणि "अक्रतुं" असा पाठ घेऊन अर्थ चांगला जुळतो. कारण परमात्मा बुद्धिरहित आहे हें खरेंच आहे आणि बुद्धि रहित असणें हा कमीपणा नसून उलट फार मोठेपणाच आहे—बुद्धिशिवायहि जगाची उत्पत्ति व नियमन करणें हा मोठेपणाच आहे. श्री. शंकराचार्यांनी "अक्रतुः" असा पाठ घेऊन अक्रतुः म्हणजे "अकाम" असा अर्थ केला आहे आणि "अकाम जीव त्या परमात्म्यास पाहतो" असा श्लोकाचा अर्थ काढला आहे. पण ह्या अर्थामध्ये वस्तुस्थितीचा विपर्यास आहे, कारण खरोखर त्या परमात्म्यास पाहिल्यानंतर जीव अकाम होतो, केवळ अकाम झाल्याने परमात्म्यास पाहतो असें नाही आणि खरोखर परमात्म्यास उच्च प्रकारच्या बुद्धीनेच पाहतो असें ह्याच श्लोकाच्या द्वितीयार्धांत आणि कठवल्ली ३।१२ येथेहि सांगितलें आहे. मुंडक ३।१।१–२ ह्यांत जें सांगितलें आहे त्यास अनुसरूनच ह्या श्लोकाचा अर्थ आम्ही केला आहे.

"मदन्यः":—येथील "अन्य" शब्दाचा अर्थ असदश असा आहे. व श्री. शंकराचार्यांनीहि असा अर्थ घेतला आहे. "अर्थोष्मणा विरहितः पुरुषः स एव अन्यः क्षणेन भवतीति विचित्रमेतत्" ह्या प्रसिद्ध सुभाषितांत "अन्य" ह्याचा हाच अर्थ आहे. "मदन्य" ह्याचा दुसराहि अर्थ करतां येतो. "मत्" हें "अहं"चेंच समासांतील रूप आहे. म्हणून 'अहं'हून म्हणजे अहंकाराहून भिन्न असा 'मदन्य' ह्याचा अर्थ होईल. "अहंकार" हा जीवाच्या जागृतावस्थेंतच असतो. म्हणून जागृतावस्थेशिवाय इतर अवस्थेंत ब्रह्म जाणतां येत नाही असा श्लोकार्थ होईल. हाच अर्थ कठवल्ली ६।१२–१३ येथेहि सांगितला आहे. बृहदाण्यक १।४।१ मध्ये "अहम्" हें आत्म्याचें अर्थात् जीवात्म्याचें नांव आहे असें म्हटलें आहे, त्याची आमच्या ह्या अर्थास पुष्टिच आहे.

"वीतशोकः"—"अक्रतुं आत्मनः महिमानम् पश्यति वीतशोकश्च भवति" असा अन्वय आम्ही पुढील २२ व्या श्लोकांतच सांगितलेल्या वस्तुस्थितीस अनुसरून केला आहे, तो कित्येकांस आक्षेपार्ह वाटेल, त्यांनी वाटे त्यास "अक्रतुं आत्मनः महिमानं वीतशोकः पश्यति" असाच करावा पण त्या वस्तुस्थितीस अनुसरून 'वीतशोकः" ह्याचा अर्थ "वीतशोकः भविष्यन्" म्हणजे, "जो वीतशोक व्हावयाचा असेल तो" असा अर्थ करावा.

**वल्ली २ श्लोक २२**

अशरीरं शरीरेष्वनवस्थेष्ववस्थितम् ॥
महांतं विभुमात्मानं मत्वा धीरो न शोचति ॥२२॥

**अर्थ**—शरीरांमधील शरीर नसलेल्या आणि बदलणाऱ्यामधील [अनवस्थितेषु] न बदलणारा मोटा [ महांतम् ] शक्तिमान् [ विभु ] जो आहे तोच मी होय असें मानणारा शहाणा मनुष्य [ धीर ] शोकापासून मुक्त होतो. ॥२२॥

नायमात्मा प्रवचेन लभ्यो ।
न मेधया न बहुना श्रुतेन ॥
यमेवैष वृणुते तेन लभ्यः ।
तस्यैष आत्मा विवृणुते तनुं स्वाम् ॥२३॥
नाविरतो दुश्चरितात् नाशांतो नासमाहितः ।
नाशांतमानसो वापि प्रज्ञानेनैनमाप्नुयात् ॥२४॥
यस्य ब्रह्म च क्षत्रं च उभे भवत ओदनः ।
मृत्युर्यस्योपसेचनं क इत्था वेद यत्र सः ॥२५॥

**अर्थ**—पुष्कळ ग्रंथ वाचल्याने [प्रवचन] किंवा यशाने [मेधया] किंवा दुसऱ्याकडून पुष्कळ ऐकल्याने [श्रुतेन] हा आत्मा मिळतो असे नाही. ज्याला हा आत्मा पसंत करतो [वृणुते] त्यालाच तो मिळतो आणि त्यालाच तो आत्मा आपले स्वरूप [स्वां तनु] प्रगट करतो म्हणजे उघडे करून दाखवितो [विवृणुते] ॥२३॥ आत्मज्ञानाने [प्रज्ञानेन] देखील [अपि] हा आत्मा मिळतो असे नाही केवळ आत्मज्ञानाने आत्यंतिक आनंद प्राप्त होत नाही असा भाव आहे. त्याकरिता दुष्कृत्ये सोडली पाहिजेत [नाविरतो दुश्चरितात्], विषयानंदाची इच्छा सोडली पाहिजे [नाशांतः], आत्मानंदाच्या ठिकाणीं मन एकाग्र केले पाहिजे [नासमाहितः] आणि सर्व मानसिक वासना सोडल्या पाहिजेत [नाशांतमानसो] तेव्हाच आत्मा प्राप्त होतो म्हणजे आत्यंतिक अशा आत्मानंदाची प्राप्ती होते. ॥२४॥ बुद्धि किंवा बुद्धीच्या साधनाने प्राप्त होणारे अनेक प्रकारचे ज्ञान [ब्रह्म] आणि शक्ति किंवा शक्तीच्या साधनाने केलीं जाणारीं अनेक कर्मे [क्षत्र] हें ज्याचे अन्न [ओदन] आहे आणि झोप [मृत्यु] हें ज्याचें पेय [उपसेचन] आहे म्हणजे ज्ञानकर्मे व झोप हीं ज्याचीं आनंदानुभवाचीं साधनें होत, तो आत्मा येथे [इत्था] म्हणजे ह्या शरीरात जेथे

[यत्न] आहे तें स्थान कोण जाणतो. "तें स्थान सांगा" : असा भाव आहे ॥२५॥.

टिप्पणी—"मेधया":—"मेधा" म्हणजे बुद्धि असाच अर्थ इतरांनी केला आहे पण तो बरोबर नाही; कारण तो "दृश्यते त्वग्र्यया बुद्ध्या सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभिः" (वल्ली ३।१२) ह्या वचनाशीं विरुद्ध आहे. "मेधा" म्हणजे "यत्न" असा अर्थ केला पाहिजे. "यत्नानें" आत्मा मिळत नाही असें अनेक ठिकाणीं म्हटलेंहि आहे (मुंडक १।२।७–९ आणि भगवद्गीता ११।४८, ५३ पहा). "मेध" हा शब्द यज्ञवाचक आहेच. "मेधा" शब्द यज्ञवाचकहि आहे, असें आपट्यांच्या कोशावरून दिसतें.

तेविसाव्या श्लोकाच्या द्वितीयार्धाचा श्री शंकराचार्यांनी वेडावाकडा अन्वय करून अर्थ केला आहे. कारण सरळ अन्वयाचा अर्थ आम्ही वर दिला आहे तसा होतो आणि तो "दृश्यते त्वग्र्यया बुद्ध्या सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभिः" ह्याशीं विरुद्ध दिसतो; शिवाय "आत्मज्ञान" होणें हें केवळ त्या परमात्म्याच्या खुषीवर असेल तर जीवाच्या प्रयत्नाला अर्थच रहात नाही, म्हणून श्री शंकराचार्यांनी तसा अर्थ केला असें दिसतें. परंतु आम्ही केलेला सरळ अर्थ "दृश्यते त्वग्र्यया बुद्ध्या" इत्यादि वचनांशीं व जीवाच्या प्रयत्नाशींहि विरुद्ध नाही. कारण कोणासहि परमात्मज्ञान करून देणारी अग्र्य बुद्धि देणें हें परमात्म्याच्या स्वाधीनचीच गोष्ट आहे हेंच सांगण्याचा ह्या श्लोकाचा उद्देश आहे. हें सांगणें, परमात्म्यानें दिलेल्या बुद्धीच्या प्रयत्नानें परमात्मज्ञान होतें ह्याशीं विरुद्ध नाही. ज्याला परमात्मा निवडतो त्याला तो श्रेष्ठ बुद्धि देतो व त्या बुद्धीच्या प्रयत्नानें आत्मज्ञान होतें असें म्हणून ह्याविरुद्ध भासणाऱ्या वचनांचा मेळ घालतां येतो. भगवद्गीतेंतहि "ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयांति ते" ह्या वचनांत असेंच म्हटलें आहे.

चोविसाव्या श्लोकांत "आत्मज्ञान" व आत्मप्राप्ति ह्या दोन भिन्न गोष्टी मानल्या आहेत. आत्म्याचें यथार्थ ज्ञान झाल्यावर तें वर्तनांत

आणून आत्यंतिक आनंदाचा अनुभव घेणें ह्यालाच आत्मप्राप्ति असें म्हटलें आहे. व्याससूत्रें अ. ४।१ पा. यावरील आमचें भाष्य पहा. ही आत्मप्राप्ति अर्थातच सत्कर्मांनी शरीरस्वास्थ्य-प्राप्त करून घेऊन विषयानंदत्याग केल्याने, स्वानंदभावनेने, व केवळ मानसिक इच्छा टाकून दिल्याने होईल हें उघड आहे आणि हेंच ह्या श्लोकांत सांगितलें आहे. कर्तव्यकर्मांचा त्याग हेंच येथे दुश्चरित मानलें आहे. "तस्यै तपो दमः कर्मेति प्रतिष्ठा" ह्या केनांतील वचनांतहि आत्मज्ञान झाल्यावर तें वर्तनांत आणलें पाहिजे हेंच सांगितलें आहे.

ह्या श्लोकांतील "प्रज्ञान". ह्याचा अर्थ कोणीं श्रवणजनित ज्ञान असा करतात, पण तो चूक आहे. कारण तशा अर्थाचें विशेषण त्या शब्दास कोणतेंच लाविलेलें नाही. 'प्र' हा उपसर्गच त्या अर्थाला विरोधी आहे. 'प्रज्ञान' म्हणजे प्रत्यक्ष स्वबुद्धिनिर्णयाने झालेलें ज्ञान हाच अर्थ होऊं शकतो. श्री शंकराचार्यांनी "प्रज्ञान" ह्याचा अर्थ आमच्या अर्थासारखा मानला आहे; तथापि हें "प्रज्ञान" झाल्यावर कोणतेंच कर्तव्य शिल्लक रहात नाही व आत्मप्राप्ति होते असा त्यांचा सिद्धांत असल्यामुळे त्याशीं जुळण्याकरितां श्लोकाचा अर्थ त्यांनी आमच्या अर्थाहून निराळा केला आहे. त्यांचा अर्थ असा आहे की "दुश्चरित टाकून देणारा, शांत, समाहित, आणि शांत मानस जो असतो त्यालाच सद्गुरुच्या उपदेशाने प्रज्ञान प्राप्त होतें" पण हें बरोबर नाही; कारण "दृश्यते त्वग्र्यया बुद्ध्या" या वचनाप्रमाणे दुश्चरितालाहि त्याच्या तीक्ष्ण बुद्धीच्या साधनाने आत्मज्ञान होईलच. आत्मज्ञान झाल्यावर त्याप्रमाणे वागल्यानेच आत्मप्राप्ति म्हणजे आत्मानंदप्राप्ति होते हाच ह्या श्लोकाचा अर्थ आहे. व तो उपनिषदांतील इतर वचनांशीं जुळतो. श्री शंकराचार्यांच्या अर्थाला श्लोकांतील 'अपि' हा शब्द बाधक आहे. कारण त्याने असा अर्थ होतो की प्रज्ञान मिळालें तरी दुश्चरितादिगुणाच्या मनुष्यास आत्मप्राप्ति होत नाही. 'वा' शब्दहि त्याच्या अर्थास बाधक आहे. त्यांनी त्याचा अर्थ 'च'च्या अर्थासारखा केला आहे.

'ब्रह्म', 'क्षत्र' 'मृत्यु':—पंचविसाव्या श्लोकांत हे शब्द परोक्षवादाने अर्थ सांगण्याकरिता योजलेले स्पष्ट दिसतात. ब्रह्म म्हणजे ब्राह्मण व क्षत्र म्हणजे क्षत्रिय हा शाब्दिक अर्थ आहे. ब्राह्मण हा बुद्धीचा किंवा ज्ञानाचा प्रतीक आहे आणि क्षत्रिय हा शक्तीचा किंवा कर्मांचा प्रतीक आहे. त्याप्रमाणे मृत्यु हा निष्क्रियतेचा म्हणजे निद्रेचा प्रतीक होय. कारण मृत्यु हा महानिद्राच मानला जातो. ओदन म्हणजे अन्न व उपसेचन म्हणजे त्याबरोबर प्यावयाचें पाणी, अनुपान. ओदन व उपसेचन ह्यांचा "आनंदानुभवाचें साधन" असा अर्थ परोक्षवादविवरणाने ठरतो.

## वल्ली तिसरी

वल्ली ३ श्लोक १–२—

ऋतं पिबंतौ सुकृतस्य लोके ।
गुहां प्रविष्टौ परमे परार्धे ।।
छायातपौ ब्रह्मविदो वदंति ।
पंचाग्नयो ये च त्रिणाचिकेताः ॥१॥
यः सेतुरीजानानां अक्षरं ब्रह्म यत्परम् ।
अभयम् तितीर्षतां पारं नाचिकेतं शकेमहि ॥२॥

**पहिल्या श्लोकाचा अन्वयः**—पंचाग्नयो ये च त्रिणाचिकेताः ते ब्रह्मविदः सुकृतस्य लोके ऋतं पिबंतौ छायातपौ गुहां परमे परार्धे प्रविष्टौ (इति) वदंति । असा अन्वय करण्याचें कारण असें आहे की मागील वल्लींतील शेवटच्या श्लोकांत जो प्रश्न आहे त्यास उत्तर ह्या श्लोकांत आहे असें मानून ह्या श्लोकाचा अन्वय व अर्थ केला पाहिजे. इतरांनी "परमे परार्धे गुहां प्रविष्टौ ऋतं पिबंतौ, छायातपौ (इति) वदंति" असा अन्वय केला आहे तो अग्राह्य आहे.

**अर्थ**—पंचाग्नि धारण करणारे आणि तीन नाचिकेत अग्नि धारण करणारे ब्रह्मवेत्ते म्हणतात की "सुकृत करावयाच्या ह्या लोकांत

[ सुकृतस्य लोके ] सत्कर्मापासून उत्पन्न होणाऱ्या आनंदाचा अनुभव घेणारे [ ऋतं पिबंतौ ] सूर्य व त्याचें सूर्यकांत मण्यांतून पडणारें प्रतिबिंब ह्यासारखे असलेले [ छायातपौ ] ईश्वर (ब्रह्म) व जीव हे दोनहि आत्मे शरीराच्या गुहेंत अतिशय खोल भागांत [ परमे परार्धे ] प्रवेश करून राहिले आहेत. ॥१॥ जो यज्ञ करणाऱ्यांचा [ ईजानानाम् ] सेतु म्हणजे आधार आहे (कारण जीवस्थितींतच यज्ञ करतां येतो), जो खरोखर शाश्वत [अक्षर] श्रेष्ठ [परम्] ब्रह्मच आहे, व जो संसार-सागराच्या पार जाऊं इच्छिणाऱ्याची भयरहित नौकाच आहे त्या नाचिकेतसंज्ञक जीवात्म्याचें वर्णन आम्ही करूं शकतों किंवा करावें. ॥२॥

टिप्पणें—मागील वल्लीच्या शेवटच्या श्लोकांतील प्रश्न एका-विषयीच असतां उत्तर दोघांविषयी कां? अशी शंका घेण्याचें कारण नाही; कारण ब्रह्म व जीव खरोखर एकच होत, असें पुढील श्लोकांतच "अक्षरं ब्रह्म यत्परम्" ह्या वाक्यांत सांगितलें आहे.

"पंचाग्नयः"—छांदोग्य ३।१३ मध्ये जे पांच (प्राण, वाणी, श्रोत्र, मनस् आणि चक्षुस्) ब्रह्मसुषि सांगितले आहेत व 'केनांत'ही वर्णिलें आहेत तेच पंचाग्नि शब्दानें निर्दिष्ट आहेत. "पंचाग्नि" म्हणजे ह्या पांचांचा योग्य उपयोग करून ज्ञान मिळविणारे आणि त्रिणाचिकेत म्हणजे अन्न, वस्त्र आणि गृह ह्यांकरितां योग्य कर्म करणारे.

"छायातपौ"—हाच शब्द पुनः वल्ली ६ श्लोक ५ येथें आला आहे. तेथे त्याचा अर्थ आम्ही केला तसा कां करावा ह्याचें कारण दिलें आहे, तें पहा.

"ऋतं पिबंतौ"—ब्रह्म व जीव हे दोघेहि आनंदाचा अनुभव घेतात हें म्हणणें बरोबर नाही अशी शंका कोणी घेतात. जीव नेहमी दुःखीच असतो. त्या अर्थी तो आनंदाचा अनुभव घेतो, हें म्हणणें बरोबर नाही असें तें प्रतिपादतात. पण तें बरोबर नाही. कारण जीवाला ब्रह्माचें ज्ञान होतें तेव्हा तोहि त्या परमानंदाचा अनुभव घेतोच

सारथ्याच्या काबूंत नसतात, त्याप्रमाणे त्याच्या काबूंत नसतात. ॥५॥ परंतु ज्याची बुद्धि चांगली असते आणि ज्याचें मन सदा आवरलेलें असतें, त्याचीं इंद्रियें, चांगले घोडे सारथ्याच्या काबूंत असतात त्याप्रमाणे, त्याच्या काबूंत असतात. ॥६॥

**टिप्पणी**—"अविज्ञानवान्"—"विज्ञान" म्हणजे "बुद्धि" असा अर्थ आहे असें पुढील नवव्या श्लोकांतील 'विज्ञानसारथि' ह्या प्रयोगावरून दिसतें, कारण मागे "बुद्धी"लाच सारथि म्हटलें आहे. अर्थात् धनवान्, बुद्धिमान्, ह्याप्रमाणे विज्ञानवान् म्हणजे चांगली बुद्धि ज्याला आहे तो असा अर्थ होतो.

"आत्मेंद्रियमनोयुक्तं" येथील "आत्मा" शब्द शरीरवाचक मानावा लागतो हें उघड आहे.

वल्ली ३ श्लोक ७-९

यस्त्वविज्ञानवान् भवत्यमनस्कः सदाशुचिः ।
न स तत्पदमाप्नोति संसारं चाधिगच्छति ॥७॥

यस्तु विज्ञानवान् भवति समनस्कः सदा शुचिः ।
स तु तत्पदमाप्नोति यस्माद् भूयो न जायते ॥८॥

विज्ञानसारथि यस्तु मनः प्रग्रहवान् नरः ।
सोऽध्वनः पारमाप्नोति तद्विष्णोः परमं पदं ॥९॥

**अर्थः**—ज्याची बुद्धि चांगली नाही, ज्याचें मन ताब्यांत नाही आणि ज्याचे विचार नेहमी अपवित्र असतात [सदा अशुचिः] म्हणजे वासनांनी युक्त असतात त्याला तें (पुढे नवव्या श्लोकांत वर्णिलेलें पद मिळत नाही आणि जन्ममरणरूपी संसाराची प्राप्ति होते. ॥७॥ ज्याची बुद्धि चांगली आहे, ज्याचें मन ताब्यांत आहे आणि ज्याचे विचार नेहमी पवित्र म्हणजे वासनारहित असतात, त्याला तें (पुढे

अव्यक्त म्हणजे अज्ञेय असें कारण आहे. आणि त्या अव्यक्ताच्या पलीकडे आंतमध्ये [ परः ] पुरुष (ब्रह्म किंवा ईश्वर किंवा परमात्मा ) आहे. त्या पुरुषाच्या पलीकडे आंतमध्ये कांहींच नाही. तोच अखेरची सीमा आहे [ काष्ठा ]. तोच गतीचा शेवटचा मुक्काम [परा गतिः] आहे. ॥११॥

टिप्पणी—श्लोक १ मध्ये निर्दिष्ट केलेलीं आत्म्याचीं दोन रूपें समजवून देण्याकरितां हे श्लोक लिहिले आहेत. तीं दोन रूपें येथे "महान् आत्मा" आणि 'पुरुष' ह्या शब्दांनी निर्दिष्ट केलीं आहेत. अद्वैतरूपी पर पुरुषाला द्वैतरूपी जीवस्थिति प्राप्त होण्याच्या कारणाला "अव्यक्त" म्हणजे "अज्ञेय" म्हणून ह्या उपनिषदानें उच्च प्रकारची निर्दोष विचारसरणी प्रगट केली आहे. त्या कारणाविषयी तर्कवितर्क करूं नयेत असा भाव त्या " अव्यक्त " शब्दांत आहे.

वल्ली ३ श्लोक १२

एष सर्वेषु भूतेषु गूढात्मा न प्रकाशते ।
दृश्यते त्वग्र्यया बुद्ध्या सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभिः ॥१२॥

अर्थ—सर्व भूतांमध्ये लपून बसलेला (गूढः) हा आत्मा प्रकाशत नाही म्हणजे जाणला जात नाही; परंतु श्रेष्ठ प्रकारच्या सूक्ष्म-बुद्धीच्या साधनाने सूक्ष्मपणें विचार करणाऱ्यांकडून तो पाहिला जातो.

टिप्पणी:—"गूढात्मा" ह्याचीं पदें "गूढः आत्मा" अशीं आहेत. ह्यांचा संधि "गूढ आत्मा" असा व्हावा पण तो "गूढात्मा" असा केला आहे. हा आर्ष संधि होय.

वल्ली ३ श्लोक १३-१५

यच्छेद्वाङ् मनसी प्राज्ञः तद्यच्छेज्ज्ञान आत्मनि ।
ज्ञानमात्मनि महति नियच्छेत्तद्यच्छेच्छांत आत्मनि ॥१३॥

उत्तिष्ठत जाग्रत प्राप्य वरान्निबोधत ॥
क्षुरस्य धारा निशिता दुरत्यया ।
दुर्गं पथस्तत्कवयो वदंति ॥१४॥
अशब्दमस्पर्शमरूपमव्ययम् ।
तथारसं नित्यमगंधवच्च यत् ॥
अनाद्यनंतं महतः परं ध्रुवम्
निचाय्य तन्मृत्युमुखात्प्रमुच्यते ॥१५॥

**अर्थ**—वाणी वगैरे इंद्रियांचें मनामध्यें नियमन करावें. मनाचें बुद्धीमध्यें [ज्ञाने आत्मनि] नियमन करावें. बुद्धीचें अहंकारामध्यें [महति] नियमन करावें आणि अहंकाराचें शांत आत्म्यांत म्हणजे वासनारहित अशा, मागें ज्याला पुरुष म्हटलें त्या आत्म्यांत नियमन करावें. ॥१३॥ उठा, जागे व्हा, आणि श्रेष्ठ मनुष्याकडे [वरान्] जाऊन हें चांगलें समजावून घ्या [निबोधत]. (असें न केलें तर नियमन करणें म्हणजे काय ह्याचा खरा अर्थ तुम्हास समजणार नाहीं असा भाव आहे. खरा अर्थ टिप्पणांत दाखविला आहे.) वस्तऱ्याच्या तीक्ष्ण धारेवरून चालणें जितकें कठीण आहे [दुरत्यया] तितकाच [तत्] वर वर्णिलेला नियमनरूपी मार्ग चालून जाण्यास कठीण [दुर्गम्] आहे असें शहाणे लोक सांगतात. ॥१४॥ ज्याला शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध नाहीं, जें *अव्यय आणि नित्य आहे आणि ज्याला आदि व अंतहि नाहीं,* त्या महताच्याहि (अहंकाराच्याहि) आंत पलीकडे [परं] असलेल्या ध्रुव परमात्म्याला आपणांत गोळा करून म्हणजे मिळवून घेऊन [निचाय्य] म्हणजे त्याचीं अद्वैत आणि वासनराहित्य हीं लक्षणें वर्तनांत बाणून घेऊन म्हणजेच जीवात्मा व परमात्मा ह्यांचें ऐक्य घडवून आणून जीव मृत्युमुखांतून मुक्त होतो. म्हणजे त्याचा मृत्यु दूर पळतो आणि त्याचें दुःख नाहींसें होतें आणि त्याला अत्यानंदाची प्राप्ति होते. ॥१५॥

**टिप्पणी**—आत्मा व त्याची आवरणें मागें दहाव्या व अकराव्या श्लोकांत सांगितलीं तीं जाणून घेऊन पुढें काय करावयाचें तें तेराव्या श्लोकांत सांगितलें आहे. वाङ् हें द्वितीया विभक्तीचें रूप आणि "मनसी" हें सप्तमीचें रूप सर्वांनीच मानलें आहे तसें आम्हीहि मानलें आहे. "वाङ्" ह्याचा मूळचा अर्थ जरी वाणी हें एकच इंद्रिय असा आहे तरी येथें "सर्व इंद्रियें" असा अर्थ सर्वांनीच घेतला आहे व तें योग्यच आहे. ज्ञान म्हणजेच ज्ञानाचें साधन जी बुद्धि ती असाहि अर्थ सर्वांनी घेतला आहे, तसेंच करणें योग्य आहे.

येथें 'नियमन करणें' म्हणजे लोप करणें असा अर्थ नाही, काबूंत ठेवणें असा अर्थ आहे. कारण 'लोप करणें' असा अर्थ घेतल्यास निर्बीज समाधि म्हणजेच पुढें वल्ली ६ श्लोक १०–११ मध्यें वर्णिलेला योग करावा असा अर्थ होईल; पण त्या योगाचें तर तेथेंच श्लोक १२–१५ मध्यें खंडन केलें आहे हें पुढें दिसून येईलच. म्हणून "नियमन करणें" ह्याचा अर्थ काबूंत ठेवणें असाच करावा आणि शब्दशः त्याचा अर्थ तोच आहे. "विलयं नयेत्" असा अर्थ नसून "वशे कुर्यात्" असा अर्थ आहे. एकूण श्लोकाचा अर्थ असा की "इंद्रियें मनाच्या काबूंत ठेवावींत, मन बुद्धीच्या काबूंत ठेवावें, बुद्धि अहंकाररूपी आत्म्याच्या काबूंत ठेवावी आणि अहंरूपी आत्मा अद्वैतरूपी आत्म्याच्या काबूंत ठेवावा. बुद्धि अहंकाराच्या काबूंत ठेवणें म्हणजे, काय तें स्पष्ट करतो. अहंकारावस्थेंत चेतना म्हणजेच ज्ञान (knowing), सुखदुःखभावना (feeling) आणि वासना (desire) हे तीन प्रकार असतात, तरी चेतना हाच मुख्य अपरिहार्य भाग आहे. तोच कायम ठेवून सुखदुःखभावना आणि वासना ह्यांचा त्याग करणें त्यालाच अहंकाराच्या काबूंत बुद्धि ठेवणें असें म्हटलें आहे. "चितितन्मात्रेण तदात्मकत्वादित्यौडुलोमिः" ह्या व्याससूत्रांतहि हेंच निर्दिष्ट आहे. (तेथील आमचें भाष्य पहा). अहंकारास यांत आत्म्याच्या काबूत ठेवणें म्हणजे यांत आत्म्याचीं अद्वैत

आणि वासनाराहित्य हीं स्वर्गे अहंकारावस्थेंतहि धारण करणें (मुंडक ३।१।१३ चें विवरण पहा).

श्लोक १३ मध्ये जें कर्तव्य सांगितलें तें समजणें कठीण आहे म्हणून तें श्रेष्ठ पुरुषाकडून समजवून घ्या असें श्लोक १४ मध्ये सांगितलें आहे. अशा श्रेष्ठ पुरुषाकडे न गेल्यास तें कर्तव्य म्हणजे मन, बुद्धि व अहंकार ह्याचा लोप करणेंच होय असेंच कोणी चुकीने समजेल; पण खरोखर मन, बुद्धि व अहंकार ह्यांचें नियमन करणें हेंच तें कर्तव्य होय असा चवदाव्या श्लोकाच्या पूर्वार्धाचा भाव आहे. हें कर्तव्य खरोखरच फार कठीण आहे, असें चवदाव्याच्या उत्तरार्धात सांगून पंधराव्यांत त्या कर्तव्याचें स्वरूप "निचाय्य" ह्या शब्दानें स्पष्ट करून त्याचें फळहि सांगितलें आहे.

"निचाय्य"—ह्याचा अर्थ जाणून असा कोणी करतात पण तो चूक आहे. "नि" म्हणजे गोळा करणें ह्यापासून हा शब्द झाला आहे; त्याचा अर्थ अर्थातच "गोळा करून" म्हणजे "आपणांत मिळवून घेऊन" असाच होतो. परमात्म्याच्या केवळ ज्ञानाने कांहींच होत नाही; त्याचे गुण आपणात मिळवून घेतले पाहिजेत हें उघड आहे, हेंच येथील "निचाय्य" ह्या शब्दाने आणि तेराव्या श्लोकांतील "शांत आत्मनि यच्छेत्" ह्या शब्दांनी सांगितलें आहे.

मृत्युमुखात्प्रमुच्यतेः—ह्याचा अर्थ मनुष्य मरणरहित होतो असा नाहीच; कारण तसें केव्हाच होत नाही. दुःखरहित होतो किंवा अकाल-मृत्यु टळतो असाच अर्थ केला पाहिजे. ईशोपनिषदांतील श्लोक ११ वरील टिपण, उपसंहार प्याय २८, आणि कठांतील वल्ली १ श्लोक १४-१९ वरील "मृत्यु" वरील टिपण पहा.

वल्ली ३ श्लोक १६-१७

नाचिकेतमुपाख्यानं मृत्युप्रोक्तं सनातनम् ।
उक्त्वा श्रुत्वा च मेधावी ब्रह्मलोके महीयते ॥१६॥

य इदं परमं गुह्यं श्रावयेत् ब्रह्मसंसदि ।
प्रयत: श्राद्धकाले वा तदानन्त्याय कल्पते
तदानन्त्यायकल्पत इति ॥१७॥

अर्थ—मृत्यूने नाचिकेतास सांगितलेलें हें सनातन उपाख्यान ऐकणारा किंवा सांगणारा बुद्धिमान मनुष्य ब्रह्म लोकांत पूजिला जातो किंवा आनंदाचा अनुभव घेतो. ॥१६॥ जो हें अतिशय गुह्य आख्यान पवित्र होऊन ब्राह्मणांच्या सभेंत किंवा श्राद्धप्रसंगीं ऐकवील, त्याला त्यापासून अनंतफळ मिळेल, त्याला त्यापासून अनंतफळ मिळेल. ॥१७॥

टिप्पणें—सनातनम्—ह्याचा मूळचा अर्थ नेहमी टिकणारें असा आहे. हें विशेषण उत्तम ग्रंथाला लावतां येतें, कारण त्याच्या उत्तमपणामुळे तो ग्रंथ लोक केव्हाच लुप्त होऊं द्यावयाचे नाहीत.

गुह्यम्—गुह्य म्हणण्याचें कारण, हें अयोग्य मनुष्याला केव्हाच सांगणें योग्य नाही, हें आहे. ह्याचा अर्थ हें केव्हाच कोणाला सांगूं नये असा नाही हे ह्याच श्लोकावरुन उघड आहे. मृत्यूला नचिकेतास जेवढें सांगावयाचें होतें तेवढें सांगून झाल्यामुळे ग्रंथकाराने येथे ग्रंथ समाप्त करुन हे समाप्तिदर्शक श्लोक लिहिले व शेवटच्या वाक्याची द्विरुक्ति केली. पण नंतर कांहीं काळाने त्यालाच पुनः काव्यस्फूर्ति झाल्यामुळे त्याने तिसऱ्या वल्लीनीलन ज्ञान पुढील तीन वल्लींमध्ये जास्त विस्ताराने, जास्त स्पष्टपणे व निराळ्या शब्दांनी सांगितलें.

## वल्ली चतुर्थी

वल्ली ४ श्लोक १–२

पराञ्चि खानि व्यतृणत्स्वयंभू: ।
तस्मात्पराङ् पश्यति नान्तरात्मन् ॥
कश्चिद्धीर: प्रत्यगात्मानमैक्षत् ।
आवृत्तचक्षुरमृतत्वमिच्छन् ॥१॥

पराचः कामान् अनुयंति बालाः ।
ते मृत्योर्यंति विततस्य पाशम् ॥
अथ धीरा अमृतत्वं विदित्वा ।
ध्रुवमध्रुवेष्विह न प्रार्थयंते ॥२॥

**अर्थः**—स्वयंभू ब्रह्माने (ईश्वराने) शरीरास जीं भोंके [खानि] पाडलीं [व्यतृणत्] तीं बाहेर उघडणाऱ्या दरवाजाचीं [पराञ्चि] पाडलीं. *त्यामुळे मनुष्य बाहेर पडून जातो व बाहेरच्या विषयाचा [पराङ्]* अनुभव घेतो [पश्यति] आतील आत्म्याचा अनुभव घेत नाही. एखा-दाच शहाणा मनुष्य, आत्यंतिक आनंदाची [अमृतत्वम्] इच्छा करतो आणि डोळे फिरवून [आवृत्तचक्षुः] अंतरात्म्याकडे [प्रत्यगात्मानम्] पाहतो. ॥१॥ मूर्ख मनुष्य [बालाः] बाह्य विषयसुखाच्या [पराचः कामान्] मागे धावतात [अनुयंति] आणि ते चोहीकडे पसरलेल्या [विततस्य] मृत्यूच्या पाशांत सापडतात. [यंति] परंतु [अथ] शहाणीं मनुष्यें नित्य आत्यंतिक आनंद [अमृतत्वम्] कोणता तें जाणून घेऊन [विदित्वा] अनित्य विषयांमध्ये [अध्रुवेषु] नित्य [ध्रुव] आनंद मिळविण्याचा प्रयत्न करीत नाहीत [प्रार्थयंते] ॥२॥

**टिप्पणी.**—"व्यतृणत्" ह्यांत रुधादिगणाची तृद् ही धातू आहे. हिचा अर्थ भोंक पाडणें. श्लोकाच्या प्रथमार्धाचा अर्थ असा की स्वयंभूनें भोंक पाडून जे दरवाजे बसविले ते बाहेर उघडणारे केले, म्हणून सामान्य मनुष्य बाहेर विषयामध्येंच पडतो. आंत आत्म्याकडे पहात नाही. (पूर्वी रेल्वे डब्याचे दरवाजे बाहेर उघडणारे असत, त्यांतून पुष्कळ मनुष्यें बाहेर पडत व त्यास दुरापत होत असे, म्हणून अलीकडे ते दरवाजे आंत उघडणारे केले आहेत. त्यामुळे आता असे अपघात होत नाहीत हें ज्यांना माहित आहे त्यांना "पराञ्चि खानि व्यतृणत्" ह्याचा अर्थ चांगला समजेल.)

"मृत्योर्यंति पाशम्":—वल्ली ३ श्लोक १५ ह्यांतील "मृत्यु-मुखात्प्रमुच्यते" ह्यांचें विवरण करण्याकरिताच वल्ली ४ श्लोक १-२ लिहिले आहेत. ह्यांतील "मृत्योर्यंति पाशं" ह्याचा अर्थ "दुःखाच्या व अकालमृत्यूच्या कचाट्यांत सापडतो" असा आहे.

वल्ली ४ श्लोक ३

येन रूपं रसं गंधं शब्दान् स्पर्शांश्च मैथुनान् ।
एतेनैव विजानाति किमत्र परिशिष्यते ॥
एतद्वैतत् ॥३॥

अर्थः— ज्या ज्ञानेच [येन एतेन एव] रूप, रस, गंध, शब्द, स्पर्श आणि मैथुन जाणतो, त्या अहंकारास काढून टाकलें असतां काय शिल्लक राहतें ? जें शिल्लक राहतें तेंच तें ब्रह्म होय. ॥३॥

टिप्पणी—ह्या श्लोकांत, ब्रह्माचें स्वरूप समजावून देण्याचा प्रयत्न ग्रंथकाराने केला आहे. ब्रह्माचें वर्णन जरी करतां येत नाही तरी घोटाने एखादी वस्तू दाखवावी तसें ब्रह्म येथे दाखविलें आहे. ह्याचा अर्थ असा की अहंकाराच्या लोपाची जी अवस्था म्हणजे निद्रावस्था तीच ब्रह्माचें मूळ स्वरूप होय. श्री शंकराचार्यांनी ह्या श्लोकाचा अर्थ निराळ्या रीतीने केला आहे. ते म्हणतात, "यस्यात्मानोऽविज्ञेयं न किंचित्परिशिष्यते ॥ आत्मा सर्वज्ञः" । हा अर्थ अग्राह्य दिसतो कारण "जें शिल्लक राहतें तें ब्रह्म" असा अर्थ स्पष्ट दिसतो. मागे ऋतं पिबंतौ इत्यादि श्लोकांत ब्रह्माचीं दोन रूपें निर्दिष्ट केलीं आहेत. तीं समजावून देण्याकरिताच हा व पुढील श्लोक दिले आहेत असें समजून ह्या सर्व श्लोकांचा अर्थ करणें योग्य आहे. म्हणून तदनुसारच आम्ही अर्थ केले आहेत.

वल्ली ४ श्लोक ४-५

स्वप्नांतं जागरितांतं चोभौ येनानुपश्यति ।
महांतं विभुमात्मानं मत्वा धीरो न शोचति ॥४॥

य इमं मध्वदं वेद आत्मानं जीवमंतिकात् ।
ईशानं भूतभव्यस्य न ततो विजुगुप्सते ॥
एतद्वैतत् ॥५॥

**अर्थ**—स्वप्नाची अवस्था [स्वप्नान्तम्] आणि जागृतीची अवस्था [जागरितांत] ह्या दोनहि अवस्था ज्याने जाणतो तो महत्तत्त्वक आत्मा म्हणजे अहंरूपी जीवात्मा विभु आहे असें जाणणारा [मत्वा] शहाणा शोक करीत नाही ॥४॥ हा जीवात्मा [इमम् जीवं आत्मानम्] आनंदाचा उपभोग घेणारा आहे [मध्वदं] असे जवळून [अंतिकात्] म्हणजे दुसऱ्याच्या सांगण्यावरून नव्हे तर स्वताच्या बुद्धीच्या निर्णयावरून, अप्रत्यक्षपणें नव्हे तर प्रत्यक्षपणे, जो जाणतो आणि हा जीवात्माच भूतभव्याचा म्हणजे मागे झालेल्या व पुढे होणाऱ्या गोष्टींचा ईशान म्हणजे नियामक आहे असें जो जाणतो तो कोणापासूनच स्वताचें रक्षण करण्याची इच्छा करीत नाही म्हणजे कोणालाच भीत नाही ह्या दोन श्लोकांत वर्णिलेला शहाणा जीव देखील ब्रह्मच होय ॥५॥

**टिप्पणे**—ह्या दोन श्लोकांत ब्रह्मरूप जीवाचे वर्णन आहे आणि तो ब्रह्मरूप जीवहि ब्रह्मच असें म्हटलें आहे एकूण ३ ते ५ ह्या तीन श्लोकांत, "ऋतं पिबन्तौ" इत्यादि श्लोकांत निर्दिष्ट केलेलीं ब्रह्माचीं दोन रूपें म्हणजे मूलरूप आणि अत्यंत निश्चित रूप हीं वर्णिलीं आहेत चवथ्या श्लोकांतील 'विभु' शब्दाचें स्पष्टीकरण करण्यासाठीच पाचवा श्लोक लिहिला आहे

"स्वप्नांत" 'जागरितान्तम्' ह्या दोन शब्दांतील 'अंत' ह्या शब्दाचा अर्थ स्थान म्हणजेच अवस्था असा आहे बृहदारण्यक ४।३।१३—१८ येथेहि "अंत" ह्याचा हाच अर्थ आहे

वल्ली ४ श्लोक ६

य पूर्वं तपसो जातमद्भ्यः पूर्वमजायत ।
गुहां प्रविश्य तिष्ठंतं यो भूतेभिर्व्यपश्यत ॥
एतद्वैतत् ॥६॥

**अर्थ**—ब्रह्माच्या पूर्वीच्या तपापासून, पूर्वी पाण्यापासून उत्पन्न झालेला जीव [अद्भ्यः पूर्वमजायत], सर्वभूतांच्या ठिकाणीं गुहेंत प्रवेश करून राहतो हें जो पाहतो [व्यपश्यत] तो देखील तें ब्रह्मच होय ॥६॥ जीवरूपी ब्रह्म जसें माझ्यांत आहे तसेंच दुसऱ्या भूतांतहि आहे असें पाहून जो भूतांशीं अद्वैतबुद्धीने वागतो तो ब्रह्मज्ञ देखील ब्रह्मच होय असा ह्या श्लोकाचा भावार्थ आहे. ह्या श्लोकांत जें ब्रह्मज्ञानें लक्षण सांगितलें तेंच सर्व उपनिषदांनी ब्रह्मज्ञाचें मुख्य लक्षण मानलें आहे.

छांदोग्य ७ । २३–२५; बृहदारण्यक ४ । ३ । २०; मांडुक्य ७ येथील "एकात्मप्रत्ययसारम्" वगैरे पहा.

**टिप्पणी**—येथे व पुढील श्लोकांत जीवाच्या उत्पत्तीची रीति मुंडक १ । १ । ८ यांत जी आहे तीच आहे असें स्पष्ट दिसतें. फक्त तेथील "अन्न" ह्या ऐवजी येथे "अप्" हा शब्द योजलेला आहे. "अप्" हेंहि एक अन्नच असल्यामुळे अर्थतः त्यांत सर्वत्र अन्नांचा. म्हणजे पृथ्वीचाहि अंतर्भाव करण्यास हरकत नाही.

"भूतेषु" ह्या ठिकाणीं "भूतेभिः" असाच पाठ बहुतेक ग्रंथांत आहे. एका ग्रंथांत "भूतेषु" असा पाठ आहे (अदयार प्रत पहा). कोणताहि पाठ घेतला तरी अर्थ बदलत नाही.

यत्ली ४ श्लोक ७:—

या प्राणेन संभवति अदिति देवतामयी ।
गुहां प्रविश्य तिष्ठंती या भूतेषु व्यजायत ॥
एतद्वैतत् ॥७॥

**अर्थः**—जो देवतारूपी [देवतामयी] आनंदरूपी अन्न ग्यागारा म्हणजे आनंदप्राप्त्यर्थ खाणारा [अदितिः । अद् म्हणजे खाणें ह्यापासून हा शब्द झाला] जीव प्राणापासून किंवा प्राणासह [प्राणेन] उत्पन्न होतो आणि शरीराच्या गुहेंत प्रवेश करून राहतो तो सर्व भूतांमध्ये उत्पन्न झाला. हा जीव देखील तें ब्रह्मच होय. ॥७॥

**टिप्पणेः**—"भूतेषु" ह्या ठिकाणी "भूतेभिः" असा पाठ पुष्कळ प्रतींत आहे. अडयारप्रतींत "भूतेषु" असा पाठ दिला आहे व तोच ग्राह्य दिसतो. श्लोक तीनमध्ये ब्रह्म कोणते ते जणू बोटाने प्रत्यक्ष दाखविलें आहे श्लोक ४–६ मध्ये ज्ञानसंपन्न व शहाणा जीवहि ब्रह्मच असें सांगितले. आता ह्या श्लोकांत कोणताहि जीव ब्रह्मच असें सांगितले आहे.

वल्ली ४ श्लोक ८:—

अरण्योर्निहितो जातवेदा । गर्भ इव सुभृतो गर्भिणीभिः ।
दिवे दिवे ईड्यो जागृवद्भि- । र्हविष्मद्भिर्मनुष्येभिरग्निः ॥
एतद्वैतत् ॥८॥

**अर्थः**—दोन अरणींमध्ये जसा अग्नि ठेवलेला असतो (दोन अरणींच्या घर्षणाने अग्नि उत्पन्न होतो म्हणून अग्नि दोन अरणींच्या मध्ये ठेवला असतो असें म्हटले आहे) किंवा गर्भिणींनी धारण केलेला जसा अग्नि असतो, तशीच जीवात्म्यामध्ये दररोज [दिवे दिवे] जिवी शहाण्या [जागृवद्भिः] व सदिच्छारूपी हवि धारण करणाऱ्या [हविष्मद्भिः] मनुष्यांनी स्तुति करावी (ईड्यः) म्हणजे सत्कर्मे करून उपासना करावी ती कर्मशक्ति [अग्निः] देखील ब्रह्मच होय ॥८॥

**टिप्पणें.**—ह्या श्लोकात परोक्षवाद आहे हें उघड आहे. परोक्षवादविवरणाने "अग्नि" म्हणजे "कर्म" किंवा "कर्मशक्ति" हें मागे वल्ली १ श्लोक १४–१९ ह्यांच्या विवरणात 'अग्नि' ह्यावरील टिप्पणांत दाखविलेंच आहे.

वल्ली ४ श्लोक ९:—

यतश्चोदेति सूर्यः अस्तं यत्र च गच्छति ।
तं देवाः सर्वे अर्पिताः तदु नात्येति कश्चन ॥
एतद्वैतत् ॥९॥

किंवा कोणाचाच द्वेष किंवा तिरस्कार करीत नाही, तो तें ब्रह्मच होय. ॥१२॥ भूतभव्याचा ईश्वर असा हा परमात्माच अंगुष्ठमात्र पुरुष म्हणजे जीव होऊन ब्रह्मज्ञानाने धूमरहित ज्योतीप्रमाणे चकचकीत होतो म्हणजे ज्ञानरूपी प्रकाश देणारा होतो आणि असाच जीव [स एव] कीर्तिरूपाने आज तर आहेच शिवाय कीर्तिरूपाने उद्याहि आहेच. असा कीर्तिमान् जीवहि ब्रह्मच होय. ॥१३॥

**टिप्पणीः**—छातींत असलेल्या हृदयाची लांबी मनुष्याच्या आंगठ्याच्या लांबीएवढी असते. आणि ह्या हृदयांतच सर्व शक्ति केंद्रित झालेली असते. म्हणून अंगुष्ठमात्र पुरुष म्हणजे जीव असा अर्थ होतो.

"स एव" म्हणजे मागे वर्णिलेला ब्रह्मज्ञानी व ब्रह्मज्ञानाचा प्रसार करणारा जीवच कीर्तिरूपाने शाश्वत राहतो. इतरांचे नांव देखील नष्ट होतें. उदाहरणार्थ, व्यास, याज्ञवल्क्य, उपनिषदांचे कर्ते कीर्तिरूपाने शाश्वतच राहणारे आहेत.

ज्योतिरिवाधूमकः—"ज्योतिस्" हा शब्द नपुंसकलिंगी असल्यामुळे "अधूमकम्" असा शब्दप्रयोग पाहिजे होता. पण ऋषींने "ज्योतिः" हा पुल्लिंगी शब्द मानून "अधूमकः" असा प्रयोग केला. श्रीशंकराचार्यांनीहि असेंच मानलें आहे.

**वल्ली ४.श्लोक १४–१५**

यथोदकं दुर्गे वृष्टं पर्वतेषु विधावति ।
एवं धर्मान् पृथक्पश्यंस्तानेवानुविधावति ॥१४॥
यथोदकं शुद्धे शुद्धमासिक्तं तादृगेव भवति ॥
एवं मुनेर्विजानत आत्मा भवति गौतम ॥१५॥

**अर्थ**—ज्याप्रमाणे उंच ठिकाणीं शिखरावर [दुर्गे] पडलेलें पाणी पर्वतावरून [पर्वतेषु] खोल भागाकडे धावत जातें, त्याप्रमाणे ब्रह्माने धर्म जीवाच्या धर्माहून भिन्न [पृथक्] आहेत. असें पाहणारा जीव,

त्या ब्रह्माच्या धर्मांकडेच धावत जातो, म्हणजे ते ब्रह्माचे धर्म आपणात आणण्याचा प्रयत्न करतो ब्रह्म हें वासनारहित शांत आहे तसाच होण्याचा तो शहाणा जीव प्रयत्न करतो ब्रह्म हें सर्व शरीरात सारखेंच आहे व सर्व जीवांशीं सारखेंच वागतें त्याप्रमाणे तो जीव स्वतांशी व इतरांशीं सारखाच वागतो ॥१४॥ अशा ह्या विचार करणाऱ्या [मुनेः] शहाण्या जीवाचा [विजानत] आत्मा, शुद्ध पाण्यात शुद्ध पाणी मिळवावें त्याप्रमाणे होतो म्हणजे असा जीव शुद्ध ब्रह्मच होतो असा भाव आहे ॥१५॥ शहाण्या जीवाला ब्रह्म का म्हटले ह्याचें कारण ह्या श्लोकात सांगितलें आहे

## वल्ली पांचवी

**वल्ली ५ श्लोक १**

पुरमेकादशद्वार अजस्यावक्रचेतस ।
अनुष्ठाय न शोचति विमुक्तश्च विमुच्यते ॥
एतद्वैतत् ॥१॥

**अर्थ** —जन्मरहित [अजस्य] आणि वल्ली ४ श्लोक १–२ ह्यात वर्णिल्याप्रमाणे पराङ् म्हणजे बाह्य विषयाकडे पाहणार असें जें चित्त तेंच ज्याला नाही असें [अवक्रचेतस] जें ब्रह्म त्याच्या अकरा दरवाज्याच्या शहरात म्हणजे शरीरात त्या ब्रह्माजवळ राहून [अनुष्ठाय] म्हणजे ब्रह्माचे गुण आपणामध्ये आणल्यामुळे जो शोक करीत नाही आणि त्यामुळे शरीरापासून मुक्त होतात म्हणजे मृत्यु पावताच [विमुक्तश्च] जन्ममरणाच्या फेऱ्यांतूनहि मुक्त होतो, तो शहाणा जीवहि तें ब्रह्मच होय ॥१॥

**टिप्पणीः**—"अवक्रचेतस"—"वक्रगति" म्हणजे "उलट गति" हा अर्थ ज्योतिषशास्त्रात प्रसिद्ध आहे. तदनुसार येथे आत्म्या-संबधाने बोलताना "वक्र" ह्याचा अर्थ "बाह्य विषयांकडे" असा होतो.

कारण आंत स्वतःकडे पाहणें ही आत्म्याची स्वाभाविक गति होय आणि "बाहेर विषयांकडे पाहणें" ही उलट गति होय. असें बाह्य विषयांकडे पाहणें, हा चित्ताचा स्वभावधर्म आहे. हें चित्तच ज्याला नाही तें असा "अवक्रचेतसः" ह्या सामासिक शब्दाचा अर्थ आहे. म्हणजे चित्तरहित, ज्ञाताज्ञेय आणि ज्ञान ही त्रिपुटी ज्याला नाही तें, अहंकाररहित असा अर्थ आहे.

"एकादशद्वारम्"—दोन डोळे, दोन कान, दोन नाकपुडया, एक तोंड, एक गुद, एक मूत्रद्वार, एक नाभि आणि एक टाळूच्या ठिकाणचे ब्रह्मरंध्र अशीं अकरा द्वारें होतात.

"अनुष्ठाय"—ह्याचा अर्थ जवळ राहणें असा आहे, "करणें" असा अर्थ नाही. मनुस्मृति अ. ११ श्लोक १११ येथें "तिष्ठंतीष्वनुतिष्ठेत्तु" ह्या वाक्यांत जवळ राहणें हाच अर्थ आहे. "जवळ राहणें" म्हणजे काय तें वर अर्थामध्ये दाखविलेंच आहे. श्रीशंकराचार्यांनी "अनुष्ठाय" म्हणजे "ध्यात्वा" असा अर्थ केला आहे. ह्याचा अर्थ ब्रह्माच्या गुणांचें चिंतन करणें असा जरी असला तरी त्यांत त्या गुणांचें अनुकरण करणें ह्याचाहि अंतर्भाव करणें आवश्यक आहे.

**वल्ली ५ श्लोक २**

हंसः शुचिषद् वसुरंतरीक्षसत् ।
होता वेदिषदतिथिर्दुरोणसत् ॥
नृषद्वरसदृतसद्व्योमसदब्जा ।
गोजा ऋतजा अद्रिजा ऋतं बृहत् ॥२॥

**अर्थः**—प्रकाशमान अशा [शुचि] द्युलोकांत राहणारा [शुचिषद्] सूर्य [हंस], अंतरिक्षांत राहणारा [अंतरीक्षसद्], वायु [वसु], वेदीच्या ठिकाणीं म्हणजे पृथ्वीवर राहणारा होता म्हणजे अग्नि, दुरोण म्हणजे नक्षत्रें त्यांत राहणारा अतिथि म्हणजे फिरणारा चंद्र, मनुष्यांत राहणारा

जीवात्मा, देहामध्ये राहणारा जीवात्मा, जगम प्राण्यात राहणारा [ऋतसद्] जीव, आकाशात राहणारे जीव [व्योमसत्] म्हणजे पक्षी, पृथ्वींत उत्पन्न होणाऱ्या वनस्पति [गोजा], पाण्यात उत्पन्न होणारे जीव व लता [अब्जाः], प्रवाहात म्हणजे नदींत उत्पन्न होणारे जीव [ऋतजा], *पर्वतापासून उत्पन्न होणारे दगड [अद्रिजा] हे सर्व वाढणारे किंवा* विकसणारे [ऋतम्] ब्रह्मच [बृहत्] होय. ॥२॥

टिप्पणी—ऋग्वेदसंहितेत ४।४०।५ येथे हाच श्लोक आहे पण त्यात तेथे "बृहत्" हा शब्द नाही. असाच श्लोक वा. स १०।२४; १२।१४ तै स ४।२।१०।१ शतपथ ब्राह्मण ६।७।३।११ येथेहि आहे. सद् म्हणजे राहणें ह्या धातूचे उपपद समास येथे पुष्कळच आहेत. ऋ म्हणजे जाणे, हालणें ह्या अर्थाचा धातू आहे, त्यापासून "ऋत" हा शब्द झाला आहे. त्याचा अर्थ हालणारा असा आहे. अर्थात् 'ऋत" म्हणजे हालणारे जगम प्राणी, हालणारा प्रवाह किंवा नदी, आणि "वाढणारे किंवा विकसणारे" असा घेता येतो. जीव हा विकसलेलें ब्रह्मच होय असा ह्या श्लोकाचा भाव आहे. मुंडकात २।७–८ येथेहि ह्या श्लोकात *सांगितलें तुसेंच सांगितलें आहे.* 'शुचि", "हंस", "वसु", "होता" ह्याचे अर्थ मागील टीकाकारास अनुसरूनच आम्ही केले आहेत. "वेदि" ह्याचा अर्थ "अग्नि" ह्याशीं जुळेल आणि "दुरोण" ह्याचा अर्थ "अतिथि" ह्याशीं जुळेल असा केला आहे. "बृहत्" म्हणजे "ब्रह्म" असा अर्थ घेतला आहे तोहि योग्य आहे. कारण "बृंह" किंवा "बृह" म्हणजे वाढणे ह्या पासूनच "मोठा" ह्या अर्थाचे "ब्रह्म" आणि "बृहत्" हे दोनहि शब्द झाले.

वल्ली ५ श्लोक ३–४

ऊर्ध्वं प्राणमुन्नयति अपानं प्रत्यगस्यति ।
मध्ये वामनमासीनं विश्वे देवा उपासते ॥३॥

अस्य विस्रंसमानस्य शरीरस्थस्य देहिनः ।
देहाद्विमुच्यमानस्य किमत्र परिशिष्यते ॥ एतद्वैतत् ॥४॥

अर्थ—शरीराच्या मध्य भागांत [मध्ये] बसलेला जो [यः (अध्याहृत)] ल्हानसा [वामन] जीव प्राणाला (उच्छ्वासास) वर ओढतो आणि अपानास खाली ढकलतो, त्याला सर्व इंद्रियें [विश्वे देवा] उपासतात म्हणजे उपभोग देतात. ॥३॥ शरीरांत असलेला [शरीरस्थस्य] हा जीव [अस्य देहिनः] जेव्हा घसरतो [विस्रंसमानस्य] आणि देहाला सोडून जातो [देहाद्विमुच्यमानस्य] तेव्हा येथे काय शिल्लक राहतें ? जें शिल्लक राहतें तेंच तें ब्रह्म होय. ॥४॥ ह्या दोन श्लोकांत "जीव" आणि ब्रह्म ह्यांचें अनुक्रमें वर्णन केलें आहे.

टिप्पणी—"यः" हें पद अध्याहृत न मानतां, "उन्नयति" आणि "अस्यति" हीं सप्तम्यंत विशेषणें "मध्ये" ह्याचीं मानूनहि तिसऱ्या श्लोकाचा अर्थ करतां येतो.

चवथ्या श्लोकांतील षष्ठ्यंत पदांची षष्ठी भावे षष्ठी होय.

**वल्ली ५ श्लोक ५**

न प्राणेन नापानेन मर्त्यो जीवति कश्चन ।
इतरेण तु जीवंति यस्मिन्नेतावुपाश्रितौ ॥५॥

अर्थः—उच्छ्वासानें किंवा श्वासानें कोणीच मर्त्य जिवंत रहात नाही. परंतु ज्यावर हे श्वासोच्छ्वास अवलंबून आहेत, त्या दुसऱ्यामुळे [इतरेण] म्हणजे जीवामुळे ते जिवंत राहतात. ॥५॥ ह्या श्लोकांत जीवाचें महत्त्व वर्णून पुढील श्लोकांत मरणाचे वेळीं तो जीव कोठें जातो ह्याचें वर्णन केलें आहे.

**वल्ली ५ श्लोक ६–७**

हंत त इदं प्रवक्ष्यामि गुह्यं ब्रह्म सनातनम् ।
यथा च मरणं प्राप्य आत्मा भवति गौतम ॥६॥

योनिमन्ये प्रपद्यंते शरीरत्वाय देहिनः।
स्थाणुमन्येऽनुसंयंति यथाकर्म यथाश्रुतम् ॥७॥

**अर्थ**—येथपर्यंत ब्रह्माचें व जीवाचें वर्णन केलें आणि आतां [च] हे गौतमा नचिकेता, मरणानंतर [मरणं प्राप्य] जीवात्म्याला [आत्मा] कोणती गति प्राप्त होते [यथा भवति] त्याविषयी गुह्य सनातन वेदांतील ज्ञान [ब्रह्म] मी तुला [ते] हें [इदम्] म्हणजे पुढील श्लोकांत सांगतों. ॥६॥ मरणानंतर कोणी जीव [अन्ये देहिनः] शरीर धारण करण्याकरितां [शरीरत्वाय] गर्भाशयांत [योनिम्] प्रवेश करतात म्हणजे पुनः जन्म घेतात. कांही दुसरे जीव [अन्ये] ब्रह्माला [स्थाणुम्] प्राप्त होतात. हें त्यांच्या त्यांच्या कर्माप्रमाणे व ज्ञानाप्रमाणे घडतें [यथाकर्म यथाश्रुतम्]. म्हणजे ज्यांचें ज्ञान व कर्में चांगलीं ते ब्रह्माला जातात म्हणजेच पुनः जन्म घेत नाहीत आणि ज्यांचें ज्ञान आणि कर्में चांगलीं नाहीत ते पुनः जन्म घेतात. ॥७॥

**टिप्पणी**—"ब्रह्म" म्हणजे वेद म्हणजेच वेदांतील ज्ञान असाच अर्थ येथे करावा लागतो. "ब्रह्म" म्हणजे जगाचें आदिकारण असा अर्थ येथे करणें चूक आहे. कारण हा ब्रह्माचें वर्णन आतापर्यंत पुष्कळ केलेंच आहे व पुढील श्लोक आत्म्याच्या दोन प्रकारच्या गतींचें वर्णन आहे. ह्यावरून "इदं ब्रह्म" म्हणजे पुढील श्लोकांतील ज्ञान हा अर्थ उघड आहे.

स्थाणु म्हणजे स्थिर असें ब्रह्म असा अर्थ करावा, म्हणजे मागे वल्ली ३ श्लोक ७–८ येथे वर्णिलेल्या दोनहि गति येथे वर्णिल्या असा अर्थ निघेल. "स्थाणु" ह्याचा असा अर्थ न केला तर, येथे मरणानंतरची एकच गति वर्णिली असा अर्थ निघेल व तें योग्य नाही; कारण मरणानंतरची गति वर्णितों असें म्हटल्यानंतर दोनहि प्रकारच्या गति वर्णणें आवश्यक आहे. म्हणून "स्थाणु" म्हणजे "वृक्षादि स्थावर भाव" असा श्री शंकराचार्यांनी केलेला अर्थ अमान्य आहे.

वल्ली ५ श्लोक ८-११

य एष सुप्तेषु जागर्ति कामं कामं पुरुषो निर्मिमाणः ।
तदेव शुक्रं तद् ब्रह्म तदेवामृतमुच्यते ॥
तस्मिंल्लोकाः श्रिताः सर्वे तदु नात्येति कश्चन एतद्वै तत् ॥८॥
अग्निर्यथैको भुवनं प्रविष्टो ।
रूपं रूपं प्रतिरूपो बभूव ॥
एकस्तथा सर्वभूतांतरात्मा ।
रूपं रूपं प्रतिरूपो बहिश्च ॥९॥
वायुर्यथैको भुवनं प्रविष्टो ।
रूपं रूपं प्रतिरूपो बभूव ॥
एकस्तथा सर्वभूतांतरात्मा ।
रूपं रूपं प्रतिरूपो बहिश्च ॥१०॥
सूर्यो यथा सर्वलोकस्य चक्षुः ।
न लिप्यते चाक्षुषैर्बाह्यदोषैः ।
एकस्तथा सर्वभूतांतरात्मा ।
न लिप्यते लोकदुःखेन बाह्यः ॥११॥

अर्थ—हीं इंद्रियें निजली असतां [सुप्तेषु] जो कामांमागून काम निर्माण करीत म्हणजे जागृतींत भोगावयाच्या उपभोगांची तयारी करीत जागा असतो, तोच शुद्ध म्हणजे वासनादिमलरहित [शुक्र], तोच ब्रह्म, तोच अत्यानंद [अमृतम्] असें म्हणतात. त्याच्याच आश्रयानें सर्व लोक म्हणजे जागृति, स्वप्न व तुर्या ह्या अवस्था असतात आणि त्याच्यापेक्षा वरचढ कोणीच नाहीं. हेंच तें ब्रह्म होय. ॥८॥ एकच अग्नि जसा सर्व भुवनांत म्हणजे लाकडांमध्ये प्रवेश करून राहतो आणि प्रत्येक लाकडामध्ये [रूपं रूपं] त्या त्या लाकडाचें रूप धारण करतो [प्रतिरूपो बभूव] त्याप्रमाणें सर्व भूतांचा अंतरात्मा

असलेला हा एकच परमात्मा (ब्रह्म) प्रत्येक प्राण्यात [रूप रूपं] त्या त्या प्राण्याचें रूप धारण करतो [प्रतिरूपो बभूव] म्हणजे गाईंत गाईसारखें, घोड्यात घोड्यासारखें व मनुष्यांत मनुष्यासारखें रूप धारण करतो आणि शिवाय बाहेरहि तो असतोच. ॥९॥ प्राण [वायुः] जसा एकच असून सर्व भुवनात म्हणजे प्राण्यामध्ये प्रवेश करून राहतो आणि प्रत्येक प्राण्यामध्यें [रूप रूपं] त्या त्या प्राण्याचें रूप धारण करतो [प्रतिरूपो बभूव] त्याप्रमाणे सर्व भूताचा अंतरात्मा असलेला हा एकच परमात्मा (ब्रह्म) प्रत्येक प्राण्यात [रूप रूपं] त्या त्या प्राण्याचें रूप धारण करतो आणि [प्रतिरूपो बभूव] म्हणजे गाईंत गाईसारखें, घोड्यात घोड्यासारखें आणि मनुष्यात मनुष्यासारखें रूप धारण करतो आणि शिवाय बाहेरहि तो आहेच. ॥१०॥ सर्व जीवाचा [लोकस्य] डोळाच असलेला म्हणजे डोळ्यास आपल्या प्रकाशाने वस्तू दाखविणारा असलेला हा सूर्य, दृश्य वस्तूच्या [चाक्षुषैः] बाहेरचा काळेपणा, रंग, दुर्गंध वगैरे दोषानी [बाह्यदोषैः] लिप्त होत नाही म्हणजे दूषित होत नाही, त्याप्रमाणेच सर्व भूताचा अंतरात्मा असलेला हा एकच परमात्मा, लोकाच्या दुःखाने लिप्त होत नाही म्हणजे दुःखी होत नाही, कारण तो जीवाचें रूप धारण करतो तरी खरोखर जीवाच्या सुखदुःखावस्थाच्या तो बाहेर आहे म्हणजे सुखदुःखावस्थाहून तो भिन्न आहे. जीवस्थितींतील सुखदुःखावस्था ह्या परमात्म्याचे स्वरूप नव्हत. परमात्म्याचें स्वरूप सुखदुःखविरहित असेंच आहे, असा भाव आहे. ॥११॥

टिप्पणी—"काम काम निर्मिमाणः" ह्याचा अर्थ "स्वप्नातील देखावे उत्पन्न करीत" असा योगास वाटेल पण तो चूक आहे. कारण स्वप्नातील देखावे असत्य असतात आणि ते असत्य देखावे उत्पन्न करण्याबद्दल स्तुति कवि करील हे संभवत नाही. त्या शब्दाचा खरा अर्थ "जागृतींत विषयोपभोग घेऊन थकलेल्या शरीरास पुनः त्या उपभोगास समर्थ करणें" असाच असला पाहिजे, कारण झोपेंत खरोखर हेंच घडत असतें.

अकराव्या श्लोकांतील "बाह्यः" ह्या शब्दाने व सर्व श्लोकाने देखील हेंच दाखविलें आहे की, सुखदुःखें जीवस्थितींतच असतात, व केवळ ब्रह्मस्थिति ही सुखदुःखातीत आहे.

वल्ली ५ श्लोक १२-१३

एको वशी सर्वभूतांतरात्मा ।
एकं रूपं बहुधा यः करोति ॥
तमात्मस्थं येऽनुपश्यंति धीराः ।
तेषाम् सुखं शाश्वतं नेतरेषाम् ॥१२॥
नित्योनित्यानां चेतनश्चेतनानाम् ।
एको बहूनां यो विदधाति कामान् ॥
तमात्मस्थं येऽनुपश्यंति धीराः ।
तेषां शांतिः शाश्वती नेतरेषाम् ॥१३॥

**अर्थ**—स्वतंत्र असलेला [वशी] जो सर्व जीवांचा एकच अंतरात्मा आहे व जो एक असून अनेक जीव बनतो, तोच स्वतःमध्ये [आत्मस्थं] आहे असें जे शहाणे मनुष्य पाहतात त्यांनाच शाश्वत सुख मिळतें; इतरांना तें शाश्वत सुख मिळत नाही. ॥१२॥ जीवांचें प्रिय करणारा [नित्य] असा हा जो एकच चेतन परमात्मा, परमात्म्यास प्रिय [नित्यांना] अशा पुष्कळ चेतन जीवांचे काम पुरवितो [विदधाति] तोच आपणांमध्ये आहे असें जे शहाणे मनुष्य पाहतात त्यांनाच शाश्वत शांति मिळते; इतरांस ती शाश्वत शांति मिळत नाही. ॥१३॥

**टिप्पणी**—"नित्योनित्यानां" ह्याचा "नित्यः अनित्यानां" असा पदच्छेद करून "अनित्यानां" म्हणजे विनाशिनाम् हें जीवांचें विशेषण करावें असें प्रथमदर्शनीं वाटतें, पण तें योग्य नाही. कारण जीवांना ह्या उपनिषदांत तरी अनित्य म्हणजे विनाशी मानलें नाही.

शिवाय "विदधाति कामान्" ह्या विधानाशीं विनाशी किंवा अविनाशी ह्या विशेषणापेक्षा "प्रिय करणारा" व "प्रिय" हींच विशेषणें चांगलीं जुळतात आणि नित्य ह्याचा "प्रियकारी" व "प्रिय" असा अर्थ वैदिक भाषेंत आहेच. "रविर्न चित्रासूरो न संदृगायुर्न प्राणो नित्योन सूनुः" (ऋग्वेद १।६६।१) येथील "नित्यो न सूनुः" ह्याचा अर्थ सायणाचार्यांनीहि "पुत्र इव प्रियकारी" असाच केला आहे. आणि "नित्यं न सूनुं मधु बिभ्रत उपक्रीळंति" (ऋग्वेद १।६६।२१). येथे "नित्यं न सूनुम्" ह्याचा अर्थ सायणाचार्यांनी "औरसं प्रियं पुत्रमिव" असा केला आहे. "उपप्रजिन्वन्नुशतीरुशंतं पतिं न नित्यं जनयः सनीळाः" (ऋग्वेद १।७१।१) "नित्यं न सूनुं पित्रोरुपस्थे" (ऋग्वेद १।१८५।२) ह्या ठिकाणीं "नित्य" ह्याचा "प्रिय" असाच अर्थ आहे. ("न" म्हणजे "इव" असा अर्थ वैदिक भाषेंत आहे हें लक्षांत ठेवावें) (श्रीयुत तर्कतीर्थ कोकजे कृत धर्मस्वरूपनिर्णय, प्रकरण दुसरें, पानें ३४-३७ पहा.)

वल्ली ५ श्लोक १४-१५

तदेतदिति मन्यंतेऽनिर्देश्यं परमं सुखम् ।
कथं नु तद्विजानीयां किमु भाति विभाति वा ॥१४॥

न तत्र सूर्यो भाति न चंद्रतारकं ।
नेमा विद्युतो भांति कुतोऽयमग्निः ॥
तमेवभांतमनुभाति सर्वम् ।
तस्य भासा सर्वमिदं विभाति ॥१५॥

**अर्थ**—ज्याला आम्ही "तत् एतत्" असें (एतद्वैतत् ह्या वाक्यांत) अनेकदा म्हटलें आहे तें ब्रह्म वर्णन करण्यास अशक्य [अनिर्देश्य] असें परम सुख आहे असें कोणी मानतात; पण खरोखर ते तसें नाही. (असा भाव आहे) कारण तें सुख स्या ब्रह्मास भासतें किंवा नाही [किमु वा भाति] स्पष्ट भासतें किंवा नाही, [किमु वा विभाति]

हें मीं म्हणजे जीवानें कसें जाणावें. (जाणतां येत नाहीं हा भाव आहे.) ॥१४॥ कारण ब्रह्माच्या त्या निद्रारूपी अद्वैत स्थितींत [तत्र] चंद्र, सूर्य, तारका, वीज किंवा अग्नि ह्यांचा प्रकाश पडत नाहीं. जेव्हा तें ब्रह्मच जागृतींत जीवरूपानें प्रकाशूं लागतें तेव्हाच- त्यामागून त्याच्या प्रकाशानें हे सर्व प्रकाशूं लागतात. ब्रह्माचें तें अनिर्देश्य परम सुखहि जागृतींतच भासूं शकतें हा भाव आहे. ॥१५॥

टिप्पणी—हे दोन श्लोक सर्व उपनिषदांत अत्यंत महत्त्वाचे आहेत. कारण उपनिषदांनीं ठरविलेलें मनुष्याचें साध्य "जागृतींतील आत्यंतिक सुख" होय असें ह्या दोन श्लोकांवरून स्पष्ट दिसतें. ब्रह्माच्या मूळच्या निद्रारूपी अद्वैत अवस्थेंत परम सुख असलें तरी त्याचें तेव्हा भान नसतें, जीवस्थितींत म्हणजे जागृतींतच त्या सुखाचें भान होतें; म्हणून "जागृतींतील आत्यंतिक सुख" हेंच मनुष्याचें साध्य ठरतें, अशी उपनिषदांची विचारसरणी आहे. तें जागृतींतील आत्यंतिक सुख, ब्रह्म आपणांतच आहे व सर्वांतच आहे असें जाणणाऱ्यास मिळतें असें मागील श्लोक बारातेरा ह्यांत सांगितलें आणि "जाणणें" हें जागृतींतच घडतें, अर्थात् परमसुखहि जागृतींतच मिळतें हें सांगण्याकरितां हे चवदा व पंधरा श्लोक दिले आहेत.

"किमु वा"—प्रश्नार्थक शब्दाशीं 'वा' जोडल्यानें त्याचा प्रश्नार्थकच अर्थ होतो. (आपट्यांचा कोश पहा) जग हें कधीं दिसतें व कधीं दिसत नाहीं. अर्थात् ज्याच्या प्रकाशानें हें जग दिसतें तें ब्रह्महि कधीं प्रकाशतें व कधीं प्रकाशत नाहीं. ह्याच जागृति व निद्रा ह्या अवस्था होत. ह्या प्रत्यक्ष व सिद्ध गोष्टींस अनुसरूनच ह्या श्लोकांचा अर्थ केला पाहिजे. श्री शंकराचार्यांनीं तसें केलें नाहीं म्हणून त्यांचा अर्थ अग्राह्य आहे.

## वल्ली सहावी

वल्ली ६ श्लोक १

ऊर्ध्वमूलोऽवाक्शाख एषोऽश्वत्थः सनातनः ।
तदेव शुक्रं तद् ब्रह्म तदेवामृतमुच्यते ।
तस्मिंल्लोकाः श्रिताः सर्वे तदु नात्येति कश्चन ॥
एतद्वै तत् ॥१॥

**अर्थः**—ज्या हें वर असलेलें मूळ आणि जीव ह्या खाली असलेल्या शाखा ह्यांनीं बनलेला हा अनादि [सनातन] जगद्रूपी अश्वत्थ आहे, तें मूळच [तदेव] शुद्ध म्हणजे वासनादिमलरहित [शुक्रम्], तेंच ब्रह्म, तेंच अत्यानंद [अमृतम्] असें म्हणतात. त्याच्याच आश्रयानें सर्व लोक म्हणजे जागृति, स्वप्न व तुर्या ह्या अवस्था असतात. आणि त्याच्यापेक्षा वरचढ असा कोणीच नाहीं. हेंच तें ब्रह्म होय ॥१॥

वल्ली ६ श्लोक २-३

यदिदं किं च जगत्सर्वं प्राण एजति निःसृतम्
महद्भयं वज्रमुद्यतम् य एतद्विदुरमृतास्ते भवंति ॥२॥
भयादस्याग्निस्तपति भयात्तपति सूर्यः ।
भयादिंद्रश्च वायुश्च मृत्युर्धावति पंचमः ॥३॥

**अर्थ**—ज्यापासून हें सर्व कांहीं [इदं किं च] जगत्, प्राण हालूं लागला असतां [प्राणे एजति —भावे सप्तमी] उत्पन्न झालें आणि जें उगारलेल्या वज्राप्रमाणे मोठें भयकारक आहे त्या ब्रह्माला जे जाणतात, ते अत्यानंदाचा अनुभव घेणारे होतात. [अमृता भवंति] ॥२॥ त्या ब्रह्माच्या भयानेच अग्नि व सूर्य तपतात, वायु वाहतो, इंद्र पाणी देतो आणि पांचवा मृत्यूहि प्राण्यांना मारतो [धावति]. ॥३॥

**टिप्पणी**—"प्राणो एजति" हे दोनहि शब्द सप्तम्यंत आहेत असें मानल्याने अर्थ फार चांगला लागतो; कारण कांहीं उपनिषदांच्या

मतें ब्रह्मापासून प्रथमतः प्राणच उत्पन्न, झाला. आणि त्या प्राणाच्या हालण्याने म्हणजेच अनेक प्रकारच्या व्यापाराने जगत् उत्पन्न झालें. उदाहरणार्थ, प्रश्नोपनिषद् १।४ आणि २।३ पहा.

"पंचमः"—पंचमः म्हणण्याचें कारण येथे सांगितलेले अग्नि, सूर्य, इंद्र, वायु आणि मृत्यु मिळून पांच होतात.

**वल्ली ६ श्लोक ४**

इह चेदशकद्बोद्धुं प्राक् शरीरस्य विस्रसः ।
ततः सर्गेषु लोकेषु शरीरत्वाय कल्पते ॥४॥

**अन्वय**—इह तद् (ब्रह्म) बोद्धुम् अशकत् (ततः) प्राक् शरीरस्य विस्रसः (मरणं) चेत् ततः (मरणात्) सर्गेषु लोकेषु शरीरत्वाय कल्पते. येथे पहिला "ततः" अध्याहृत घ्यावा लागतो.

**अर्थ**—ह्या लोकीं (म्हणजे मरणापूर्वी) तें ब्रह्म जाणूं शकला [अशकत्-लुङ्] त्या पूर्वी जर शरीराचा विनाश झाला, तर त्याला त्यानंतर [ततः] ब्रह्मानेच उत्पन्न केलेल्या लोकांमध्ये [सर्गेषु लोकेषु] शरीर धारण करण्याकरिता जन्मावें लागतें [कल्पते]. ॥४॥

**टिप्पणी**—विस्रसः—हें प्रथमा विभक्त्यंत नाम मानून त्याचा अर्थ "विनाश" असा मानावा. "विस्रसा" म्हणजे "विनाश" असा अर्थ आपट्यांच्या कोशांत दिलाच आहे

श्री शंकराचार्यांनी "शरीरस्य विस्रसः (पंचमी) प्राक् इह तत् ब्रह्म बोद्धुं चेदशकत् संसार-बंधनाद्विमुच्यते, न चेदशकत् बोद्धुं ततः सर्गेषु लोकेषु शरीरत्वाय कल्पते" असा अन्वय केला आहे, त्यांत अध्याहृत पदें पुष्कळच आहेत. त्यापेक्षा आमचा अन्वय चांगला, कारण त्यांत अध्याहृत पद "ततः" हें एकच आहे.

**वल्ली ६ श्लोक ५**

यथादर्शे तथात्मनि यथा स्वप्ने तथा पितृलोके ।

यथाप्सुपरीवददृशे तथा गंधर्वलोके ।
छायातपयोरिव ब्रह्मलोके ॥५॥

**अर्थ**—शरीरांत असतांना [आत्मनि] म्हणजे जीवंतपणीं जें ज्ञान किंवा ब्रह्माचें प्रतिबिंब असतें तें आरशांतील प्रतिबिंबाप्रमाणे स्पष्ट पण उष्णतारहित असतें. शरीराबाहेर जाऊन म्हणजे मेल्यावर मनुष्य पितृलोकीं गेला तर तेथे ज्ञान किंवा ब्रह्माचें प्रतिबिंब स्वप्नांतील ज्ञानाप्रमाणे अंधुक असतें. मेल्यावर मनुष्य गंधर्वलोकीं गेला तर तेथे ज्ञान किंवा ब्रह्माचें प्रतिबिंब पाण्यावरील प्रतिबिंबाप्रमाणे, भोंवती फिरणारें [परीव = परि इव] असें म्हणजे अस्थिर दिसतें [ददृशे]. ब्रह्मलोकीं मात्र म्हणजे मनुष्य मनानेच शरीराबाहेर जाऊन सर्वांच्या शरीरांत मीच आहे असें मानतो तेव्हा, ज्ञान किंवा ब्रह्माचें प्रतिबिंब, सूर्याचें सूर्यकांत मण्यांतून जें प्रतिबिंब [छाया] पडतें त्यासारखें उष्णतायुक्त म्हणजे आनंदी, स्पष्ट व स्थिर असतें. ॥५॥

**टिप्पणी**—मागील श्लोकांमध्ये मरणापूर्वीच ब्रह्माचें ज्ञान करून घेतलें पाहिजे असें सांगितलें आहे. ह्यावरून आणि पुढील श्लोक चवदांतील "अत्र ब्रह्म समश्नुते" ह्या वाक्यावरून या श्लोकांतील "ब्रह्मलोक" म्हणजे मरणापूर्वीची अवस्था होय असें स्पष्ट ठरतें. ह्या अवस्थेंतील ब्रह्माच्या प्रतिबिंबानी तुल्ना करण्याकरिता ग्रंथकर्त्यांनें श्लोकाच्या पूर्वीच्या पादामध्ये निर्दिष्ट केलेल्या आरशांतील किंवा पाण्यांतील प्रतिबिंबाहून भिन्न प्रकारचें प्रतिबिंब घेतलें असलें पाहिजे हें उघड आहे. अशाच प्रकारचें प्रतिबिंब सूर्यकांत मण्यांतून (Convex lens) पडणारें प्रतिबिंब हेंच असूं शकतें. हें प्रतिबिंब सूर्यापेक्षांहि जास्त प्रभावी असतें, कारण प्रत्यक्ष सूर्य जाळूं शकत नाही, पण हें प्रतिबिंब कागद वगैरे वस्तू जाळूं शकतें. आरशांतील किंवा पाण्यांतील प्रतिबिंबहि जाळूं शकत नाही. ह्यावरून असें निश्चित दिसतें की "छायातप" ह्याचा अर्थ तप म्हणजे सूर्य व छाया म्हणजे सूर्याचें सूर्यकांत मण्यांतून

पडणारें प्रतिबिंब. ■ प्रतिबिंबाचे जे दाहक धर्म प्रसिद्ध आहेत, त्यांवरून ग्रंथकारास असें दाखवावयाचें आहे की सूर्यांत नसलेला दाहकधर्म जसा सूर्यकांत मण्यांतून पडणाऱ्या प्रतिबिंबांत असतो, तसा ब्रह्मांत नसलेला आनंद ब्रह्म जीवांत असतो. सूर्यकांतमणि फार प्राचीन काळापासून माहीत होता असें नलराजाच्या हकीकतीवरून दिसतें, कारण त्याला केवळ मंत्राने लाकूड पेटवितां येत असे अशी हकीकत आहे. श्री शंकराचार्यांनी "छायातप" म्हणजे ऊन व सावली असा अर्थ करून ह्या श्लोकाचा अर्थ केला आहे. तो चूक आहे असें जरी म्हणतां येत नाही, तरी तो नीरस आहे हें खास. शिवाय त्याप्रमाणे, "यथादर्शे" आणि "छायातपयोरिव" ह्या दोहोंचाहि एकच म्हणजे विविक्तपणा म्हणजे स्पष्टपणा हाच अर्थ आहे; परंतु ग्रंथकारास तर ह्या दोन ठिकाणीं दोन भिन्न अर्थ सांगावयाचे आहेत हें उघड आहे.

पितृलोक म्हणजे मेल्यानंतरची अवस्था; मेल्यानंतर जे भूत म्हणजे पिशाच होतात म्हणजे जिवंत मनुष्यास पकडतात त्यांस गंधर्व म्हटलें आहे असें बृहदारण्यक ३।३।१ येथील "गंधर्वगृहीता" या शब्दावरून ठरतें.

वल्ली ६ श्लोक ६

इंद्रियाणां पृथग्भावं उदयास्तमयौ च यत् ।
पृथदुत्पद्यमानानां मत्वा धीरो न शोचति ॥६॥

अर्थ—ज्या अर्थी [यत्] इंद्रियें आत्म्याहून भिन्न आहेत [पृथग्भावं] आणि आत्म्याहून भिन्न प्रकाराने उत्पन्न झालेल्या [पृथग् उत्पद्यमानानां] इंद्रियांनाच उत्पत्ति आणि नाश आहेत [उदयास्तमयौ] व आत्म्याला ते नाहीत हें जाणल्यामुळे [मत्वा] शहाणा मनुष्य [धीरः] शोक करीत नाही, त्याअर्थी सूर्यकांत मण्यांतून पडणाऱ्या सूर्याच्या प्रतिबिंबाप्रमाणे तो अत्यानंदयुक्त असतो [छायातपयोः इव ब्रह्मलोके] (मागील श्लोकांतील "छायातपयोरिव ब्रह्मलोके" ह्या सिद्धांताचें कारण ह्या श्लोकांत दिलें आहे हें ह्या श्लोकांतील "यत्" ह्या शब्दावरून स्पष्ट आहे.)

वल्ली ६ श्लोक ७-८

इंद्रियेभ्यः परं मनो मनसः सत्वमुत्तमम् ।
सत्वादधिमहानात्मा महतोऽव्यक्तमुत्तमम् ॥७॥
अव्यक्तात्तु परः पुरुषो व्यापकोऽलिंग एवच ।
यं ज्ञात्वा मुच्यते जंतुः अमृतत्वं च गच्छति ॥८॥

**अर्थ**—इंद्रियांच्या पलीकडे आंत [परम्] मन आहे. मनाच्या वर [उत्तमम्] म्हणजेच आंतमध्ये पलीकडे बुद्धि [सत्व] आहे. बुद्धीच्या वर [अधि] म्हणजेच आंतमध्ये पलीकडे महान् आत्मा म्हणजे जीवात्मा अथवा अहंकार आहे. महान् आत्म्याच्या वर [उत्तमम्] म्हणजेच पलीकडे आंतमध्ये अव्यक्त म्हणजे परमात्म्याला जीवात्म्याचें स्वरूप देणारें अज्ञेय कारण आहे आणि त्या अव्यक्ताच्या पलीकडे आंतमध्ये [परः] पुरुष म्हणजेच परमात्मा आहे. तो परमात्मा सर्वांना व्यापणारा परंतु लिंगरहित आहे. (लिंग म्हणजे जाणण्याचें इंद्रियगम्य चिन्ह जसे रूप, रस, गंध वगैरे). त्याला (बुद्धीने) जाणल्याने जीव (जंतुः) वासनांपासून मुक्त होतो आणि अत्यानंदाचा अनुभव घेतो [अमृतत्वं गच्छति] ॥ ८ ॥

**टिप्पणी**—इंद्रियाहून आत्मा भिन्न असें जें मागील श्लोकांत सांगितले ते कसें तें या श्लोकांत वर्णिलें आहे. या श्लोकांशीं व वल्ली ३ श्लोक १०-११ यांशीं विरोध आहे असे कोणीं म्हणतात पण ते चूक आहे. कारण येथे फक्त "इंद्रियें" व "मन" ह्यांमधील "अर्थ" ही पायरी गाळली आहे. इतर पायऱ्या तशाच कायम आहेत. एखादी पायरी गाळणें हा विरोध नव्हे.

वल्ली ६ श्लोक ९

न संदृशे तिष्ठति रूपमस्य ।
न चक्षुषा पश्यतिकश्चनैनम् ॥

हृदा मनीषा मनसाभिक्लृप्तो ।
य एतद्विदुरमृतास्ते भवंति ॥ ९ ॥

**अर्थ**—डोळ्याने पहावयाचे जे विषय आहेत त्यांपैकी [संदृशे] त्या ब्रह्माचें रूप नाही. म्हणून कोणीहि मनुष्य त्या ब्रह्माला डोळ्याने पाहूं शकत नाही. कोणत्याहि इंद्रियाने ब्रह्म जाणलें जाऊं शकत नाही हा भाव अहंकाराने [हृदा] बुद्धीने [मनीषा] आणि मनाने त्याची कल्पना करावी लागते [अभिक्लृप्तः] म्हणजे जागृतींतच बुद्धि व मन ह्यांचा व्यापार चालूं असतांच तो जाणल्या जातो हा भाव आहे. त्याला जे जाणतात ते अमृत म्हणजे शाश्वत सुखाचा अनुभव घेणारे होतात. ॥९॥

वल्ली ६ श्लोक १०–१५

यदा पंचावतिष्ठंते ज्ञानानि मनसा सह ।
बुद्धिश्च न विचेष्टति तामाहुः परमां गतिम् ॥१०॥
तां योगमिति मन्यंते स्थिरामिंद्रियधारणाम् ।
अप्रमत्तस्तदा भवति योगोहि प्रभवाप्ययौ ॥११॥
नैव वाचा न मनसा प्राप्तुं शक्यो न चक्षुषा ।
अस्तीति ब्रुवतोन्यत्र कथं तदुपलभ्यते ॥१२॥
अस्तीत्येवोपलब्धव्यस्तत्वभावेन चोभयोः ।
अस्तीत्येवोपलब्धस्य तत्वभावः प्रसीदति ॥१३॥
यदा सर्वे प्रमुच्यंते कामायेस्य हृदि श्रिताः ।
अथ मर्त्योऽमृतो भवत्यत्र ब्रह्म समश्नुते ॥१४॥
यदा सर्वे प्रभिद्यंते हृदयस्येह ग्रंथयः ।
अथ मर्त्योऽमृतो भवत्येतावदनुशासनम् ॥१५॥

**अर्थ**—जेव्हा पांचहि इंद्रियांकडून होणारीं ज्ञानें आणि मन हीं त्याहीशी होतात [अवतिष्ठंते] आणि बुद्धि देखील आपला व्यापार करीत

नाही, त्या स्थितीला परमगति असें कोणी म्हणतात. ॥१०॥ त्या स्थिर इंद्रियधारणेला म्हणजे प्रत्येक इंद्रिय स्थिर होतें अथवा काम करीत नाही त्या स्थितीलाच योग म्हणजे जीवब्रह्मैक्य ते मानतात; कारण त्यांच्या मतें, त्या योगानेच [तदा] मनुष्य अप्रमत्त होतो; कारण त्या योगानेच सुखाची उत्पत्ति [प्रभव] आणि दुःखाचा नाश होतो ॥११॥ (पण हें सर्व चूक आहे कारण त्या अवस्थेंत), वाणीनें, डोळ्यानें, किंवा मनानेंहि तो परमात्मा जाणला जाऊं शकत नाही. परमात्मा आहे [अस्तीति] असें म्हणणाऱ्या मनुष्याशिवाय इतराला [ब्रुवतः अन्यत्र] म्हणजेच जागृतींतील बुद्धीच्या व्यापाराशिवाय तो कसा जाणला जाईल, ॥१२॥ परमात्मा आहे असें म्हणत असतांच [अस्तीत्येव] म्हणजे जागृतींतील बुद्धिव्यापार चालू असतांच परमात्मा जाणला जाऊं शकतो [उपलब्धव्यः]; कारण आत्मा व अनात्मा ह्या दोघांचेंहि स्वरूप [तत्त्वभावेन चोभयोः] तेव्हाच जाणलें जातें. आत्मा आहे असें बुद्धि ठरविते तेव्हाच [अस्तीत्येवोपलब्धस्य] आत्म्याचें स्वरूप [तत्त्वभावः] स्पष्टपणें समजतें [प्रसीदति] ॥१३॥ (हा योग परमगति नव्हे तर श्रेष्ठगति कोणती असें विचाराल तर सांगतों ऐका.) म्हणून हा योग श्रेष्ठगति नव्हे. जेव्हा हृदयात असलेले सर्व काम टाकून दिले जातात, तेव्हाच मर्त्य म्हणजे दुःखी असलेला मनुष्य सुखी [अमृत] होतो आणि मरणापूर्वीच [अत्र] ब्रह्माचा उपभोग घेतो. ॥१४॥ जेव्हा हृदयांत असलेल्या वासनाग्रंथींचा भेद होतो, तेव्हाच मर्त्य म्हणजे दुःखी असलेला मनुष्य सुखी होतो. एवढेंच [एतावद्] वेदांमध्ये सांगितलें आहे. [अनुशासनम्.] ॥१५॥

टिप्पणी—जागृतींत बुद्धि व मन ह्यांचा व्यापार चालू असतांनाच तो परमात्मा (ब्रह्म) जाणला जातो असें नवव्या श्लोकांत सांगितलें. त्यावरील आक्षेपकाचें म्हणणें श्लोक १० व ११ ह्यांत सांगून त्या आक्षेपाचें खंडन श्लोक १२ ते १५ ह्यांत केलें आहे, असा आमचा अर्थ आहे व तसा अर्थ आजपर्यंत कोणीच केला नाही. म्हणून आम्ही असा अर्थ कां केला ह्याचें कारण सांगणे जरूर आहे. "हृदा मनीषा

मनसाभिक्लृप्तः" आणि "नैव वाचा न मनसा प्राप्तुं शक्यो न चक्षुषा" हीं वाक्यें परस्पर विरुद्ध आहेत. म्हणून हें दुसरें वाक्य योगस्थितिसंबंधी आहे असें मानणें भाग आहे. म्हणजे त्याचा अर्थ "योगस्थितींत आत्मा वाणीनें, डोळ्यानें किंवा मनानें हि जाणला जाऊं शकत नाही; कारण त्यांचे व्यापारच तेव्हा बंद असतात" असा करावा लागतो. असा त्याचा अर्थ केल्यावर आत्मा केव्हा जाणला जाऊं शकतो हें सांगणारें वाक्य पुढे आहे असें मानावेंच लागतें आणि तोच अर्थ पुढील वाक्यांतून काढावा लागतो. हेंच आम्ही केलें आहे. श्री शंकराचार्यांनी श्लोक १०-११ ह्यांचा अर्थ बहुतेक आमच्या अर्थासारखाच केला आहे. पण श्लोक १२-१३ मध्ये "योग निरर्थक आहे" ह्या आक्षेपाचें (योगोऽनर्थकः) खंडन आहे, असा अर्थ त्यांनी काढण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांच्या अर्थांतहि सार असें आहे की "ब्रह्म आहे" असें *आगमानुसार म्हणणाऱ्या आस्तिकाशिवाय* इतरांस ब्रह्माचें ज्ञान होणार नाही. ह्या उत्तरानें देखील योगाचें आनर्थक्यच सिद्ध होतें आणि विचाराचें किंवा आगमाचें उपयोगित्व सिद्ध होतें. आमच्या अर्थाप्रमाणे योग ह्या अवस्थेचेंच खंडन श्लोक १२-१३ मध्ये आहे व तें नवव्या श्लोकाशीं अनुरूप असेंच आहे. श्लोक ९ मध्ये बुद्धीनें *आत्मा जाणला जातो* असें म्हटलें आहे त्याशीं श्लोक १०-११ विरुद्ध असल्यामुळे त्या श्लोक १०-११ मध्ये पूर्वपक्षाचें म्हणणें असलें पाहिजे. आणि त्याला उत्तर पुढील श्लोकांत असलें पाहिजे. श्लोक ९ मध्ये वर्णिलेल्या सम्यक् दर्शनाचा उपाय म्हणून योग श्लोक १०-११ मध्ये सांगितला असेंहि श्री शंकराचार्य म्हणतात ("साहृन्मनीट् कथं प्राप्यते तदर्थो योग उच्यते") तेंहि बरोबर नाही. कारण तेथे योगाला उपाय म्हटलें नसून परमगति म्हटलें आहे. "मनसाऽभिक्लृप्तः" आणि "न मनसा प्राप्तुं शक्यः" ह्या परस्परविरुद्ध वाक्यांची संगति श्री शंकराचार्यांनी लाविली नाही.

वल्ली ६ श्लोक १६

शतं चैका हृदयस्य नाड्यः ।
तासां मूर्धानमभिनिःसृतैका ॥
तयोर्ध्वमायन्नमृतत्वमेति ।
विष्वङ्ङन्याउत्क्रमणे भवंति ॥१६॥

**अर्थ**--हृदयापासून एकशे एक नाडी निघाल्या आहेत. त्यांपैकी एक डोक्याकडे गेलेली आहे. तिने वर गेलें तर मनुष्य अत्यानंदाला प्राप्त होतो. (अमृतत्वमेति) परंतु दुसऱ्या नाडीखाली चोहीकडे म्हणजे विषयांकडे ( विष्वङ् ) जाण्याकरिता (उत्क्रमणे) आहेत. ॥१६॥

**टिप्पणी**--हृदयापासून खाली आणि वर म्हणजे वल्ली ४ श्लोक १-२ ह्यांतील वर्णनाप्रमाणे बाहेर व आंत जाण्याचे मार्ग आहेत जे उघड आहे. त्यांसच येथे नाडी म्हटलें आहे. वरच्या नाडीने जाणारा म्हणजे आत्म्याच्या स्वरूपाचें चिंतन करणारा अत्यानंदाला प्राप्त होतो. परंतु खालच्या चोहीकडच्या नाडींनी जाणारा म्हणजे इंद्रियोपभोगांकडे जाणारा मनुष्य मृत्यूला म्हणजेच दुःखाला प्राप्त होतो. एकूण वल्ली ४ श्लोक १-२ मध्ये जो अर्थ सांगितला आहे तोच येथेहि सांगितला आहे. मरणानंतरच्या निरनिराळ्या भिन्न गति ह्यांत वर्णिल्या आहेत, असें मानण्याची गरज नाही. त्या अर्थापेक्षा आमचा हा अर्थ फारच सरस आहे.

वल्ली ६ श्लोक १७

अंगुष्ठमात्रः पुरुषोंतरात्मा ।
सदाजनानां हृदये संनिविष्टः ॥
तं स्वाच्छरीरात् प्रवृहेत् ।
मुंजादिवेषिकां धैर्येण ॥
तंविद्याच्छुक्रममृतम् ।
तं विद्याच्छुक्रममृतम् ॥१७॥

**अर्थ**—अंतरात्मा पुरुष म्हणजे ब्रह्मच अंगुष्ठमात्र म्हणजे जीवात्मा होऊन सदा सर्व जनांच्या हृदयांत प्रवेश करून राहिला आहे. गवतांतून त्याच्या आंतील काडी जशी बाहेर काढतात तसा धैर्यानें तो जीवात्मा आपल्या शरीरांतून बाहेर काढावा तसाच तो सर्वांच्या शरीरांतून निघेल, म्हणून मीच सर्वांच्या शरीरांमध्ये आहे असें मानावें. असें मानणाराच [तं] शुद्ध [शुक्र] म्हणजे वासनारहित आणि अत्यानंदी [अमृतं] असतो असें जाणावें. असें मानणाराच शुद्ध व अत्यानंदी असतो असें जाणावें. ॥१७॥ सर्व उपनिषदांचें सार ह्या श्लोकांत सांगितलें आहे.

वल्ली ६ श्लोक १८

मृत्युप्रोक्तां नचिकेतोय लब्ध्वा ।
विद्यामेतां योगविधिं च कृत्स्नम् ॥
ब्रह्मप्राप्तो विरजोऽभूद्विमृत्युः ।
अन्योप्येवं यो विदध्यात्ममेवम् ॥१८॥

**अर्थ**—ह्याप्रमाणें मृत्यूनें सांगितलेली विद्या आणि संपूर्ण योग विधि ऐकून नचिकेताला ब्रह्माची प्राप्ति झाली आणि तो वासनारहित [विरज] आणि दुःखरहित [विमृत्यु] झाला, त्याप्रमाणेच दुसराहि कोणी जो शरीरांतील जीवाविषयी [अध्यात्मम्] हें ज्ञान जाणेल [विद्] तो देखील त्याप्रमाणेच होईल.

**टिप्पणी**—हा श्लोक प्रक्षिप्त आहे की काय ह्या विषयी विचार आरंभींच केला आहे. या श्लोकांतील शेवटचा शब्द "एव" असाहि कांहीं प्रतींत आहे आणि "एवं" असाहि कांहीं प्रतींत आहे. आम्हांस "एवं" हाच पाठ ग्राह्य वाटतो.

---

# मुंडकोपनिषद्

हें छंदोबद्ध असल्यामुळे भगवद्गीतेच्या पूर्वीचें ठरतें. कठांतील कांहीं श्लोक ह्यांत आहेत. कठ २।२३।२४=मुंडक ३।२।३-४; कठ २।५=मुंडक १।२।८; कठ ५।१५=मुंडक २।२।१०. ह्यावरून कठ पाहून नंतर मुंडक लिहिलें गेलें किंवा मुंडक पाहून कठ लिहिलें गेलें असे दोनहि प्रकारचे सिद्धांत होऊं शकतात. निश्चित अमकाच सिद्धांत असें म्हणतां येत नाहीं. तथापि मुंडक ३।२।६ येथील "वेदान्त" शब्दावरून मुंडका पूर्वीं बरींच उपनिषदें म्हणजे "केन" "कठ" आणि "प्रश्न" हीं होऊन गेलीं होतीं असें दिसतें. मुंडक १।२।१ येथें त्रेतायुगाचा निर्देश भूतकालीन असा आहे. त्यावरून हें द्वापरयुगांत म्हणजे भारतीय युद्धापूर्वी म्हणजे इ. स. पूर्व १४०२ ते इ. स. पूर्व १२०२ ह्या काळांत झालें असेल. ह्याचा कर्ता अंगिरा: ऋषि असावा.

**घटनेची योजना**—ह्याचीं तीन मुंडकें असून प्रत्येकाचे दोन खंड आहेत. मुं. १ खंड १ ह्यांत प्रस्तावना व जगाची उत्पत्ति सांगितली आहे. मुं. १ खं. २ ह्यांत यज्ञकर्मवाद्यांचा पूर्वपक्ष व त्याचें खंडन आहे आणि शेवटीं यज्ञकर्मांचें वैयर्थ्य जाणून ब्रह्मविद्येकरितां गुरूस शरण जावें असें सांगितलें आहे. मुंडक २ खंड १ ह्यांत जगाची उत्पत्ति सविस्तर सांगून अनाविष्कृत ब्रह्माचें वर्णन केलें आहे. मुंडक २ खंड २ ह्यांत व पुढें आविष्कृत ब्रह्माचें म्हणजे जीवाचें वर्णन करून, अनाविष्कृत व आविष्कृत ब्रह्मामधील म्हणजे ईश्वर व जीव ह्यांमधील फरक स्पष्ट केला आहे आणि जीवास ईश्वराचें ज्ञान झाल्याने तो ईश्वराशीं

परमसाम्य पावतो व मरणकाळीं जन्ममृत्यूच्या फेऱ्यांतून मुक्त होऊन ब्रह्मांत मिळून जातो असें सांगितलें आहे.

## मुंडक १ खंड १

मुंडक १ खंड १ श्लोक १-३

ब्रह्मा देवानांप्रथमःसंबभूव।
विश्वस्य कर्ता भुवनस्य गोप्ता ॥
सब्रह्मविद्यां सर्वविद्याप्रतिष्ठाम्।
अथर्वाय ज्येष्ठपुत्राय प्राह ॥१॥

अथर्वणे यां प्रवदेत ब्रह्माऽ।
थर्वा तां पुरोवाचांगिरे ब्रह्मविद्यां ॥
स भारद्वाजाय सत्यवाहाय प्राह।
भारद्वाजोंगिरसेपरावराम्॥२॥

शौनकोह महाशालोऽगिरसं विधिवदुपसन्नः पप्रच्छ।
कस्मिन्नु भगवो विज्ञाते सर्वमिदं विज्ञातम् भवति
इति॥३॥

अर्थ—देवांमध्ये म्हणजे अधिकाऱ्यांमध्ये ब्रह्मा (आनंद नांवाचा ब्रह्मा) पहिला होऊन गेला तो विश्वाचा म्हणजे समाजाचा कर्ता म्हणजे समाजाची रचना करणारा व भुवनाचा म्हणजेच समाजाचा रक्षण करणारा होता. त्याने सर्व विद्यांना आधारभूत असलेली ब्रह्मविद्या आपल्या अथर्वा नांवाच्या ज्येष्ठ पुत्रास सांगितली. ॥१॥ ब्रह्म्याने अथर्व्याला जी विद्या सांगितली ती पूर्वी अथर्व्याने अंगिऱ्यास सांगितली. अंगिऱ्याने सत्यवाह भारद्वाजास सांगितली, त्या भारद्वाजाने पूर्वीच्या लोकांपासून अलीकडच्या लोकांस प्राप्त होत गेलेली ती विद्या [परावरां]

अंगिरसास सांगितली. ॥२॥ मोठ्या विद्यालयांत शिकलेला [महाशालः] शौनक योग्यविधीने [विधिवत्] अंगिरसाकडे आला आणि त्याला पुसतां झाला, "हे भगवन्, काय जाणलें असतां हें सर्व जाणलें जातें ॥३॥

टिप्पणीः—वाराहकल्पाच्या आरंभीं म्हणजे इ. स. पूर्व ३१०२ किंवा शकपूर्व ३१८० ह्या काळीं आनंद नांवाच्या ऋषीनें ब्रह्मर्षि देशांत स्वतः ब्रह्मपद धारण करून राज्य स्थापिलें, व नवीन समाजव्यवस्था, यज्ञव्यवस्था, कालगणनापद्धति, विवाहपद्धति व धर्मव्यवस्था स्थापन केली (Artronomical method etc. छेदक १५५, १५६, २९८, २९९) म्हणून त्याला येथे "देवानां प्रथमः" "विश्वस्य कर्ता" आणि "भुवनस्य गोप्ता" असें म्हटलें आहे. "परावराम्" "पर" म्हणजे पूर्वीचे लोक आणि "अवर" म्हणजे अलीकडे लोक म्हणून 'परावर' ह्याचा अर्थ पूर्वीच्या लोकापासून अलीकडच्या लोकास प्राप्त झालेली असा केला आहे. श्री शंकराचार्यांनीहि असाच अर्थ केला आहे.

मुंडक १ खंड १ श्लोक ४–६

तस्मै स होवाच। द्वे विद्ये वेदितव्ये इति ह
स्म यद् ब्रह्मविदो वदंति पराचैवापरा च ॥४॥
तत्रापरा ऋग्वेदो यजुर्वेदः सामवेदोऽथर्ववेदः
शिक्षा कल्पो व्याकरणं निरुक्तं छंदो ज्योतिषमिति
अथ परा यया तदक्षरमधिगम्यते ॥५॥
यत्तदद्रेश्यमग्राह्यमगोत्रमवर्णमचक्षुः श्रोत्रं
तदपाणिपादम्। नित्यं विभुं सर्वगतम् सुसूक्ष्मं।
तद् व्ययं यद्भूतयोनिं परिपश्यंति धीराः ॥६॥

अर्थ—त्या शौनकाला अंगिरस म्हणता झाला. ब्रह्मवेत्ते जें सांगतात तें हें की परा आणि अपरा अशा दोन विद्या जाणण्याला योग्य

[विदितव्ये] अशा आहेत. ॥४॥ त्यांपैकी [तत्र] ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, आणि अथर्ववेद हे चार वेद आणि शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंदस् आणि ज्योतिष हीं सहा वेदांगें ही अपरा म्हणजे कमी महत्त्वाची विद्या होय. जिने तें अक्षर ब्रह्म जाणलें जातें ती परा म्हणजे श्रेष्ठ विद्या होय. ॥५॥ जें कोणत्याहि ज्ञानेंद्रियानें जाणतां येत नाही [अद्रेश्यं = अदृश्यम्], ज्याला हातानें पकडतां येत नाही [अग्राह्यम्], जें दुसऱ्या कशापासून उत्पन्न झालें नाही [अगोत्रं], ज्याला कोणताच रंग नाही [अवर्णं], ज्याला डोळे, कान, हात व पाय नाहीत असें, तें अक्षर आहे. तथापि तें नेहमी राहणारें [नित्यम्] सर्वांना आपल्या कह्यांत ठेवणारें [विभु], सर्व ठिकाणीं असणारें आणि सुसूक्ष्म आहे ॥ तें सर्वभूतांचें उत्पत्तिस्थान [योनि] असूनहि अव्यय म्हणजे क्षीण न होणारें आहे; म्हणजे त्यांतून कितीहि भूतें उत्पन्न झाली तरी तें कमी होत नाही व तेवढेंच कायम राहतें. अशा त्या भूतयोनीला ज्ञाते लोक [धीराः]. पाहतात ॥६॥

टिप्पणी—'अग्राह्य' ह्याचा ज्ञानेंद्रियांना म्हणजे डोळे, कान, घ्राण, रसना, व त्वचा ह्यांना अग्राह्य असा अर्थ होईल. (बुद्धीलाहि अग्राह्य असा अर्थ करूं नये कारण "परिपश्यंति धीराः" असें येथेंच स्पष्ट म्हटलें आहे. कठांतहि "दृश्यते सूक्ष्मया बुद्ध्या" (३।१२) असें स्पष्ट म्हटलें आहे.) तथापि "अद्रेश्य" व "अग्राह्य" ह्यांचा एकच अर्थ करणें बरोबर नाही म्हणून "अग्राह्य" ह्याचा अर्थ "जें हातानें पकडतां येत नाही तें" असा करावा.

अगोत्रः—ज्याला गोत्र नाही तें. म्हणजेच जें दुसऱ्या कोणापासून उत्पन्न झालें नाही तें.

अवर्णम्ः—गुणरहित असल्यामुळे ज्याचें वर्णन करतां येत नाही तें असा अर्थ कोणी करतोल. ब्रह्म अगदीच अवर्णनीय आहे असें नाही म्हणून तो अर्थ बरोबर नाही. रंगरहित असा अर्थ करावा; त्यास कोण-

तीच हरकत नाही. श्री शंकराचार्यांनी अनेक अर्थ केले त्यांपैकी तो एक आहे.

अन्वयः--ज्यांतून कितीहि भूतें उत्पन्न होऊन बाहेर निघालीं तरी जें जेवढेंचे तेवढेंच कायम राहतें, क्षीण होत नाही तें. असेंच वर्णन "अदःपूर्णमिदंपूर्णं" इत्यादि (बृहदारण्यक ५।१) येथे आहे. ह्याचें आणि बृहदारण्यक ३।८।८ ह्याचेंहि विवरण पहा.

**मुंडक १ खंड १ श्लोक ७–९**

यथोर्णनाभिः सृजते गृह्णते च ।
यथा पृथिव्यामोषधयः संभवंति ॥
यथा सतः पुरुषात्केशलोमानि ।
तथाऽक्षरात्संभवतीह विश्वम् ॥७॥

तपसा चीयते ब्रह्म ततोऽन्नमभिजायते ।
अन्नात्प्राणोमनः सत्यम् लोकाः कर्मसुचामृतम् ॥८॥

यः सर्वज्ञः सर्वविद्यस्य ज्ञानमयं तपः ।
तस्मादेतद्ब्रह्मनाम रूपमन्नं च जायते ॥९॥

अर्थः—ज्याप्रमाणे कोळी स्वतःच्या शरीरांतून स्वतःच तंतूचें जाळें निर्माण करतो आणि तें पुनः आंत घेतो, ज्याप्रमाणे पृथिवीवर औषधि उत्पन्न होतात आणि ज्याप्रमाणे जिवंत असलेल्या [सतः] पुरुषापासून मस्तकाचे केश [केश] आणि इतर भागावरील केश [लोमानि] उत्पन्न होतात त्याप्रमाणेच अक्षरापासून हें विश्व उत्पन्न होतें, म्हणजे ब्रह्म हें जगाचें उपादान कारण व निमित्त कारणहि आहे आणि ब्रह्माचा विकास होऊन जग बनलें, (ब्रह्माच्या ठिकाणीं आभास होऊन विश्व बनलें असें नाही) असा भाव आहे. ॥७॥ तपानें ब्रह्म वाढतें [चीयते] तेंहा त्यापासून अन्न म्हणजे पृथ्वी, पाणी, तेज,वायु व आकाश हीं पंच

महाभूतें उत्पन्न होतात. त्या अन्नापासून "प्राण" म्हणजेच "जीवशक्ति" उत्पन्न होते. व "प्राणा" पासूनच सत्य म्हणजे ज्यांत ज्ञाता, ज्ञान आणि ज्ञेय ही त्रिपुटी आहे असें मन उत्पन्न होतें. मन असलेले अनेक प्राणी एकत्र आले असतां समाज [लोकाः] उत्पन्न होतात. समाजांत अनेक प्रकारचीं सत्कर्में उत्पन्न होतात व त्यापासून आनंद [अमृत] उत्पन्न होतो. ह्या आनंदाच्या प्राप्तीकरतांच ब्रह्म वाढतें म्हणजेच विकास पावतें आणि दुष्कर्मांपासून दुःख उत्पन्न होतें असे दोनहि भाव ह्या वाक्यांत आहेत. ॥८॥ जो सर्वज्ञ आहे आणि जो सर्व मिळविणारा आहे [सर्वविद्] इच्छा [ज्ञानमय] हीच ज्याचें तप आहे, त्या (अनाविष्कृत) ब्रह्मापासून (आविष्कृत) ब्रह्म नांवाचें, जें रूपहि आहे आणि अन्नहि आहे तें म्हणजे पंचमहाभूतें उत्पन्न झालीं. (पंचमहाभूतें ह्यांना रूप आहे आणि हीं प्रत्यक्षपणे स्थावर जीवांचें म्हणजे औषधींचें आणि अप्रत्यक्षपणे जंगम जीवांचें अन्न आहे हें प्रसिद्धच आहे) ॥९॥

**टिप्पणी**—तपः—म्हणजेच एकसारखी दीर्घकाळपर्यंत केलेली इच्छा. अशा इच्छेंत निर्माणशक्ति (Will-power) असते हें अनुभवसिद्ध आहेच. मानसोपचारशास्त्र (Psychotherapy) हें ह्या शक्तीवरच अवलंबून आहे. मनाशिवाय इच्छा किंवा ज्ञान संभवत नाहीं आणि मन तर अन्न व प्राण ह्यानंतर उत्पन्न झालें आणि ब्रह्मास पुढे २।१।२ येथे "अमनाः" असें म्हटलेंहि आहे. म्हणून येथील "तपः" आणि "सर्वज्ञ" हे शब्द गौणार्थानें योजिले आहेत असें मानलें पाहिजे. गौणार्थानें तरी ते शब्द ब्रह्मास लावण्याचें कारण असें आहे की ब्रह्माच्या ठिकाणीं सर्वज्ञत्व आणि इच्छा आहेत असें मानल्याशिवाय जगाच्या रचनेची उपपत्ति लागत नाहीं. ("रचनानुपपत्तेश्च" हें व्याससूत्र पाहा.)

"अन्न"—चराचर प्राण्यांचें जें प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष अन्न आहे तें म्हणजे वायु, पाणी आणि पृथ्वी (माती व तीमधील क्षार), जुन्या मताप्रमाणे पंचमहाभूतें.

" अन्नात्प्राणः मनः सत्यम् "—अन्नापासून चराचर जीवांमध्ये असणारा प्राण आणि त्या प्राणापासूनच मन म्हणजे अहंकार, द्वैतज्ञान, बुद्धि वगैरे उत्पन्न झाले, हा अर्थ निर्विवादच आहे आणि प्रत्यक्ष जें दिसतें त्याशीं जुळणाराच आहे. मनापासून सत्य म्हणजे आकाशादि पंचमहाभूतें झालीं असा अर्थ कोणी—श्री शंकराचार्यहि करतात तो चूक आहे. कारण अन्न म्हणजे पंचमहाभूतेंच व त्यांची उत्पत्ति मागेच सांगितली आहे. म्हणून "सत्य" हें मनाचें विशेषण मानून "सत्य" म्हणजे "द्रष्टा, दर्शन आणि दृश्यवस्तु" ही त्रिपुटी ज्यांत आहे तें मन असा अर्थ करावा. तैत्तिरीय उपनिषदांत ब्रह्मानंद वल्ली ६ येथे "सत्या" चा हाच अर्थ आहे.

" सर्वविद् "—" सर्वज्ञ " आणि " सर्वविद् " ह्यांचा बहुतेक सारखाच अर्थ श्रीशंकराचार्यांनीहि केला आहे. पण " सर्वविद् " ह्यांतील धातू " वेत्ति " मानण्या ऐवजी " विंदते " मानली तर त्या दोघांचा निरनिराळा अर्थ करतां येतो. सर्व मिळविणारा म्हणजे सर्व मिळविण्याची ज्यांत शक्ति आहे तो.

" ज्ञानमय " म्हणजे " इच्छामय " असा अर्थ घ्यावा; कारण तपः हें इच्छामयच असतें. इच्छा ही ज्ञानात्मक असतेच.

" कर्मसुचामृतम् "—जीवांनी केलेल्या कर्मांत् म्हणजे जीव कर्म करीत असतांनाच त्यांना अमृत म्हणजे सुख किंवा दुःखहि मिळूं लागलें, असा अर्थ आहे. सुख हें शारीरिक किंवा मानसिक कर्मांच्या ठिकाणीं आहे हे आपण प्रत्यक्षच पाहतों त्यास अनुसरूनच हें म्हटलें आहे. हे तीन श्लोक फार महत्वाचे व सुंदर आहेत. ह्यांमध्ये जगाची उत्पत्ति कशी झाली व कशाकरिता झाली तें थोडक्यांत वस्तुस्थितीस अनुसरून सांगितलें आहे. ब्रह्म विकास पावलें व त्या विकासाची परिणति आनंदांत झाली हें येथे स्पष्टपणे सांगितलें आहे.

"अमृतम्" ह्याचा अर्थ श्रीशंकराचार्यांनी "कर्मजं फलं" असा केला आहे. तो निराधार आहे. अमृत म्हणजे सुख, आनंद असाच अर्थ सर्वत्र आहे. "ज्ञानादेव तु कैवल्यम्" असा सिद्धांत त्यांना स्थापावयाचा असल्यामुळे त्यांनी असा अर्थ केला, पण तो खरोखर होत नाही. "कर्मसुखामृतं" हें वाक्य ह्या उपनिषदांतील पुढील प्रतिपादन योग्य रीतीने समजण्याची किल्ली आहे. म्हणूनच त्याचा अर्थ श्रीशंकराचार्यांनी फिरविला.

## मुंडक १ खंड २

**मुंडक १ खंड २ श्लोक १–६**

तदेतत्सत्यम्।
मंत्रेषु कर्माणि कवयो यान्यपश्यन्।
तानि त्रेतायां बहुधा संततानि॥
तान्याचरथ नियतं सत्यकामाः।
एष वः पंथाः सुकृतस्य लोके॥१॥
यदा लेलायते ह्यर्चिः समिद्धे हव्यवाहने।
तदाज्य भागावंतरेणाहुतीः प्रतिपादयेत्॥२॥
यस्याग्निहोत्रमदर्शमपौर्णिमासम्।
अचातुर्मास्यमनाग्रयणमतिथिवर्जितं च॥
अहुतमवैश्वदेवमविधिना हुतम्।
आसप्तमांस्तस्य लोकान् हिनस्ति॥३॥
काली कराली च मनोजवा च।
सुलोहिता याच सुधूम्रवर्णा॥
स्फुलिंगिनी विश्वरुची च देवी।
लेलायमाना इति सप्त जिह्वाः॥४॥

एतेषु यश्चरते भ्राजमानेषु।
यथाकालं चाहुतयो ह्याददायन् ॥
तनयं त्येताः सूर्यस्य रश्मयो।
यत्र देवानां पतिरेकोधिवासः ॥५॥

एह्येहीति तमाहुतयः सुवर्चसः।
सूर्यस्य रश्मिभिर्यजमानं नयंति ॥
प्रियां वाचमभिवदंत्यो.ऽर्चयंत्यः।
एष वः पुण्यः सुकृतो ब्रह्मलोकः ॥६॥

**अर्थ**—पुढे जें सांगितलें आहे [एतत्] ते [तद्] अगदी खरें आहे। शहाण्यांनी मंत्रांमध्ये जीं कर्में पाहिलीं म्हणजे शहाण्यांनी जीं कर्में पाहून मंत्रांत सांगितलीं, तींच त्रेतायुगामध्ये बहुतकरून (बहुधा) केलीं जात [संततानि] तींच, तुम्हास जर सत्याची इच्छा असेल तर [सत्यकामाः] तुम्ही नेहमी आचरण करा [आचरथ]. तुमच्याकरिता सत्कर्मांचा [सुकृतस्य] हाच मार्ग आहे. ॥१॥ अग्नि इंधनांनी पेटविला असतां त्याची ज्वाळा जेव्हा *लवलव* करीत असते म्हणजे हालत असते [लेलायते] तेव्हा तुपाच्या दोन आहुतींमध्ये [आज्यभागौ अंतरेण], आहुती द्याव्यात. ॥२॥ ज्याचें अग्निहोत्र, दर्शकर्मरहित, पौर्णमासकर्म-रहित, चातुर्मास्यकर्मरहित, अग्रयणकर्मरहित, अतिथिपूजनरहित, आहुतिरहित, वैश्वदेवकर्मरहित आणि अयोग्यविधीने आहुति दिलेलें असेल त्याचें तें *अग्निहोत्र त्याच्या सातहि लोकांचा नाश करतें. त्याला* भूरादि जे सात लोक आहेत त्यांपैकी कोणत्याहि लोकाचें सुख त्याला मिळत नाही असा भाव आहे.) ॥३॥ (१) काली, (२) कराली, (३) मनोजवा, (४) सुलोहिता, (५) सुधूम्रवर्णा, (६) स्फुलिंगिनी आणि (७) देवी विश्वरुची अशा लवलवणाऱ्या ह्या अग्नीच्या सात जिव्हा (ज्वाळा) आहेत ॥४॥ योग्य काळीं प्रकाशणाऱ्या ह्या जिव्हांमध्ये आहुति

देत जो अग्निहोत्राचें आचरण करतो, त्याला ह्या सूर्याच्या रश्मि, जेथे सर्वांच्या वर राहणारा [अधिवासः] देवांचा एकच पति म्हणजे ब्रह्मा असतो तेथे म्हणजे ब्रह्मलोकास नेतात. ॥५॥ तेजस्वी अशा [सुवर्चसः] त्या आहुति, इकडे ये, इकडे ये, हा इकडे तुमच्या सत्कर्मानें बनविलेला [सुकृतः] आनंददायक [पुण्यः] ब्रह्मलोक आहे" अशी प्रिय वाणी बोलत आणि त्याची पूजा करीत, सूर्याच्या रश्मींच्या सहाय्यानें, त्या यज्ञ करणाऱ्याला [यजमानं] ब्रह्मलोकीं घेऊन जातात. ॥६॥

टिप्पणी—"कर्मसुचामृतम्" असें मागे १।१।८ येथे सांगितलें. त्या अर्थी तीं कर्मे कोणतीं हा प्रश्न येथे उत्पन्न होतो. त्या संबंधीचा पूर्वपक्ष ह्या श्लोकांत आहे व त्याचें खंडन पुढील श्लोकांत आहे. ज्या कर्मांबरोबर वासनाभाव नसतो तीं कर्मे मुक्द होत नाहीत आणि वासनाभावास आत्मज्ञानाची गरज आहे, असा त्या खंडनाचा अर्थ आहे. ह्याच पूर्वपक्षाचें असेंच खंडन व्याससूत्रें ३।४।१–२६ येथे केलेलें आहे. 'तदेतत्सत्यं' यावरून ह्या सहा श्लोकांत जें सांगितलें तें सर्व खरेंच आहे असें मानूं नये. (कारण तें खोटें असलें तरी पूर्वपक्षकार तें खरें आहे असेंच म्हणेल) अर्थात् ह्या श्लोकांचा अर्थ उपपन्न असाच करण्याची गरज नाही. शब्दांवरून जसा होईल तसाच त्यांचा अर्थ करावा. म्हणून ब्रह्मलोक म्हणजे स्वर्ग असा अर्थ करणें बरोबर नाही व आवश्यकहि नाही.

"आचरथ"—हें आज्ञार्थ (लोट्) मध्यमपुरुष बहुवचन ह्याचें रूप आहे हें निश्चित आहे. पण तें अपाणिनीय आहे. पाणिनीय रूप "आचरत" असें होतें. अशींच अपाणिनीय रूपें मुंडकांत २।२।५ मध्ये (जानथ, विमुंचथ) आणि प्रश्नांत १।२ मध्ये (पृच्छथ) आणि २।३ मध्ये (आपद्यथ) आहेत. पालीमध्ये अशींच "थ" प्रत्ययांत रूपें होतात. ह्यावरून पालीभाषा उत्पन्न झाल्यानंतर हीं उपनिषदें झालीं असा कोणी तर्क करतात पण तो चूक आहे. कारण फार प्राचीन काळीं

असा प्रयोग कोणत्या तरी प्रदेशांत चालूं असेल, तोच ह्या उपनिषदांत आला व तोच पुढें पाली मार्येतहि आला असेंहि संभवतें व इतर रीतीनें ह्या उपनिषदांचा काळ जर फार पुरातन ठरत असेल तर त्यास बाध न आणणारा हाच तर्क बरोबर ठरतो.

मुंडक १ खंड २ श्लोक ७–११

प्लवा ह्येते अदृढा यज्ञरूपाः।
अष्टादशोक्तमवरं येषुकर्म ॥
एतच्छ्रेयो येऽभिनंदति मूढाः।
जरामृत्युं ते पुनरेवापि यंति ॥७॥

अविद्यायामंतरे वर्तमानाः।
स्वयं धीराः पंडितं मन्यमानाः ॥
जंघन्यमानाः परियंति मूढाः।
अंधेनैव नीयमाना यथांधाः ॥८॥

अविद्यायां बहुधा वर्तमानाः।
वयं कृतार्था इत्यभिमन्यंति बालाः ॥
यत्कर्मिणो न प्रवेदयंति रागात्।
तेनातुराः क्षीणलोकाश्च्यवंते ॥९॥

इष्टापूर्तं मन्यमाना वरिष्ठं।
नान्यच्छ्रेयो वेदयंते प्रमूढाः ॥
नाकस्य पृष्ठे सुकृतेनुभूत्वा।
इमं लोकं हीनतरं वा विशंति ॥१०॥

तपः श्रद्धे येह्युपवसंत्यरण्ये।
शांता विद्वांसो भैक्ष्यचर्यां चरंतः ॥

सूर्यद्वारेण ते विरजाः प्रयांति ।
यत्रामृतः स पुरुषो ह्यव्ययात्मा ॥११॥

अर्थः—सोळा ऋत्विज, यजमान व त्याची पत्नी ह्या अठरा जणांचे [अष्टादश] हलक्या प्रकारचें [अवरम्] कर्म ज्यांत सांगितलें आहे त्या यज्ञरूपी नौका फुटक्या [अदृढाः] म्हणजे फुटक्या आहेत. जे मूढ लोक हें यज्ञकर्म हेंच कल्याण समजून त्यांचें अभिनंदन करतात म्हणजे तेंच आचरतात ते म्हातारपण व मृत्यु भोगण्यास पुनः परत येतात. ॥७॥ स्वतःस शहाणे (धीराः) व पंडित समजणारे परंतु अज्ञानांत [अविद्यायामंतरे] बुडलेले [वर्तमानाः] हे मूढ लोक, आंधळेच ज्यांना वाट दाखवितात त्या आंधळ्यांप्रमाणे अनेक प्रकारचीं दुःखें अनुभवत [जंघन्यमानाः] पुनः पुनः त्याच ठिकाणीं फिरून परत येतात, [परियंति] म्हणजे अभीष्ट ठिकाणास जाऊन पोंचत नाहीत ॥८॥ बहु प्रकारच्या अविद्येंत बुडलेले हे मूढ आम्ही कृतकृत्य [कृतार्थाः] झालों असें मानतात; परंतु ज्याअर्थी केवळ यज्ञकर्म करणारे हे लोक [कर्मिणः] वास-नेमुळे [रागात्] खऱ्या आनंदाचा अनुभव जाणत नाहीत [प्रवेदयंते] त्या अर्थी त्यांना मिळालेल्या लोकांचा क्षय होऊन [क्षीणलोकाः] ते दुःखी होऊन [आतुराः] आणि खालीं पडतात. ९॥ यज्ञ आणि धर्मार्थ खाळीं वगैरे बांधणें [इष्टापूर्तं] हेंच वरिष्ठ मानणारे हे अतिशय मूर्ख लोक दुसरें अधिक मोठें कल्याण [श्रेयः] जाणत नाहीत. ते आपल्या सत्कर्मांनी मिळविलेल्या [सुकृते] स्वर्गात [नाकस्य पृष्ठे] कांहीं काळ सुखाचा अनुभव घेऊन [अनुभूत्वा] ह्या मनुष्य लोकांत [इमं लोकम्] किंवा ह्यापेक्षाहि वाईट अशा पशुलोकांत प्रवेश करतात. ॥१०॥ परंतु अरण्यांत राहून भिक्षा मागून राहणारे (म्हणजे यज्ञकर्मे न करणारे असा भाव आहे), जे तपः म्हणजे विषयानंदत्याग, आणि श्रद्धा म्हणजे आत्मानंद-स्वावर आणि आत्माद्वैतावर दृढ विश्वास ह्यांचें आचरण करतात [उपवसंति], वासनारहित [शांताः] असतात ते निष्पाप [विरजाः] होऊन

सूर्यद्वाराने, जेथे तो कधीच नाश न पावणारा [अव्ययात्मा] व आनंदवान् [अमृतः] पुरुष म्हणजे नामरूपातीत ब्रह्म असतें तेथे जातात म्हणजे जन्ममरणाच्या फेऱ्यांतून मुक्त होतात असा भाव आहे. ॥११॥

**टिप्पणें**—"अव्ययात्मा अमृतः पुरुषः" म्हणजे ह्याच उपनिषदांत शेवटीं ( ३।२।८ येथे ) सांगितलेला "परात्पर दिव्य पुरुष" म्हणजे ब्रह्म हें अगदीं स्पष्ट आहे. कारण दोनहि *ठिकाणीं आत्मज्ञाचीच* गति सांगितली आहे.

"सूर्यद्वारेण"—"सूर्यद्वारेण" म्हणण्याचें कारण छांदोग्य ४।१५ व ५।१० हीं प्रकरणें वाचल्याने समजेल. तेथे "धूमादि" व "अर्चिरादि" अशा दोन गति वर्णिल्या आहेत. धूमादि गतींत पुनर्जन्म आहे व तो मार्ग सूर्यांतून जात नाहीं. अर्चिरादि गतींत मनुष्य ब्रह्मांत जाऊन मिळतो [ब्रह्म गमयति] आणि पुनः जन्म घेत नाहीं [इमं मानवमावर्तं नावर्तते] आणि हा मार्ग सूर्यांतून जातो. म्हणून प्रकरणाच्या श्लोकाचा भाव पुनर्जन्म पावत नाहीं असा काढावा लागतो. श्लोक ७-१० मध्ये अज्ञानी पुनः जन्म घेतो असें सांगितलें आहे. त्याच्या उलट ज्ञानी पुनः जन्मत नाहीं असाच भाव श्लोक ११ मध्ये असला पाहिजे. व तो "सूर्यद्वारेण" ह्या "अर्चिरादि"-मार्गदर्शक शब्दानें समजून येतो. "भैक्ष्यचर्यं चरंतः" हे शब्द कोणताच आश्रम दाखवीत नाहींत; कारण गृहस्थालाहि भिक्षा मागतां येते आणि दोनहि प्रकारच्या ब्रह्मचाऱ्यांस भिक्षेवरच निर्वाह करावा लागतो. ह्या शब्दांचा खरा अर्थ समजण्यास संदर्भाकडे पाहिलें पाहिजे. श्लोक१-६ मध्ये पूर्वपक्ष आहे. त्याचें तात्पर्य ब्रह्मप्राप्तिकरिता "यज्ञ" केलेच पाहिजेत असें आहे पुढील श्लोकांत ह्या पूर्वपक्षाचें खंडन आहे. श्लोक ७-१० मध्ये यज्ञाचें हलकें फळ दाखविलें आहे. श्लोक ११ मध्ये "तपस् आणि श्रद्धा" ह्यांचें उच्च फळ दाखविलें आहे. येथेच हें उच्च फळ यज्ञाशिवायच मिळतें किंवा यज्ञाच्या साहाय्यानें मिळतें. हें सांगणें जरूर आहे आणि तें सांगण्याकरिताच

"भैक्ष्यचर्यं चरंतः" हे शब्द योजिले असले पाहिजेत, कारणं हें सांगणारे दुसरे शब्दच नाहीत. म्हणून ह्यांचा अर्थ "भिक्षेवर उदर–पोषण करणारे म्हणून दरिद्री व ज्यांना पुष्कळ पैसा लागतो असे यज्ञ करण्यास असमर्थ" असा करावा लागतो. ह्याचा अर्थ हें उच्च फळ यज्ञादिवायच मिळतें असा आहे. श्री व्यासहि अतएव "अग्नींधनाद्यनपेक्षा" (३।४।२५) ह्या सूत्रांत हेंच म्हणतात. ह्याचा अर्थ सर्वकर्मत्याग करावा असा होत नाही. म्हणून ह्या अकराव्या श्लोकांत सर्वकर्मत्यागाचा विधि आहे हें समजणें योग्य नाही. "कर्मसु चामृतम्" असें सांगणारें उपनिषद् सर्व कर्मांचा त्याग कधीच सांगणार नाही. शिवाय उपनिषदांत पुढे "आत्मक्रीड, आत्मरतिः क्रियावान् एष ब्रह्मविदां वरिष्ठः" (३।१।४) ह्यांत सत्क्रिया करणारा [ क्रियावान् ] सर्व ब्रह्मवेत्यांमध्ये श्रेष्ठ होय असें स्पष्ट म्हटलें आहे. व्याससूत्र ३ । ४ । २५–२६ ह्यांतहि यज्ञकर्मे करणें काम्य ठरविलें आहे (तेथील आमचें विवरण पहा). यज्ञ-कर्मांचा त्याग करावाच असा देखील विधि ह्या श्लोकांतून काढतां येत नाही. ह्या श्लोकांत "तपः आणि श्रद्धा" ह्यांचें आवश्यकत्व आणि विधान सांगितलें आहे. आणि ते दोन असतील तर यज्ञकर्म देखील नसलें तरी चालेल असें सांगितलें आहे. पण सर्व कर्मांचा त्याग सांगितला नाही हें श्लोक ३ । १ । ४ वरून व "कर्मसु चामृतं" ह्यावरून सिद्ध आहे. व्याससूत्रें ३ । ४ । २७–३९ ह्यांत निर्दिष्ट केलेलीं कर्मे म्हणजे प्राणधारणः -करणारी कर्में, आश्रमकर्मे, आणि शमदमादि हीं आवश्यकच आहेत.

मुंडक १ खंड २ श्लोक १२–१३

परीक्ष्य लोकान् कर्मचितान् ।
ब्राह्मणो निर्वेदमायान्नास्त्यकृतः कृतेन ॥
तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत् ।
समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम् ॥१२॥

तस्मै स विद्वानुपसन्नाय सम्यक्।
प्रशांतचित्ताय शमान्विताय ॥
येनाक्षरं पुरुषं वेद सत्यम्।
प्रोवाच तां तत्वतो ब्रह्मविद्याम् ॥१३॥

**अर्थः**—केवळ कर्मांनी प्राप्त होणाऱ्या [कर्मचितान्] लोकांची परीक्षा करून म्हणजे ते लोक विनाशी आहेत असें समजून घेऊन शहाण्या मनुष्याने [ब्राह्मणः] केवळ कर्मांनी प्राप्त होणाऱ्या लोकांविषयी विरक्त व्हावें [निर्वेदमायात्] कारण केवळ कर्मांनी मनुष्य कामरहित केव्हाच होणार नाही. म्हणजे कर्मांच्या वासनारूपी आणि दुःखरूपी फलांतून केव्हाच सुटणार नाही. म्हणून [तत्] ज्ञानाची म्हणजे कर्मांच्या वासनादुःखरूपी फलांतून ज्याने सुटेल त्या ज्ञानाची प्राप्ती करून घेण्याकरिता [विज्ञानार्थं] हातांत समिधा घेऊन मनुष्याने, ज्याने वेदांचें व इतर ग्रंथांचें अध्ययन केलें आहे [श्रोत्रिय] आणि जो ब्रह्मनिष्ठ आहे अशा गुरुजवळच जावें. ॥१२॥ योग्य रीतीने जवळ आलेल्या त्या शांतचित्त आणि शमयुक्त शिष्याला, जिने सत्य म्हणजे अविनाशी अक्षर पुरुषाचें ज्ञान होतें ती ब्रह्मविद्या तत्वतः सांगावी. ॥१३॥

**टिप्पणीः**—"ब्राह्मणः"—ब्राह्मण म्हणजे "ब्राह्मण वर्णाचा" असा अर्थ करूं नये; कारण ब्रह्मविद्या शिकण्याचा सर्वांनाच अधिकार आहे. "ब्राह्मण" म्हणजे ब्रह्मज्ञ असाहि अर्थ करूं नये, कारण त्याला ब्रह्म जाणून घे असें सांगावयाचें आहे. म्हणून ज्या अर्थी बुद्धि व शहाणपणा हें ब्राह्मणाचें मुख्य लक्षण आहे त्या अर्थी ब्राह्मण म्हणजे शहाणा मनुष्य. असा अर्थ करावा.

"श्रोत्रिय"—वेदादि ग्रंथांचें अध्ययन केल्यामुळे हुशार झाल्याने जो शंकांचें समाधान करण्यास समर्थ आहे तो.

"ब्रह्मनिष्ठ"—ज्ञानाप्रमाणें स्वतः वागून ब्रह्मानंदाचा स्वतः अनुभव घेणारा. असा अनुभव घेतल्याशिवाय शंकांचें समाधान करण्याचें पूर्ण सामर्थ्य येत नाही.

"समित्पाणिः"—समिधा ह्या शिष्यत्वबुद्धि व नम्रता ह्यांचें चिन्ह पूर्वी मानत असत म्हणून "समित्पाणि" असें म्हटलें आहे.

"प्रोवाच" हें रूप, भूतकालवाचक आहे तरी त्याचा भाव आज्ञार्थ आहे हें उघड आहे.

## मुंडक २, खंड १

मुंडक २, खंड १, श्लोक १–३

तदेतत्सत्यम् । यथा सुदीप्तात्पावकात्
विस्फुलिंगाः सहस्रशः प्रभवंते सरूपाः ।
यथाक्षराद्विविधाः सौम्यभावाः प्रजायंते
तत्रचैवापियंति ॥१॥

दिव्योह्यमूर्तः पुरुषः सबाह्याभ्यंतरो ह्यजः ।
अप्राणोह्यमनाः शुभ्रोह्यक्षरात्परतः परः ॥२॥

एतस्माज्जायते प्राणो मनः सर्वेंद्रियाणि च ।
खं वायुर्ज्योतिरापः पृथिवी विश्वस्यधारिणी ॥३॥

अर्थः—हें पुढे जें सांगितलें आहे तें अगदी खरें आहे. ज्याप्रमाणे चांगल्या रीतीने पेटलेल्या विस्तवांतून, त्यासारखेच [सरूपाः] हजारो विस्फुलिंग ( म्हणजे ठिणग्या ) उत्पन्न होतात, त्याप्रमाणेच हे बाळा, [सौम्य] त्या अक्षरापासून अनेक प्रकारच्या वस्तु उत्पन्न होतात आणि त्यांतच जाऊन मिळतात. ॥१॥ शरीरांत राहणारा तो आत्मा [पुरुषः स] अमूर्त म्हणजे आकाररहित, दिव्य म्हणजे अलौकिकगुणसंपन्न, कोणापासून न जन्मलेला [अजः] बाहेरहि असणारा आणि आंतहि असणारा

असा [ह्याभ्यंतरः] आहे. त्याला प्राण नाही, त्याला मन नाही. तो शुभ्र म्हणजे निष्कलंक आहे. तो अक्षर आहे म्हणजे त्यांतून कितीहि इतर भाव उत्पन्न झाले तरी तो क्षीण होत नाही. तो आंतमध्ये असलेल्या जीवाच्याहि आंतमध्ये आहे [परतः परः]. ॥२॥ ह्या आत्म्यापासूनच प्राण, मन, सर्व इंद्रियें, आकाश [खं], वायुः, तेज [ज्योतिः], पाणी [आपः] आणि सर्व विश्वाला धारण करणारी पृथ्वी उत्पन्न होतात. ॥३॥

टिप्पणी—पुरुषः—पुरि शरीरे शेते स पुरुषः। कठांत ३ । ११ मध्ये जो पुरुष सांगितला तोच येथेहि अभिप्रेत आहे.

"अक्षरात्परतः परः" हा भ्रष्ट पाठ आहे अशी खात्री वाटते. मूळ पाठ "अक्षरः परतः परः" असाच असला पाहिजे. कारण सध्याच्या पाठाप्रमाणे अक्षराच्याहि पलीकडे कांही आहे असा अर्थ होईल, पण तसें तर कांही नाही. म्हणून श्री शंकराचार्यांनी 'अक्षर' ह्याचा अर्थ "उपाधियुक्त अक्षर" असा केला आहे. "अक्षरा"चा अर्थ बदलविण्यापेक्षा पाठ भ्रष्ट झाला आहे असें मानणेंच अधिक योग्य आहे. "परतः परः" ह्याचा अर्थ, कठ ३ । ११ येथील वर्णनावरून चांगला समजेल.

विश्व—म्हणजे मनुष्यसमाज हा अर्थ मुंडक १।१।१, २।१।१० आणि २।१।४ येथेहि चांगला जुळतो. ह्या खंडात अव्याकृत ब्रह्म व त्यापासून झालेली जगाची उत्पत्ति वर्णिली आहे व पुढील खंडांत व्याकृत ब्रह्म म्हणजे जीव वर्णिला आहे हें लक्षांत ठेवावें.

मुंडक २, खंड १, श्लोक ४-९

अग्निर्मूर्धा चक्षुषी चंद्रसूर्यौ ।
दिशः श्रोत्रे वाग्विवृताश्च वेदाः ॥
वायुः प्राणो हृदयं विश्वमस्य ।
पद्भ्यां पृथिवी ह्येष सर्वभूतांतरात्मा ॥४॥

तस्मादग्निः समिधो यस्य सूर्यः ।
सोमात्पर्जन्य ओषधयः पृथिव्याम् ॥
पुमान् रेतः सिंचति योषितायाम् ।
बह्वीः प्रजाः पुरुषात्संप्रसूताः ॥५॥

तस्मादृचः साम यजूंषि दीक्षाः ।
यज्ञाश्च सर्वे क्रतवो दक्षिणाश्च ॥
संवत्सरश्च यजमानश्च लोकाः ।
सोमो यत्र पवते यत्र सूर्यः ॥६॥

तस्माच्च देवा बहुधा संप्रसूताः ।
साध्या मनुष्याः पशवो वयांसि ॥
प्राणापानौ व्रीहियवौ तपश्च ।
श्रद्धा सत्यं ब्रह्मचर्यं विधिश्च ॥७॥

सप्तप्राणाः प्रभवंति तस्मात् ।
सप्तार्चिषः समिधः सप्तहोमाः ॥
सप्त इमे लोकाः येषु चरंति प्राणाः ।
गुहाशया निहिताः सप्त सप्त ॥८॥

अतः समुद्रा गिरयश्च सर्वे ।
अस्मात्स्यंदते सिंधवः सर्वरूपाः ॥
अतश्च सर्वा ओषधयो रसश्च ।
येनैषभूतैस्तिष्ठते ह्यंतरात्मा ॥९॥

अर्थः—द्युलोक म्हणजे सारे जेथे असतात व जेथे चंद्र व सूर्य असतात तो प्रदेश [अग्नि] हा त्याचा मूर्धा होय. चंद्रसूर्य हे त्याचे डोळे होत. दिशा हा त्याचे कान होत. विस्तृत असे [विवृत]

जे वेद तेच त्याचें बोलणें होय. वायु म्हणजे वारा हा त्याचा श्वासोच्छ्वास [प्राणः] होय. मनुष्यसमाज [विश्व] हाच त्याचें हृदय-म्हणजे मन होय. पृथिवी हीच त्याचे पाय होत. सर्वभूतांतरात्मा हा असा आहे. ॥४॥ ज्यांत सूर्यरूपी समिधा पेटण्यास टाकली आहे तो अग्नि म्हणजे उष्णता त्या ब्रह्मापासून उत्पन्न झाली. त्या सूर्याच्या पेटण्यापासून सोम म्हणजे पाण्याची हवेंतील वाफ उत्पन्न झाली. सोमापासून पर्जन्य उत्पन्न झाला. त्या पर्जन्यापासून पृथिवीवर औषधि उत्पन्न झाल्या. त्या औषधीपासून मनुष्यांत रेत उत्पन्न झालें. तें रेत मनुष्य स्त्रियेंत टाकतो व त्यापासून प्रजा उत्पन्न होते. ह्याप्रमाणे त्या अक्षर पुरुषापासून म्हणजे ब्रह्मापासून पुष्कळ प्रजा उत्पन्न झाल्या. ॥५॥ ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, यज्ञकर्त्यानें पाळावयाचे नियम [दीक्षा], सर्व यज्ञ, सयूप यज्ञ [क्रतु], ऋत्विजांस द्यावयाच्या दक्षिणा, दक्षिणायन व उत्तरायण असे ज्याचे दोन भाग आहेत तो संवत्सर म्हणजेच यज्ञ करण्याचे विशिष्ट काळ, यजमान म्हणजे यज्ञ करणारा आणि लोक म्हणजे ज्या लोकाला चंद्र पवित्र करतो तो चंद्रलोक व ज्याला सूर्य पवित्र करतो तो सूर्यलोक म्हणजे अज्ञान्याला मिळणारी धूमादि गति आणि आत्मज्ञाला मिळणारी अर्चिरादि गति हे सर्व त्या ब्रह्मापासूनच उत्पन्न झाले. ॥६॥ सर्व प्रकारचे देव म्हणजे मनुष्य समाजांतील अधिकारी, साध्य नांवाचे देव, मनुष्य, पशु, पक्षी, प्राण आणि अपान म्हणजे श्वास आणि उच्छ्वास, व्रीही आणि यव म्हणजेच खावयाचें अन्न, तपः म्हणजे विषयसुखांचा त्याग, श्रद्धा म्हणजे आत्मा आनंदरूप आहे आणि सर्व भूतांमध्ये एकच आत्मा आहे ह्यावर दृढ विश्वास, सत्य म्हणजे सद्गुणांचें आचरण, वेदांचें अध्ययन [ब्रह्मचर्यम्] आणि वेदांतील आज्ञा [विधिः] हे सर्व त्यापासूनच उत्पन्न झाले. ॥७॥ सात प्राण म्हणजे (१) डोळे, (२) कान, (३) नाक, (४) रसनेंद्रिय, (५) त्वचा, (६) वागिंद्रिय आणि (७) मन हीं सात इंद्रियें, त्या

सात इंद्रियांच्या सात शक्ति [अर्चिषः], त्या सात इंद्रियांचे सात विषय [समिधः] त्या इंद्रियांचे त्यांच्या त्यांच्या विषयांशीं होणारे सात प्रकारचे संयोग [होमाः], हीं सात इंद्रियें ज्यांत राहून आपला व्यापार करतात तीं हीं शरीरांतील सात ठिकाणें [लोकाः] आणि प्रत्येक इंद्रियाचीं सात प्रमाणे सात इंद्रियांचीं एकोणपन्नास [सप्त सप्त] गुहेंत ठेवलेलीं व राहणारीं ज्ञानें [गुहाशयाः] हीं सर्व त्या ब्रह्मापासूनच उत्पन्न झालीं. ॥८॥ सर्व समुद्र आणि पर्वत त्यापासूनच झाले. सर्व प्रकारच्या [सर्वरूपा] नद्या [सिंधवः] त्यामुळेच वाहतात [स्यंदंते]. सर्व प्रकारच्या औषधि आणि त्यांतील रस त्यापासूनच उत्पन्न झाला आणि त्या रसाच्या साधनानेच हा अंतरात्मा सर्व भूतांच्या ठिकाणीं राहतो. (अन्नरसामुळेच अंतरात्मा सर्वभूतांच्या ठिकाणीं जीवरूपाने प्रगट होतो असा भाव आहे). ॥९॥

टिप्पणें—अग्निः—अग् कुटिलायां गतौ अशी एक धातु आहे. कुटिल गति म्हणजे वाटोळी गति. ह्या धातू पासून अग्नि म्हणजे वाटोळा फिरणारा म्हणजे द्युलोक असा शब्द होतो; कारण चंद्र, सूर्य, तारे जेथे राहतात तो द्युलोक एका दिवसांत एक वाटोळा पूर्ण फेरा करतो. चवथ्या श्लोकांतील "अग्नि"चा हा असा अर्थ आहे. पांचव्या श्लोकांतील "अग्नि"चा उष्णता देणारा किंवा उष्णता असाच मामुली अर्थ आहे.

"सोम" म्हणजे हवेंतील पाण्याची वाफ, असा अर्थ घेणें आवश्यकच आहे. कारण तीच सूर्याच्या उष्णतेपासून उत्पन्न होते आणि तिच्यापासूनच पर्जन्य उत्पन्न होतो. ह्या पांचव्या श्लोकांतील वर्णनासारखेंच वर्णन छांदोग्योपनिषदांत ५।४–८ येथे आहे तें पहा.

"लोकाः सोमो यत्र पवते यत्र सूर्यः" म्हणजे छांदोग्योपनिषदांत ४।१५ व ५।१० येथील वर्णनांत सांगितलेल्या धूमादि आणि अर्चिरादि

गति होत असें तेथील वर्णनावरून दिसतें. सूर्यलोक म्हणजे आत्मज्ञाची जागृति आणि चंद्रलोक म्हणजे अज्ञानी जागृति असाहि अर्थ असेल.

"सप्तप्राणाः"—बृहदारण्यकें ४।४।२ येथे जीं सात इंद्रियें सांगितलीं तींच हीं सात इंद्रियें होत. कारण हींच मुख्य इंद्रियें आहेत आणि हींच मृत्युकाळीं आत्म्याबरोबर जातात असें वर्णिलें आहे.

"गुहाशयाः निहिताः सप्त सप्त"—सात इंद्रियांचे जे सात विषय आहेत, त्या प्रत्येक विषयाचेहि सात प्रकार येथे मानले आहेत. डोळयाच्या विषयाचे सात प्रकार म्हणजे सात रंग प्रसिद्धच आहेत. कानाच्या विषयाचे सात प्रकार म्हणजे सात स्वर प्रसिद्धच आहेत. ह्याप्रमाणे वागिंद्रियाचेहि सात स्वर होतात. जिव्हाविषयाचे सहा रस मानतात पण; ह्या उपनिषत्काराने सात मानले असें दिसतें. मधुराचे साखरेसारखे मधुर व गव्हासारखे मधुर असे दोन प्रकार करतां येतात. ह्याप्रमाणे इतर इंद्रियांचें समजावें. गंधाचे सात प्रकार सात रसाला अनुरूप असे मानतां येतात. स्पर्शाचे अत्युष्ण, ऊष्ण, सम, शीत, अतिशीत, मृदु व कठीण असे सात प्रकार मानतां येतील. मनाचे विषय इच्छा, द्वेष, सुख, दुःख, संशय, निर्णय आणि श्रद्धा म्हणजे प्रमाणाशिवाय (a priori) मानलेल्या गोष्टी हे सात आहेत. किंवा श्री शंकराचार्यांप्रमाणे अर्थ करावा. गुहाशयाः हें "प्राणाः" ह्याचें विशेषण मानावें. "प्रत्येक प्राण्यांत सात सात ह्या प्रमाणे ठेवलेले गुहेंत म्हणजे शरीरांत राहणारे प्राण जेथे व्यापार करतात [चरंति] तीं ठिकाणें [लोकाः]" असा अर्थ तेह्या होईल. ह्या अर्थांत दिरुक्ति आहे. कारण "सप्त प्राणाः" हें पूर्वीं म्हटलेलें आहेच. शिवाय "गुहा" हा शब्दहि शरीरवाचक नाही, तो शरीरांतील खोल भागांना वाचक आहे, असें पुढच्याच श्लोकांत दिसतें. म्हणून आम्ही दुसरा अर्थ केला आहे.

मुंडक २, खंड १, श्लोक १०

पुरुष एवेदं विश्वं कर्म तपोब्रह्म परामृतम् ।
एतद्यो वेद निहितं गुहायाम्
सोऽविद्याग्रंथिं विकिरतीह सौम्य ॥१०॥

अर्थ—हा मनुष्यसमाज [विश्वं], त्यांत राहून केलें जाणारें सत्कर्म, तपः म्हणजे विषयानंदत्याग, वेदांमध्ये सांगितलेलें आत्मज्ञान [ब्रह्म] आणि त्यांमुळे अनुभवास येणारा परमानंद [परामृतम्] हे सर्व तो पुरुषच म्हणजे अक्षर ब्रह्मच होय. हें अक्षर ब्रह्मच आपल्या व इतर सर्वांच्या शरीराच्या अंतरस्थ भागांत म्हणजे स्वतःच्या आत्म्यांतच [गुहायां] ठेवलेलें आहे असें जो जाणतो, तोच हे बाळा, अविद्याग्रंथि म्हणजे अविद्यारूपी गांठ सोडण्यास समर्थ होतो [विकिरति]. ॥१०॥

टिप्पणी—"ब्रह्म" म्हणजे वेद असा अर्थ होतोच. त्यावरून लक्षणेने वेदांतील ज्ञान असा अर्थ घ्यावा. कारण कर्म आणि तपः ह्यांच्या पंक्तीमध्ये हाच अर्थ चांगला बसतो. "एतत्" म्हणजे, "तें अक्षर ब्रह्म" असा आम्ही अर्थ केला आहे. "परामृतम्" ह्याबद्दल तो शब्द घातला असेल असेंहि संभवतें. तसें मानल्यास द्वितीय श्लोकार्धाचा अर्थ "हा परमानंद आपल्या हृदयांतच आहे, बाहेरून कोठून येत नाही असें जो जाणतो तो अविद्याग्रंथि सोडण्यास समर्थ होतो" असा होईल. हाहि अर्थ चांगला आहे.

## मुंडक २, खंड २

मुंडक २, खंड २, श्लोक १

आविः संनिहितं गुहाचरन्नाम
महत्पदमत्रैतत्समर्पितम् ।

एजत्प्राणन्निमिषच्च यदेतज्जानथ सदसद्वरेण्यं
परं विज्ञानाद्यद्वरिष्ठं प्रजानाम् ॥१॥

**अर्थ**—ब्रह्माच्याच जवळ असणारे [संनिहितम्] गुहाचरन् नांवाचें [गुहाचरन्नाम] महत् हें पद म्हणजे पदवी ज्याला आहे असें हें आविष्कृत ब्रह्म [आविः] ह्या शरीरांत चांगल्या रीतीनें ठेवलेलें आहे. एजत् म्हणजे हालचाल म्हणजे क्रिया करणारें प्राणत् म्हणजे शरीरांतील प्राणक्रिया चालविणारें, निमिषित् म्हणजे डोळ्यांची उघडझाप करणारें म्हणजे आळीपाळीनें जागृति व निद्रा ह्यांचा अनुभव घेणारें, बुद्धीच्याहि आंत असलेलें [विज्ञानात्परम्] ब्रह्मापासून झालेल्या सर्व वस्तूंमध्ये श्रेष्ठ [प्रजानां वरिष्ठं] अनाविष्कृत आणि आविष्कृत ब्रह्म ह्या दोहोंमध्ये जें वरेण्य म्हणजे अधिक मोठें आहे [सदसद्वरेण्यम्] असें जें तें आहे तें जाणून घ्या [जानथ]. ॥१॥

**टिप्पणी**—मागील खंडांत अनाविष्कृत ब्रह्माचें "अप्राणः" "अमनाः" अशा प्रकारचें वर्णन करून त्यापासून सर्व जग कसें उत्पन्न झालें तें वर्णिलें. तेथील शेवटच्या श्लोकांत परमानंदहि ब्रह्मच आहे व तें ब्रह्म किंवा तो परमानंद गुहेंतच म्हणजे आत्म्यांतच आहे असें जाणल्यानें अविद्येचा नाश होतो असें सांगितलें आहे. तो परमानंद जाणून त्याचा अनुभव कसा घ्यावा हें ह्या द्वितीय मुंडकाच्या द्वितीय खंडांत सांगावयाचें आहे. जीवावस्थेंतच परमानंदाचा अनुभव घेतां येतो व परमानंदाचें ज्ञान होतें म्हणून प्रथमतः जीवावस्थेचें महत्त्व ह्या पहिल्या श्लोकांत वर्णिलें आहे. जीव म्हणजे प्रगट झालेलें [आविष्कृत] ब्रह्मच होय हें लक्षांत ठेवल्यास ह्या व पुढच्या श्लोकाचा अर्थ चांगला समजेल.

"आविः"—व्याकृत झालेलें, आविष्कृत झालेलें, प्रकट झालेलें.

संनिहितम्—कठांत ३।१०-११ मध्ये किंवा ६।७-८ मध्ये ज्यांची परंपरा दिली आहे त्या इंद्रियें, मन, बुद्धि, आणि महत् ह्यांमध्ये

महत् म्हणजेच जीव किंवा आविष्कृत ब्रह्म पुरुषाच्या म्हणजे अनाविष्कृत ब्रह्माच्या अगदी जवळ आहे म्हणून त्यास संनिहित हें विशेषण लावलें आहे.

महत्पदम्—कठांत ३।१०–११ आणि ६।७–८ जीवाला "महान्" म्हटलें आहे. म्हणून हें विशेषण योग्यच आहे.

"प्रजानां वरिष्ठं" म्हणजे "ब्रह्मापासून उत्पन्न झालेल्या वस्तूंमध्ये श्रेष्ठ" असा अर्थ स्पष्ट आहे. पण हें विशेषण आविष्कृत ब्रह्मास म्हणजे जीवासच लागूं शकतें अनाविष्कृत ब्रह्मास लागूं शकत नाही. म्हणून हें ह्या श्लोकांतील वर्णन जीवाचेंच आहे असें ठरतें व ह्या जीवासच जाणण्यास ह्या श्लोकांत सांगितलें व ह्या जीवाचीच उपासना करण्यास पुढच्या श्लोकांत सांगितलें असें ठरतें. पण हें श्री शंकराचार्यांस अनिष्ट वाटतें म्हणून त्यांनी "प्रजानाम्" ह्याचा संबंध "विज्ञानात्" ह्या शब्दाशीं जोडला आणि "प्रजानाम् विज्ञानात्परं वरिष्ठं च" असा अन्वय केला आणि "लोकांच्या ज्ञानाला अगम्य आणि श्रेष्ठ" असा अर्थ केला. परंतु "प्रजानां" ह्याचा संबंध "विज्ञानात्" ह्याशीं जोडणें चूक आहे. कारण त्या दोहोंमध्ये "वरिष्ठम्" हें पद आडवें आहे आणि "प्रजानाम्" ह्याचा संबंध जवळच्या "वरिष्ठं" ह्या पदाशीं जोडल्यानेहि अर्थ निष्पन्न होतो. श्री शंकराचार्य म्हणतात "परं व्यतिरिक्तं विज्ञानात्प्रजानामिति व्यवहितेन संबंधो यल्लौकिकविज्ञानागोचरमित्यर्थः" ह्यांत "प्रजानां" ह्याचा संबंध दूरच्या पदाशीं जोडला ही गोष्ट श्री शंकराचार्यांनी मान्य केली आहे. ज्याचा संबंध जवळच्या पदाशीं जुळूं शकतो त्याचा संबंध दूरच्या म्हणजे व्यवहित पदाशीं जोडणें चूक आहे. "लोकांच्या ज्ञानाला अगम्य" असा जो अर्थ श्री शंकराचार्य करतात तोहि योग्य नाही कारण "दृश्यते त्वग्र्यया बुद्ध्या" असें कठांत स्पष्टच सांगितलें आहे (कठ ३ । १२). लौकिक म्हणजे अशास्त्रीय असा त्यांचा अर्थ असेल तर तो "प्रजानाम् विज्ञानात्" ह्यांतून निष्पन्न नाही. "मनुष्याच्या ज्ञानाला म्हणजेच दुर्लभ

अगम्य" असाच अर्थ त्यांतून निघेल व तो अग्राह्य आहे. पुढील सातव्या श्लोकांत "मनोमयः" हें विशेषण आहे आणि पहिल्या खंडांतील दुसऱ्या श्लोकांत उलटें "अमनाः" हें विशेषण आहे. अर्थात् दोनहि ठिकाणचीं विशेष्यें एकच आहेत असें मानणें योग्य नाही, म्हणून पहिल्या खंडांत अनाविष्कृत ब्रह्माचें वर्णन आहे आणि दुसऱ्या खंडात आविष्कृत ब्रह्माचें म्हणजे जीवाचें वर्णन आहे असें मानूनच ह्या दुसऱ्या खंडांतील सर्व श्लोकांचे अर्थ लाविले पाहिजेत. ह्यास दुसरेंहि महत्त्वाचें प्रमाण पुढील सातव्या श्लोकांतच आहे. तेथील "यस्यैष महिमा भुवि" हें वर्णन अक्षर ब्रह्मास लागत नाही, जीवासच लागतें. कारण अक्षर ब्रह्माचा महिमा सर्वत्रच दिसतो, पृथ्वीवरच दिसतो असें नाही. फक्त पृथ्वीवरच जीवाचा महिमा घरें, पूल, शहरें, रस्ते, शेतें, ह्या रूपानें दिसतो.

जीवस्थितींतच आनंदाचा अनुभव येऊं शकतो म्हणून या खंडांत जीवोपासनाच सांगितली आहे व जीवाचेंच वर्णन केलें आहे असें मानलें पाहिजे. येथील वर्णन जीवाकडे सरळपणेंच लागतेंहि.

"सदसद्वरेण्य"—सदसतोः वरेण्यम् म्हणजे सत् व असत् ह्या दोहोंमध्ये वरेण्य (वरचढ). सदसत् म्हणजे व्याकृत व अव्याकृत असा अर्थ आहे असें तैत्तिरीयोपनिषद् २।७ ह्यावरून दिसतें. तेथेहि हेच शब्द आहेत व तेथे त्यांचा अव्याकृत ह्याहून दुसरा अर्थ करतांच येत नाही. श्री शंकराचार्यांनीहि तेथे तोच अर्थ केला आहे. तर मग येथे त्यांचा अर्थ स्थूलसूक्ष्म असा करणें अयोग्य आहे. कारण तेथे ते शब्द जसे ब्रह्माच्या वर्णनाकरिता योजले आहेत, तसेच येथेहि ते कोणत्या तरी प्रकारच्या ब्रह्माच्या वर्णनाकरिताच योजले आहेत. आता व्याकृत आणि अव्याकृत ह्या दोहोंमध्ये वरेण्य कोणतें ह्या प्रश्नाचें उत्तर व्याकृतच वरेण्य असेंच द्यावें लागेल. बी हें अव्याकृत रूप आणि त्यापासून उत्पन्न झालेलें फूल किंवा फळ हें व्याकृत रूप. ह्या दोहोंमध्ये फूल किंवा

फळ हेंच अधिक चांगलें वर्णन तें आहे. अर्थात् सदसद्वरेण्य हें व्याकृत ब्रह्माचें म्हणजे जीवाचेंच विशेषण होऊं शकतें. तैत्तिरीय उपनिषदांत २।७ येथेहि व्याकृतालाच सुकृत म्हणजे चांगला बनविलेला असें विशेषण लाविलें आहे, त्यावरूनहि व्याकृतच अधिक चांगलें असें तेथे दाखविलें गेलें आहे.

"गुहाचरत्" कठ ३।१०–११ येथें जी गुहा वर्णिली आहे तीच येथेहि निर्दिष्ट आहे.

"परं विज्ञानात्"—कठ ३।१०–११ येथील "बुद्धेरात्मा महान् परः" ह्यांत जो अर्थ आहे तोच "परं विज्ञानात्" ह्याचा आहे. "विज्ञान" हा शब्द "बुद्धि" ह्या अर्थानें कठ ३।५–९ येथे योजलेला आहेच.

"निमिषत्"--झोपेंत डोळे बंद होतात आणि जागृतींत उघडे असतात. त्यावरून "निमिषत्" ह्याचा अर्थ आळीपाळीनें निद्रा व जागृति अनुभवणारा असा होतो.

मुंडक २, खंड २, श्लोक २

यदर्चिमद्यदणुभ्योऽणु च ।
यस्मिन् लोका निहिता लोकिनश्च ॥
तदेतदक्षरं ब्रह्म स प्राणस्तदु वाङ्मनः ।
तदेतत्सत्यम् तदमृतं तद्वेद्धव्यम् सौम्य विद्धि ॥२॥

अर्थः—जो प्रकाशरूप आहे [अर्चिमत्] (कारण त्याच्या प्रकाशामुळेच सर्व जगानें भान होतें. "तस्य भासा सर्वमिदं विभाति" हें कठ ५। १५ येथील वचन पहा व मुंडकांतील २। २। १० पहा) जो लहानापेक्षाहि लहान आहे, आणि ज्यावर हे सर्व समाज [लोकाः] आणि त्यांतील व्यक्ति [लोकिनः] ठेवलेल्या आहेत म्हणजे अवलंबून

आहेत, (कारण पूर्णानंदयुक्त अशा ब्रह्मशाच्या कृतीमुळेच, "अथ य आत्मा स सेतुर्विधृतिरेषां लोकानामसंभेदाय" छां. ८।४ ह्यात सागितल्याप्रमाणे, समाज व त्यांतील व्यक्ति सुस्थितीत असतात.) तो हा जीव अक्षर ब्रह्मच म्हणजे अव्याकृत ब्रह्मच होय. तोच प्राण, तोच मन, होय. तो सत्य आहे, (खरा आहे, आभास नव्हे असा भाव) तोच आनंद आहे [अमृतम्] आणि तोच, हे बाळा, वेद्धव्य म्हणजे प्राप्तव्य आहे असें जाण. ॥२॥

टिप्पणी :—जीवस्थितींतच कोणतेंहि ज्ञान संभवतें. आनंदाचें ज्ञान व अर्थात् अनुभवहि जीवस्थितींतच असतो. म्हणूनच अर्चिमत् हें विशेषण जीवासच लागतें आणि म्हणूनच जीवाला येथें "अमृत" म्हणजे आनंद म्हटलें आहे आणि तोच प्राप्तव्य होय असें म्हटलें आहे. ह्याचा अर्थ आनंदपूर्ण जीवावस्था प्राप्तव्य आहे असा होतो. ती कशी मिळवावी तें पुढील श्लोकांत सांगितलें आहे.

मुंडक २, खंड २, श्लोक ३-४

धनुर्गृहीत्वौपनिषदं महास्त्रम् ।
शरं ह्युपासानिशितम् संधयीत ॥
आयम्य तद् भावगतेन चेतसा ।
लक्ष्यं तदेवाक्षरं सौम्य विद्धि ॥३॥

प्रणवो धनुः शरो ह्यात्मा
ब्रह्म तल्लक्ष्यमुच्यते ॥
अप्रमत्तेन वेद्धव्यम् ।
शरवत्तन्मयो भवेत् ॥४॥

अर्थः—उपनिषदामध्ये सांगितलेलें, मोठे बाण फेकणारें [महास्त्र] धनुष्य हातामध्ये धरून, उपासनेने घासून तीक्ष्ण केलेला

[उपासानिशितम्] बाण त्यावर ठेवावा. आणि भावनाकरणाच्या [भावगतेन] चित्ताने तें धनुष्य ओढून, हे बाळा, तेंच मागील दोन श्लोकांत वर्णिलेल्या त्याच [तदेव] आविष्कृत अक्षर ब्रह्माचा तूं वेध कर. ॥३॥

**टिप्पणी**—महास्त्र = मोठें अस्त्र, अस्यते अनेन तद् अस्त्रं.

"संधयीत"—हा भ्रष्ट पाठ आहे असें दिसतें. "संदधीत" असा शुद्ध पाठ घेऊन अर्थ करावा लागतो.

"विद्धि" हें विद् म्हणजे जाणणें ह्याचें रूप आहे. तथापि येथे त्याचा भावार्थ "वेध कर" असाच होईल.

**अर्थः**—प्रणव म्हणजे ॐ हें अक्षर हेंच धनुष्य आहे. आत्मा (म्हणजे बुद्धि) हा शर आहे आणि तें ब्रह्म हें लक्ष्य आहे असें म्हटलें जातें. चुकी न करतां [अप्रमत्तेन] त्याचा वेध करावा. शराप्रमाणे ब्रह्ममय व्हावें. ॥४॥

**टिप्पणी**—आत्मा म्हणजे बुद्धि, विचारशक्ति असाहि अर्थ आहे, आपटयांचा कोश पहा. वरील दोन श्लोकांचा शब्दार्थ फार सोपा आहे. पण त्याचा खरा भावार्थ चांगला समजवून घेणें जरूर आहे. कारण पुष्कळजण ह्याचा भावार्थ चित्तवृत्तिनिरोध समजून कठवल्ली ६ । १०–११ ह्यांत वर्णिलेला योग साध्य करून घ्यावा असें म्हणतात. पण तें चूक आहे. ह्या श्लोकांचा खरा भावार्थ समजण्यास पुढील गोष्टी लक्षांत आणल्या पाहिजेत. (१) तिसऱ्या श्लोकांत "लक्ष्यं तदेवाक्षरं" असें म्हटलें आहे आणि चवथ्या श्लोकांत "लक्ष्यं तत् ब्रह्म" असें म्हटलें आहे. "तदेव" आणि "तत्" म्हणजे श्लोक १ । २ मध्ये वर्णिलेलें आविष्कृत ब्रह्म म्हणजेच आनंदपूर्ण जीवात्मा असा अर्थ स्पष्ट आहे. (२) प्रणव हें धनुष्य आहे. प्रणव म्हणजे ॐ हें अक्षर. ॐ ह्याने उपासना करणें म्हणजे काय ? प्रश्नोपनिषत् पांचवा प्रश्न (५ । ५–७)

ह्यांतहि ॐच्या अ, उ आणि म् ह्या तीनहि मात्रांनें एकदम ध्यान केलें तर ब्रह्मलोकाची प्राप्ति होते व परम पुरिशय पुरुष दिसतो असें सांगितलें आहे. मांडुक्यांत अ म्हणजे जागृति, उ म्हणजे स्वप्न आणि म् म्हणजे निद्रा असें स्पष्ट सांगितलें आहे. (मांडुक्य ९-११ पहा). ह्यावरून तीनहि अवस्थांचा विचार करून जो सिद्धांत ठरतो तो मनांत दृढ ठेवून त्याप्रमाणे वागणें हेंच ॐचें ध्यान आणि हीच ब्रह्माची उपासना होय. ह्या तीन अवस्थांच्या विचाराने सिद्धांत कोणता ठरतो ? आत्मा अद्वैत आणि आनंदरूप आहे हा सिद्धांत ठरतो. आणि असेंहि ठरतें की आत्मा अद्वैत आणि आनंदरूप आहे; ह्याचें ज्ञान व ह्याचा अनुभव जागृतींतच होऊं शकतो. (प्रश्नोपनिषद् प्रश्न ५ वरील आमचें विवरण पहा.) (३) "शर आत्मा आहे" ह्यांतील "आत्मा" ह्याचा अर्थ काय ? जीवात्मा हाच जर लक्ष्य आहे तर जीवात्माच शर आहे हें म्हणणें असमंजस आहे. म्हणून आत्मा ह्याचा अर्थ बुद्धि असा घेतला पाहिजे आणि तसा अर्थ होऊंहि शकतो. "तद्विज्ञानेन परिपश्यंति" ह्या पुढील वचनांत "विज्ञान" म्हणजे बुद्धि हेंच साधन सांगितलें आहे. ह्या तीन गोष्टी लक्षांत ठेवल्यास ह्या दोन श्लोकांचा भावार्थ असा होतो की "जागृति, स्वप्न व निद्रा ह्या धनुष्यरुपी तीन अवस्थांत शररूपी बुद्धि लावून म्हणजे बुद्धीने ह्या तीन अवस्थांचा विचार करून, जीवावस्थेंतील म्हणजेच जागृतींतील पूर्णानंद येथावा, म्हणजे तो आनंद कसा मिळेल ह्याविषयीं सिद्धांत ठरवावा व त्या सिद्धांताप्रमाणें वागावें." ह्याचा अर्थ निर्बीज समाधि किंवा योग साधा असा होत नाही. बुद्धीने जागृतींतील आनंद मिळवा असाच खरा अर्थ होतो व तोच पुढील श्लोकांत स्पष्टपणें सांगितला आहे.

**मुंडक २, खंड २, श्लोक ५**

यस्मिन् द्यौः पृथिवी चांतरीक्षमोतं ।
मनः सह प्राणैश्च सर्वैः ॥

तमेवैकं जानथ आत्मानमन्या वाचो
विमुंचथामृतस्यैष सेतुः ॥५॥

**अर्थ**—आकाश, अंतरीक्ष, पृथिवी, मन आणि सर्व इंद्रियें [प्राणैः] ज्या सूत्ररूपी जीवात्म्यांत ओवलेलीं आहेत (असें म्हणण्याचें कारण जीवस्थितींतच तीं दिसतात व इतर वेळीं नसतात) त्या एका जीवात्म्यालाच जाणून घ्या. इतरविषयीं म्हणजे अनाविष्कृत ब्रह्माविषयीं बोलूं नका. कारण हा जीवात्माच परमानंदाचा [ अमृतस्य ] सेतु ( पूल ) आहे. ॥५॥

**टिप्पणें**—भावयुक्त आनंद जीवावस्थेंतच संभवतो. अनाविष्कृत ब्रह्मावस्थेंत म्हणजे निद्रावस्थेंत किंवा निर्बीजसमाधींत परमानंद असला तरी त्याचें तेव्हां भान किंवा ज्ञान नसतें म्हणून आणि निद्रा ही प्रत्येकास प्रयत्नाशिवाय प्राप्त होतेच; म्हणून त्या अनाविष्कृत ब्रह्माविषयीं बोलण्यापासून कांहीं फायदा नाहीं व बोलतांहि पण येणार नाहीं. कारण तें बहुतांशीं अज्ञेयच आहे. कठ वल्ली ३ । २ ह्यांतहि असेंच सांगितलें आहे. "यस्मिन् द्यौरंतरीक्षमोतम्" इत्यादि वचन जीवासच लागतें, अनाविष्कृत ब्रह्मास लागत नाहीं; कारण जीवस्थितींतच द्योः वगैरे दिसतात, अनाविष्कृत ब्रह्मस्थितींत तीं दिसत नाहीत.

मुंडक २, खंड २, श्लोक ६

अरा इव रथनाभौ संहता यत्र नाडयः ।
स एषोऽतश्चरते बहुधा जायमानः ॥
ॐ इत्येवं ध्यायथ आत्मानम् ।
स्वस्तिवः पराय तमसः परस्तात् ॥६॥

**अर्थः**—रथाच्या चाकाच्या नाभीच्या ठिकाणीं चाकाच्या आरा येऊन मिळतात, त्याप्रमाणेच नाडी जेथे येऊन मिळतात त्या आंतील

ठिकाणी [अंतः] अनेक प्रकारें प्रगट होत बहुधा [ जायमानः ] तो फिरतो त्या आत्म्याचा तो ॐ आहे म्हणजे जागृति, स्वप्न व निद्रा ह्या अवस्था धारण करणारा आहे हें लक्षात ठेवून [ॐ इत्येवं] विचार करा, अशाकरिता की त्या विचाराने तुम्ही अज्ञानदुःखरूपी अंधकाराच्या पैलतीरास जावें. तुमचें कल्याण असो. ॥६॥

टिप्पणी—"नाडी" ह्याचा अर्थ रक्तवाहिन्या किंवा कर्मतंतु व ज्ञानतंतु (nerves) असाहि करतां येईल. पहिला अर्थ केला तर हृदय म्हणजे छातींतील रक्ताभिसरणेंद्रिय असा अर्थ होईल. "नाडीचा" दुसरा अर्थ केला तर हृदय म्हणजे डोक्यातील मेंदु असा अर्थ होईल. आत्मा मेंदूत राहतो हेंहि ज्ञान तेव्हा झालें होतें असें तैत्तिरीयोपनिषत् १ । ६ ह्यावरून दिसतें. (तेथील आमचें विवरण पहा). कोणताहि अर्थ केला तरी श्लोकाचा भावार्थ तोच राहतो. त्यात बदल होत नाही.

पराय = पाराय = पैलतीरास जाण्याकरिता.

**मुंडक २, खंड २, श्लोक ७**

यः सर्वज्ञः सर्वविद् यस्यैष महिमा भुवि ।
दिव्ये ब्रह्मपुरे ह्येष व्योम्न्यात्मा प्रतिष्ठितः ॥
मनोमयः प्राणशरीरनेता ।
प्रतिष्ठितोऽन्ने हृदयं संनिधाय ॥
तद्विज्ञानेन परिपश्यन्ति धीराः ।
आनंदरूपममृतं यद्विभाति ॥७॥

**अर्थ**—जो सर्व ज्ञेय वस्तूंना जाणणारा आहे (ज्ञान जीवावस्थेंतच जागृतींतच संभवतें म्हणून असें म्हटलें आहे) व जो सर्व वस्तूंना मिळविणारा म्हणजे सर्व भोग्य वस्तूंचा उपभोग घेणारा आहे.

[सर्वविद्-विद् हें विन्दतिचें रूप मानावें], ज्यांचा महिमा म्हणजे मोठेपणा ह्या पृथ्वीवर [भुवि] त्याच्या बुद्धीने निर्माण केलेल्या कला-कौशल्यादि कृतीच्या रूपाने [एष] दिसून येतो, तो, ह्या दिव्य ब्रह्मपुरांत म्हणजे शरीरांत, अंतस्थ खोल भागांत [व्योम्नि] बसलेला आहे. (मनोमय, प्राण व शरीर ह्यास चालविणारा तो अन्नमय शरीरांत हृदय म्हणजे मेंदू ठेवून बसलेला आहे.) जो आनंदरूप आणि अविनाशी [अमृतम्] दिसतो [विभाति] त्याला शहाणे लोक बुद्धीने [विज्ञानानें] पाहतात. म्हणजे जीवात्मा आनंदरूप आणि अविनाशी आहे असें शहाणे बुद्धीने पाहतात. (बुद्धीने पाहणें म्हणजे जागृतींत पाहणें हें उघड आहे.)

टिप्पणी—"सर्वज्ञ, सर्वविद्"–निद्रेसारख्या अनाविष्कृत ब्रह्म-स्थितींत कोणतेंच ज्ञान किंवा उपभोग नसतो. ज्ञान किंवा उपभोग जीवावस्थेत जागृतींतच असतो, म्हणून जीवास सर्वज्ञ आणि सर्वविद् म्हटलें आहे. सर्वज्ञ म्हणजे सर्व विद्या जाणणारा व सर्वविद् म्हणजे म्हणजे सर्व वस्तू मिळविण्याची शक्ति ज्यांत आहे तो, असे अर्थ येथे नाहीत. ह्या अर्थाने ते शब्द ईश्वरास गौणार्थाने लावतां येतील. परंतु येथे "मनोमयः" आणि "यस्यैष महिमाभुवि" ह्या विशेषणांवरून हें जीवाचें वर्णन आहे हें निश्चित असल्यामुळे सर्वज्ञ आणि सर्वविद् ह्यांचे अर्थ निराळे करावे लागतात.

"यस्यैष महिमा भुवि"—जीवाने बुद्धीने ह्या पृथ्वीवर घरें, राजवाडे, शेतें, रस्ते, पूल, गाड्या, विमानें, कपडे, वगैरे निर्माण करून ठेवले आहेत, त्यावरून जीवाचा महिमा दिसून येतो व तो ह्या पृथ्वी-वरच दिसतो, आकाशांत नाही म्हणून हें विशेषण जीवालाच लागूं शकतें. श्री शंकराचार्यांनी "भुवि" म्हणजे "लोके" असा अर्थ केला आहे. तो चूक आहे. कारण भू, भुवर् स्वर असे तीन तरी लोक प्रसिद्ध आहेत व त्यांपैकी एकाचाच वाचक असा "भू" शब्द येथे योजला असतां तो सर्व लोकवाचक मानणें बरोबर नाही.

ब्रह्मपुर— ब्रह्म शरीरातच जीवरूपाने आविर्भूत होतें म्हणून त्यास ब्रह्मपुर म्हटलें आहे ऐतरेयोपनिषदातहि १।८ येथे त्यास ब्रह्मगिरि असें म्हटलें आहे. छांदोग्यात ८।१ येथेहि त्यास ब्रह्मपुर म्हटलें आहे व त्यातील "आकाशात" जीव राहतो असें म्हटलें आहे

मुंडक २ खंड २ श्लोक ८

भिद्यते हृदयग्रंथि छिद्यते सर्वसंशया ।
क्षीयते चास्यकर्माणि तस्मिन् दृष्टे परावरे ॥८॥

**अर्थ**—पर म्हणजे अत्यंत पलीकडचें व अवर म्हणजे अत्यंत अलीकडचें म्हणजे पर पुरुष आणि महत् म्हणजेच अनाविष्कृत ब्रह्म व आविष्कृत ब्रह्म म्हणजे जीव हीं दोनहि रूपें धारण करणाऱ्या [परावरे] त्या जीवाला मागील श्लोकात सांगितल्याप्रमाणे पाहिल असता म्हणजे तो आनंदरूप व अविनाशी आहे असें पाहिलें असता सर्व हृदयग्रंथींचा म्हणजे वासनांचा नाश होतो, सर्व संशयाचा म्हणजे जगात दिसणारें द्वैत खरें आहे या अज्ञानाचा नाश होतो, आणि त्याचीं सर्व कर्में क्षीण होतात म्हणजे त्याचीं कर्में वासनारूपीं फळें उत्पन्न करू शकत नाहीत किंवा (व्यासस्त्र ३।४।१६ "उपमर्दं च" ह्यात अर्थ केला त्याप्रमाणे) आवश्यक कर्तव्यकर्में कमी होतात म्हणजेच त्याला वेदामध्ये सांगितलेलीं यज्ञकर्में करण्याची गरज राहत नाही ॥८॥

**टिप्पणी**—परावरे–पर आणि अवर म्हणजे काय तें कठ ३।१०–११ ह्यावरून समजतें

मुंडक २ खंड २ श्लोक ९

हिरण्मये परेकोशे विरज ब्रह्म निष्कलम् ।
तच्छुभ्र ज्योतिषां ज्योति तद्यदात्म विदोविदु ॥९॥

**अर्थ**—आतमध्ये असलेल्या [परे] सोन्याप्रमाणे चकाकणाऱ्या कोशात म्हणजे डोक्यातील मेंदूत पापरहित (विरजम्) आणि ज्याला

कला म्हणजे भाग किंवा अंश नाहीत म्हणजे ज्याचे भाग पाडतां येत नाहीत असें ब्रह्म आहे. तें शुभ्र म्हणजे आनंदरूपी प्रकाशानें प्रकाशणारें आहे. आणि तें सर्व प्रकाशणाऱ्या वस्तूंना (ज्योतिषां) प्रकाशित करणारें आहे. म्हणजे प्रकाशणाऱ्या सूर्यचंद्रादि वस्तूंचें ज्ञान देखील त्यांच्या प्रकाशाशिवाय होत नाही असें तें आहे. आत्मवेत्ते ज्याला जाणतात तें हेंच जीवरूपी ब्रह्म होय. ॥९॥

टिप्पणी—हें वर्णन जीवात्म्याचेंच होय हें उघड आहे. कारण जीवाच्या जागृतावस्थेंतच सर्व वस्तूंवर जीवाचा प्रकाश पडतो तेव्हाच सर्व वस्तू दिसतात. पुढील श्लोकांत हेंच स्पष्टपणें सांगितलें आहे. शिवाय मेंदूंत राहतो असें जीवाविषयींच म्हणतां येतें, कारण अनाविष्कृत ब्रह्म सर्वत्रच आहे.

निष्कलम्—ह्या विशेषणाचा हेतु, एका शरीरांतील जीवात्मा दुसऱ्या शरीरांतील जीवात्म्याहून भिन्न नाही असें दाखविण्याचा आहे असें वाटतें. किंवा सर्व जगांत जेवढें ब्रह्म आहे तेवढेंच एका शरीरांतहि आहे हें दाखविण्याकरिता हा शब्द योजला असेल. मुंडक ३, खंड १, श्लोक ८ चा अर्थ व त्यावरील टिप्पणी पहा.

मुंडक २ खंड २ श्लोक १०

न तत्र सूर्यो भाति न चंद्रतारकं ।
नेमाविद्युतो भांतिकुतोऽयमग्निः ॥
तमेवभांतमनुभाति सर्वम् ।
तस्यभासा सर्वमिदं विभाति ॥१०॥

**अर्थ**—त्या जीवात्म्यावर [तत्र] सूर्य, चंद्र, तारे किंवा वीज प्रकाश पाडूं शकत नाहीं. मग हा अग्नि कोठून प्रकाश पाडील ? हा जीवात्माच जागृतींत प्रकाशतो तेव्हाच [अनु] ते सर्व प्रकाशतात. त्याच्याच प्रकाशामुळे ह्या जगांतील सर्व वस्तूंचें ज्ञान होतें.

**टिप्पणी**—शब्दश हाच श्लोक कठवल्ली ५।१५ मध्ये आहे पण सदर्भभिन्नत्वामुळे तेथे त्याचा अर्थ थोडा भिन्न आहे तेथे अनाविष्कृत ब्रह्मस्थितींतील परमसुख भासतें किंवा भासत नाही हें जाणता येत नाही ह्या सिद्धान्ताच्या पुष्ठ्यर्थ तो श्लोक दिला आहे येथे जीवात्म्याच बरोबर सर्व प्रकाशमान वस्तूंना प्रकाशविणारा आहे, हें मागील श्लोकातील विधान [ज्योतिषा ज्योति] पुष्टून देण्याकरिता, हा श्लोक दिला आहे

मुडक २ खड २ श्लोक ११

ब्रह्मैवेदममृतपुरस्तात् ।
ब्रह्मपश्चात् ब्रह्मदक्षिणतश्चोत्तरेण ॥
अधश्चोर्ध्वं च प्रसृतम् ।
ब्रह्मैवेद विश्वमिद वरिष्ठम् ॥११॥

**अर्थ**—हें जीवरूपी अविनाशी किंवा आनदरूप [अमृत] ब्रह्मच पूर्वेस, पश्चिमेस, दक्षिणेस, उत्तरेस, खाली आणि वर अशा सर्वहि दिशांकडे पसरलेलें आहे हें विश्व जीवरूपी वरिष्ठ ब्रह्मच होय ॥११॥

**टिप्पणी**—सर्व शरीरात एकच जीव आहे हा ह्या श्लोकाचा भाव आहे ह्याचा हेतु हाच आहे की स्वत शीं जसें आपण वागू तसच इतर सर्वांशीं वागावें

वरिष्ठ—"सदसद्वरेण्य" ह्याचा अर्थ तोच "वरिष्ठ" ह्याचा आहे जीवात्मरूपी ब्रह्मच अनाविष्कृत ब्रह्मापेक्षा वरिष्ठ आहे कारण जीवापर्यंतच सर्व वस्तूंचें विशेषत सुखाचें ज्ञान होतें

## मुंडक ३ खंड १

मुडक ३ खड १ श्लोक १–२

द्वा सुपर्णा सयुजा सखाया ।
समान वृक्ष परिषस्वजाते ॥

तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्ति ।
अनश्नन्नन्यो अभिचाकशीति ॥१॥
समाने वृक्षे पुरुषो निमग्नः ।
अनीशया शोचति मुह्यमानः ॥
जुष्टं यदा पश्यत्यन्यमीशम् ।
तस्य महिमानमिति वीतशोकः ॥२॥
यदा पश्यः पश्यते रुक्मवर्णम् ।
कर्तारमीशं पुरुषं ब्रह्मयोनिम् ॥
तदा विद्वान् पापपुण्ये विधूय ।
निरंजनः परमं साम्यमुपैति ॥३॥

**अर्थ**—ईश आणि जीव हे दोन, मित्र असलेले व नेहमी एकत्र राहणारे [सयुजा] पक्षी शरीररूपी एकाच [समानं] झाडावर बसले [परिषस्वजाते]. त्यांपैकी एक म्हणजे जीव हा पिप्पलाचीं गोड फळें खातो म्हणजे कर्मांपासून मिळणाऱ्या सुखांना अनुभव घेतो तथापि तो दुर्बलच आहे. दुसरा म्हणजे ईश तीं फळें खात नसूनहि बलवान् आहे [अभिचाकशीति]. ॥१॥ एकाच झाडावर असून देखील जीव दुर्बलत्वामुळे [अनीशया] बुडालेला [निमग्नः] मोह पावून शोक करतो. परंतु त्याच झाडावर बसलेल्या अर्थात् नेहमी जीवाबरोबर राहणाऱ्या [जुष्टम्] दुसऱ्याला म्हणजे ईशाला जेव्हा तो पाहातो, तेव्हा तो शोक टाकून देऊन त्या ईशाच्या मोठेपणाला प्राप्त होतो [इति = "एति" किंवा "अयति" आर्षप्रयोग]. ॥२॥ जेव्हा पाहणारा [पश्यः] जीव, सोन्याचा वर्ण म्हणजे आनंद हाच ज्याचा वर्ण म्हणजे तेज आहे, जो जगांत होणाऱ्या सर्व क्रिया करणारा आहे [कर्तारम्], जो ईश्वर म्हणजे सर्वांवर सत्ता चालविणारा आहे, जो सर्व जगाचें उत्पत्तिस्थान आहे [योनिम्], त्या सर्वांच्या शरीरांत राहणाऱ्या [पुरुषम्] ब्रह्माला

पाहतो, तेव्हां, तो शहाणा होऊन [ विद्वान् ] पाप व पुण्य या दोहोंचाहि त्याग करतो म्हणजे ह्या दोहोंपासून मुक्त होतो व निरंजन म्हणजे वासनारहित होऊन त्या ब्रह्माशीं अतिशय समानतेला प्राप्त होतो. ॥ [illegible] ॥

**टिप्पणें**—द्वा सुपर्णा इत्यादि = हीं आकारांत पदें येथे द्विवचनात आहेत. वेदामध्ये पुष्कळ ठिकाणीं कोणत्याहि विभक्तिप्रत्ययाऐवजी "डा" म्हणजे आ लागतो व त्याने शब्दाचा शेवटचा स्वर व त्यापुढील व्यंजन् गळतें. परिषस्वजाते = हें लिटाचें रूप आहे. धातु स्वञ्ज अभि-चाकशीति = हें चश् "गतिशासनयो." ह्या धातूचें यङ् प्रत्ययान्त रूप आहे पण त्याचा अर्थ काय याचा संशय आहे. भागवतकारानी "पश्येन् भूपान्" असा त्याचा अर्थ केला आहे (भा. ११।११।६-७) त्याला अनुसरूनच मी त्या शब्दाचा अर्थ येथे केला आहे. हा शब्द बृहदारण्यक ४।३।११ व श्वेताश्वतरोपनिषद् ३।५। येथेहि आला आहे. ह्या दोनहि ठिकाणीं "सामर्थ्य देणे" असा अर्थ जुळतो. सामर्थ्य देणारा स्वतः समर्थ असलाच पाहिजे म्हणून सामर्थ्यसंपन्न असणें असा अर्थ करता येतो "चश्" धातूचा "शासन" हा जो अर्थ आहे त्यात याचा अंतर्भाव होतोच. अनीशया—अनीशा म्हणजे दुर्बलता ऐतरेय १।२ मध्ये "नतस्मेईशे" येथे "ईशे" याचा अर्थ ह्या धारणान करावा लागतो.

जुष्टं—हा कर्तरि क्त मानावा लागतो म्हणजे जुष्ट याचा अर्थ "ज्ञानानें सेवन करणारा म्हणजे ज्ञानावर बसलेला" असा करावा लागतो

"इति" हे "इ" म्हणजे जाणें ह्या धातूचें आर्षरूप आम्ही मानलें आहे. व्याकरणशुद्ध रूप, "अभ्येति" किंवा "एति" असे होणें असें मानल्याने अन्वय करण्यांत अडचण रहात नाही. श्री शंकराचार्यांनी "अनेकैः योग मार्गैः कर्मभिश्च जुष्टं सेवितम् अन्यं ईशं अस्य महिमा-नम् यदा पश्यति तदा वीतशोकः भवति" असा अन्वय केला आहे. यांत "च" हा जास्त घालावा लागतो आणि "इति" हा शब्द निरर्थक पडून रहतो. त्यापेक्षा "इति" म्हणजे "अभ्येति" "एति" असें मानून

ह्या प्रश्नाचा विचार करण्यापासून कांही फायदा नाही व तो प्रश्न मनुष्यास सोडविणेंहि शक्य नाही. दुःखकारक अशा द्वैतावस्थेचा त्याग करून आनंददायक अशा अद्वैतप्रत्यय जीवावस्थेचें मनुष्याने सेवन करावें, हाच उपनिषदांचा भावार्थ आहे.

मुंडक ३ खंड १ श्लोक ४

प्राणो ह्येष यः सर्वभूतैर्विभाति ।
विजानन् विद्वान् भवते नातिवादी ।
आत्मक्रीड आत्मरतिः क्रियावान् ।
एष ब्रह्मविदां वरिष्ठः ॥४॥

अर्थ—सर्व भूतांच्याबरोबर [ सह ] म्हणजेच ठिकाणीं दिसणारा जो प्राण तो हें ब्रह्मच [एष] असें जाणणारा तो त्या भूतांशीं अतिवाद करणारा होत नाहीं. [अतिवादी न भवते] म्हणजे तो दुसऱ्या जीवाशीं फार झगडत नाही. सर्वभूत संरक्षणापुरतेंच झगडेल, जास्त झगडत नाहीं. (तो हिंसा शक्य तितकी कमी करतो असा भाव आहे.) तो आत्म्याशींच क्रीडा करतो म्हणजे विषयांशीं क्रीडा करीत नाही, म्हणजेच विषयानंद-त्याग करतो आणि आत्म्यांतच रममाण होतो म्हणजे आत्म्यांतच जो आनंद आहे त्याचें सेवन करतो. आणि चांगलीं कर्मे करतो [क्रियावान्] म्हणजे सर्वभूतांना सुखकर होतील अशीं कर्मे करतो. (विषयानंदाचा त्याग, आत्मानंदाचें सेवन, सत्कर्म आणि सर्वभूतांशीं वाद न करणें हेंच त्याचें ब्रह्माशीं परमसाम्य होय असा ह्या श्लोकाचा भावार्थ आहे.) हा असाच मनुष्य [एष] ब्रह्मवेत्यांमध्ये श्रेष्ठ होय. ॥४॥

टिप्पणी—मागील श्लोकांत सांगितल्याप्रमाणे जो ब्रह्माशीं परमसाम्य पावला तो कसा वागतो तें ह्या श्लोकांत सांगितलें आहे.

"नातिवादी" म्हणजे काय ?- उपसंहार प्यारा ७९ मध्ये ह्याचा विचार केलेला आहे. त्याचा सारांश असा; आत्मनाश झाल्याने शर

पुष्कळ जीवांचें रक्षण होत असेल तर "अवश्य आत्मनाश" करून घेईल, आत्मरक्षण झाल्याने पुष्कळ जीवांचें रक्षण होत असेल तरच आत्मरक्षणार्थ झगडेल ह्याप्रमाणे त्याच्या हातून हिंसा कमींतकमी होईल दधीचिऋषीने दुष्ट राक्षसाचा निःपात करण्याकरिता लागणारें वज्र बनविण्यास इंद्राला आपलीं हाडें दिलीं व त्याकरिता मृत्यु पत्करला ह्या एकाच उदाहरणा-वरून दुष्टाचा नाश करण्याकरिता झगडून आणि दुष्टापासून सज्जनांचें रक्षण करण्याकरिता आत्मनाशहि स्वीकारावा असें दिसून येतें हिंसा होईल तितकी कमी करावी हाच "नातिवादी" ह्याचा स्पष्टार्थ आहे

"क्रियावान्"—"बुद्धिमान्" म्हणजे चांगली बुद्धि ज्याची आहे तो, त्याप्रमाणे "क्रियावान्" म्हणजे चांगली क्रिया ज्याची आहे तो, अर्थात् सत्कर्म करणारा सत्कर्म म्हणजे सर्वभूतहित ज्याने होईल तें कर्म श्री शंकराचार्यांनी ज्ञान आणि कर्म ह्यांचा समुच्चय होऊं शकत नाही असें कारण देऊन, क्रियावान् ह्याचा ज्ञानध्यान-वैराग्यादि क्रियावान् असा अर्थ केला आहे पण तें चूक आहे हें उघडच आहे ज्ञानी कर्म करूच शकत नाही असें नाहीच श्लोक ३ मध्ये ईश्वरास "कर्तारम्" हें विशेषण लाविलें आहे "अमना" असून जर ईश्वर कर्म करतो तर वासनारहित असूनहि जीवास कर्म करण्यास कोणतीच हरकत नाही ज्ञानीहि मरेपर्यंत कर्म करूं शकतो ॥ श्री शंकराचार्यहि व्याससूत्र ४।१।१५ च्या भाष्यांत ज्ञानी देखील ज्ञानप्राप्तीनंतर कांहीं काळ पर्यंत म्हणजे आरब्धकार्य कर्म क्षीण होईपर्यंत जिवंत राहतो अर्थात् कर्म करतो असें म्हणतात अर्थात् तशा स्थितप्रज्ञांच्या ठिकाणीं ज्ञानकर्मसमुच्चय समजतो व त्याच स्थितप्रज्ञांचें ह्या श्लोकांत वर्णन आहे हें उघड आहे.

मुंडक ३ खंड १ श्लोक ५

सत्येन लभ्यस्तपसा ह्येष आत्मा।
सम्यग् ज्ञानेन ब्रह्मचर्येण नित्यम्॥

अंतःशरीरे ज्योतिर्मयोहि शुभ्रो ।
यं पश्यंति यतयः क्षीणदोषाः ॥५॥

अर्थ—हा आत्मा म्हणजेच मागील श्लोकांत वर्णिलेली पूर्णानंदरूपी अवस्था सत्याने आणि तपाने मिळते, म्हणजेच नेहमी [नित्यम्] खरें ज्ञान [सम्यग्ज्ञान] आणि ब्रह्मचर्य म्हणजे विषयानंदत्याग ह्यांचें आचरण केल्याने मिळते. हा आत्मा शरीरांतच असतो. (शरीराशिवाय हा पूर्णानंदरूपी आत्मा असूं शकत नाही हा भाव आहे) तो शुभ्र म्हणजे आनंदरूपी प्रकाशाने चमकणारा आहे आणि ज्योतिर्मय म्हणजे आपल्या प्रकाशाने दुसऱ्या वस्तूचें ज्ञान करून देणारा आहे. आणि प्रयत्न करणारे [यतयः] क्षीणदोष होऊन ह्याचें पाहतात. ॥५॥

टिप्पणी—आत्मा मिळविण्याची दोनच साधनें सत्य आणि तपस् हीं ह्या श्लोकाच्या पहिल्या पादांत सांगितलीं आहेत. व दुसऱ्या पादांत त्या साधनांचेंच स्पष्टीकरण केलें आहे. सत्य म्हणजे सम्यग् ज्ञान आणि तपस् म्हणजे ब्रह्मचर्य असें तें स्पष्टीकरण आहे. ह्याप्रमाणें दिसेल की आत्मप्राप्तीचीं सत्य, तपस्, सम्यग् ज्ञान आणि ब्रह्मचर्य अशीं चार साधनें येथे सांगितलीं नसून सत्य म्हणजे सम्यग्ज्ञान आणि तपस् म्हणजे ब्रह्मचर्य (विषयानंदत्याग) हीं दोनच साधनें येथे सांगितलीं आहेत.

मुंडक ३ खंड १ श्लोक ६

सत्यमेव जयति नानृतम् ।
सत्येनपंथा विततोदेवयानः ॥
येनाक्रमंत्यृषयो ह्याप्तकामाः ।
यत्रतत्सत्यस्य परमं निधानम् ॥६॥

अर्थ—सत्य म्हणजे खरें ज्ञानच त्या आत्म्याला मिळविते [जयति]. अनृत म्हणजे खोटें ज्ञान त्या आत्म्याला मिळवूं शकत नाही.

वासनारहित झाल्यामुळे जे प्राप्तकामच असतात [आप्तकाम] असे ऋषि ज्या देवयान पथाने, [येन] जेथें सत्याचा म्हणजे सम्यक् ज्ञानाचा परम विषय [निधानम्] म्हणजे ब्रह्म राहतें [यत्र] त्या ब्रह्मलोकीं जातात [आक्रमति] तो देवयान मार्गहि सत्यानेच घडविला [विततः] आहे म्हणजे सत्याने मरणापूर्वी पूर्णानदाची प्राप्ति होतेच शिवाय मरणानंतर त्यानेच देवयान पथानें ब्रह्मलोकींहि जातो म्हणजे जन्ममरणांपासून मुक्त होतो ॥६॥

टिप्पणी—आत्मानंदाच्या प्राप्तीचे सत्य आणि तपस् हे जे दोन उपाय मागील श्लोकात सांगितले, त्यापैकी सत्य म्हणजे सम्यग्ज्ञान हेंच जास्त महत्त्वाचें आहे (कारण त्यानेच तपस् म्हणजे विषयानन्दत्याग करण्याकडे प्रवृत्ति होते) म्हणून त्याचीच ह्या श्लोकात स्तुति केली आहे.

मुंडक ३ खंड १ श्लोक ७–९

बृहच्च तद्दिव्यमचिंत्यरूपं ।
सूक्ष्माच्च तत्सूक्ष्मतरं विभाति ॥
दूरात्सुदूरे तदिहांतिके च ।
पश्यत्स्विहैव निहितं गुहायाम् ॥७॥
न चक्षुषा गृह्यते नापि वाचा ।
नान्यैर्देवैस्तपसा कर्मणा वा ।
ज्ञानप्रसादेन विशुद्धसत्त्व ।
ततस्तु तं पश्यते निष्कलं ध्यायमानः ॥८॥
एषोऽणुरात्मा चेतसा वेदितव्यो ।
यस्मिन्प्राणः पंचधा संविवेश ॥
प्राणैश्चित्तं सर्वमोतं प्रजानाम् ।
यस्मिन् विशुद्धे विभवत्येष आत्मा ॥९॥

[अर्थ—सम्यग् ज्ञानाचा परमविषय जें ब्रह्म, तें मोठें आहे (कारण तें जगांत प्रत्येक ठिकाणीं आहे व जग मोठें आहे), तें ल्हानापेक्षाहि [सूक्ष्मात्] ल्हान [सूक्ष्म] आहे (कारण प्रत्येक ल्हान ल्हान अणूमध्येहि तें पूर्णपणें आपल्या सर्व धर्मांसह असतें), एकच वस्तू मोठी व ल्हानहि आहे अशी कल्पना मनास करतां येत नाही म्हणून तें अचिंत्यरूप आहे. तें अतिशय दूर आहे (कारण अज्ञ मनुष्य त्याला पोहोचूं म्हणजे जाणूं शकत नाही) तें येथे जवळच आहे (कारण तें मनुष्याच्या हृदयाच्या गुहेंतच आहे), तें दिव्य म्हणजे प्रकाशमान आहे (कारण त्याच्या प्रकाशानेच सर्व वस्तू दिसतात म्हणजे सर्व वस्तूंचें ज्ञान होतें), जेथे जीव त्याला पाहूं शकतात [पश्यत्सु जीवेषु] अशा ठिकाणीं येथेच म्हणजे या शरीरांतच तें ठेवलेलें आहे. ॥७॥ या शरीरांतच हें ब्रह्म ठेवलेलें आहे तथापि तें वक्षं डोळ्याला, वाणीला किंवा इतर कोणत्याहि देवांना म्हणजे इंद्रियांना ग्रहण करता येत नाहीं म्हणजे ज्ञात होत नाही. विषयभोगत्यागाने [तपसा], किंवा कर्मांनीहि तें ग्रहण केलें जात नाही. मनुष्य, जेव्हा, शुद्धबुद्धि [विशुद्धसत्त्वः] म्हणजे ऐंद्रिय-सुखाविषयी विरक्त होऊन सत्या सुखाचा शोध करणारा होतो तेव्हा विचार करून [ध्यायमानः] ज्ञानप्रकाशाने म्हणजे सम्यग्ज्ञानाने त्या विभागरहित [निष्कलं] ब्रह्माला पाहतो [पश्यते = पश्यति; आर्षप्रयोग] ॥८॥ हें ब्रह्म अणु म्हणजे सूक्ष्म असल्यामुळें एकाच देहांत तें पूर्णपणें राहूं शकतें म्हणूनच तें चित्ताला जाणता येतें. आणि चित्तहि सर्व जीवांना आहेच. कारण त्या ब्रह्मांत पांच प्रकारचा प्राण प्रविष्ट झाला व त्या प्राणाबरोबरच सर्व प्रकारचे परिपूर्ण [सर्वं] चित्त प्रजामध्ये ओवलें गेलें आणि तें शुद्ध झालें असतां म्हणजे द्वैतादिप्रमादरहित म्हणजे सर्व जीवांस अद्वैत बुद्धीने पाहूं लागलें असतां हा आत्मा मोठ्या वैभवास म्हणजे जीवन्मुक्तदशा प्राप्त होतो [विभवति] ॥९॥

टिप्पणी—सम्यग्ज्ञानाचा परम विषय जें ब्रह्म त्याचें वर्णन सातव्या श्लोकांत आहे. त्याचें ज्ञान कसें होतें तें आठव्या श्लोकांत वर्णिलें

त्याहे आणि नवव्या श्लोकांत त्या ब्रह्माचें ज्ञान प्रत्येक जीवास कां होतें त्याची उपपत्ति दिली आहे. ती अशी की प्राणावरोबर चित्त असतें व विचामुळें ज्ञान होतें. चित्त शुद्ध होऊन हें ज्ञान झालें असता मूळचें अनाविष्कृत ब्रह्म आविष्कृत होऊन मोठ्या वैभवास म्हणजे जीवन्मुक्तिपदास प्राप्त होतें असेंहि नवव्या श्लोकांच्या शेवटीं सांगितलें आहे.

निष्कल म्हणजे ज्याला कला म्हणजे विभाग नाहींत असें. हें विशेषण योजण्याचें कारण असें आहे की, ब्रह्म हें सर्व जगास व्यापून राहणारें असता जीवाला आपल्या एकट्याच्या हृदयांत पूर्णपणें कसें दिसेल अशी शंका येते, तिचें निवारण करणें जरूर आहे. तिचें निवारण असें; ब्रह्माला कला म्हणजे भाग नसल्यामुळें जेवढें ब्रह्म सर्व जगांत आहे तेवढेंच एका जीवाच्या हृदयांतहि आहे. म्हणून जीव त्याला पूर्णपणें पाहूं शकतो.

मुंडक ३ खंड १ श्लोक १०

यं यं लोकं मनसा संविभाति ।
विशुद्धसत्वः कामयते यांश्च कामान् ।
तं तं लोकं जयते तांश्च कामान् ।
तस्मादात्मज्ञं ह्यर्चयेद् भूतिकामः ॥१०॥

**अर्थ**—ज्या ज्या लोकांत म्हणजे मनुष्यसमाजांत आपल्याची तो वैभवास प्राप्त झालेला विशुद्धसत्व म्हणजे शुद्धबुद्धि म्हणजे सर्वत्र अद्वैत पाहणारा मनुष्य इच्छा करतो त्या त्या लोकांत तो जाऊं शकतो [जयते] आणि ज्या ज्या इच्छा तो करतो त्याच्या त्या त्या इच्छा पूर्ण होतात म्हणून स्वतःचें कल्याण व्हावें असें इच्छिणाऱ्या मनुष्यानें [भूतिकामः] अशा आत्मज्ञाची पूजा करावी. ॥१०॥

**टिप्पणः**—"लोक"—लोक म्हणजे मनुष्यसमाज असा जो अर्थ मी करतो त्याला कांहीं जण विरोध करतील. पण "लोक" शब्दाचा हा

अर्थ करून एकदर श्लोकाचा जो अर्थ मी करतों त्याच अर्थाचें वचन श्रीमद्भागवतांतहि आहे तें असें —।

नवाऽभवन्महाभागा मुनयो ह्यर्थशंसिन ।
श्रमणावातरशना आत्मविद्याविशारदा ॥२०॥

त एते भगवद्रूप विश्व सदसदात्मकम् ।
आत्मनो व्यतिरेकेण पश्यतो व्यचरन् महीं ॥२२॥

अव्याहतेष्टगतय सुरसिद्धसाध्य-।
गंधर्वयक्षनरकिंनर नागलोकान् ॥
मुक्ताश्चरति मुनिचारण भूतनाथ-
विद्याधरद्विजगवा भुवनानि कामम् ॥२३॥

स्कंध ११ अ २

विष्णोर्भूतानि लोकाना पावनाय चरंति हि ॥२८॥

स्कध १२ अ २

येथील "महीं" ह्या शब्दावरून "लोक" व "भुवनानि" हे पृथ्वीवरील मनुष्यसमाजच होत हें उघड आहे अशा कोणत्याहि समाजात जाण्यास त्या मुनींना त्या समाजांतील मनुष्य प्रतिबंध करीत नसत हें "अव्याहतेष्टगतय" या शब्दानें स्पष्ट केलें आहे व तेंच ह्या उपनिषदांत "जयते" ह्या शब्दानें सांगितलें आहे ह्याचें कारणहि भागवतांत दिलें आहे तें "विश्व आत्मनो व्यतिरेकेण पश्यत" हें आहे. येथेंहि तेंच "विशुद्धसत्त्व" ह्या शब्दानें सांगितलें आहे अशा समदृष्टि मनुष्यास कोणीच प्रतिबंध करीत नाही हा अनुभवच आहे कारण ते तरी सर्व लोकांना पावन करण्याकरिताच फिरतात हें भागवतांत सांगितलेलें चरित्र ह्या श्लोकांत सांगितलें आहे हें उघड आहे

विशुद्धसत्व म्हणजे अद्वैतनिष्ठ मनुष्यांसहि इच्छा कशा होतात अशी शंका घेण्याचें कारण नाही. अशा मनुष्यासहि स्वतःचें व इतरांचें प्राणधारण करण्यास आवश्यक तीं कर्में करण्याची इच्छा होतेच. शिवाय आपणांस जें ज्ञान व सुख झालें तें इतरांसहि प्राप्त करून द्यावें ही इच्छा त्यास होतेच. ह्या इच्छा अद्वैतबुद्धिमुळेच होतात आणि त्या पूर्ण करण्याकरतांच तो कर्में करीत असतो. आणि त्या इच्छा पूर्णहि होतात कारण इतर जीव त्यास त्या पूर्ण करण्यास मदतच करतात. हेंच ह्या श्लोकांत सांगितलें आहे. छांदोग्य ८।१-५। व त्यावरील आमचें विवरण पहा.

"विशुद्धसत्व" ह्याचा ह्या श्लोकांत आणि "विशुद्धचित्त" ह्याचा मागील नवव्या श्लोकांत आम्ही जो अर्थ घेतला आहे तो, आठव्या श्लोकांत "विशुद्धसत्व" याचा जो अर्थ केला आहे त्याहून भिन्न आहे. कारण ब्रह्मज्ञानाला आवश्यक तेवढीच शुद्धि आठव्या श्लोकांत अभिप्रेत आहे आणि नवव्या व दहाव्या श्लोकांत वैभवाला आवश्यक तेवढी शुद्धि अभिप्रेत आहे. अद्वैतनिष्ठेशिवाय वैभव प्राप्त होत नाही, हें उपनिषदाचें मत उघडच आहे.

पूजा करणें म्हणजे सत्कार करून संतुष्ट करणें व व उपदेश ऐकून त्याप्रमाणे वागणें.

## मुंडक ३ खंड २

**मुंडक ३ खंड २ श्लोक १**

स वेदैतत्परमं ब्रह्मधाम ।
यत्रविश्वं निहितं भाति शुभ्रम् ॥
उपासते (तं) पुरुषं ये ह्यकामाः ।
ते शुक्रमेतदतिवर्तंति धीराः ॥१॥

**अर्थ**—तो मागील खंडाच्या शेवटच्या श्लोकांत वर्णिलेला आत्मज्ञ [स] हें ब्रह्माचें श्रेष्ठ धाम म्हणजे अवस्था म्हणजेच अद्वैतज्ञाची जागृतावस्था जाणतो त्या अवस्थेंत जवळ ठेवलेलें [निहित] हें विश्व आनंदप्रद [शुभ्र] दिसतें ( बृहदारण्यक २।५ येथे हेंच सांगितलें आहे ) अशी ती अवस्था तो जाणतो म्हणून त्या आत्मज्ञ पुरुषाची [तं पुरुष] जे उपासना करतात ते ह्या शुक्राच्या म्हणजेच शुक्रजनित शरीराच्या पलीकडे जातात [अतिवर्तंति] म्हणजे अनेक प्रकारचीं दुःखें देणाऱ्या ह्या शरीरापासून त्यांना दुःख होत नाही (छांदोग्य ८।१२ येथेहि "अशरीर" ह्या शब्दाने अशीच कल्पना व्यक्त केली आहे) किंवा एकाच शरीराच्या पलीकडे जातात म्हणजे सर्वभूतांच्या शरीरांत आपणच आहोंत असें मानतात, सर्वभूतीं एकच आत्मा आहे असें पाहतात म्हणजे अद्वैत मानतात, आणि अकाम होतात ॥१॥

**टिप्पणी**—मागील खंडाच्या श्लोकांत ब्रह्मज्ञाची पूजा करावी असें सांगितलें ह्या श्लोकांत त्या पूजेचें फळ उपपत्तिसह सांगितलें आहे आत्मज्ञाची उपासना करतात म्हणून ते उपासकहि आत्मज्ञ होतात असा भावार्थ आहे श्लोकांत "पुरुष" ह्याच्या मागे "तं" हा शब्द घातल्यानेच श्लोकाचा अर्थ लागतो म्हणून तो शब्द घालून अर्थ केला आहे

**मुंडक ३ खंड २ श्लोक २**

कामान् यः कामयते मन्यमानः ।
स कामभिर्जायते तत्रतत्र ॥
पर्याप्तकामस्य कृतात्मनस्तु ।
इहैव सर्वे प्रविलीयन्ति कामाः ॥२॥

**अर्थ**—जो आदरपूर्वक [मन्यमान] म्हणजे आसक्तिपूर्वक कामाची इच्छा करतो, ( त्याचे काम कधीच नाहीसे होत नाहीत आणि ) त्या कामामुळेच तो त्या त्या योनींत [तत्र तत्र] म्हणजे कामोपभोगास अनुकूल अशा योनींत जन्म घेतो परंतु ज्याने आत्म्याचें यथार्थ ज्ञान

करून घेतलें आहे [कृतात्मनः] व त्यामुळें ज्याचें काम पर्याप्त म्हणजे सर्वभूतहित साधावें इत्यादि नियमांनी मर्यादित व त्यामुळे आसक्तिरहित असतात, त्यांचे काम येथेच म्हणजे मरणापूर्वीच नाहींसे होतात. ॥२॥

**टिप्पणें**—ब्रह्माची उपासना करणारा अकाम होतो असें मागील श्लोकांत म्हटलें आहे त्याची उपपत्ति ह्या श्लोकांत दिली आहे. ती उपपत्ति आम्ही उपसंहार प्यारे ४३–४५ येथे सविस्तर वर्णिली आहे ती पहा.

"पर्याप्त" हा शब्द भगवद्गीतेंत पहिल्या अध्यायांत "अपर्याप्तं तदस्माकम् बलं भीष्माभिरक्षितम् । पर्याप्तंत्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितम् ॥१०॥" ह्या श्लोकांत आलेला आहे. तेथे त्याचा अर्थ, मर्यादित, लहान, थोडें असा आहे, तसाच अर्थ येथेहि घेतला आहे.

"कृतात्मा" कृत म्हणजे ज्ञानाने संस्कृत आहे आत्मा ज्याचा तो.

**मुंडक ३ खंड २ श्लोक ३**

नायमात्मा प्रवचनेन लभ्यो ।
न मेधया न बहुना श्रुतेन ॥
यमेवैषवृणुते तेन लभ्यः ।
तस्यैष आत्मा विवृणुते तनुस्वाम् ॥३॥

**अर्थ**—कठ वल्ली २।२३ येथे हाच श्लोक आहे तेथे त्याचा अर्थ व टिप्पणें पहा. ह्याचा भावार्थ हाच आहे की ज्याला ईश्वराने श्रेष्ठ बुद्धि दिली असेल त्यालाच ती जीवन्मुक्तावस्था प्राप्त होते.

**मुंडक ३ खंड २ श्लोक ४**

नायमात्मा बलहीनेन लभ्यः ।
नच प्रमादात्तपसोवाप्यलिंगात् ॥
एतैरुपायैर्यतते यस्तु विद्वान् ।
तस्यैष आत्मा विशते ब्रह्मधाम ॥४॥

**अर्थ**—ज्याचें शरीर सुस्थितींत नाही [बलहीनेन] ज्यास सत्याचें ज्ञान झालेलें नाही [नच प्रमादात्] आणि जो स्वाश्रमकर्तव्याचरणासहित तप म्हणजे विषयभोगत्याग करीत नाही [तपसोवाप्यलिंगात्] त्याला हा आत्मा म्हणजे जीवन्मुक्तावस्था प्राप्त होत नाही. म्हणजे पूर्णानंदाचा अनुभव येत नाही. परंतु शहाणा मनुष्य, शरीर सुस्थिति; सत्यज्ञान, आणि स्वाश्रमकर्तव्याचरणासहित तप ह्या तीन उपायांनी [एतैरुपायैः] प्रयत्न करतो त्याचा हा आत्मा ब्रह्मधामांत म्हणजे ब्रह्माच्या श्रेष्ठ अवस्थेंत म्हणजे ब्राह्मी स्थितींत किंवा जीवन्मुक्तींत प्रवेश करतो. भगवद्गीता अ० २ श्लोक ७१।७२ ह्यांत जें सांगितलें तेंच येथेहि सांगितलें आहे. ॥४॥

**टिप्पणी**—"ब्रह्म धाम" शब्द येथे व मागील पहिल्या श्लोकांतहि आला आहे. त्याचा अर्थ भगवद्गीतेंत सांगितलेली ब्राह्मी स्थिति हें उघड आहे.

"लिंग" म्हणजे आश्रमचिन्ह म्हणजे त्या त्या आश्रमाचें कर्तव्य. "लिंग" म्हणजे संन्यासाश्रम असा अर्थ पूर्वीचे टीकाकार करतात. पण त्यामुळे असा अर्थ केला पाहिजे असें कांही कारण दिसत नाही. "लिंग" म्हणजे आश्रमचिन्ह हाच मूळ अर्थ आहे व त्यांत विशिष्ट आश्रम दाखविण्याचें सामर्थ्य नाही.

"प्रमाद" म्हणजे चूक, भ्रांति, असत्य ज्ञान, मुंडक १।१।६ मध्ये निर्दिष्ट केलेलें अनृत.

मुंडक ३ खंड २ श्लोक ५

संप्राप्यैनमृषयो ज्ञान तृप्ताः ।
कृतात्मानो वीतरागाः प्रशांताः ॥
ते सर्वगं सर्वतः प्राप्य धीराः ।
युक्तात्मानः सर्वमेवाविशंति ॥५॥

**अर्थ**—ह्या ब्राह्मी स्थितींत [एन] प्राप्त झालेले, ज्ञानतृप्त, कृतात्म, निष्काम प्रशांत आणि ज्यांचा आत्मा ब्रह्माशीं युक्त झाला [युक्तात्मान] असे शहाणे [धीराः] ऋषि, सर्वांच्या हृदयांत असलेल्या [सर्वग] ब्रह्माला सर्वत्र [सर्वत] प्राप्त होऊन म्हणजे पाहून सर्वांच्या हृदयांत प्रवेश करतात म्हणजे सर्वभूत आपण आहों असें मानतात ॥५॥

**टिप्पणी**—भगवद्गीता ६। २९ येथे जें सांगितलें आहे तेंच येथे दुसऱ्या शब्दांनी सांगितलें आहे

**मुडक ३ खड २ श्लोक ६**

वेदांतविज्ञानसुनिश्चितार्थाः ।
संन्यासयोगाद् यतयः शुद्धसत्त्वाः ॥
ते ब्रह्मलोकेषु परांतकाले ।
परामृताः परिमुच्यन्ति सर्वे ॥६॥

**अर्थ**—वेदांतामध्ये सांगितलेल्या ज्ञानाने ज्यांनी अर्थ म्हणजे खरें काय आहे ते सुनिश्चित करून टाकले आहे आणि ज्यांनी प्रयत्न करून [यतय] कामसन्यासाच्या योगाने म्हणजे साधनाने आपलें चित्त शुद्ध केलेलें आहे, ते सर्व मरणाच्या काळीं [परांतकाले] ब्रह्मलोकीं म्हणजे ब्राह्मीस्थितींत परम आनंदाचा अनुभव घेणारे [परामृता] होत्साते, जन्म मरणाच्या फेऱ्यांतून मुक्त होतात [परिमुच्यन्ति] ॥६॥

**टिप्पणी**—भगवद्गीता २। ७२ येथे जें सांगितलें आहे तेंच येथेहि सांगितलें आहे "संन्यास" म्हणजे कर्मसन्यास असा अर्थ न घेता कामसन्यास असाच अर्थ घेतला पाहिजे कारण मुडक ३। १। ४ येथील "क्रियावान" हा शब्द कर्मत्यागाच्या विरुद्ध आहे येथील श्लोक ४ येथील "बल" आणि "अलिंग" हे शब्दहि कर्मत्यागाला विरुद्धच आहेत

"ब्रह्मलोकेषु" येथील बहुवचनाचें कारण श्री शंकराचार्यांनी फार उत्तम दिलें आहे ते म्हणतात "साधकांना बहुत्वाद् ब्रह्मैव लोको

ब्रह्मलोक एकोपि अनेकवद् दृश्यते-प्राप्यते वा अतो बहुवचनं ब्रह्मलोकेष्विति, ब्रह्मणीत्यर्थः ॥

**मुंडक ३ खंड २ श्लोक ७**

गताः कला. पंचदश प्रतिष्ठाः ।
देवाश्च सर्वे प्रतिदेवतासु ॥
कर्माणि विज्ञानमयश्च आत्मा ।
परेऽव्यये सर्व एकीभवंति ॥७॥

**अर्थ**—ब्राह्मीस्थितींतील मनुष्य मरतो तेव्हां त्याच्या शरीरांतील प्राण वगैरे पंधरा कला, आपापल्या कारणामध्ये [प्रतिष्ठा] मिळून जातात आणि त्याची श्रोत्रादि इंद्रियें [देव] आपल्या दिगादि प्रतिदेवतामध्ये मिळून जातात. त्याचीं कर्मे आणि विज्ञानमय आत्मा म्हणजे जीवात्मादेखील सर्व पर म्हणजे श्रेष्ठ अव्यय ब्रह्मात जाऊन मिळतात म्हणून त्याचें शरीर पुनः बनत नाहीं अर्थात् तो पुनः जन्मत नाही.

**टिप्पणी**—मागील ६ व्या श्लोकांत जें सांगितलें त्याची उपपत्ति ह्या श्लोकांत दिली आहे.

**मुंडक ३ खंड २ श्लोक ८**

यथानद्य स्यंदमानाः समुद्रे ।
अस्तं गच्छंति नामरूपे विहाय ॥
तथा विद्वान् नामरूपाद्विमुक्त ।
परात्परं पुरुषमुपैति दिव्यम् ॥८॥

**अर्थ**—ज्याप्रमाणे वाहणाऱ्या नद्या आपलें नामरूप सोडून देऊन समुद्रात जाऊन अस्तास पावतात, त्याप्रमाणेच, ब्रह्मज्ञ [विद्वान्] आपल्या नामरूपापासून मुक्त होऊन, पर अशा जीवाच्याहि पर म्हणजे पलीकडे असलेल्या पुरुषाला म्हणजे "अनाविष्कृत" ब्रह्माला जाऊन मिळतो ॥८॥

टिप्पणी—ह्या व मागील श्लोकातील वर्णन प्रश्नोपनिषद् ६।१-५ ह्यातील वर्णनाशीं फारच जुळतें येथील पञ्चदशकला व विज्ञानात्मा मिळून सोळा व तेथीलं सोळा कला एकमेकाशीं जुळतात नदीसमुद्राची उपमा व योजलेले शब्द दोनहि ठिकाणीं एकच आहेत ह्यावरून प्रश्नोपनिषदानंतर मुंडक झालें ह्या सिद्धातास पुष्टीच येते.

ह्या श्लोकांत विदेहमुक्ति वर्णिली आहे ती जीवन्मुक्ताला मृत्यु काली मिळते असें सहाव्या श्लोकात सांगितलें त्यापूर्वीच्या श्लोकात जीवन्मुक्ति वर्णिली आहे

मुंडक ३ खंड २ श्लोक ९

स योह वैतत्परम ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति ।
नास्याब्रह्मवित् कुले भवति, तरति शोकम्
तरति पाप्मानं, गुहाग्रन्थिभ्यो विमुक्तोऽमृतो भवति ॥९॥

अर्थ—ह्याप्रमाणे जो तें परम ब्रह्म जाणतो, तो ब्रह्मच होतो त्याच्या कुलात अब्रह्मज्ञ उत्पन्न होत नाही, तो शोकाला आणि पापाला तरून जातो आणि गुहेंतील वासनारूपी ग्रंथीपासून मुक्त होऊन परमानंदाचा अनुभव घेणारा [अमृत] होतो

टिप्पणी—अमृत ह्याचा अर्थ "मरणरहित" असा घेताच येत नाहीं कारण शरीर मरतो हें श्लोक ६ मधील "परान्तकाले" ह्या शब्दावरून स्पष्ट आहे

मुंडक ३ खंड २ श्लोक १०

क्रियावन्त श्रोत्रिया ब्रह्मनिष्ठा ।
स्वयं जुह्वत एकर्षिं श्रद्धयन्त ।
तेषामेवैतां ब्रह्मविद्यां वदेत ।
शिरोव्रतं विधिवद् यैस्तु चीर्णम् ॥१०॥

अर्थ—ज्यांनी वेदांचें अध्ययन केलें आहे [श्रोत्रियाः] ब्रह्मज्ञानी होऊन त्या ज्ञानानुरूप वागण्याची ज्यांना निष्ठा म्हणजे पक्की आवड आहे [ब्रह्मनिष्ठाः] जे सत्कर्म करणारे आहेत [क्रियावंतः] मुख्य ऋषि जो प्राण [एकर्षि] त्याला स्वतः आहुति देणारे [स्वयं जुह्वतः] म्हणजे प्राणधारणार्थ स्वतःच मेहनत करणारे, म्हणजे संन्याशांप्रमाणे दुसऱ्यावर अवलंबून न राहणारे, ब्रह्मज्ञानाची उत्कट इच्छा ज्यांना आहे [श्रद्दधानाः], आणि ज्यांनी शिरोव्रताचें योग्य रीतीनें आचरण केलें आहे अशांनाच ही ब्रह्मविद्या सांगावी. ॥१०॥

टिप्पणी—"ब्रह्मनिष्ठः" हा शब्द मागेंहि मुंडक १।२।१२ येथे आला आहे. त्याचा तेथे जो अर्थ केला आहे त्याहून भिन्न अर्थ येथे करावा लागला आहे. कारण तेथे तो गुरूचें विशेषण आहे व येथे शिष्याचें विशेषण आहे.

"एकर्षि"—प्रश्नोपनिषदांत २।११ येथे मुख्य प्राणाला "एकर्षि" म्हटलें आहे म्हणून येथे एकर्षि म्हणजे "मुख्य प्राण" असा अर्थ केला आहे. श्री शंकराचार्यांनी "एकर्षि" म्हणजे अग्नि असा अर्थ केल्यामुळे त्यांना "स्वयं" या पदाचें स्वारस्य सांगतांच आलें नाहीं.

शिरोव्रतम्—"शिरसि अग्निधारण लक्षणं व्रतम् आथर्वणानां प्रसिद्धम्" असें म्हणजे डोक्यावर अग्निधारण करण्याचें अथर्व वेदांमध्ये सांगितलेलें व्रत असें सर्व टीकाकार म्हणतात. पण तें कोठे सांगितलें आहे त्याचा मला पत्ता लागला नाही. या व्रताला मनाचा फार पक्के-पणा किंवा बुद्धीचा प्रगल्भपणा लागत असला पाहिजे म्हणून तें व्रत हें शिष्याची परीक्षा पाहण्याची युक्ति होय असें दिसतें. किंवा शिरोव्रत म्हणजे शिरसि म्हणजे गुरूजवळून ऐकण्याच्यापूर्वी करावयाचें व्रत जें प्रश्नोपनिषदांत १।२ येथे सांगितलें तें म्हणजे ज्ञानाच्या उत्कट इच्छेने वेदांचा अभ्यास व स्वतंत्र विचार करणें. असेंच व्रत केल्याशिवाय गुरूने सांगितलेलें बरोबर समजणार नाही हें उघडच आहे आणि हेंच पुढील श्लोकांत सांगितलें आहे. म्हणून शिरोव्रत याचा खरा अर्थ हाच असावा.

**मुण्डक ३ खंड २ श्लोक ११**

तदेतत्सत्यमृषिरंगिराः पुरोवाच ।
नैतदचीर्णव्रतोऽधीते ।
नमः परमऋषिभ्यः ।
नमः परमऋषिभ्यः ॥११॥

**अर्थ**—हें तें सत्य असलेलें ज्ञान अंगिरा ऋषीनें पूर्वकाली सांगितलें. ज्यानें व्रताचें म्हणजे मागील श्लोकांतील शिरोव्रताचें आचरण केलें नाही त्याला तें ज्ञान समजूं शकत नाही [अधीते]. हें ब्रह्मज्ञान ज्या ऋषीपासून प्राप्त झालें त्या श्रेष्ठ ऋषींना नमस्कार असो, त्या श्रेष्ठ ऋषींना नमस्कार असो.

---

# प्रश्नोपनिषत्

**कर्ता व काल**—ह्या उपनिषदांत पिप्पलाद ऋषीने सहा शिष्यांस ज्ञान सांगितलें असें वर्णन आहे, यावरून हें उपनिषद पिप्पलाद ऋषीनें केलें असावें असें दिसतें. सहा शिष्यांपैकी एक 'वैदर्भिः' म्हणजे विदर्भ देशांतील भार्गव आहे. विदर्भ देश श्रीरामकालीन अगस्त्य-ऋषींच्या काळीं वसविला गेला. ह्यावरून हें उपनिषद् श्रीरामानंतरचें ठरतें. सहाव्या प्रश्नाच्या आरंभीं हिरण्यनाभ कौशल्य ह्या राजपुत्राचा निर्देश आहे. हा श्रीरामाचा दहावा वंशज होय. ह्यावरून हें उपनिषद् इ. स. पूर्वी १३८९ (१६०९-२२०) ह्यानंतर म्हणजे भारतीय युद्धा-पूर्वी १९२ वर्षें ह्यानंतर म्हणजे द्वापर युगांत झालें असें सिद्ध होतें. मुंडकोपनिषद्हि द्वापरयुगांत झालें असें मी दाखविलें आहेच. कठ आणि मुंडक ह्यांमध्ये ईश्वर आणि ब्रह्मजीव ह्यामधील फरक स्पष्ट मांडला आहे, तसा तो प्रश्नोपनिषदांत दिसत नाही म्हणून हें उपनिषद् कठमुंडकांपूर्वीचें असावें. प्रश्नानंतरचें कठ व कठानंतरचें मुंडक ठरतें. प्रश्न ६ वाक्य ७ वरील टिप्पण पहा.

**घटनेची योजना**—सहा शिष्यांनी सहा प्रश्न विचारले आहेत. त्यांची उत्तरें प्रश्न नांवाच्या सहा भागांत आहेत. शिष्यांनी केलेले प्रश्न फार मार्मिक आहेत व त्यांचीं उत्तरेंहि फार मार्मिक आहेत. प्राणाचें महत्त्व, उत्पत्ति व व्यापार, प्रश्न दोन व तीन मध्ये वर्णिले आहेत, त्यावरून प्राणोपासना हें एक मनुष्याचें कर्तव्य ठरतें. आणि प्रश्न चार व पांच मध्ये जागृति, स्वप्न व सुषुप्ति ह्या अवस्थांचा विचार आहे व

त्या विचारानेच ब्रह्मलोक मिळतो असें सांगितलें आहे, यावरून हा विचार करणें हें मनुष्याचें दुसरें कर्तव्य ठरतें. पहिल्या प्रश्नात प्रजोत्पत्ति वर्णिली आहे आणि सहाव्या प्रश्नात षोडशकल पुरुषाचें म्हणजे जीवाचें वर्णन करून तो ज्ञानी झाला असता मृत्यूनंतर पुन ब्रह्मात मिळून जातो असें सांगितलें आहे

## प्रश्न १

### प्रश्न १ वाक्यें १–३

ॐ सुकेशा च भारद्वाज शैब्यश्च सत्यकाम सौर्यायणी च गार्ग्य कौशल्यश्चाश्वलायनो भार्गवो वैदर्भि कबन्धी कात्यायनस्ते हैते ब्रह्मपरा ब्रह्मनिष्ठा पर ब्रह्मान्वेषमाणा एष ह वै तत्सर्वं वक्ष्यतीति ते ह समित्पाणयो भगवतं पिप्पलाद-मुपसन्ना ॥१॥ तान् स ऋषिरुवाच भूय एव तपसा ब्रह्म-चर्येण श्रद्धया सवत्सर वत्स्यथ यथाकाम प्रश्नान् पृच्छथ यदि विज्ञास्याम सर्वं ह वो वक्ष्याम इति ॥२॥ अथ कबन्धी कात्यायन उपेत्य पप्रच्छ। भगवन्! कुतो ह वा इमा प्रजा प्रजायन्ते इति ॥३॥

अर्थ —(१) सुकेशा भारद्वाज (२) शैब्य सत्यकाम (३) सौर्यायणी गार्ग्य (४) कौशल्य आश्वलायन (५) भार्गव वैदर्भि आणि (६) कबधी कात्यायन हे सहा जण वेदाचे अध्ययन करणारे [ब्रह्मपरा], नतर वेदाचे अध्ययन करता करता ब्रह्माचें ज्ञान करून घेऊन त्याप्रमाणे वागण्याची ज्याना पक्की आवड उत्पन्न झाली असे [ब्रह्मनिष्ठा] आणि त्यामुळे परब्रह्माचा शोध करणारे असे 'हा आपणास सर्व कांही सांगेल' अशा समजुतीने, हातात समिधा घेऊन भगवान् पिप्पलादाकडे गेले ॥१॥ तेव्हा त्यांना ते भगवान् पिप्पलाद ऋषि म्हणाले "तुम्ही

पुनः एकाग्रचित्ताने विचार करीत [तपसा], वेदांचें अध्ययन करीत [ब्रह्मचर्येण], ज्ञान मिळविण्याच्या उत्कट इच्छेने [श्रद्धया] एक संवत्सर घालवा [वत्स्यथ]. नंतर आपल्या इच्छेस येतील ते प्रश्न विचारा. आणि आम्हाला जर त्या प्रश्नांचीं उत्तरें माहीत असतील तर तीं सर्व आम्ही तुम्हांस सांगूं" ॥२॥ नंतर एक वर्ष झाल्यानंतर कबंधी कात्यायन पिप्पलादाजवळ जाऊन पुसता झाला, "हे भगवन्! ही प्रजा कोठून उत्पन्न होते ?" ॥३॥

टिप्पणें—"तपसा" तैत्तिरीयोपनिषदांत "तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व" असें वाक्य आहे, त्यावरून "तपस्" म्हणजे "विचार करणें" असा अर्थ ठरतो. कारण ब्रह्मज्ञान विचारानेंच होऊं शकतें.

"ब्रह्मचर्य" म्हणजे वेदाभ्यास हा अर्थ प्रसिद्धच आहे.

"यदि विज्ञास्यामः" ह्यावर श्रीशंकराचार्य असें भाष्य करतात की "अनुद्धतत्वप्रदर्शनार्थो यदि शब्दो नाज्ञान संशयार्थः। प्रश्ननिर्णयादवसीयते" (अर्थ—"यदि" शब्द जो घातला आहे तो ज्ञानाविषयी संशय आहे म्हणून घातला नसून अनुद्धतपणा म्हणजे विनय दाखविण्याकरिता घातला असें त्या प्रश्नांच्या निर्णयावरून म्हणजे उत्तरावरूनच ठरतें.) पण आम्हांस ह्या "यदि" चें कारण निराळेंच आहे असें वाटतें. प्रश्नोपनिषद् हें पहिलेंच उपनिषद् असल्यामुळे पिप्पलादास आपलें ज्ञान पूर्ण आहे किंवा नाही हा संशय असल्यामुळे त्याने "यदि" शब्दाची योजना केली आणि त्यामुळेच शेवटीं उपसंहारांतहि "एतावदेवाहमेतत्परं ब्रह्म वेद। नातःपरं अस्ति" म्हणजे "हें परब्रह्म मी एवढेंच जाणतों त्यापेक्षा जास्त (ज्ञान मला) नाही" असें म्हटलें आहे. पण पुढील उपनिषत्कारांस मागील प्रश्नोपनिषदाचा आधार असल्यामुळे त्यांना असें म्हणण्याची गरज वाटली नाही असें दिसतें. यावरून पिप्पलाद ऋषिच उपनिषद् संप्रदायास सुरुवात करणारा होय असें दिसतें.

एक वर्षपर्यंत ज्ञानाच्या उत्कट इच्छेने वेदाभ्यास व विचार करण्यास सांगितलें आहे तेंच मुंडक ३।२।१० येथे निर्दिष्ट केलेलें शिरोव्रत असावें. कारण हें व्रत करणाऱ्यालाच गुरूने सांगितलेलें ज्ञान समजूं शकतें. डोक्यावर अग्नि धारण करण्याने मनाचा पक्केपणा ठरेल. पण समजण्याची शक्ति वाढणार नाही. त्यास स्वतंत्र विचार आणि ग्रंथाभ्यासच पाहिजे. प्रश्नोपनिषद् आणि मुंडक हीं दोनहि अथर्व वेदाचींच उपनिषदें आहेत. त्यावरूनहि मुंडकांत निर्दिष्ट केलेलें शिरोव्रत प्रश्न १।२ येथीलच व्रत होय या अनुमानास पुष्टिच मिळते.

पृच्छय—हे लोट्चें (आज्ञार्थीचें) रूप आहे. मुंडक १।२।१ येथील "आचरथ" यावरील टिप्पण पहा.

प्रश्न १ वाक्य ४

तस्मै स होवाच । प्रजाकामो वै प्रजापतिः ।
तपोऽतप्यत स तपस्तप्त्वा स मिथुनमुत्पादयते । रयिं च
प्राणं चेत्येतौ मे बहुधा प्रजाः करिष्यत इति ॥४॥

अर्थः—त्या शिष्याला तो ऋषि उत्तर देता झाला. प्रजापतीला म्हणजे ब्रह्माला प्रजा असावी अशी इच्छा झाली. त्यामुळे त्याने तप केलें. त्याने तप करून एक मिथुन म्हणजे स्त्रीपुरुषांची जोडी उत्पन्न केली. त्या मिथुनाची नावें रयि आणि प्राण अशी आहेत. हे दोघे पुष्कळ प्रकारच्या [बहुधा] प्रजा उत्पन्न करतील अशा हेतूने तें मिथुन प्रजापतीने उत्पन्न केलें. ॥४॥

टिप्पणी—"तपः" मुंडक १।१।८ येथील "तपः" ह्यावरील टिप्पण पहा. त्यावरूनच दिसून येईल की-"प्रजाकामः" हा शब्द गौणार्थानें योजिला आहे.

रयि—मुंडक १।१।८ येथे ज्याला "अन्न" म्हटलें आहे तें म्हणजेच वायु, पाणी व माती, जुन्या मताप्रमाणे पंचमहाभूतें म्हणजे

जगातील वस्तु जीपासून बनविल्या गेल्या, ती सामुग्री किंवा जगाचें उपादान कारण

*प्राण*—रयिपासून वस्तू बनविणारी शक्ति=जगाचें निमित्त कारण मुंडक १।१।८ येथील "प्राण" किंवा दुसऱ्या प्रश्नातील "प्राण" हा म्हणजे जीवशक्ति, येथील प्राणाचाच एक विशिष्ट प्रकार होय

**प्रश्न १ वाक्य ५**

आदित्यो ह वै प्राणो रयिरेव चद्रमा । रयिर्वा एतत्सर्वं यन्मूर्तं चामूर्तं च । तस्मान्मूर्तिरेव रयि ॥५॥

**अर्थ**—चद्रमा हा रयि आहे आणि सूर्य म्हणजे लक्षणेने सूर्यप्रकाश हा प्राण आहे (कारण चद्र हा स्वत प्रकाशमान नाही सूर्यच त्या चद्राला प्रकाशशक्ति देतो) ह्या जगातील हे सर्व "मूर्त" म्हणजे ज्याना निश्चित आकार असतो असे घन व द्रव पदार्थ (जसें अनुक्रमें सोनें व पारा किंवा माती व पाणी) आणि "अमूर्त" म्हणजे ज्याना निश्चित आकार नसतो असे वायुरूप पदार्थ (जसे पाण्याची वाफ किंवा हवा) हे दोनहि रयिच होत म्हणून चद्र व सूर्य ह्यांची मूर्ति म्हणजे आकारच तेवढा रयि होय (त्यांचा प्रकाश हा "प्राण" होय असा भाव आहे)

**प्रश्न १ वाक्य ६**

अथादित्य उदयन् यत्प्राचीं दिशं प्रविशति तेन प्राच्यान् प्राणान् रश्मिषु सनिधत्ते । यद्दक्षिणा यत्प्रतीचीं यदुदीचीं यदधो यदूर्ध्वं यदन्तरा दिशो यत्सर्वं प्रकाशयति तेन सर्वान् प्राणान् रश्मिषु सनिधत्ते ॥६॥

**अर्थ**—आणि सूर्याचा प्रकाश प्राण आहे म्हणूनच [अथ] जेव्हा हा सूर्य उगवून [उदयन्] पूर्व दिशेत किरणरूपाने प्रवेश करतो तेव्हा

पूर्वेकडील प्राण्याचे प्राण आपल्या किरणात ठेवतो म्हणजे आपल्या किरणानी वाढवितो दक्षिणेत, पश्चिमेत, उत्तरेत, वर किंवा खाली आणि मधील दिशात जेव्हा सूर्य सर्वांना प्रकाशित करतो तेव्हा सर्वांचे प्राण आपल्या किरणात तो ठेवतो म्हणजे प्राण सूर्याच्या किरणापासूनच उत्पन्न होतात असा भाव आहे ॥६॥

प्रश्न १ वाक्य ७-८

स एष वैश्वानर विश्वरूप प्राणोऽग्निरुदयते ।
तदेतदृचाभ्युक्तम् ॥७॥
विश्वरूप हरिण जातवेदसं ।
परायण ज्योतिरेक तपतम् ॥
सहस्ररश्मि शतधा वर्तमान ।
प्राण प्रजानामुदयत्येष सूर्य ॥८॥

अर्थ—तो हा वैश्वानर म्हणजे सर्व विश्वाचा आत्मा, विश्वरूप म्हणजे ज्याने विश्व बनविले, जो सर्व जगाला प्राण देणारा [प्राण] आणि जो सर्व जगाला उष्णता देणारा आहे [अग्नि] तो सूर्य दररोज उदय पावतो हेंच पुढील ऋचेंत सांगितलें आहे ॥७॥ विश्वरूप म्हणजे विश्व बनविणारा, हरिण म्हणजे नेहमी हरिणाप्रमाणें फिरणारा, जातवेदस् म्हणजे उष्णता देणारा, सर्वांचा श्रेष्ठ आधार [परायण] असलेला एकच प्रकाश [ज्योति एक] अशा त्या तळपणाऱ्या [तपतम्] सूर्याला नमस्कार करा हा पहा, अनंत किरणें ज्याला आहेत [सहस्र रश्मि] असा अनंत प्रकारानी परिणत होणारा [शतधावर्तमान । कारण तो अनंत प्रकारच्या प्राण्याचा प्राण बनतो] प्रजाचा प्राणच असलेला हा सूर्य उदय पावत आहे ॥८॥

टिप्पणी—विश्वरूप—विश्व रूपयति म्हणजे विश्वरूपाला आणतो म्हणजेच बनवितो तो

"नमंत" अशा अर्थाचा शब्द श्लोकाच्या प्रथमार्धांत अध्याहृत घ्यावा लागतो. श्रीशंकराचार्यांनीहि "सूरयः आत्मनं विज्ञातवंतः" असा अध्याहार मानून अर्थ केला आहे. त्यापेक्षा आमचा अध्याहार लहान आहे आणि द्वितीयार्धाशीं अधिक चांगला जुळतो.

**प्रश्न १ वाक्यें ९-११**

संवत्सरो वै प्रजापतिस्तस्यायने दक्षिणं चोत्तरं च। तद्ये ह वै तदिष्टापूर्ते कृतमित्युपासते ते चांद्रमसमेव लोकमभिजयंते। त एव पुनरावर्तंते तस्मादेते ऋषयः प्रजाकामाः दक्षिणं प्रतिपद्यंते। एष ह वै रयिर्यः पितृयाणः ॥९॥ अथोत्तरेण। तपसा ब्रह्मचर्येण श्रद्धया विद्ययात्मानमन्विष्यादित्यमभिजयंते। एतद्वै प्राणानामायतनमेतदमृतमभयमेतत्। परायणमेतस्मान्न पुनरावर्तंत इत्येष निरोधस्तदेष श्लोकः ॥१०॥

पंचपादं पितरं द्वादशाकृतिम्।
दिव आहुः परे अर्धे पुरीषिणम्॥
अथेमे अन्य उ परे विचक्षणम्।
सप्तचक्रे षडर आहुरर्पितम्॥ इति ॥११॥

**अर्थ**—संवत्सर म्हणजे ऋतूंचा फेरा हाच प्रजापति म्हणजे प्रजा उत्पन्न करणारा आहे (कारण ऋतूंमुळेच पाऊस पडतो, पावसापासून धान्य व धान्यापासून प्रजा उत्पन्न होतात). त्या संवत्सराचे दक्षिणायन आणि उत्तरायण अशीं दोन अयनें म्हणजे मार्ग आहेत. जे लोक इष्ट म्हणजे यज्ञ करणें आणि पूर्त म्हणजे तळीं वगैरे वगैरे बांधणें हेंच आपलें कर्तव्य समजून [कृतमिति] तीं करतात [उपासते] ते चंद्रलोकांत जातात आणि तेच पुनः परत येतात. म्हणून प्रजा वाढविण्याची इच्छा करणारे ऋषि दक्षिणायनाचा आश्रय करतात [दक्षिणं प्रतिपद्यंते]. (आणि हा

रीतीने प्रजांची संख्या कायम राहते असा भाव आहे). हा पितृयाण म्हणजेच दक्षिणायन हा रयि आहे. (आणि उत्तरायण हा प्राण आहे) (कारण उत्तरायणांत सूर्य तापल्यामुळेच दक्षिणायनांत पाऊस पडतो व त्यापासून अन्न उत्पन्न होतें.) ॥९॥ आणि आता उत्तरायणाने काय होतें तें सांगतो [अथोत्तरेण]. तपाने, ब्रह्मचर्याने, श्रद्धेने म्हणजे उत्कट इच्छेने, ज्ञानाने [विद्यया] आत्म्याचा शोध करून म्हणजे आत्मानंद मिळवि- ल्यामुळे ते सूर्यलोकांत जातात. सूर्य लोक (म्हणजे जीवाची आत्मज्ञावस्था) प्राणांचें आयतन म्हणजे प्राणांचें रक्षण करणारा म्हणजे पूर्णायुष्य देणारा, पूर्ण आनंद देणारा [अमृतं], भय नाहीसें करणारा, आणि श्रेष्ठ आश्रयस्थान [परायणं] आहे. ह्या लोकांतून पुनः परत येत नाही. ह्या रीतीने प्रजांच्या संख्येचा निरोध होतो म्हणजे प्रजा कमी होते. त्या संबंधाने हा श्लोक आहे. ॥१०॥ द्वादशमासांनी ज्याची आकृति बनली आहे, पांच ऋतू हे ज्याचे पाय आहेत त्या सर्व प्रजांच्या पित्याला, तो आकाशाच्या [दिवः] दुसऱ्या भागांत [परे अर्धे] म्हणजे दक्षिणायनांत पुरीषी म्हणजे उत्सर्ग करणारा म्हणजे पाणी सोडणारा आहे असें हे [अथ इमे] म्हणतात आणि दुसरे [अन्ये] जास्त शहाणे लोक [परे] सहा ऋतु ज्याच्या चाकाच्या अरा आहेत आणि सात वार (रविवार, सोमवार वगैरे) ज्यांच्या चक्राचे घटक आहेत अशा रथावर बसलेल्या (अर्पितम्) त्याला विचक्षण म्हणजे शहाणा म्हणतात. म्हणजे तो कालमापनाच्या म्हणजेच कालज्ञानाच्या उपयोगी पडतो म्हणून त्यास शहाणा म्हणतात असा भाव आहे.

टिप्पणी—वर अगदी शब्दशः भाषांतर दिलें आहे. येथील चंद्र- लोक व सूर्यलोक हे मरणानंतर प्राप्त होणारे आहेत किंवा मरणापूर्वीच प्राप्त होणारे आहेत हा संशय उत्पन्न होतो. सूर्यलोकाला "प्राणानां आयतनम्" म्हणजे "प्राण कायम ठेवणारा" म्हटलें आहे, ह्यावरून ती मरणापूर्वीची अवस्था दिसते. अर्थात् चंद्रलोक ही

मरणापूर्वीची अवस्था ठरते „चद्रलोकात गेलेला दक्षिणायनात मरतो व पुन जन्मतो आणि सूर्यलोकास गेलेला उत्तरायणात मरतो व पुन जन्मत नाही असा ह्या वचनांचा भावार्थ असेल, आत्मज्ञ नेहमी विषयानदाचा त्याग करणारा असल्यामुळे त्याचें आयुष्य वाढतें म्हणून त्याच्या अवस्थेस प्राणाचें आयतन म्हणता येतें हेंहि उघड आहे ह्या सूर्यलोकालाच पुढे वाक्य १५ मध्ये ब्रह्मलोक म्हटलें आहे कारण दोनहि ठिकाणी साधनें तींच आहेत याच या प्रश्नातील ४-५ ह्या वाक्यांवरून ब्रह्मलोक आणि सोमलोक म्हणजेच चद्रलोक ह्या मरणापूर्वीच्याच अवस्था ठरतात आणि ब्रह्मलोक म्हणजे मरणापूर्वीचा सूर्यलोकच असें ठरतें

पचपाद्—ऋतु जरी सहा आहेत तरी कोणी हेमत व शिशिर ह्याचा एकच ऋतु मानून एकदर ऋतु पाचच मानतात "पच वा ऋतवो हेमतशिशिरयो समासेन" हें ऐतरेय ब्राह्मणात १ । १ येथे सांगितलें आहे ।

"सप्तचक्रे" ह्यातील सप्त हे सात वारच असले पाहिजेत कारण वारच कालज्ञानाच्या उपयोगी पडतात सप्त हे सूर्यरथाचे सात घोडे होत असें कोणी म्हणतात, पण रथाने घोडे असल्यामुळे त्याचा चाकाशीं सबध येत नाही आणि येथे तर सातांचा चक्राशीं सबध पाहिजे, तो वारानीच होईल सात वार तेव्हा माहीत होतेच (Astronomical method and its application to chronology of Ancient India, Paragraphs 44-306-298 note पहा) शिवाय घोडे तरी सात का हा प्रश्न येतोच हे घोडेहि वारच होत असेंहि म्हणता येतें

"पुरीषिण" येथे "पदषिण" असाहि पाठ आहे "पदष" किंवा 'पुरीष' ह्या दोन्हींचा अर्थ उदक आहे असें टीकाकार म्हणतात निघटुमध्ये उदकाच्या नामामध्ये "पुरीष" हा शब्द आहेच

प्रश्न १ वाक्य १२

मासो वै प्रजापति तस्य कृष्णपक्ष एव रयि शुक्ल प्राण । तस्मादेते ऋपय शुक्ल इष्टिं कुर्वंति इतरे इतरस्मिन् ॥१२॥

अर्थ—मास हाच प्रजापति होय त्याचा कृष्णपक्ष हा रयि आणि शुक्लपक्ष हा प्राण होय म्हणून हे ऋषि (जे शहाणे आहेत ते) शुक्लपक्षात इष्टि करतात. दुसरे ऋषि (जे मूर्ख आहेत ते) कृष्णपक्षात इष्टि करतात

टिप्पणी—शब्दश हा अर्थ सुबोधच आहे पण ह्याची उपपत्ति समजूनच घतली पाहिजे चद्राच्या किरणानी औषधींची वाढ फोफावते म्हणून चद्रास औषधीश म्हणतात ह्यावरून मासास प्रजापति का म्हटलें ह्याची उपपत्ति लागते चद्रकिरणाची शुक्लपक्षात वाढ होते म्हणून तो प्राण व कृष्णपक्षात किरणाचा क्षय होतो म्हणून तो रयि हें उघडच आहे

प्रश्न १ वाक्य १३

अहोरात्रो वै प्रजापतिस्तस्याहरेव प्राणो रात्रिरेव रयि प्राण वा एते प्रस्कदति ये दिवा रत्या सयुज्यते ब्रह्मचर्यमेव तद् यद्रात्रौ रत्या सयुज्यते ॥१३॥

अर्थ—अहोरात्र हा प्रजापति होय दिवस हा त्याचा प्राण आणि रात्रि ही रयि म्हणून जे कोणी दिवसा मैथुन करतात (रत्या सयुज्यते) ते आपल्या प्राणाचाच नाश करतात, परतु जे रात्रीस मैथुन करतात तें त्याचें ब्रह्मचर्यच होय, म्हणजे तें मैथुन न करण्यासारखेंच होय ॥१३॥

टिप्पणी—दिवसा सूर्याचे किरण मिळतील तरच वनस्पति वाढतात, हें झाडाच्या खाली सावलींत वनस्पति वाढत नाहींत ह्या

अनुभवावरून स्पष्ट दिसतें. म्हणून अहोरात्र हा प्रजापति, दिवस हा प्राण आणि रात्र ही रयि हें उघड आहे.

**प्रश्न १ वाक्य १४**

अन्नं वै प्रजापतिस्ततो ह वै तद्रेतस्तस्मादिमाः प्रजाः प्रजायन्त इति ॥१४॥

**अर्थ.**—अन्न हेंहि प्रजापतिच आहे कारण त्यापासून रेत उत्पन्न होतें आणि त्या रेतापासून प्रजा उत्पन्न होतात. ॥१४॥

*मागील सर्व वाक्यांचा अर्थ एवढाच आहे की प्रजापतीपासूनच प्राण व रयि, सूर्य चंद्र उत्पन्न झाले. सूर्याच्या गतीमुळे दोन अयनें व अहोरात्र उत्पन्न झाले. त्यामुळे पाऊस व वनस्पति उत्पन्न झाल्या. वनस्पतींपासून रेत व रेतापासून प्रजा उत्पन्न झाल्या.*

**प्रश्न १ वाक्यें १५–१६**

तद्ये ह वै तत्प्रजापतिव्रतं चरन्ति ते मिथुनमुत्पादयन्ते । तेषामेवैष ब्रह्मलोको येषां तपो ब्रह्मचर्यं येषु सत्यं प्रतिष्ठितम् ॥१५॥ तेषामसौ विरजो ब्रह्मलोको न येषु जिह्ममनृतं न माया चेति ॥१६॥

**अर्थ**—म्हणून जे प्रजापतिव्रताचें आचरण करतात (म्हणजे भार्यागमन करतात) ते मुलगे व मुली [मिथुन] उत्पन्न करतात (त्यांना एवढेंच फळ मिळतें. त्यांना ब्रह्मलोक मिळत नाहीं कारण) ज्यांच्या ठिकाणीं तप, ब्रह्मचर्य, आणि सत्य म्हणजे विद्या म्हणजे आत्मज्ञान असतें त्यांनाच हा ब्रह्मलोक म्हणजे मागील दहाव्या वाक्यांत वर्णिलेला सूर्यलोक मिळतो ॥१५॥ सर्वभूतीं एकच आत्मा आहे व तो आनंदरूप आहे असें ज्ञान झाल्यामुळे ज्यांच्या ठिकाणीं जिह्म म्हणजे वाकडेपणा म्हणजेच विषयानंदसेवन, अनृत म्हणजेच अज्ञान आणि

माया म्हणजे कपट म्हणजे दुसऱ्यास फसविणें ह्या गोष्टी नाहीत त्यालाच हा विरज म्हणजे दुःखरहित असा ब्रह्मलोक मिळतो. ॥ १६ ॥

टिप्पणें--ह्या वाक्यांचा आमचा अर्थ श्रीशंकराचार्यांच्या अर्थाहून फारच भिन्न आहे. त्यांनी पंधराव्या वाक्यांतील ब्रह्मलोक ह्याचा अर्थ चंद्रलोक असा केला आहे, पण तो बरोबर नाही. कारण येथें जीं ब्रह्मलोकप्राप्तीचीं साधनें सांगितलीं आहेत तींच म्हणजे तपः, ब्रह्मचर्य आणि सत्य म्हणजे विद्या हींच दहाव्या वाक्यांत आदित्यलोकप्राप्तीचीं साधनें सांगितलीं आहेत; ह्यावरून येथील ब्रह्मलोक आणि तेथील आदित्यलोक एकच असें निश्चितपणें ठरतें. "एष" हें जें विशेषण आहे त्याचा अर्थहि अगदी जवळच म्हणजे दहाव्या वाक्यांत वर्णिलेला असा होतो; दूरच्या नवव्या वाक्यांत वर्णिलेला असा होणार नाही. कोणी असा आक्षेप घेतील की पंधराव्या व सोळाव्या ह्या दोनहि वाक्यांत एकच लोक वर्णिला आहे असें म्हणतां येत नाही, कारण पंधराव्या वाक्यांत "एष" म्हणजे "हा" असें विशेषण आहे आणि सोळाव्या वाक्यांत "असौ" म्हणजे "तो" असें विशेषण आहे आणि शिवाय एकच लोक दोनदां वर्णण्याची गरज नव्हती. ह्या आक्षेपाचें उत्तर असें—"असौ" ह्याचा "तो" असा अर्थ आहे तथापि कधी कधी "हा" ह्या अर्थानेंहि त्याचा उपयोग करतात. आपट्यांचा कोश पहा. आणि "अमुं पुरः पश्यसि देवदारुं" हें रघुवंशांतील उदाहरण पहा. शिवाय ब्रह्मलोकाचें दोनदां वर्णन करण्याची गरज ग्रंथकारास वाटलीच, कारण पंधराव्या वाक्यांत ब्रह्मलोकप्राप्तीस कोणत्या गोष्टी पाहिजेत तें सांगितल्यानें त्याचें समाधान झालें नाही म्हणून ब्रह्मलोकप्राप्तीकरिता कोणत्या गोष्टी टाळल्या पाहिजेत तेंहि त्यानें सोळाव्या वाक्यांत सांगितलें. पंधराव्या वाक्यांतील ब्रह्मलोक म्हणजे दहाव्या वाक्यांतील आदित्यलोकच हें जें साधनैक्यावरून निश्चितपणें ठरतें त्यामुळेंहि हा आक्षेप टिकूं शकत नाही आणि पंधराव्या वाक्यांतील ब्रह्मलोक ह्याचा

अर्थ चंद्रलोक असा करताच येत नाही साधनभिन्नत्वामुळे पधराव्या वाक्यातील ब्रह्मलोक सोळाव्या वाक्यातील ब्रह्मलोकाहून भिन्न आहे असेंहि म्हणता येत नाही, कारण सोळाव्यातील टाळावयाच्या गोष्टी पधराव्यातील साधनाच्या केवळ उलट्या आहेत, भिन्न नाहीत मुडकाल ३ । ५–६ येथे "अनृत" हें "सत्याच्या" सम्यग्ज्ञानच्या उलटें मानलें आहे तसेंच येथे आहे. ब्रह्मचर्य म्हणजे ब्रह्माप्रमाणे सर्व जीवाच्या ठिकाणीं समदृष्टी ठेऊन वागणें त्याच्या उलट "माया" ही आहे आणि "तप" म्हणजे विषयानदत्याग त्याच्या उलट "जिह्म" म्हणजे वाकडें जाणें म्हणनेच कठ ५।१ यात म्हटल्याप्रमाणे वक्र जाणें किंवा कठ ४ । १–२ ह्यात म्हटल्याप्रमाण पराङ् जाणें म्हणजे विषयानदाचें सेवन करणें हें आहे पधराव्या वाक्यातील ब्रह्मलोक ह्या नयावातील चंद्रलोक नःहेच हे साधनभिन्नत्वावरूनहि सिद्ध आहेच प्रश्न ५ वाक्य ५ येथे "'सूर्ये सपन्न ' उन्नीयते ब्रह्मलोक" असें म्हटलें आहे ह्यावरून आदित्यलोकीं गेलेला ब्रह्मलोकीं जातोच असें ठरतें आणि "आदित्यो-ब्रह्मेत्यादेश " हें छांदोग्य ३ । १९ येथे स्पष्ट म्हटलेंहि आहे ह्यावरून ब्रह्मलोक व आदित्यलोक एकच ठरतो —।

ह्या प्रश्नात प्रजा कशा उत्पन्न होतात एवढेंच सांगितलें नसून त्याना त्यांची श्रेष्ठ अवस्था म्हणजेच ब्रह्मलोक कसा मिळतो तें सुचवून मनानी ती अवस्था प्राप्त करून घेण्याकरिता झटावें हेंहि सुचविलें आहे

## प्रश्न २

**प्रश्न २ वाक्य १**

अथ हैन भार्गवो वैदर्भि पप्रच्छ । भगवन्! कत्येव देवा प्रजा विधारयन्ते । कतर एतत्प्रकाशयते । क पुनरेषां वरिष्ठ इति ॥१॥

अर्थ—नतर ह्या पिप्पलादाला भार्गव वैदर्भीने हे विचारलें, "भगवन्! किती देव ह्या प्रजांना धारण करतात? त्यापैकी कोणते देव आम्ही प्रजा धारण करतों असें [एतत् = विधारणं] दाखवितात? [प्रकाशयते] ह्या देवांमध्ये सर्वांमध्ये मोठा देव कोणता?" ॥१॥

प्रश्न २ वाक्य २

तस्मै स होवाच आकाशो ह वा एष देवो वायुरग्निराप पृथिवी वाङ्मनश्चक्षुः श्रोत्रं च। ते प्रकाश्याभिवदन्ति वयमेतद् बाणमवष्टभ्य विधारयाम ॥२॥

अर्थ—त्याला पिप्पलाद ऋषीने उत्तर दिलें आकाश, वायु, अग्नि, आप आणि पृथिवी हीं पाच महाभूतें आणि वाणी, मन, चक्षु आणि श्रोत्र हीं चार इंद्रियें आपापलें कार्य दाखवून [प्रकाश्य] म्हणतात, "आम्हीच हें शरीर [बाणम्] खाली पडूं न देता म्हणजे उचलून [अवष्टभ्य] धारण करतों, म्हणजेच धरून ठेवतों" प्रत्येक जण असें म्हणतो असा भावार्थ आहे ॥२॥

प्रश्न २ वाक्य ३–४

तान् वरिष्ठः प्राण उवाच मा मोहमापद्यथ। अहमेवैतत्पंचधाऽऽत्मानं प्रविभज्यैतद्बाणमवष्टभ्य विधारयामीति ॥३॥
तेऽश्रद्दधाना बभूवुः सोऽभिमानादूर्ध्वमुत्क्रामत इव, तस्मिन्नुत्क्रामत्यथेतरे सर्व एवोत्क्रामते तस्मिन् प्रतिष्ठमाने सर्व एव प्रातिष्ठते तद्यथा मक्षिका मधुकरराजानमुत्क्रामतं सर्वा एवोत्क्रामंते एवमस्मिंश्च प्रतिष्ठमाने सर्वा एव प्रतिष्ठन्त एवं वाङ्मनश्चक्षुः श्रोत्रं च। ते प्रीताः प्राणं स्तुन्वति ॥४॥

अर्थ—त्या देवाना श्रेष्ठ प्राण म्हणाला, "मोह पावू नका, मी आपणाला पाच ठिकाणीं विभागून ह्या शरीरास उचलून धरून

ठेवतो. ॥३॥ त्या प्राणाच्या या म्हणण्यावर त्या देवांचा विश्वास बसला नाही [ अश्रद्धाना बभूवुः ]. म्हणजे प्राणाचें म्हणणें त्या देवांना पटलें नाही. त्यांच्या त्या अभिमानामुळे म्हणजे गर्वामुळे त्या प्राणाने शरीरांतून बाहेर गेल्यासारखें केलें [ उत्क्रमत इव ] (अर्थे निद्रावस्थेंत होतें). तो प्राण शरीरांतून बाहेर गेला असतां इतर सर्वहि बाहेर जातात आणि तो शरीरांत परत येऊन स्थिर झाला असतां इतर सर्वहि शरीरात परत येऊन स्थिर होतात. ज्याप्रमाणे मधुमक्षिका त्यांचा राजा उडून गेला असतां सर्वच उडून जातात आणि त्यांचा राजा बसला असता सर्वहि बसतात, त्याप्रमाणेच वाङ् मनस् चक्षुस् आणि श्रोत्र हे प्राणाबरोबरच पुनः शरीरांत परत येतात. (म्हणून प्राणच श्रेष्ठ असें त्या देवाना देखील दिसून आलें, म्हणून) ते देव संतुष्ट होऊन त्या प्राणाची स्तुति करतात. ॥४॥ तीच पुढील श्लोकांत दिली आहे.

प्रश्न २ वाक्य ५

एषोऽग्निस्तपत्येष सूर्यः।
एष पर्जन्यो मघवानेष वायुः ॥
एष पृथिवी रयिर्देवः।
सदसच्चामृतं च यत् ॥५॥

अर्थ—हाच अग्नि होऊन उष्णता देतो. हाच सूर्य होऊन प्रकाश देतो. हाच पर्जन्य होऊन पाणी देतो. हाच इंद्र होऊन सर्वांचें रक्षण करतो. हाच वाहणारा वायु होतो. सर्व प्राण्यांचें अन्न (रयिः) होणारी पृथ्वी हाच आहे. हाच देव म्हणजे आराधना किंवा उपासना ज्याची केली पाहिजे तो आहे. सर्व अनाविष्कृत (असद्) किंवा आविष्कृत (सद्) जगत् हाच आहे आणि जें अमृत म्हणजे चीवंत ठेवणारें किंवा आनंद देणारें आहे तें हाच आहे. ॥५॥

टिप्पणी—"सदसद्"- ह्याच्या अर्थाविषयीं मुंडक २।२।१ ह्यावरील टिप्पणी पहा.

प्रश्न २ वाक्य ६

अरा इव रथनाभौ प्राणे सर्वं प्रतिष्ठितम् ।
ऋचो यजूंषि सामानि यज्ञः क्षत्रं (च) ब्रह्म च ॥६॥

अर्थः—ज्याप्रमाणे चाकाच्या अरा चाकाच्या नाभीच्या म्हणजे मध्यभागाच्या [रथनाभौ] आधारावर असतात त्याप्रमाणेच ऋचा, यजुष, साम, यज्ञ, क्षत्रियकर्म [क्षत्र] आणि ब्राह्मणकर्म हे सर्व त्या (शरीरातील) प्राणाच्या आधारावरच असतात.

टिप्पणी—मागील श्लोकात शरीराच्या बाहेरच्या प्राणाचें वर्णन आहे आणि ह्या श्लोकात शरीरातील प्राणाचें वर्णन आहे. ह्या श्लोकात जे सांगितलें आहे त्याची उपपत्ति उघडच आहे.

प्रश्न २ वाक्य ७

प्रजापतिश्चरसि गर्भे त्वमेव प्रतिजायसे ॥
तुभ्यं प्राण ! प्रजास्त्विमा बलिं हरन्ति यः प्राणैः प्रतितिष्ठसि ॥७॥

अर्थ—तूच प्रजापति म्हणजे प्रजा उत्पन्न करणारा आहेस. तूच गर्भांत फिरतोस व नंतर जन्म घेतोस. जो इंद्रियां [प्राणैः] बरोबर राहतोस [प्रतितिष्ठसि] त्या तुलाच हे प्राणा, ह्या प्रजा अन्नरूपी बलि देतात ॥७॥

प्रश्न २ वाक्य ८

देवानामसि वह्नितमः पितॄणां प्रथमा स्वधा ।
ऋषीणां चरितं सत्य अथर्वांगिरसामपि ॥८॥

अर्थ—हे प्राण ! ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें ह्यांना [देवाना] त्यांचें त्यांचें अन्न उत्तम प्रकारें पोचविणारा [वह्नितमः] तूच आहेस तसेंच

पचनेंद्रियाचे [पितृणां] उत्तम प्रकारचें अन्न [प्रथमा स्वधा] तूंच आहेस म्हणजे तूंच त्यांना पोचवितोस. ज्ञानेंद्रियाच्या [ऋषिणाम्] सत्यज्ञान करून देणाऱ्या क्रिया [सत्यं चरितम्] तूंच आहेस. सर्व चित्तवृत्तींना [अंगिरसाम्] आधारभूत असलेला अहंकार [अथर्वा] तूंच आहेस. ॥८॥

टिप्पणी—ह्या श्लोकांत परोक्षवाद आहे हें उघड आहे. त्याचा उलगडा येणेंप्रमाणे आहे.

देव = ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें.

पितृ = रक्षण करणारीं इंद्रियें म्हणजेच पचनेंद्रियें.

ऋषि = ज्ञानेंद्रियें कारण ऋष् म्हणजे जाणणें.

अथर्वा = सर्व चित्तवृत्तींना आधारभूत असलेला अहंकार, जीव.

अंगिरस. = चित्तवृत्ति.

प्रश्न २ वाक्य ९

इंद्रस्त्वं प्राण ! तेजसा रुद्रोऽसि परिरक्षिता ।
त्वमंतरीक्षे चरसि सूर्यस्त्वं ज्योतिषां पतिः ॥९॥

अर्थ—हे प्राणा ! तूंच इंद्र म्हणजे जीवात्मा आहेस. आपल्या तेजाने रक्षण करणारा रुद्र तूंच आहेस. तूंच वायुरूपाने अंतरिक्षांत फिरतोस आणि प्रकाशणाऱ्यांचा [ ज्योतिषां ] पति म्हणजे स्वामी म्हणजे प्रकाशणाऱ्यांना प्रकाश देणारा असा सूर्य तूंच आहेस.

प्रश्न २ वाक्य १०

यदा त्वमभिवर्षसि अथेमाः प्राणते प्रजाः ।
आनंदरूपास्तिष्ठति कामायान्नं भविष्यतीति ॥१०॥

अर्थ—जेव्हा तूं पावसाची वृष्टि करतोस तेव्हाच ह्या प्रजा जिवंत राहतात [ प्राणते ] आणि आतां यथेच्छ [ कामाय ] अन्न होईल असें वाटल्यामुळे [ इति ] त्या आनंदरूप राहतात.

किंवा

हे प्राणा [ प्राण ] जेव्हां तूं पावसाची वृष्टि करतोस तेव्हा ह्या तुझ्या [ते] प्रजा आता यथेच्छ वृष्टि होईल असें वाटल्यामुळे [ इति ] आनंदरूप राहतात.

प्रश्न २ वाक्य ११

व्रात्यस्त्वं प्राण ! एकर्षिः अत्ताविश्वस्य सत्पतिः ।
वयमाद्यस्य दातारः पिता त्वं मातरिश्व ! नः ॥११॥

अर्थ—हे प्राण ! तुला कोणीच संस्कार केला नाही [व्रात्यः] कारण तुला संस्कार करण्याची गरजच नाही. तूं एकच ऋषि आहेस म्हणजे तुझ्या बरोबरीचा कोणीच नाही. आम्ही इंद्रियांनी पुरविलेल्या विषयाचा उपभोग घेणारा तू आहेस [अत्ता]. विश्वाचा चांगला पति तू आहेस. आम्ही तुला तुझें अन्न [आद्यस्य] म्हणजे उपभोगावयाचे विषय देणारे आहों. हे मातरिश्वा! तू आमचा पिता म्हणजे उत्पन्न करणारा आहेस.

टिप्पणी—"वयम्" इंद्रियेंच ही स्तुति करीत आहेत म्हणून "वयम्" ह्याचा अर्थ इद्रियें असा आहे.

एकर्षि—श्रीशंकराचार्य म्हणतात "आथर्वणानां प्रसिद्धः एकर्षिनामाग्निः"

"मातरिश्व" हें संबोधनाचा आर्षप्रयोग आहे.

प्रश्न २ वाक्य १२

या ते तनूर्वाचि प्रतिष्ठिता या श्रोत्रे या च चक्षुषि ।
या च मनसि संतता शिवां तां कुरु मोत्क्रमीः ॥१२॥

अर्थ—तुझी जी तनू म्हणजेच शक्ति वाणीमध्ये, कानांत, डोळ्यांत आणि मनात एकसारखी [ संतता ] प्रतिष्ठित आहे ती आम्हास सुख देणारी कर [ शिवां कुरु ], तूं शरीरास सोडून जाऊं नकोस. शरीरातच राहून आम्हांस सुख दे असा भावार्थ आहे ॥१२॥

प्रश्न २ वाक्य १३

प्राणस्येदं वशे सर्वं त्रिदिवे यत्प्रतिष्ठितम्।
मातेव पुत्रान् रक्षस्व श्रीश्च प्रज्ञां च विधेहि न ॥इति॥ १३॥

अर्थ—त्रिदिवामध्ये म्हणजे जागृति, स्वप्न व सुषुप्ति ह्या तीनहि अवस्थामध्ये जें काही आहे तें सर्व प्राणाच्याच काबूत आहे (अधीन आहे) म्हणून हे प्राणा! माता पुत्राचें रक्षण करते त्याप्रमाणे तू आमचें रक्षण कर आणि आम्हास सर्व प्रकारची संपत्ति [श्री] आणि ज्ञान [प्रज्ञा] प्राप्त होईल असें कर अशी इंद्रियानी प्राणाची स्तुति केली [इति] ॥१३॥

टिप्पणी—"त्रिदिव" म्हणजे मरणानंतरची अवस्था असा अर्थ कोणी घेतील तो बरोबर नाही कारण ती अवस्था प्राणाच्या आधीन आहे असें म्हणता येत नाही जागृति, स्वप्न व निद्रा ह्यातीलच सुरें प्राणाच्या आधीन आहे म्हणून त्रिदिव ह्याचा ह्या तीन अवस्था असाच अर्थ घेणें योग्य आहे. "त्रि" हा शब्दहि ह्या अर्थास पोषकच आहे पुढील प्रश्नात ह्याच अवस्था वर्णिल्याहि आहेत

"श्री च प्रज्ञा च"—श्री व प्रज्ञा हीं दोनहि मागितलें आणि श्री कर्मसाध्य आहे म्हणून ह्या उपनिषदास ज्ञानकर्मसमुच्चयच अभीष्ट आहे हें उघड आहे.

प्रश्न ३

प्रश्न ३ वाक्य १

अथ हैनं कौशल्यश्चाश्वलायन पप्रच्छ। भगवन्! कुत एष प्राणो जायते? कथमायात्यस्मिन् शरीरे? आत्मानं वा प्रविभज्य कथं प्रातिष्ठते? केनोत्क्रमते कथं बाह्यमभिधत्ते? कथं अध्यात्मम्? इति ॥१॥

अर्थ—नंतर पिप्पलाद ऋषीला कौशल्य आश्वलायनाने विचारलें "भगवन् हा श्रेष्ठ प्राण (ज्याचें मागील प्रश्नात वर्णन केलें तो ) ( एप प्राण ) कोठून उत्पन्न होतो ? तो कोणत्या कारणाकरिता म्हणजेच कशाकरिता (कथम् ) ह्या शरीरात येतो ? स्वत चे विभाग करून तो कसा—म्हणजेच कोणतें कोणत्या ठिकाणीं कोणतें कोणतें कार्य करीत राहतो ? तो शरीराबाहेर किंवा शरीरातच वर कसा जातो ? शरीराबाहेरील व्यापार तो कसे करतो ? आणि शरीरातील [अध्यात्म] व्यापार तो कसे करतो ? " ॥१॥

टिप्पणी—"कथम्" याचा सामान्यत अर्थ कसा म्हणजे कोणत्या रीतीने असा आहे तथापि येथील "कथ" चा अर्थ "कशा करिता, कोणत्या हेतूने" असा करावा लागतो, कारण त्या प्रश्नाचें पुढील उत्तर "मनोकृतेनायात्यस्मिन् शरीरे" ह्यात शरीरात येण्याचा हेतूच सांगितला आहे श्रीशंकराचार्यांनीहि या "कथ"चा असाच अर्थ केला आहे. ते म्हणतात, "किंनिमित्तस्य शरीरग्रहणमित्यर्थ ॥"

"उत्क्रमते" याचा अर्थ "बाहेर किंवा वर जातो" असा करण्याचें कारण वाक्य ७ वरील टिप्पणात दिसून येईल

**प्रश्न ३ वाक्य २–३**

तस्मै स होवाच अतिप्रश्नान् पृच्छसि ब्रह्मिष्ठोसीति तस्मात्तेऽहं ब्रवीमि ॥२॥ आत्मन एष प्राणो जायते । यथैषा पुरुषे छाया एतस्मिन्नेतदाततम् ॥ मनोकृतेना-यात्यस्मिन् शरीरे ॥३॥

अर्थ—त्या शिष्याला ते ऋषि म्हणाले, "तू फार मोठे म्हणजे फार महत्त्वाचे [ अतिप्रश्न ] विचारलेस तुला ब्रह्म जाणण्याची तळमळ लागली आहे [ब्रह्मिष्ठ] म्हणून तुला त्याचें उत्तर सांगतो ॥२॥ आत्म्यापासूनच हा प्राण उत्पन्न होतो मनुष्याच्या शरीराची छाया

म्हणजे प्रभा जशी त्या शरीरावरोवरच नेहमी असते तसेंच हा प्राण या आत्म्याच्या ठिकाणीं नेहमी असतोच [आततम्]. मनाकरितः (मनोकृतेन) म्हणजे मनाशिवाय आनंदाचा प्रत्यय म्हणजेच अनुभव येत नाही म्हणून मन उत्पन्न करण्याकरिता तो या शरीरांत येतो ॥३॥

टिप्पणी—"अतिप्रश्न" असाच शब्द बृहदारण्यक ३।६।१ येथे आहे. पण तेथे त्याचा अर्थ येथील अर्थाहून भिन्न आहे हें उघड आहे. तेथे प्रश्नाचें उत्तर दिलें नाही आणि प्रश्न विचारूं नकोस असें म्हटलें आहे. पण येथे उत्तर दिलें आहे. ह्यावरून तेथे "अतिप्रश्न" म्हणजे जी गोष्ट कोणासच जाणतां येत नाही तीविषयीं प्रश्न असा आहे. पण येथे प्रश्नाचें उत्तर दिलें आहे म्हणून फार मोठा प्रश्न, फार महत्त्वाचा प्रश्न असा अर्थ करावा लागतो.

"ब्रह्मिष्ठो"—शिष्याला अजून ब्रह्म जाणावयाचेंच आहे म्हणून ह्याचा अर्थ ज्याला ब्रह्म जाणून घेण्याची तळमळ आहे तो, असाच केला पाहिजे.

छाया—छाया म्हणजे "प्रभा" असाहि अर्थ आहेच. (आपटयां-चा कोश पहा). शरीराची प्रभा म्हणजे जीमुळे शरीर ओळखास दिसतें ती. श्रीशंकराचार्यांनी छाया म्हणजे सावली असा अर्थ घेऊन, सावली जशी अनृत असते तसा प्राण अनृत असतो असा भावार्थ काढला आहे. तो टाळावयाचा असेल तर छाया म्हणजे प्रभा असाच अर्थ घ्यावा लागतो. ही "प्रभा" सूर्यप्रकाशाशिवाय प्रत्ययास येत नाही असा कोणी आक्षेप घेईल त्यास अगदी समर्पक उत्तर असें आहे की सावली देखील सूर्यप्रकाशाशिवाय प्रत्ययास येत नाही. आता आम्ही केलेलाच अर्थ कसा बरोबर आहे हें दाखवितों- ब्रह्माची जागृती हेंच ह्या उपनिषदाचें देखील साध्य आहे हें पुढे दिसेलच. जागृती मनाशिवाय संभवत नाही. त्या मनाला उपनिषत्कार अनृत म्हणेल असेंहि संभवत नाही. म्हणून छाया म्हणजे सावली अर्थात् अनृत असा अर्थ करूं नये.

"मनोकृतेन"—"मनःकृतेन" असा शब्द पाहिजे होता. आर्ष संधि करून "मनोकृतेन" असा शब्द ग्रंथकाराने बनविला. "कृते" किंवा "कृतेन" ह्या प्रत्ययाचा अर्थ "करिता" असा आहे. त्याप्रमाणे "मनोकृतेन" ह्याचा अर्थ मनाकरिता म्हणजे मन उत्पन्न व्हावें म्हणून असा होतो. मनहि अमृताकरिता म्हणजे आनंदाकरिता पाहिजे हें मुंडक १ । १ । ८ येथील वचनावरून स्पष्ट आहे.

प्रश्न ३ वाक्य ४–७

यथा सम्राडेवाधिकृतान् विनियुंक्ते एतान् ग्रामानेतान् ग्रामानधितिष्ठस्वेत्येवमेव प्राण इतरान् प्राणान् पृथक् पृथगेव संनिधत्ते ॥४॥ पायूपस्थेऽपानं चक्षुः श्रोत्रे मुखनासिकाभ्यां प्राणः स्वयं प्रातिष्ठते मध्ये तु समानः। एष ह्येतद् धुतमन्नं समं नयति तस्मादेताः सप्तार्चिषो भवंति ॥५॥ हृदि ह्येष आत्मा। अत्रैतदेकशतं नाडीनां तासां शतं शतं एकैकस्याम्। द्वासप्ततिर्द्वासप्ततिः प्रतिशाखानाडी सहस्राणि भवंत्यासु व्यानश्चरति ॥६॥ अथैकयोर्ध्व उदानः पुण्येन पुण्यं लोकं नयति पापेन पापं उभाभ्यामेव मनुष्यलोकम् ॥७॥

अर्थः—ज्याप्रमाणे एखादा राजा तूं ह्या गावीं रहा, तूं ह्या गावीं रहा असें सांगून आपले अधिकारी नेमतो, त्याप्रमाणेच हा मुख्य प्राण, इतर प्राणांना म्हणजे अपान, समान, व्यान व उदान ह्यांना वेगवेगळ्या ठिकाणीं नेमून ठेवतो. ॥४॥ पायू आणि उपस्थ ह्यांच्या ठिकाणीं अपानास ठेवतो. डोळे, कान, मुख आणि नासिका यांच्या ठिकाणीं स्वतः प्राणच राहतो. शरीराच्या मध्यभागीं समान राहतो. हा समानच जठराग्निमध्ये टाकलेलें [हुतं] अन्न आपणासारखें करतो [समं नयति] आणि त्यापासून ह्या सात ज्वाला [अर्चिषः] म्हणजे दोन डोळे, दोन कान, दोन

नाकपुडया व जीभ ह्या सात ज्ञानेंद्रियाच्या शक्ति उत्पन्न होतात. ॥५॥ हा आत्मा हृदयातच म्हणजे छातींतच आहे. ह्या येथे १०१ नाडी म्हणजे रक्तवाहिनी आहेत. त्यापैकी शंभरशंभर शाखानाडी आहेत. त्या शाखानाडींपैकी प्रत्येकीस बाहात्तर हजार प्रतिशाखानाडी आहेत. ह्या शरीरव्यापी सर्व नाडींमध्ये व्यान संचरतो. म्हणजे ह्या नाडीमध्ये होणारी रक्ताभिसरणाची क्रिया करतो. ॥६॥ मुख्य १०१ नाडींपैकी एकीने वर जाणारा [ ऊर्ध्वः ] उदान म्हणजे हृदयातून डोक्याकडे जाणारा उदान जागृतिकाळीं किंवा मृत्युकाळीं, पुण्याने पुण्यलोकास, पापाने पापलोकास आणि दोन्हींनी म्हणजे पापपुण्यानी मनुष्यलोकास नेतो म्हणजे पुण्यवंतास पुण्यलोकीं नेतो, पाप्यास पापलोकीं नेतो व ज्याने पाप व पुण्य दोनहि केलीं आहेत त्याला मनुष्यलोकीं नेतो. ॥७॥

टिप्पणी—ह्या वाक्यात पाच प्राणाचीं कर्मे सांगितलीं आहेत. त्यापैकी "उदाना" शिवाय इतराचीं कर्मे समजणें सोपेंच आहे. "उदाना" चें कर्म समजणें कठीण आहे. उदानाचें कर्म मेल्यानंतर पुनः चन्या किंवा वाईट जन्मास घालणें एवढेंच आहे असें वरवर पाहणाऱ्यास वरील सातव्या वाक्यावरून वाटेल. हें तर त्याचें कार्य आहेच व तें पुनः ह्याच प्रश्नात ९-१० ह्या वाक्यात सांगितलेंहि आहेच. परंतु त्याशिवाय दुसरेंहि त्याचें कार्य आहे व तें प्रश्न ४ वाक्य ४ येथील "अहरहर् ब्रह्म गमयति" ह्या शब्दावरून दर्शित होतें. येथील अहरहर् ह्या शब्दावरून "ब्रह्म" म्हणजे ब्रह्मशाची दररोजची जागृति हा अर्थ अगदी स्पष्ट आहे व ती जागृति उत्पन्न करण्याचें काम "उदानाचें" आहे हा तेथील वाक्याचा अर्थ आहे. ह्या अर्थहि येथील सातव्या वाक्यात अंतर्भूत होईल अशा रीतीने ह्या सातव्या वाक्याचा अर्थ वर केला आहे. झोपेंत आत्मा हृदयात असतो, स्वप्नात कंठात असतो आणि जागृतींत नेत्रात असतो असें छांदोग्य ४-१५ येथील विवरणांत सविस्तर दाखविलें आहे. त्याप्रमाणे झोपेंत

हृदयात असलेला आत्मा वर जातो तेव्हा स्वप्नाव व नंतर जागृतींत जातो. ह्याच जन्मातील जागृतींतच पापलोक, मनुष्यलोक व पुण्यलोक म्हणजेच प्रश्न ४-४ येथील ब्रह्मलोक असतो असें येथील सातव्या वाक्यात मानलें आहे आणि मरणानतर पुढच्या जन्मातहि पापलोक, मनुष्यलोक व पुण्यलोक आहेत असेंहि मानलें आहे. ह्या दोनहि प्रसंगीं म्हणजे जागें होताना व मरताना उदान आरम्यास हृदयातून वर डोक्याकडे नेतो असेंहि येथे मानलें आहे. "आत्मानं वा प्रविभज्य कथं तिष्ठते" ह्याचें उत्तर वाक्य ४-६ मध्ये आहे आणि वाक्य ७ मध्ये "कैनोत्क्रमते" ह्याचें उत्तर आहे.

प्रश्न ३ वाक्य ८–१०

आदित्यो ह वै बाह्यः प्राण उदयत्येप ह्येन चाक्षुपं प्राण-मनुगृह्णानः । पृथिव्या या देवता सैषा पुरुपस्यापानमवष्टभ्य (वर्तते) । अंतरा यदाकाशः स समानो । वायुर्व्यानः ॥८॥ तेजो ह वाव उदान' । तस्मादुपशाततेजाः पुनर्भवमिंद्रियै-र्मनसि संपद्यमानै (प्रतिपद्यते) ॥९॥ "यच्चित्तस्तेनैप प्राणमायाति । प्राणः तेजसा, युक्तः स ह आत्मना, यथा संकल्पितं लोकं नियति ॥१०॥

**अर्थ**—आदित्य हा बाह्य प्राण दररोज उदय पावतो, तो ह्या डोळ्यातील प्राणाला मदत करतो. पृथिवीमध्ये जी देवता म्हणजे शक्ति आहे, ती पुरुषाच्या अपानाला आपल्या आकर्पणाने वश करीत [अवष्टभ्य] असते. [वर्तते । हें पद अध्याहृत घ्यावें लागतें. ] ती बाह्य अपान होय. सूर्य आणि पृथिवी ह्यामध्ये [अतरा] जें आकाश (म्हणजे रासायनिक क्रिया करणारीं सूर्यकिरणें) आहे तेंच बाह्य समान होय. रक्ताला व्यान फिरवितो त्याप्रमाणे पाण्याला किंवा पाण्याच्या वाफेला चोहींकडे फिरविणारा वायु हाच बाह्य व्यान होय. ॥८॥ तेज म्हणजे

उष्णता हाच उदान होय. म्हणूनचं [ तस्मात् ] ज्याचें तेज (म्हणजे उष्णता ) शांत म्हणजे नष्ट झालें आहे तो मनांत मिळून गेलेल्या [मनसि संपद्यमानैः] इंद्रियांसह पुनर्जन्म [ पुनर्भव ] पावतो. [ प्रतिपद्यते—हें पद अध्याहृत घ्यावें लागतें. ] ॥९॥ जीवाच्या मरणकाळीं मैं चित्त म्हणजे संकल्पित असेल [ यच्चित्तः ] त्यासह [ तेन ] हा जीव [ एषः ] प्राणामध्ये [ प्राणं ] जाऊन मिळतो [आयाति] आणि तो प्राण [ स ह प्राणः ] त्या जीवासह [आत्मना युक्तः ] तेजाकडून म्हणजेच उदानाकडून संकल्पिलेल्या लोकाला नेला जातो. ॥१०॥

टिप्पणी—ह्या वाक्यांत " कथं बाह्यं अभिधत्ते कथमध्यात्मं " ह्या दोनहि प्रश्नांचें उत्तर एकदमच आहे, ह्या उत्तराचा सारांश असा की शरीरांतील पांच प्राणांप्रमाणेच बाहेरहि सूर्य म्हणजे सूर्याचा प्रकाश, पृथ्वी म्हणजेच पृथिवीची आकर्षणशक्ति, आकाश म्हणजे आकाशांतील रासायनिक सूर्यकिरणें, वायु आणि तेज म्हणजेच उष्णता हे पांच प्राण आहेत आणि ते शरीरांतील प्राण, अपान, व्यान, आणि उदान ह्यांस अनुक्रमें मदत करतात. बाहेरचे प्राण मदत करतात आणि ह्या मदतीनेच आंतील प्राण आपापलें कार्य करतात असा भाव आहे. सूर्यप्रकाश डोळ्यास मदत करतो हें सर्वांस माहीतच आहे. उत्सर्ग करणें हें अपानाचें कार्य त्याला पृथिवीचें आकर्षण मदत करतें असें येथे मानलें आहे. समान अन्न पचवितो, ही रासायनिक क्रिया आहे व ती सूर्यकिरणांवर अवलंबून आहे. हीं सूर्यकिरणेंच वनस्पतींतील पचनक्रिया घडवितात हें प्रसिद्धच आहे. त्याप्रमाणेच मनुष्यांतील पचनक्रियेलाहि त्यांची मदत होत असली पाहिजे. कारण सूर्यप्रकाश न मिळाल्यास मनुष्य रोगी होतो. ह्या गोष्टी तेव्हांच्या लोकांस कळणें अशक्य असेंहि नाही. व्यान म्हणजे वायु श्वासोच्छ्वासानें छातींत जातो व रक्ताभिसरणास मदत करतो असें येथे मानलें आहे. वास्तविक तो रक्तशुद्धीकरणास मदत करतो. बाहेरची उष्णता आंतील उष्णतेस मदत करतेच. एकूण बाहेरचे प्राण आंतील प्राणांस मदत करतात हें म्हणतां येतें.

ह्या वाक्यात अध्याहार पुष्कळच मानावे लागतात. आणि द्द्याच्या वाक्याचा अन्वय पुढीलप्रमाणे करावा लागतो.

"आत्मना युक्तः स ह प्राण. तेजसा यथा संकल्पितं लोकं नीयते"—"तेजसा" ही कर्तरि तृतीया आहे. असा अन्वय करताना "नयति" हा उपलब्ध पाठ सुधरून "नीयते" असा करावा लागतो. असे केल्याशिवाय अर्थच लागत नाही. श्रीशंकराचार्यांनी "आत्मानं" हें पद अध्याहृत मानून "आत्मना सह सहितः तेजसा युक्तः प्राण. आत्मानम् यथासंकल्पितम् लोकं नयति" असा अन्वय केला असें दिसतें. तेंहि असाध्य नाही. दोनहि प्रकारांनी अर्थ एकच येतो.

प्रश्न ३ वाक्यें ११–१२

य एवं विद्वान् प्राणं वेद न हास्य प्रजा हीयतेऽमृतो भवति ॥११॥ तदेष श्लोकः ॥

उत्पत्तिमायतिं स्थानं विभुत्वं चैव पंचधा ।
अध्यात्मं चैव प्राणस्य विज्ञायामृतमश्नुते ।
विज्ञायामृतमश्नुते ॥१२॥

अर्थ—जो विद्वान् याप्रमाणे प्राणाला जाणतो त्याची संतति टाकण्यालायक हलक्या प्रकारची नसते [हीयते] आणि तो आनंदाचा अनुभव घेणारा [अमृत] होतो. ॥११॥ त्या संबंधाने पुढील श्लोक श्लोक आहे. जो प्राणाची उत्पत्ति, प्राणापासून पुढे काय काय होतें तें [आयतिं], प्राणाचें पांच ठिकाणीं राहणें [स्थानं] आणि पांच प्रकारचें सामर्थ्य [विभुत्वं] आणि त्यानें शरीरांतील कार्यें जो जाणतो तो आनंदाचा अनुभव घेतो [अमृतं अश्नुते]. म्हणजे तो प्राणोपासना करून तीपासून आनंद मिळवितो असा भाव आहे. ॥१२॥

टिप्पणें—"हीयते"–"हा" "त्यागे" या धातूचें हें कर्मणिरूप आहे. याचा मूळचा अर्थ टाकला जात नाही असा आहे, तथापि

त्यावरूनच " टाकण्यालायक हलक्याप्रकारचें नसतें " असा अर्थ होतो. " प्रजा न हीयते तस्या रतिश्च भरतर्षभ " ॥२०॥ (महाभारत, अनुशा. पर्व, अध्याय ४४ Bombay edition). येथे "हीयते" ह्याचा हाच अर्थ आहे. आणि हा अर्थ उपपन्नहि आहेच कारण हें प्राणाचें ज्ञान ज्याला आहे तो त्याचें महत्व जाणतो व त्याची उपासना करतो, म्हणजे प्राणाचें सर्व प्रकारें पोषण व रक्षण करतो. त्यामुळे तो शरीरानें चांगला होतो व अर्थात् त्याची संततिहि चांगली होते.

"आयति" ह्या शब्दाचा अर्थ "भविष्य" असाहि आहे (आपट्यांचा कोश पहा). ह्याचाच अर्थ प्राणापासून पुढे काय काय होतें तें. म्हणजे प्राणापासून पुढे मनस् होतें, मनापासून कर्म होतें व कर्मापासून आनंद होतो हें सर्व.

## प्रश्न ४.

**प्रश्न ४ वाक्य १**

अथ हैनं सौर्यायणी गार्ग्यः पप्रच्छ । भगवन्! एतस्मिन् पुरुषे कानि स्वपंति ? कान्यस्मिन् जाग्रति ? कतर एष देवः स्वप्नान् पश्यति ? कस्यैतत्सुखं भवति ? कस्मिन्नु संप्रतिष्ठिता भवंति ? इति ॥१॥

अर्थः—सौर्यायणी गार्ग्यानें पिप्पलायन ऋषीला विचारलें, " हे भगवन्! ह्या पुरुष निजला असतां [ स्वपति । हें सतिसप्तम्यंतपद अध्याहृत घेतलें पाहिजे ] कोण निजतात ? कोण जागे असतात ? स्वप्नें कोणता देव पाहतो ? झोपेंत जें सुख होतें तें कोणास होतें ? हें सर्व कशाच्या आधारावर असतात ?

**प्रश्न ४ वाक्य २**

तस्मै स होवाच । यथा गार्ग्य ! मरीचयोऽर्कस्यास्तं गच्छतः सर्वा एतस्मिंस्तेजोमंडल एकीभवंति ताः पुनः

पुनरदयत प्रचरति एव ह वै तत्सर्वं परे देवे मनस्येकी-
भवति । तेन तर्ह्येष पुरुषो न शृणोति न पश्यति न
जिघ्रति न रसयते न स्पृशते नाभिवदते नादत्ते नानदयते
न विसृज्यते नेयायते स्वपितीत्याचक्षते ॥२॥

अर्थ—त्या शिष्याला त्या ऋषीने उत्तर दिलें, "हे गार्ग्या, ज्याप्रमाणे अस्तास जाणाऱ्या सूर्याचीं किरणें सर्वहि ह्या त्याच्या तेजोमडळात येऊन मिळतात [एकीभवंति] आणि पुन्हा उगवणाऱ्या सूर्याचीं किरणें त्याच्या तेजोमडळातून पुन बाहेर पडतात, त्याप्रमाणेच तीं सर्व इंद्रियें [तत्सर्वं] श्रेष्ठ देव जें मन त्यात झोपेच्या वेळीं येऊन मिळतात त्यामुळे [तेन] त्या वेळीं हा पुरुष ऐकत नाही, पहात नाही, वास घेत नाही, स्वाद घेत नाही किंवा स्पर्शहि जाणत नाही आणि बोलत नाही, हातानीं काही धरत नाही, मैथुन करीत नाही [नानदयते], मलोत्सर्ग करीत नाही किंवा चालत नाही [इयायते] त्या वेळीं तो निजला आहे असें म्हणतात ॥२॥

टिप्पणी—येथील सूर्य व त्याचीं किरणें ह्याची उपमा चांगली नाही (कारण किरणें सूर्यात जाऊन मिळतच नाहीत किंवा बाहेरहि पडत नाहीत) तथापि भाव स्पष्ट आहे आणि तो हाच की झोपेच्या वेळीं पाच ज्ञानेंद्रियें व पांच कर्मेंद्रियें मनासह निजलेलीं असतात, त्याचें हें उत्तर आहे "इयायते" हें "इ" धातूचें यङ् प्रत्ययात आर्षरूप आहे पाणिनीय मतें हलादि धातूनाच यङ् लागतो. ह्या रूपाचा अर्थहि "चालतो" एवढाच आहे

प्रश्न ४ वाक्य ३–४

प्राणाग्नय एवैतस्मिन् पुरे जाग्रति । गार्हपत्यो ह वा एषोऽ-
पानो व्यानोऽन्वाहार्यपचनो यद् गार्हपत्यात्प्रणीयते प्रणयना-
दाहवनीय प्राण । यदुच्छ्वासनि श्वासावेता धाहुती

समं नयतीति स समानः ॥३॥ मनो ह वाव यजमानः इष्ट-
फलमेवोदानः स एनं यजमानमहरहर्ब्रह्म गमयति ॥४॥

अर्थ—सर्व इंद्रियें आणि मन निजलें असतात, तथापि ह्या शरीररूपी शहरांत प्राणरूपी अग्नि जागत असतात. म्हणजे प्राणाचें श्वासोच्छ्वासाचें, समानाचें अन्न आणि वायु पचविण्याचें, अपानाचें मलमूत्र खाली घसरविण्याचें, व्यानाचें रक्ताभिसरणाचें व उदानाचें झोपविण्याचें कार्य चालू असतें. हा अपान हा गार्हपत्य अग्नि होय. व्यान हा अन्वाहार्यपचन अग्नि होय. ज्याप्रमाणे गार्हपत्य अग्नींतूनच आहवनीय अग्नि नेला जातो, त्याप्रमाणेच अपानांतूनच वर मुख-नासिकांकडे प्राण नेला जातो म्हणून [प्रणयनात्], प्राण हा आहव-नीय अग्नि होय. ज्या अर्थी [यत्] उच्छ्वास आणि निःश्वास ह्याच आहुती शरीराची सम करतो म्हणजे पचवितो, म्हणजेच पाहुण्यांना घरच्या माणसासारखे पचवितो त्या अर्थी समान हाच सभ्य अग्नि होय. [ "सभ्यः" हा शब्द अध्याहृत घ्यावा लागतो ], पांच प्राण हे पांच अग्निच होत आणि निद्रा ही त्यांची उपासना म्हणजे अग्निहोत्रच किंवा यज्ञच होय असा भाव आहे. ॥३॥ ह्या अग्निहोत्राचा यजमान मन हें होय. आणि इष्टाचें म्हणजे निद्रारूपी यज्ञाचें फळ, तो उदानरूपी आवसथ्य अग्निच ह्या मनोरूपी यजमानाला दररोज त्याच्या ब्रह्मरूपी अवस्थाला म्हणजे परात्रा म्हणजेच जागृतीला नेऊन पोचवितो, हेंच होय. ॥४॥

टिप्पणी—चवथ्या वाक्यांतील "ब्रह्म" म्हणजे निद्रावस्था असा अर्थ करणें बरोबर नाही. कारण निद्रारूपी यज्ञाचें निद्राच फळ होय हे म्हणणें बरोबर नाही. निद्रेचें फळ जागृति किंवा जागृतीचें फळ निद्रा असें मात्र म्हणतां येतें. शिवाय " उदान " हा उर्ध्व म्हणजे वर जाणारा आहे. वर जाणारा म्हणजे हृदयांतून वर डोक्याकडे किंवा डोळ्याकडे जाणारा आणि जीव हृदयांत असतो तेव्हां निद्रावस्था

असते व डोळ्यात असतो ते हा जागृति असते. म्हणून उदान मनाला दररोज जागृतींत नेतो हाच अर्थ असला पाहिजे. जागृतींतच ब्रह्माचें ज्ञान व तज्जनित मानयुक्त आनंद संभवतो. निद्रेंत आनंद असला तरी त्याचें भान असत नाही. म्हणून निद्रा ही मनुष्याचें साध्य ठरत नाही आणि ब्रह्मज्ञानी जागृति हेंच मनुष्याचें साध्य ठरते. यज्ञाचें फळ मनुष्याला त्याच्या साध्याकडे घेऊन जाणारें असेंच असलें पाहिजे. म्हणून उदान मनुष्याला दररोज जागृतिकडे घेऊन जातो हाच अर्थ उपपन्न आहे.

**प्रश्न ४ वाक्य ५**

अत्रैष देवः स्वप्ने महिमानमनुभवति । यद्दृष्टं दृष्टमनुपश्यति श्रुतं श्रुतमेवार्थमनुशृणोति देशदिगंतरैश्च प्रत्यनुभूतं पुनः पुनः प्रत्यनुभवति दृष्टं चादृष्टं च श्रुतं चाश्रुतं च अनुभूतं चाननुभूतं च सच्चासच्च सर्वं पश्यति सर्वः पश्यति ॥५॥

**अर्थ**—हा मनोरूपी देव स्वप्नांत आपल्या महिम्याचा म्हणजे सामर्थ्याचा अनुभव घेतो. जें पाहिलें असेल त्यासारखेंच पुनः पाहतो [अनुपश्यति], जें ऐकलें असेल त्यासारखेंच पुनः ऐकतो, निरनिराळ्या देशांत व दिशांत अनुभविलेलेंच पुनः पुनः अनुभवतो, पाहिलेलें पाहतो, न पाहिलेलें पाहतो, ऐकलेले ऐकतो, न ऐकिलेलेंहि ऐकतो, अनुभविलेलें अनुभवतो, न अनुभवलेलेंहि अनुभवतो, खरेंहि आणि खोटेंहि पाहतो, सर्व पाहतो आणि सर्व होऊन पाहतो. हेंच त्याचें सामर्थ्य किंवा महिमा होय असा भाव आहे. ॥५॥

**प्रश्न ४ वाक्य ६**

स यदा तेजसाभिभूतो भवत्यत्रैष देवः स्वप्नान्न पश्यत्यथ तदैतस्मिन् शरीरे एतत्सुखं भवति ॥६॥

समं नयतीति स समानः ॥३॥ मनो ह वाव यजमानः इष्ट-फलमेवोदानः स एनं यजमानमहरहर् ब्रह्म गमयति ॥४॥

**अर्थ**—सर्व इंद्रियें आणि मन निजलें असतात, तथापि ह्या शरीररूपी शहरांत प्राणरूपी अग्नि जागत असतात. म्हणजे प्राणाचें श्वासोच्छ्वासाचें, समानाचें अन्न आणि वायु पचविण्याचें, अपानाचें मलमूत्र खाली घसरविण्याचें, व्यानाचें रक्ताभिसरणाचें व उदानाचें झोपविण्याचें कार्य चालू असतें. ह्या अपान हा गार्हपत्य अग्नि होय. व्यान हा अन्वाहार्यपचन अग्नि होय. ज्याप्रमाणे गार्हपत्य अग्नीतूनच आहवनीय अग्नि नेला जातो, त्याप्रमाणेच अपानांतूनच वर मुख-नासिकाकडे प्राण नेला जातो, म्हणून [प्रणयनात्], प्राण हा आहव-नीय अग्नि होय. ज्या अर्थी [यत्] उच्छ्वास आणि निःश्वास ह्याच आहुती शरीराशीं सम करतो म्हणजे पचवितो, म्हणजेच पाहुण्यांना घरच्या माणसासारखे बनवितो त्या अर्थी समान हाच सभ्य अग्नि होय. [ "सभ्यः" हा शब्द अध्याहृत घ्यावा लागतो ]. पांच प्राण हे पांच अग्निच होत आणि निद्रा ही त्यांची उपासना म्हणजे अग्निहोत्रच किंवा यज्ञच होय असा भाव आहे. ॥३॥ ह्या अग्निहोत्राचा यजमान मन हें होय. आणि इष्टाचें म्हणजे निद्रारूपी यज्ञाचें फळ, तो उदानरूपी आवसथ्य अग्निच ह्या मनोरूपी यजमानाला दररोज त्याच्या ब्रह्मरूपी अवस्थाला म्हणजे घराला म्हणजेच जागृतीला नेऊन पोचवितो, हेंच होय. ॥४॥

**टिप्पणी**—चवथ्या वाक्यांतील "ब्रह्म" म्हणजे निद्रावस्था असा अर्थ करणें बरोबर नाही. कारण निद्रारूपी यज्ञाचें निद्राच फळ होय हें म्हणणें बरोबर नाही. निद्रेचें फळ जागृति किंवा जागृतीचें फळ निद्रा असें मात्र म्हणतां येतें. शिवाय "उदान" हा उर्ध्व म्हणजे वर जाणारा आहे. वर जाणारा म्हणजे हृदयांतून वर डोक्याकडे किंवा डोळ्याकडे जाणारा आणि जीव हृदयांत असतो तेव्हा निद्रावस्था

असते व होळयांत असतो तेंहा जागृति असते. म्हणून उदान मनाला दररोज जागृतींत नेतो हाच अर्थ असला पाहिजे. जागृतींतच ब्रह्मार्चे ज्ञान व तज्जनित मानयुक्त आनंद संभवतो. निद्रेंत आनंद असला तरी त्याचें भान असत नाही. म्हणून निद्रा ही मनुष्याचें साध्य ठरत नाही आणि ब्रह्मज्ञाची जागृति हेंच मनुष्याचें साध्य ठरतें. यज्ञाचें फळ मनुष्याला त्याच्या साध्याकडे घेऊन जाणारें असेंच असलें पाहिजे. म्हणून उदान मनुष्याला दररोज जागृतिकडे घेऊन जातो हाच अर्थ उपपन्न आहे.

प्रश्न ४ वाक्य ५

अत्रैष देवः स्वप्ने महिमानमनुभवति । यद्दृष्टं दृष्टमनुपश्यति श्रुतं श्रुतमेवार्थमनुशृणोति देशदिगंतरैश्च प्रत्यनुभूतं पुनः पुनः प्रत्यनुभवति दृष्टं चादृष्टं च श्रुतं चाश्रुतं च अनुभूतं चाननुभूतं च सच्चासच्च सर्वं पश्यति सर्वः पश्यति ॥५॥

अर्थ—हा मनोरूपी देव स्वप्नात आपल्या महिम्याचा म्हणजे सामर्थ्याचा अनुभव घेतो. जें पाहिलें असेल त्याचप्रमाणेंच पुनः पाहतो [अनुपश्यति], जें ऐकलें असेल त्याप्रमाणेंच पुनः ऐकतो, निरनिराळ्या देशांत व दिशांत अनुभविलेलेंच पुनः पुनः अनुभवतो, पाहिलेलें पाहतो, न पाहिलेलें पाहतो, ऐकलेलें ऐकतो, न ऐकिलेलेंहि ऐकतो, अनुभविलेलें अनुभवतो, न अनुभवलेलेंहि अनुभवतो, खरेंहि आणि खोटेंहि पाहतो, सर्व पाहतो आणि सर्व होऊन पाहतो. हेंच त्याचें सामर्थ्य किंवा महिमा होय असा भाव आहे. ॥५॥

प्रश्न ४ वाक्य ६

॥ स यदा तेजसाभिभूतो भवत्यत्रैष देवः स्वप्नान्न पश्यत्यथ तदैतस्मिन् शरीरे एतत्सुखं भवति ॥६॥

अर्थ—तो मनोरूपी देव जेव्हा तेजाने म्हणजे उदानाने (कारण प्रश्न ३।९ प्रमाणे शरीरांतील उदान व बाहेरचें तेज एकच होय) पराभूत होतो [अभिभूत] तेव्हा तो स्वप्नें पहात नाही. आणि हा शरीरांत हें झोपेचें सुख होतें.

प्रश्न ४ वाक्य ७–९

स यथा सोम्य! वयांसि वासोवृक्षं संप्रतिष्ठन्ते एवं ह वै तत्सर्वं पर आत्मनि संप्रतिष्ठते ॥७॥ पृथिवी च पृथिवी-मात्राचापश्चापोमात्रा च तेजश्च तेजोमात्रा च वायुश्च वायु-मात्रा चाकाशश्चाकाशमात्रा च चक्षुश्च द्रष्टव्यं च श्रोत्रं च श्रोतव्यं च घ्राणं च घ्रातव्यं च रसं च रसयितव्यं च त्वक् च स्पर्शयितव्यं च वाक् च वक्तव्यं च हस्तौ चादातव्यं चोपस्थ-श्चानंदयितव्यं च पायुश्च विसर्जयितव्यं च पादौ च गंतव्यं च मनश्च मंतव्यं च बुद्धिश्च बोद्धव्यं चाहंकारश्चाहंकर्तव्यं च चित्तं च चेतयितव्यं च तेजश्च विद्योतयितव्यं च प्राणश्च विधारयितव्यं च ॥८॥ एष हि द्रष्टा, स्प्रष्टा, श्रोता, घ्राता, रसयिता, मंता, बोद्धा, कर्ता, विज्ञानात्मा पुरुषः। स परे अक्षरे आत्मनि संप्रतिष्ठते परमेवाक्षरं प्रतिपद्यते ॥९॥

अर्थ—हे बाळा! [सोम्य], ज्याप्रमाणे पक्षी आपल्या वसण्याच्या झाडावर [वासोवृक्षं] जाऊन बसतात, त्याप्रमाणे हे सर्व म्हणजे पृथिवी व पृथिवीमात्रा म्हणजे गंध, पाणी आणि आपोमात्रा म्हणजे रस (चव), तेज आणि तेजोमात्रा म्हणजे रूप, वायु आणि वायुमात्रा म्हणजे स्पर्श, आकाश आणि आकाशमात्रा म्हणजे शब्द, डोळे आणि विषय, कान आणि ऐकण्याचे विषय (शब्द), घ्राण (नाक) आणि घ्राणाचे गंधरूपी विषय, रसना [जिव्हा] आणि जिव्हेचे रसरूपी

विषय, त्वचा आणि त्वचेचे विषय [ स्पर्श ], वाणी (वागिंद्रिय) आणि बोलणें, हात आणि हातानें घेणें, उपस्थ आणि त्याचें मैथुनरूपी कार्य, गुद आणि त्याचें विसर्जन कार्य, पाद आणि चालणें, मन आणि विचार करणें, बुद्धि आणि जाणणें, अहंकार आणि अहंक्रिया, चित्त आणि चेतना, तेज आणि प्रकाशणें म्हणजे कठ ५।१५ येथील "तस्य भासा सर्वमिदं विभाति" ह्यात म्हटल्याप्रमाणे विषयांना प्रकाशित करणें, प्राण आणि जिवंत राहणें [ धारयितव्य ] पर आत्म्याकडे जाऊन राहतात ॥ ७–८ ॥ हे मागील खंडात सांगितलेलेच झोपेच्या वेळीं पर आत्म्याकडे जातात व राहतात असें नाही तर हा पाहणारा, स्पर्श जाणणारा [ स्प्रष्टा ], श्रवण करणारा, वास घेणारा, चव घेणारा [ रसयिता ], मनन करणारा, जाणणारा, क्रिया करणारा, विज्ञानात्मा पुरुष म्हणजे जीव देखील झोपेंत त्या पर अक्षर अविनाशी आत्म्याकडे जातो आणि त्या पर अक्षर आत्म्यातच जाऊन मिळतो [ प्रतिपद्यते ]

टिप्पणी—वाक्य सहावें व हीं तीन वाक्यें ह्यात झोपेचें वर्णन आहे हें उघड आहे कारण सहाव्या वाक्यात आणि सातव्यात व आठ यातहि झोपेचें वर्णन आहे हें निर्विवाद आहे. श्रीशंकराचार्यहि असेंच म्हणतात तो वर्णावयाचा विषय नवव्यात बदलला असें दाखविणारा एकहि शब्द नवव्या वाक्यात नाही तसे शब्द पुढील दहाव्या वाक्यातच आहेत व ते "स यो ह वै . अक्षर वेदयते" हे होत. ह्यावरून मागील नवव्या वाक्यातील वर्णन, झोपेचें होय असें ठरतें असें वर्णन छांदोग्य ६।८।१ येथेहि आहेच अर्थात् हें झोपेचें वर्णन होय असें म्हणण्यास हरकतहि कोणती नाहीच

प्रश्न ४ वाक्य १०–११

स यो ह वै तदच्छायमशरीरमलोहितं शुभ्रमक्षरम् वेदयते । यस्तु सोम्य ! स सर्वज्ञः सर्वो भवति ॥१०॥ तदेष श्लोकः ।

विज्ञानात्मा सह देवैश्च सर्वैः ।
प्राणा भूतानि संप्रतिष्ठंति यत्र ॥
तदक्षरं वेदयते यस्तु सोम्य ।
स सर्वज्ञः सर्वमेवाविवेश ॥ इति ॥११॥

अर्थ—हे बाळा, मोठेंच जीव ज्यांत जाऊन मिळतो, त्या जीवरूपी छाया ज्याला नाही, शरीर ज्याला नाही व रक्तहि [लोहित] ज्याला नाही त्या शुभ्र म्हणजे आनंदरूपी पर अक्षराला जो जाणतो [वेदयते] तो सर्वज्ञ होतो आणि सर्व होतो म्हणजे सर्वभूतें मी आहे असें मानतो. ॥१०॥ याच संबंधानें हा श्लोक आहे. सर्व इंद्रियांसह [सह देवैः] हा विज्ञानात्मा म्हणजे जीवात्मा, प्राण, आणि भूतें ज्यामध्ये जाऊन मिळतात, ते पर अक्षर जो जाणतो, तो, हे बाळा! सर्वज्ञ होतो आणि सर्वामध्ये प्रवेश करतो म्हणजे सर्वभूतें मीच आहे असें मानतो. ॥११॥

टिप्पणी—दहावें आणि अकरावें ह्या दोन वाक्यांत जीवाची ज्ञानावस्था हेंच त्याचें परम साध्य आहे असें सूचित केलें आहे आणि त्या अक्षरापेक्षां पर्यंतहि ही जोडणी केलें आहे. जीव शेवटच्या वेळीं त्या अक्षरांत जाऊन मिळतात तें अक्षर सर्व जीवांत भिन्न नाही —अर्थात् एकच आहे म्हणून परिणामतः सर्व जीव एकच आहेत असें ज्ञान ज्याला होतें तोच खरा सर्वज्ञ आणि तो सर्व जीव मीच आहे असें मानतो असा ह्या वाक्यांचा अर्थ आहे. आणि ही अवस्था जीवाचें परम साध्य आहे असा भावहि ह्या वाक्यामध्ये आहे.

“अच्छायम्”—पद ११ येथे, अच्छाया पुढें आणि जीवात्मा त्याची छाया म्हणजे प्रतिबिंब म्हटलें आहे. त्याच अर्थानें येथे छाया शब्द योजला असें मानून आम्ही अर्थ केला आहे.

## प्रश्न ५

प्रश्न ५ वाक्य १

अथ हैनं शैब्यः सत्यकामः पप्रच्छ । स यो ह वै तद् भगवन् ! मनुष्येषु प्रायणांतमोंकारं अभिध्यायीत कतमं वाव स तेन लोकं जयति इति ॥१॥

अर्थ—सत्यकाम शैब्याने पिप्पलायनास विचारलें, "हे भगवन् मनुष्यांपैकी जो कोणी ह्या मागील प्रश्नांत वर्णिलेल्या [तत्] ओंकाराचें म्हणजे जागृति, स्वप्न व निद्रा ह्या तीन अवस्थांची प्राप्ती होईपर्यंत ध्यान करील म्हणजे पुनः पुनः विचार करील, तो त्याने कोणता लोक मिळवील [जयति].

टिप्पणी—मागील प्रश्नांत पर आत्म्याला जाणणारा सर्वज्ञ होतो आणि सर्व भूतांत प्रवेश करतो असें सांगितलें आहे. ह्या प्रश्नांत पर आत्म्याला जाणण्याचा उपाय सांगितला आहे. तो ओंकाराचें ध्यान करणें म्हणजे जागृति, स्वप्न व निद्रा यांचा पुनःपुनः विचार करणें हा होय. मांडुक्यांत अ म्हणजे जागृति, उ म्हणजे स्वप्न आणि म् म्हणजे निद्रा हें स्पष्ट सांगितलेंच आहे. ( हेच तीन ओचे तीन भाग म्हणजे तीन मात्रा होत ). ह्या उपनिषदांतहि मागील चवथ्या प्रश्नांत जागृति, स्वप्न व निद्रा ह्यांचें वर्णन करून पुढे पांचव्या प्रश्नांत "तत् ओंकार" असा निर्देश केला आहे, ह्याचा अर्थ मागील प्रश्नांत वर्णिलेला ओंकार म्हणजे जागृति, स्वप्न व सुषुप्ति असाच होतो. पुढील वाक्यांतहि, "परं चापरं च ब्रह्म यदोंकारः" असें म्हटलें आहे. त्यावरूनहि ओंकार म्हणजे जागृति, स्वप्न व सुषुप्ति हा अर्थ दिसून येतो, असें पुढील वाक्याच्या विवरणांत दाखविलें जाईलच. "तत्" हें पद नपुंसकलिंगी आहे तें ओंकारं ह्या पुल्लिंगी पदाचें विशेषण आहेच कां मानलें असा कोणी प्रश्न करील त्यास उत्तर असें की पुढील वाक्यांतच "यद् ओंकारम्"

असा शब्दप्रयोग आहे व त्यांत "यद्" हें नपुंसकलिंगी पद "ओंकार" या पुल्लिंगी पदाचें विशेषण मानावेंच लागतें म्हणून येथेहि तसाच प्रयोग आहे असें अनुमान होतें.

"प्रायणांत" म्हणजे मरणापर्यंत असा अर्थ आजपर्यंत करीत आले आहेत. पण तो चूक आहे. "प्रायण" म्हणजे "प्राप्ति" असाहि अर्थ होतो व तोच येथे जुळतो. कारण ब्रह्माची प्राप्ति मरणानंतरच होते असें नाही. मरणापूर्वीहि ब्रह्माची प्राप्ति होतेच असें "अत्र ब्रह्म समश्नुते" ह्या कठवल्ली ६।१४ येथील वाक्यांत स्पष्ट सांगितलें आहे. त्या मरणापूर्वीच्या ब्रह्मप्राप्तीला अवकाश ठेवण्याकरिता "प्रायणांत" याचा अर्थ मरणापर्यंत असा न करतां प्राप्तीपर्यंत असाच केला पाहिजे. व्यासपूत्र ४।१।१२ येथेहि हा "प्रायण" शब्द आला आहे व त्याचा अर्थ पुढील सूत्रांतील "अधिगम" या शब्दावरून "प्राप्ति" असाच ठरतो. (तेथील आमचें विवरण पहा.)

"ओंकारं अभिध्यायीत" म्हणजे नुसतें ओं ओं करीत बसणें नव्हे. ओम् म्हणजे जागृति, स्वप्न व निद्रा या तीन अवस्थांचा विचार करून त्यावरून सिद्धांत ठरविणें व तो सिद्धांत पुनः पुनः आठवून आचरणांत आणणें याला ध्यान म्हटलें पाहिजे. तो सिद्धांत आचरणांत भिनून जाणें–मुरणें-यालाच प्रायण किंवा प्राप्ति म्हटलें आहे. या तीन अवस्थांच्या विचारावरून सिद्धांत कोणकोणते ठरतात तें पुढे स्पष्ट होईलच. "लोक" म्हणजे "अवस्था" हा अर्थ स्पष्टच आहे. लोक म्हणजे "अवस्था" असाहि अर्थ होतो हें उपसंहार प्यारा २८ येथे दाखविलेंच आहे.

**प्रश्न ५ वाक्य २**

तस्मै स होवाच । एतद्वै सत्यकाम ! परं चापरं च ब्रह्म यद् ओंकारः। तस्माद्विद्वानेतेनैवायतनेनैकतरमन्वेति ॥२॥

**अर्थ**—त्या शिष्याला ते पिप्पलाद ऋषी म्हणाले,—"हे सत्यकामा, हा जो ओंकार आहे तो, अपर ब्रह्म म्हणजे "जीव" आणि परब्रह्म म्हणजे ब्रह्मस्र जीव किंवा ईश्वरहि होय. म्हणून ह्या ओंकाररूपी साधनाने [आयतनेन] विद्वान् मनुष्य त्या दोहोंपैकी कोणत्या तरी एकास [एकतरं] जाऊन पोचतो. म्हणजे जो केवळ जीवाची (अपरब्रह्माची) उपासना करील तो जीवावस्थेचा हलका आनंद भोगील पण जो परब्रह्माची म्हणजे ब्रह्मसजीवावस्थेची उपासना करील म्हणजे प्रत्येक जीव ब्रह्मच मानून त्याची उपासना करील तो अत्यंत श्रेष्ठ आनंदाचा उपभोग घेईल असा भाव आहे. अर्थात् ब्रह्मस जीवावस्थेस प्राप्त होईल.

**टिप्पणी**—"*आयतन*"—हा शब्द यत् म्हणजे प्रयत्न करणें ह्या धातूपासून झाला आहे व त्याचा अर्थ "साधन" असा होतो. "आयतन" म्हणजे स्थान असा जो प्रसिद्ध अर्थ आहे तो येथे युक्त नाही. "*आत्मप्राप्तिसाधनेन*" असाच अर्थ श्रीशंकराचार्यांनीहि केला आहे. "आयतन" ह्याचा हा अर्थ केनोपनिषद् ४।८ येथेहि जुळूं शकतो.

"परं चापरं च ब्रह्म"—"अपरं ब्रह्म" म्हणजे "जीव" आणि "परं ब्रह्म" म्हणजे "ईश्वर" किंवा "ब्रह्मस जीव" हे अर्थ उघड आहेत. जीवाच्या तीन अवस्था जागृति, स्वप्न व सुषुप्ति या आहेत. म्हणून जीव म्हणजे ह्या तीन अवस्था, आणि ओंकार जर जीव होय तर ओंकार म्हणजे ह्या तीन अवस्था किंवा ओंकाराच्या तीन मात्रा म्हणजे ह्या तीन अवस्था हा अर्थ स्पष्ट आहे. जीवाचेंच उन्नतरूप म्हणजे *ब्रह्मस जीव आणि जीवाचेंच अनाविष्कृत रूप* म्हणजेच ईश्वर किंवा परम ब्रह्म म्हणून ओंकारच अपरब्रह्म व परब्रह्म असें म्हणतां येतें.

स यद्येकमात्रमभिध्यायीत स तेनैव संवेदितः तूर्णमेव जगत्यामभिसंपद्यते । तमृचो मनुष्यलोकमुपनयंते स तत्र तपसा ब्रह्मचर्येण श्रद्धया संपन्नो महिमानमनुभवति ॥३॥

अर्थ—तो जर ओंकाराच्या एकाच मात्रेचा म्हणजे अ ह्या मात्रेचा म्हणजे जागृतीचाच विचार करील, तर त्यानेच त्याला ज्ञान होऊन [संवेदितः] तो लवकरच [तूर्णमेव] म्हणजे ह्या जन्मांतच ह्या जगांत म्हणजे पृथ्वीवर राहूं लागतो [अभिसंपद्यते]. त्याला ऋचा म्हणजे त्याच्या वासना मनुष्यलोकास नेतात. म्हणजे त्याला त्याच्या वासना पशूचा मनुष्य बनवितात. त्या मनुष्यलोकांत तो तपाने म्हणजे विषयानंदत्यागाने, ब्रह्मचर्याने म्हणजे ज्ञान मिळविण्याच्या प्रयत्नाने आणि श्रद्धेने म्हणजे उत्कट इच्छेने म्हणजे त्या इच्छेमुळे होणाऱ्या कर्मांनी तो संपत्तीने युक्त होऊन [संपन्नः] मोठेपणाचा म्हणजे उत्तम प्रकारच्या विषयानंदाचा, किंवा छांदोग्य ७ । २४ येथे सांगितलेल्या महिमा शब्दाच्या अर्थाप्रमाणे, गाई, घोडे, दास, दासी वगैरे ऐश्वर्याचा अनुभव घेतो. ॥३॥

टिप्पणी—आनंद कसा मिळतो हा विचार तो फक्त जागृति स्थितिचाच विचार करून करतो. त्याला विषयसंपर्क हेंच आनंदाचें साधन दिसतें. त्यामुळे जास्तींत जास्त विषयानंद हें जीवितसाध्य त्याला दिसतें. व त्याकरिता कांहीसा इंद्रियसंयम, ज्ञान आणि कर्मे हीं साधनांची आवश्यकता त्यास दिसते व त्या साधनांचा उपयोग करून तो जास्तीत जास्ती विषयानंद मिळवितो असा या वाक्याचा भाव आहे.

कोणी अशी शंका घेईल की येथील साधनें आणि मागे प्रश्न १ वाक्य १० किंवा १५ येथे सांगितलेलीं आदित्य लोकाचीं किंवा ब्रह्मलोकांचीं साधनें एकच असतां येथे फळ भिन्न कां सांगितलें. ह्याचें

उत्तर असें—एकतर, साधनें जरी तींच असलीं तरी साध्य भिन्न असल्यामुळे त्या साधनांचा उपयोग भिन्न प्रकारें किंवा कमी जोराने केला जातो आणि म्हणून फळहि भिन्न येतें. दुसरें असें की, वाक्य दहावें येथे विद्या आणि वाक्य पंधरावें येथे "सत्य" म्हणजेच आत्मज्ञान हें जें साधन सांगितलें आहे तें साधन येथे नाही. त्यामुळे साधनच भिन्न होतें. येथील साध्य विषयानंद आहे तर तेथील साध्य विषयनिरपेक्ष असा आत्मानंद आहे. तिसरें असें की ब्रह्मचर्य ह्याचा अर्थ दोनहि ठिकाणीं एकच नाही. दोनहि ठिकाणीं ब्रह्मचर्य ह्याचा अर्थ विषयानंदत्याग असा घेताच येत नाही. कारण येथे तो अर्थ "तपः" ह्या शब्दाने व्यक्त केलेलाच आहेच. प्रश्न १ वाक्य दहावें किंवा पंधरावें येथे ब्रह्मचर्य ह्याचा अर्थ ज्ञान मिळविण्याचा प्रयत्न असा घेतां येत नाही. कारण तेथे "विद्या" किंवा सत्य म्हणजे आत्मज्ञान हें एक साधनच सांगितलें आहे, म्हणून तें मिळविण्याचा प्रयत्न निराळा सांगण्याची गरज नाही. येथे "ब्रह्मचर्य" म्हणजे ब्रह्मावें अद्वैत वासनाराहित्य हे गुण आपल्या वर्तनांत आणणें असा अर्थ घेतां येत नाही, कारण येथे त्या पुरुषास ब्रह्मज्ञानच नाही. एकूण दोन ठिकाणचीं साधनेंहि भिन्न आहेत.

"ऋचः"—परोक्षवादविवरणतत्वाप्रमाणे "ऋचः" ह्याचा अर्थ वासना असा करावा लागतो. ऋग्वेदामध्ये मला अमकें दे, तमकें दे अशा प्रार्थना असतात व त्या वासनामूलक असतात, म्हणून "ऋचः" ह्याचा अर्थ "वासना" असा होतो. तैत्तिरीयोपनिषद् २।३ ह्यांत मनोमय आत्म्याचें यजुर् हें शिरः, ऋग् दक्षिण बाहू आणि साम उत्तर बाजू होय असें म्हटलें आहे. ह्यावरून, ऋग्, यजुर् आणि साम हे मनाचे व्यापार ठरतात. ह्याने ऋग्, यजुर् आणि साम ह्यांचा परोक्षवादविवरणपद्धतीने आम्हीं जो अर्थ केला आहे त्यास पुष्टिच मिळते.

प्रश्न ५ वाक्य ४

अथ यदि द्विमात्रेण मनसि संपद्यते सोऽन्तरिक्षं यजुर्भिरुन्नीयते सोमलोकं स सोमलोके विभूतिमनुभूय पुनरावर्तते ॥४॥

अर्थ.—जो कोणी "अ" व "उ" या दोनहि मात्रांचा म्हणजे जागृति व स्वप्न या दोनहि अवस्थांचा मनात विचार करतो [ मनसि संपद्यते ], त्याला गोड कल्पना [ यजुर्भि. ] दोन लोकांमध्ये असलेल्या [ अंतरिक्षं ] सोमलोकांत म्हणजे मनोराज्यात नेतात आणि तो तेथे आनंदाचा [विभूति] अनुभव घेऊन मनुष्य लोकात परत येतो. ॥४॥

टिप्पण—जागृतिस्थितीचाच विचार केला तर इंद्रियांचा विषयांशी संपर्क झाल्याने आनंद होतो असें दिसतें. परंतु स्वप्नांत विषयांचा इंद्रियांशी संपर्क होत नसूनहि सुखदुःखें होतात यावरून केवळ कल्पनांनी हीं सुखदुःखें होतात असें जागृति व स्वप्न ह्या दोनहि अवस्थांचा विचार करणारा जाणतो व तो गोड कल्पना [ यजुष् ] म्हणजेच मनोराज्यें करून आनंदाचा अनुभव घेतो. पण केवळ कल्पनांनी भूक तहान वगैरे दुःखें टळत नाहीत. म्हणून केवळ कल्पनांनी त्यांचा निभाव लागत नाही, व त्यामुळे तो पुनः मनुष्यांच्या लोकात येतो म्हणजे मागील वाक्यात सांगितल्याप्रमाणे वागतो म्हणजे कर्में करतो असा ह्या वाक्याचा भाव आहे. येथे "अंतरिक्षांतील सोमलोक" म्हणजे मनोराज्यस्थिति असा अर्थ परोक्षवाद विवरण पद्धतीप्रमाणे घेतला पाहिजे आणि तसें करण्यास आधारहि आहेच. अंतरिक्ष म्हणजे पृथ्वी व सूर्य ह्यामधील जागा व ह्या जागेतच सोम म्हणजे चंद्र आहे. त्याप्रमाणेच मागील वाक्यात वर्णिलेला मनुष्यलोक व पुढील वाक्यात वर्णिलेला ब्रह्मलोक ह्यामध्ये मनोराज्यस्थिति आहे. मनुष्यलोक, सोमलोक व ब्रह्मलोक हे तीनहि जागृतींतीलच अवस्था आहेत आणि त्यांपैकी

ब्रह्मलोक हा सूर्याच्या ठिकाणी आहे. कारणं पुढील वाक्यांत "सूर्ये संपन्नः" असें म्हटलेंच आहे. आणि मनुष्यलोक हा पृथिवीच्या ठिकाणी आहे "जगत्यां अभिसंपद्यते" । आहे. अर्थात् मनोरा ज्यास अंतरिक्षातील सोमलोक म्हणणं योग्यच आहे.

पुढील कोष्टकाने ह्याचा खुलासा चांगला होईल.

| कार्य | स्थान | लोक | अवस्था |
|---|---|---|---|
| कर्मांनी वासनापूर्ति | पृथिवी= | मनुष्यलोक= | अज्ञानाची जागृति |
| कल्पनांनी वासनापूर्ति | अंतरिक्ष= | सोमलोक= | मनोराज्यें करणाऱ्याची जागृति |
| वासनात्याग व कर्में | सूर्य= | ब्रह्मलोक= | ब्रह्मज्ञानाची जागृति |

येथे यजुष् म्हणजे 'गोड कल्पना' म्हणजे मनोराज्य असा अर्थ घेतला आहे. त्याचें कारण असें--"यजुष्" ह्यात मूळ धातू यज् म्हणजे पूजा करणें हा आहे. देवतांची पूजा हाच यजुर्वेदाचा विषय आहे. देवतांची पूजा करतांना आपण अनेक कल्पना करतों. (देवताहि कल्पितच आहेत) जसें देवतांस स्नान घालणें, वस्त्र घालणें, धूप देणें वगैरे व त्या कल्पनांपासून आपणास आनंद होतो. (अशा कल्पना स्वतःविषयीहि करतां येतात.) म्हणून यजुष् म्हणजे गोड कल्पना असा अर्थ होतो.

**प्रश्न ५ वाक्य ५–७**

यः पुनरेतं त्रिमात्रेणोमित्येतेनैवाक्षरेण परं पुरुषमभिध्यायीत स तेजसि सूर्ये संपन्नः । यथा पादोदरस्त्वचा.

विनिर्मुच्यत एवं ह वै स पाप्मना विनिर्मुक्तः स सामभिरु-न्नीयते ब्रह्मलोकं स एतस्मात् जीवघनात्परात् परं पुरिशयं पुरुषमीक्षते ॥५॥ तदेतौ श्लोकौ भवतः ।

तिस्रो मात्रा मृत्युमत्यः प्रयुक्ताः ।
अन्योन्यसक्ता अनविप्रयुक्ताः ॥
क्रियासु बाह्याभ्यंतरमध्यमासु ।
सम्यक् प्रयुक्तासु न कंपते ज्ञः ॥६॥
ऋग्भिरेतं यजुर्भिरंतरिक्षं ।
सामभिर्यत्तत्कवयो वेदयंते ।
तमोंकारेणैवायतनेनान्वेति विद्वान् ।
यत्तच्छांतमजरममृतमभयं परं चेति ॥७॥

अर्थ—जो विद्वान् ॐ या अक्षराच्या तीन मात्रा म्हणजे जागृति, स्वप्न व निद्रा या ज्या तीन अवस्था त्यांच्या साधनाने पर पुरुषाचा म्हणजे जीवाच्या श्रेष्ठ स्थितीचा विचार करतो, तो तेजोरूपी सूर्यात मिळून जातो [ संपन्न ] म्हणजे ब्रह्मज्ञ जीवावस्थेस प्राप्त होतो, म्हणजे सर्प जशी आपली त्वचा टाकून देतो, त्याप्रमाणे तो आपले पाप टाकून देतो, म्हणजे आपल्या वासना टाकून देतो ( कारण वासनापूर्तिशिवायहि झोपेंत सुख होतें असें त्याला दिसतें ). तो सामानी म्हणजे अद्वैत भावनेने म्हणजे सर्व जीवांत एकच परमात्मा आहे या भावनेने ब्रह्मलोकास नेला जातो आणि तो या श्रेष्ठ [ परात् ] अशा अनाविष्कृत ब्रह्मापेक्षांहि [ जीवघनात् ] म्हणजे निद्रास्वरूपी ईश्वरापेक्षाहि श्रेष्ठ [ परं ] अशा शरीरांत राहणाऱ्या [ पुरिशयम् ] पुरुषास म्हणजे ब्रह्मज्ञ जीवात्म्यास पाहतो, म्हणजेच ब्रह्मज्ञ जीवावस्थेचा अनुभव घेतो. ॥५॥ याविषयी पुढील श्लोक आहेत. या तीन मात्रा म्हणजे जागृति, स्वप्न व सुषुप्ति या तीन

अवस्था एकमेकींस सोडून असूं शकत नाहींत [अन्योन्यसक्ताः]. कारण एकीनंतर दुसरी हें रहाटगाडगें चालूच आहे. असें असून आपण जर त्यांचा अलग अलग करून [अनविप्रयुक्ताः] उपयोग केला [प्रयुक्ताः] म्हणजे केवळ जागृतींतच, केवळ स्वप्नांतच किंवा केवळ निद्रेंतच राहिलें तर त्यापासून मृत्यु येतो. परंतु या बाह्य, आंतील [अभ्यंतर] आणि मधील क्रियांचा म्हणजे जागृति, निद्रा आणि स्वप्न यांतील क्रियांचा जर चांगला उपयोग केला [सम्यक् प्रयुक्तासु] म्हणजे एकत्र मिळून मर्यादितपणें योग्य उपयोग केला तर ज्ञानी मनुष्य मुळापासून चलित होत नाही [न कंपते]. किंवा अवस्थात्रयांच्या सदुपयोगाने, कीर्तिरूपाने मृत्यूनंतरहि कायम राहण्याची खात्री असल्यामुळे तो मृत्यूला भीत नाही. (छांदोग्य २। १० वरील आमचें भाष्य पहा.) ॥६॥ वासनांनी [ऋग्भिः] या विषयानंदरूपी लोकास मनुष्य प्राप्त होतो. गोड कल्पनांनी [यजुर्भिः] तो मनोराज्यरूपी अंतरीक्ष लोकांस प्राप्त होतो. आणि सामांनी म्हणजे अद्वैतभावनांनी शहाणे मनुष्य जो लोक मिळवितात [वेदयंते] तो शांत, अजर म्हणजे क्षीण न होणारा, अमृत म्हणजे परमानंदयुक्त, अभय आणि सर्वांमध्ये श्रेष्ठ [परं] लोक या ओंकाराच्या साधनानेंच विद्वान् मनुष्य मिळवितो. ॥७॥

टिप्पणें—झोपेंत अद्वैत असतें म्हणजे दुसरें कांही दिसतच नाही. त्यामुळे वासना, भय आणि दुःखहि नसतें. म्हणजे एक प्रकारचें सुखच असतें. पण त्या झोपेच्या सुखाचें मान म्हणजेच जाणीव झोपेच्या वेळीं नसतें. म्हणून तें सुख कमी दर्जाचें ठरतें आणि जाणीव जागृतींतच असूं शकते. म्हणून जागृतींत अद्वैतभावना करणें आणि वासनात्याग करणें हेंच श्रेष्ठ सुखाचें साधन ठरतें. हें तीनहि अवस्थांचा विचार करून ठरतें. त्याप्रमाणे शहाणा मनुष्य वागतो आणि श्रेष्ठ आनंदाचा अनुभव घेतो. हाच ह्या तीन वाक्यांचा भाव आहे.

तेजसि सूर्ये—तेजस् सूर्य म्हणजे तेजाने म्हणजेच आनंदाने युक्त अशी प्रज्ञ जीवावस्था. "आदित्यो ब्रह्मेत्यादेशः" असें छांदोग्य ३।१९ येथे म्हटलेंच आहे. आणि तेथेच पुढे "अथ यत्तदजायत सोऽसावादित्यः" असें म्हटलें आहे. यावरून आदित्य म्हणजे जीव असा तेथील अर्थ उघड आहे. येथे सूर्याला "तेजस्" हें विशेषण लाविलें आहे आणि तेजस् म्हणजे प्रज्ञान व तज्जनित आनंद, म्हणून तेजस् सूर्य म्हणजे प्राज्ञ जीव म्हणजेच त्याची अवस्था असाच अर्थ येथे योग्य आहे. छांदोग्य १।६–७ येथेहि आदित्याच्या आंतील किंवा डोळ्यांतील पुरुष वर्णिला आहे तो प्राज्ञ, जीवच होय, असें व्याससूत्रें १।१।२०–२१ यावरील विवरणांत आम्ही दाखविलें आहे.

३ सामः—साम म्हणजे कलहाभाव; अद्वैतभावनेशिवाय कलहाभाव पूर्णपणें असत नाही, म्हणून साम म्हणजे अद्वैतभावना असा अर्थ घ्यावा लागतो. साम म्हणजे अद्वैत भावना म्हणजेच ऐक्यभावना हा अर्थ जो आम्ही केला त्याला मांडूक्योपनिषदांत आधार आहेच. कारण तेथे खंड ७ मध्ये चवथ्या पादाचें म्हणजेच प्राज्ञी स्थितीचें म्हणजेच प्राज्ञ जीवावस्थेचें वर्णन करतांना "एकात्मप्रत्ययसारम्" असें विशेषण योजिलें आहे. अद्वैत भावनेने विशेषेकरून दुःखद वासनांचाहि त्याग होतोच, म्हणून अद्वैत भावनेने ज्योर्तेतत्याप्रमाणें वासनाभावहि असतोच हें सर्वांत ठेवावें.

४ "जीवघनात् परात् परं पुरुषं"—"जीवघन" म्हणजे काय? "जीवघन" म्हणजे जीवच असा अर्थ असता तर "घन" या शब्दाचें लोढणें त्याच्या मागे लावण्याची गरज नव्हती. जीवावस्थेतच ज्ञान संभवतें म्हणून जीव आणि ज्ञान, विज्ञान किंवा प्रज्ञान हे शब्द समानार्थकच समजले पाहिजेत. अर्थात् "जीवघन" आणि "प्रज्ञानघन" हे शब्द समानार्थक ठरतात; "प्रज्ञानघन" हा शब्द मांडूक्योपनिषदांत निद्रावस्थेस लाविला आहे आणि ती निद्रावस्थाच ईश्वर

होय असें तेथेच पुढे म्हटलें आहे यावरून जीवघन म्हणजें ईश्वर म्हणजेच अनाविष्कृत ब्रह्म असा अर्थ स्पष्ट आहे तें सामान्य जीवापेक्षा श्रेष्ठ आहेच म्हणून त्याला परात् हें विशेषण लाविलें, पण ब्रह्मज्ञ जीव त्या अनाविष्कृत ब्रह्मापेक्षा श्रेष्ठ म्हणून त्याला "जीवघनात् परात् पर" असें विशेषण लावलें. निद्रेला प्रज्ञानघन असें नाव का लाविलें ह्याचें कारण माण्डुक्याच्या विवरणांत दिलें आहे तें पहा आणि व्याससूत्र १।३।१३ ह्याचेंहि आमचें विवरण पहा कारण येथील आमचें म्हणणें तेथे सविस्तर मांडलें आहे.

ब्रह्मलोक—ब्रह्मज्ञ जीवावस्थेलाच ब्रह्मलोक म्हणतात बृहदारण्यकोपनिषदांत ४।३।३२–३३ आणि ४।४।२३ येथील "एष ब्रह्मलोक सम्राट्" आणि एष. ब्रह्मलोक सम्राडेनं प्रापितोऽसि" ह्यावरून हें स्पष्टच आहे ह्या ब्रह्मलोकाचेंच वर्णन "तिस्रो मात्रा" इत्यादि पुढील श्लोकांत आहे. आणि तें "जागृति, स्वप्न आणि निद्रा ह्या क्रिया योग्य प्रकारें करणारा" असें आहे ह्यावरूनहि ब्रह्मलोक म्हणजे मरणापूर्वीची अवस्था ठरतें ब्रह्मलोकच जर मरणापूर्वीची अवस्था आहे तर सोमलोक व मनुष्यलोकहि मरणापूर्वीच्या अवस्था होत हें निश्चितपणें ठरतेंच

"वेदयते" हें "विंदते" ह्याचें णिजंतरूप आहे पण त्याचा अर्थ "विंदते" असाच घ्यावा लागतो "क्रियासु बाह्याभ्यंतरमध्यमासु सम्यक्प्रयुक्तासु"—स्वप्न व सुषुप्ति ह्यांतील क्रिया योग्य रीतीने कशा करावयाच्या असा प्रश्न येतो त्याचें उत्तर असें की जागृतींतील क्रिया योग्य रीतीने केल्यास स्वप्न व सुषुप्ति मधील क्रिया योग्य रीतीनें होतातच.

युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु
युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥

ह्या भगवद्गीतेंतील वचनातहि ह्याच श्लोकाचा अर्थ सांगितला आहे

"अजर" म्हणण्याचें कारण असें की ब्रह्मलोकांतील आनंद कधीच कमी होत नाही

"अनविप्रयुक्ताः"—"विप्रयुक्त" म्हणजे अलग अलग केलेलें, त्याला दोनदां नञ् लावून हें रूप झालें म्हणून ह्या रूपाचा अर्थ अलग अलग केलेलें असाच होतो.

## प्रश्न ६

**प्रश्न ६ वाक्य १**

अथ हैनं सुकेशा भारद्वाजः पप्रच्छ । भगवन् ! हिरण्यनाभः कौशल्यो राजपुत्रो मामुपेत्यैतं प्रश्नमपृच्छत । षोडशकलं भारद्वाज ! पुरुषं वेत्थ ? । तमहं कुमारमब्रवं नाहमिमं वेद यद्यहमिममवेदिषं कथं ते नावक्ष्यमिति । समूलो वा एष परिशुष्यति योऽनृतमभिवदति तस्मान्नार्हाम्यनृतं वक्तुम् । स तूष्णीं रथमारुह्य प्रवव्राज । तं त्वा पृच्छामि क्वासौ पुरुष ! इति ॥१॥

अर्थ—आता सुकेशा भारद्वाज त्या पिप्पलादऋषीला प्रश्न विचारता झाला. "हे भगवन्! कोशल देशांतील हिरण्यनाभ नांवाचा राजपुत्र माझ्याकडे येऊन पुसता झाला, 'हे भारद्वाजा ! षोडशकल म्हणजे सोळा कलांचा पुरुष तुला माहीत आहे काय ?' त्या कुमाराला मी उत्तर दिलें की 'मला तो पुरुष माहीत नाही. मला जर तो पुरुष माहीत असता तर मी तुला कसा सांगितला नसता ? जो खोटें बोलतो तो मूलासहित शुष्क होतो. म्हणून खोटें बोलणें मला योग्य नाही.' तेव्हा तो गुपचिप रथावर बसून चालता झाला. त्या तुला मी विचारतों "हा पुरुष कोठें आहे ?" ॥१॥

**प्रश्न ६ वाक्य २**

तस्मै सहोवाच । इहैवान्तःशरीरे सौम्य ! स पुरुषो यस्मिन्नेताः षोडशकलाः प्रभवन्तीति ॥२॥

**अर्थ**—त्या शिष्याला त्या ऋषीनें उत्तर दिलें "हे बाळ, येथेच ह्या शरीरातच आतल्या भागात, ज्यात ह्या सोळा कला उत्पन्न होतात, तो पुरुष आहे ॥२॥

**प्रश्न ६ वाक्यें ३-४**

स ईक्षाचक्रे । कस्मिन्नहमुत्क्रान्त उत्क्रान्तो भविष्यामि कस्मिन् वा प्रतिष्ठिते प्रतिष्ठास्यामि इति ॥३॥ स प्राण मसृजत प्राणाच्छ्रद्धा खं वायुर्ज्योतिराप पृथिवींद्रिय मनोऽन्न अन्नाद्वीर्यं तपो मन्त्रा कर्म लोका लोकेषु च नाम च ॥४॥

**अर्थ**—तो शरीरातच आहे असें मागील वाक्यात ज्याविषयीं म्हटलें तो पुरुष विचार करता झाला "कोण विकसित झाला असता [उत्क्रान्ते] मीहि विकसित होईन [उत्क्रान्तो भविष्यामि] आणि कोण प्रतिष्ठित झाला असतां मीहि प्रतिष्ठित होईल" ॥३॥ त्याने प्राण[1] उत्पन्न केला व त्यापासून श्रद्धा[2] उत्पन्न केली आकाश,[3] वायु,[4] अग्नि[5] [ज्योति] पाणी,[6] पृथिवी[7] इंद्रियें,[8] मना,[9] अन्न,[10] अन्नापासून वीर्य,[11] तपस्[12] (इंद्रियनिग्रह), प्रार्थना[13] [मन्त्रा] कर्में,[14] लोक[15] म्हणजे समाज आणि समाजामध्ये भाषा[16] [नाम] ह्या कला उत्पन्न झाल्या ॥४॥

**टिप्पणें**—"उत्क्रान्त"—"उत्क्रान्ति" म्हणजे शरीराच्या बाहेर जाणें म्हणजेच मरण असा अर्थ आजपर्यंतचे टीकाकार घेत आले पण तो बरोबर नाही अनाविष्कृत ब्रह्माचे आविष्कृत होण्यापूर्वी केलेल्या ईक्षणाच्या वर्णनात मी आविष्कृत कसा होईन हाच विचार असणें अधिक योग्य आहे म्हणून उत्क्रान्ति याचा अर्थ आविष्कृति म्हणजे विकास असा आम्ही केला आहे व तो अर्थ "उत्क्रान्ति" या शब्दाला असूहि शकतो "उत्क्रान्ति"चा मूळ अर्थ वर येणें, बाहेर येणें असा आहे.

अर्थात् बीजांतून वृक्ष व फळ बाहेर येतें त्याला, म्हणजे विकासालाहि तो शब्द लागता येतो. श्री व्यासानीहि "उत्क्रमिष्यत एवं भावादित्यौडु लोमि" १।४।२१ या सूत्रात "उत्क्रम्" हा धातु विसर्ग या अर्थानेच योजिला आहे (तेथील सूत्रें १६ ते २२ चें आमचें विवरण पहा.)

। "प्राण" म्हणजे जगांत झालेल्या व होणाऱ्या सर्व क्रियांना आधारभूत अशी शक्ति शरीराला जिवंत ठेवणारी अशी जी शक्ति, तिलाहि प्राण असेंच म्हणतात तो या शक्तीचाच एक प्रकार आहे

श्रद्धा—याचा अर्थ उत्कट इच्छा, पण येथेहि इच्छा जीवाची नसून ब्रह्माची आहे अशी इच्छा मानल्याशिवाय विकासाच्या निरनिराळ्या पायऱ्याची उपपत्ति लागत नाही उदाहरणार्थ, निर्जीव अशा पचमहाभूतातून सजीव जगत् निर्माण होणाऱ्या वेळीं अशी इच्छा झालेली असली पाहिजे "अनेन जीवेनाऽत्मनानुप्रविश्य नामरूपे व्याकरवाणीति" छांदोग्योपनिषद्—६।३।२ या वाक्यात सांगितलेली जी प्रवेशनक्रिया तिच्या बुडाशीं ही ब्रह्माची उत्कट इच्छा आहे असें मानणें भाग आहे म्हणून "श्रद्धा" याचा अर्थ विकासाची वरची पायरी उत्पन्न करणारी ब्रह्माची उत्कट इच्छा. "ईक्षणाला" ज्याप्रमाणे "ईक्षण" हा शब्द गौणार्थानें योजिला आहे, त्याप्रमाणेच "श्रद्धा" हा शब्दहि गौणार्थानें योजिला आहे "उपनिषदां"चा उपसंहार प्यारा ६५ पहा

**प्रश्न ६ वाक्य ५—६**

स यथेमा नद्यः स्यन्दमानाः समुद्रायणाः समुद्रं प्राप्यास्तं गच्छन्ति भिद्येते तासां नामरूपे समुद्र इत्येवं प्रोच्यते । एवमेवास्य परिद्रष्टुरिमाः षोडशकलाः पुरुषायणाः पुरुषं प्राप्यास्तं गच्छन्ति, भिद्येते तासां नामरूपे पुरुष इत्येवं प्रोच्यते स एषोऽकलोऽमृतो भवति । तदेष श्लोकः ॥

अरा इव रथनाभौ कला यस्मिन् प्रतिष्ठिता ।
त वेद्यं पुरुषं वेद यथा मा वो मृत्यु परिव्यथा ॥ इति ॥६॥

**अर्थ**—ज्याप्रमाणे ह्या वाहणाऱ्या [ स्यदमानाः ] समुद्र हाच ज्यांचें जाण्याचें ठिकाण आहे [ अयन ] त्या समुद्रात जाऊन मिळाल्या असता अस्त पावतात म्हणजे आपलें व्यक्तित्व टाकून देतात आणि त्याच्या नामरूपाचा नाश होतो [ भिद्येते ] आणि त्या नद्याना समुद्र असेंच म्हणतात, त्याप्रमाणेच ह्या सभोंवार म्हणजे सर्वत्र ब्रह्म पाहणाऱ्याच्या [ परिद्रष्टुः ] म्हणजे ब्रह्मज्ञाऱ्या सोळा कला, पुरुष म्हणजे ब्रह्मच त्याचें जाण्याचें ठिकाण [ अयन ] आहे त्या (मृत्यूनंतर) पुरुषात जाऊन मिळाल्या असता अस्त पावतात म्हणजे आपलें व्यक्तित्व टाकून देतात व त्याच्या नामरूपाचा नाश होतो आणि त्या कलाना पुरुष असेंच म्हणतात. ह्याप्रमाणे तो हा ज्ञानी जीव मेला असता [ मृत ] (फक्त) कलारहित होतो. म्हणजे नाश पावत नाही असा भाव आहे ॥५॥ त्यासंबधाने हा श्लोक आहे. ज्याप्रमाणे रथाच्या चाकाच्या नाभीवर त्याच्या अरा प्रतिष्ठित असतात त्याप्रमाणेच कला ज्यावर प्रतिष्ठित असतात अशा त्या जाणण्यास योग्य [वेद्य] अशा पुरुषास म्हणजे ब्रह्मास, तुम्हास मृत्यूपासून व्यथा होऊ नये ह्याकरिता म्हणजे मृत्यूचें भय तुम्हास वाटूं नये याकरिता [यथा] जाणून घ्या [वेद] कारण त्या ज्ञानाने तुम्हास समजेल की तुम्ही ब्रह्माचाच विकास आहात व शेवटीं ब्रह्मातच मिळाल, पण नाश कधीच पावणार नाही. ॥६॥

**टिप्पणी**—प्रश्न १ वाक्य दहावें यात ज्ञानी मनुष्य पुनः जन्मत नाही असें सांगितलें आहे, त्याची उपपत्ति येथे सांगितली आहे, आणि तो ज्ञानी मृत्यूनंतर नाश न पावता ब्रह्मात मिळतो म्हणून मृत्यूला भिऊं नये असेंहि सुचविलें आहे. वरील उपपत्ति अशी की ज्ञानी मृत्युकाळीं ब्रह्मलोकातून म्हणजे आदित्य लोकातून जाऊन ब्रह्मात विलीनच होतो. म्हणून तो पुनः जन्मत नाही. ज्ञानी मनुष्य

मरतच नाही असा अर्थ ह्या वाक्यांतून "अमृतः" असा पदच्छेद करून, काढणें बरोबर नाही, कारण ज्ञानी देखील मरतो हें निश्चित आहे.

"परिद्रष्टा"—मोववाल ब्रह्म पाहणारा म्हणजे ज्ञानी असा अर्थ होतो.

पुरुषायणः पुरुषं प्राप्याः—ज्ञानी मनुष्याच्याहि कला मेल्यानंतरच ब्रह्मांत मिळतात म्हणून 'मेल्यानंतर' असाच ह्या शब्दांचा अर्थ आहे. मरणापूर्वी ज्ञान्याच्या कला कायम असतात व तो जीवन्मुक्तीचा अनुभव घेत असतो.

प्रश्न ६ वाक्यें ७–८

स होवाचैतावदेवाहमेतत्परं ब्रह्म वेद नातःपरमस्तीति ॥७॥ ते तमर्चयंतस्त्वं हि नः पिता योऽस्माकमविद्यायाः परं पारं तारयसीति । नमः परमऋषिभ्यो नमः परमऋषिभ्यः ॥८॥

अर्थ—तो ऋषि म्हणाला "मी परब्रह्म एवढेंच जाणतो म्हणजे परब्रह्माचें मला एवढेंच ज्ञान आहे. ह्यापेक्षा अधिक [अतःपरं] ब्रह्माचें ज्ञान मला नाही. ॥७॥ त्या शिष्यांनी त्या ऋषीची पूजा करण्याकरिता [अर्चयंतः] म्हटलें, "तूं आम्हांस आमच्या अविद्येच्या पैलतीरास तारून नेलेंस त्या अर्थी तूं आमचा पिता आहेस." पिप्पलायनासारख्या श्रेष्ठ ऋषींना नमस्कार असो. पिप्पलायनासारख्या श्रेष्ठ ऋषींना नमस्कार असो.

टिप्पणः—"मला ब्रह्माविषयी एवढेंच ज्ञान आहे, अधिक नाही" ह्यावरून हें उपनिषद् पहिलेंच होय असें अनुमान होतें. कारण कोणत्याहि विषयावरच्या पहिल्या लेखकांतच असा विनय संभवतो. वेदांमध्ये असलेल्या इतस्ततः पसरलेल्या विचारांचें संकलन करून व स्वतःचेहि विचार त्यांत घालून ह्या उपनिषदाच्या कर्त्यानें हें उपनिषद् लिहिलें. अर्थात् हें पहिलेंच उपनिषद् आहे असें मानण्यास कोणतीच हरकत दिसत नाही.

---

# तैत्तिरीयोपनिषद्

**काल व कर्ता**—हें कृष्ण यजुर्वेदाचें उपनिषद् आहे. कृष्ण यजुर्वेदाचीच सुधारणा होऊन शुक्ल यजुर्वेद व त्याचें ब्राह्मण जें शतपथ ब्राह्मण तें व त्या ब्राह्मणातील बृहदारण्यकोपनिषद् झालें. यावरून तैत्तिरीयोपनिषद् बृहदारण्यकोपनिषद् आणि शुक्ल यजुर्वेदांतर्गत ईशोपनिषद् या दोहोंच्याहि पूर्वीचें असावें. तें छंदोबद्ध नाही म्हणून तें भगवद्गीतेच्या नंतरचें असावें. (छंदोबद्ध उपनिषदें ईशोपनिषद् धरून भगवद्गीतेपूर्वीचीं हें मागे दाखविलेंच आहे.) ह्याच्या कर्त्याचा थांग लागत नाही. शीक्षावल्लीचा कर्ता एखादा शिक्षक असावा असें तेथील चवथ्या अनुवाकातील "ब्रह्मचारी म्हणजे शिष्य मला मिळोत" ह्या प्रार्थनेवरून दिसतें, असें कोणी म्हणतात. तेव्हा ब्राह्मणच शिक्षकाचा धंदा करीत. अर्थात् तो ब्राह्मण होता असें म्हणता येईल.

**घटनेची योजना**—ह्याचे तीन भाग आहेत, त्यास शीक्षावल्ली, ब्रह्मानंदवल्ली आणि भृगुवल्ली अशीं नांवें आहेत. प्रत्येक वल्लीचे पोटभाग आहेत. त्यास अनुवाक असें म्हटलें आहे. शीक्षावल्लींत निरनिराळ्या शीक्षा वर्णिल्या आहेत. ब्रह्मानंद वल्लींत ब्रह्मज्ञान व त्यापासून होणारा आनंद वर्णिला आहे. भृगुवल्लींत तेंच दुसऱ्या रीतीनें व संवादरूपानें वर्णिलें आहे.

## शीक्षावल्ली

**शीक्षावल्ली अनुवाक १**

ॐ शं नो मित्रः शं वरुणः। शं नो भवत्वर्यमा। शं न इंद्रो बृहस्पतिः। शं नो विष्णुरुरुक्रमः। नमो ब्रह्मणे नमस्ते

*वायो । त्वमेव प्रत्यक्षं ब्रह्मासि । त्वामेव प्रत्यक्षं ब्रह्म वदिष्यामि । ऋतं वदिष्यामि । सत्यं वदिष्यामि । तन्मामवतु । तद्वक्तारमवतु । अवतु माम् । अवतु वक्तारम् । ॐ शांतिः शांतिः शांतिः ।*

अर्थ—मित्र, वरुण, अर्यमा, इंद्र, बृहस्पतिः आणि ऊरुक्रम म्हणजे मोठ्या वेगाने चालणारा विष्णु म्हणजे सूर्य आम्हांस सुखकारक [शं] होवोत. ब्रह्मास नमस्कार असो. हे वायो तुला नमस्कार असो. हे वायो, तूंच प्रत्यक्ष दिसणारें ब्रह्म आहेस. तूंच प्रत्यक्ष दिसणारें ब्रह्म आहेस असें मी सांगेन म्हणजे वर्णन करीन किंवा सिद्ध करीन. मी ऋत सांगेन आणि सत्यहि सांगेन. हे सांगणें मला सुख देवो [अवतु]. हें सांगणें सांगणाऱ्यास सुख देवो. हें सांगणें मला सुख देवो. हें सांगणें सांगणाऱ्यास सुख देवो.

टिप्पणी—शं म्हणजे कल्याण करणारा, सुखकारक.

उरुक्रमः—ऊरुः म्हणजे मोठा आहे क्रमः म्हणजे चालण्याचा वेग ज्याचा असा विष्णु म्हणजेच सूर्य.

वायुः—शरीरांतील प्राणशक्ति आणि शरीराबाहेर सर्वत्र संचरणारी शक्ति जिला प्रश्नोपनिषदांत "प्राण" असें म्हटलें आहे.

"त्वमेव प्रत्यक्षं ब्रह्मासि"—ब्रह्म हें प्रत्यक्ष कधीच दिसत नाही. त्यांचें आपण अनुमान करतो. पण त्या ब्रह्माची शरीरांत व शरीराबाहेर प्राणरूपाने संचरणारी शक्ति मात्र आपण प्रत्यक्ष पाहतों. म्हणून "हे वायो! तूं प्रत्यक्ष दिसणारें ब्रह्म आहेस" असें म्हटलें आहे.

"त्वामेव प्रत्यक्षं ब्रह्म वदिष्यामि"—"तूं प्रत्यक्ष दिसणारें ब्रह्म आहेस असें मी सांगेन" असें येथे म्हटलें आहे आणि शेवटच्या बाराव्या अनुवाकांत "त्वामेव प्रत्यक्षं ब्रह्मावादिषम्" म्हणजे "तूं प्रत्यक्ष दिसणारें ब्रह्म आहेस असें मी सांगितलें" असें म्हटलें आहे.

ह्यावरून मधील कोणत्या तरी अनुवाकात वायु अथवा प्राण प्रत्यक्ष ब्रह्म असल्याचें प्रतिपादन असलें पाहिजे पण तें कोणत्याच अनुवाकांत आहे असें दिसत नाही. म्हणून तसें प्रतिपादन करणारा अनुवाक् गळला असावा.

"ऋतु" आणि "सत्य"—"ऋतु" आणि "सत्य" हे विज्ञानाचे दोन पक्ष म्हणजे बाजू आहेत असें पुढे ब्रह्मानदवल्लीच्या चवथ्या अनुवाकात सागितलें आहे ह्यावरून विज्ञानाचेच हे दोन प्रकार आहेत असें दिसतें "ऋतु" म्हणजे शास्त्रात, म्हणजे, प्रथमध्ये जें सागितलें असेल तें ज्ञान आणि सत्य म्हणजे बुद्धीस जें समजेल आणि पटेल तें ज्ञान असा अर्थ करावा लागतो. ह्या दोनहि प्रकारानी झालेलें ज्ञान एकच असलें पाहिजे हें उघड आहे. म्हणून "ऋत वदिष्यामि सत्य वदिष्यामि" ह्याचा भावार्थ असा दिसतो की "जें शास्त्रप्रधात सागितलें आहे आणि बुद्धीसहि पटतें तें मी सागेन"

"अवतु"—"अवतु" म्हणजे "रक्षण करो" असा अर्थ इतर करतात, परतु "सुख देवो" असाहि त्याचा अर्थ करता येतो, (आपट्याचा कोश पहा) आणि हाच अर्थ येथे जुळतो, कारण ह सागितल्यानतर बाराव्या अनुवाकात "तन्मामावीत्" म्हणज त्याने माझें अवन केलें असें म्हटलें आहे सागण्याची क्रिया करीत असता-नाच तिने अवन करणे म्हणजे रक्षण करणें नसून आनद देणेंच असलें पाहिजे, शिवाय ही क्रिया रक्षण करण्यास समर्थ नसून आनद देण्यासच समर्थ आहे

शीक्षावल्ली अनुवाक २

ॐ शीक्षा व्याख्यास्याम । वर्ण स्वर । मात्रा बल ।
साम सतान । इत्युक्त शीक्षाध्याय ॥

**अर्थ**—आता शीक्षा म्हणजे काय तें सागतों वर्ण, स्वर, मात्रा, बल, साम, आणि सतान ह्यांविषयी ज्यात सागितलें असतें त्याला

शीक्षाध्याय म्हणतात. तो समजाऊन घेऊन त्याप्रमाणे योग्य उच्चार करावे असा भाव आहे.

टिप्पणी—वर्ण म्हणजे अकारादि.

स्वर म्हणजे उदात्त, अनुदात्त आणि स्वरित हे तीन प्रकार.

मात्रा म्हणजे ऱ्हस्व, दीर्घ आणि प्लुत.

बल म्हणजेच प्रयत्नविशेष, जसे अल्पप्राण, महाप्राण, संवार, विवार इत्यादि.

साम्न् म्हणजे सर्वांचे उच्चार समान जोराने करणें.

संहित म्हणजे स्वरसंधि, व्यंजनसंधि.

शीक्षावल्ली अनुवाक ३

सह नौ यशः । सह नौ ब्रह्मवर्चसम् । अथातः संहिताया उपनिषदं व्याख्यास्यामः । पंचस्वधिकरणेषु । अधिलोक-मधिज्योतिषमधिविद्यमधिप्रजमध्यात्मम् । ता महासंहिता इत्याचक्षते । अथाधिलोकम् । पृथिवी पूर्वरूपं । द्यौरुत्तररूपं । आकाशः संधिः ॥१॥ वायुः संधानम् । इत्यधिलोकं । अथाधिज्यौतिषं । अग्निः पूर्वरूपं । आदित्य उत्तररूपं । आपः संधिः । वैद्युतः संधानम् । इत्यधिज्यौतिषं । अथाधि-विद्यम् । आचार्यः पूर्वरूपं ॥२॥ अंतेवास्युत्तररूपं । विद्या संधिः । प्रवचनं संधानं । इत्यधिविद्यं । अथाधिप्रजम् । माता पूर्वरूपं । पितोत्तररूपं । प्रजा संधिः । प्रजननं संधानं । इत्यधिप्रजम् ॥३॥ अथाध्यात्मम् । अधरा हनुः पूर्वरूपं । उत्तरा हनुरुत्तररूपं । वाक् संधिः । जिह्वा संधानं । इत्यध्यात्मं । इतीमा महासंहिताः । य एवमेताः महासंहिता

*व्याख्याता वेद । संधीयते प्रजया पशुभिः । ब्रह्मवर्चसेनान्नाद्येन सुवर्ग्येण लोकेन ॥४॥*

अर्थ—आपणा दोघांना म्हणजे गुरुशिष्यांना मिळून यश मिळो. आपणा दोघांना म्हणजे गुरुशिष्यांना मिळून ब्रह्मतेज [ब्रह्मवर्चस्] प्राप्त होवो. (शिक्षण सुरू करण्यापूर्वी गुरूने म्हणावयाची ही प्रार्थना आहे.) आता संहितावें (विशिष्ट फळ मिळण्याच्या हेतूने एकमेकाजवळ येऊन विशिष्ट कर्म करणें ह्यास संहिता म्हणतात.) ज्ञान [उपनिषद्] सांगतों. पाच ठिकाणीं [अधिकरणेषु] असलेल्या संहिता सांगतों. लोकामध्ये असलेली, ज्योतिषामध्ये असलेली, विद्येसंबंधी असलेली, प्रजासंबंधी असलेली, आणि शरीरात असलेली [अध्यात्मं] अशा ह्या पाच संहिता आहेत. त्यांना महासंहिता असें म्हणतात. आता लोकामध्ये असलेली संहिता सांगतों. पृथिवी हें पूर्वरूप आणि द्यौः म्हणजे *सूर्यचंद्र जेथे फिरतात तो प्रदेश हें उत्तररूप (ह्या दोघांची) संहिता होते.* त्या संहितेपासून आकाश म्हणजे आकाशात राहणारीं वृक्षांचीं व वनस्पतींचीं फळें हें फळ [संधिः] उत्पन्न होते. वायु म्हणजे हवा हें संधान म्हणजे वरील फळ उत्पन्न करण्याचें साधन आहे. ही लोकामधील संहिता सांगितली. (सूर्यचंद्रांचीं किरणें हवेंतील पोषण घेण्यास झाडांस मदत करतात हें प्रसिद्धच आहे. आणि प्रश्नोपनिषद् १।१२–१३ ह्यात सांगितलेंहि आहेच.) आता ज्योतिषामधील म्हणजे उष्णता देणाऱ्यामधील संहिता सांगतों. अग्नि हें पूर्वरूप आहे आणि आदित्य हें उत्तररूप आहे. ह्या दोघांपासून पाणी म्हणजे पाऊस हें फळ उत्पन्न होतें. वीज हें पाऊस उत्पन्न करणारें साधन आहे. ही ज्योतिषामधील संहिता सांगितली. आता विद्येसंबंधीची संहिता सांगतों. आचार्य पूर्वरूप आहे, शिष्य उत्तररूप आहे. विद्या हें त्या दोघांपासून उत्पन्न होणारें फळ आहे. प्रवचन म्हणजे गुरूने शिष्यास शिकविणें हें विद्या उत्पन्न करण्याचें साधन आहे. ही विद्येसंबंधीची संहिता सांगितली. आता

प्रजेसंबंधींची संहिता सांगतों.- माता हें पूर्वरूप आहे. पिता हें उत्तररूप आहे. प्रजा हें फळ आहे. मैथुन हें साधन आहे. ही प्रजेसंबंधी संहिता सांगितली. आता शरीरांतील संहिता सांगतों. खालची हनुवटी हें पूर्वरूप आहे. वरची हनुवटी हें उत्तररूप आहे. वाणी हें फळ आहे आणि जिह्वा हें साधन आहे. ही शरीरांतील संहिता सांगितली. ह्या पांच महासंहिता सांगितल्या. या सांगितलेल्या महासंहिता जो जाणतो (म्हणजेच आचरणांत आणतो) त्याला प्रजा, पशु, ब्रह्मतेज, अन्न वगैरे आणि स्वर्गलोकहि मिळतो. ॥४॥

**टिप्पणें**—पृथिवींतून पीक उत्पन्न करणें, जो पाऊस पडतो त्याचा योग्य उपयोग करून घेणें, आचार्यांजवळून विद्या शिकणें, प्रजा उत्पन्न करणें, पशूंची वाढ करणें, वाणीचा शिकविण्याकडे आणि मधुर भाषणानें दुसऱ्याचें प्रेम संपादण्याकडे उपयोग करणें, ह्या क्रिया या अनुवाकांत करण्यास सांगितल्या आहेत, असें शेवटीं सांगितलेल्या फळा-वरून स्पष्ट आहे. ह्या फळांपैकी ब्रह्मवर्चस् म्हणजे ब्रह्मविद्येपासून मिळणारा आनंद किंवा इतर मनुष्यांवर मिळणारें वर्चस्व म्हणजेच वजन आणि स्वर्ग लोक म्हणजेच ब्रह्मलोक " म्हणजेच जीवन्मुक्तावस्था हें उघड आहे. केनोपनिषदांत ४ । ९ येथे " स्वर्गलोक ह्या शब्द ह्याच अर्थानें योजिला आहे.

### शीक्षावल्ली अनुवाक ४

यश्छंदसामृषभो विश्वरूपः । छंदोभ्योऽध्यमृतात्संबभूव ।
स मेंद्रो मेधया स्पृणोतु । अमृतस्य देवधारणो भूयासं । शरीरं
मे विचर्षणम् । जिह्वा मे मधुमत्तमा । कर्णाभ्यां भूरि विश्रुवम् ।
ब्रह्मणः कोशोऽसि मेधयाऽपिहितः । श्रुतं मे गोपाय ।
आवहन्ती वितन्वाना ॥१॥ कुर्वाणाचीरमात्मनः । वासांसि
मम गावश्च । अन्नपाने च सर्वदा । ततो मे श्रियमावह ।

रोमशा पशुभि सह स्वाहा। आमायतु ब्रह्मचारिण स्वाहा। विमायतु ब्रह्मचारिण स्वाहा। प्रमायतु ब्रह्मचारिण स्वाहा। दमायतु ब्रह्मचारिण स्वाहा। शमायतु ब्रह्मचारिण स्वाहा ॥२॥ यशो जनेऽसानि स्वाहा। श्रेयान् वस्यसोऽसानि स्वाहा। त त्वा भग प्रविशानि स्वाहा। स मा भग प्रविश स्वाहा। तस्मिन् सहस्रशाखे। निभगाह त्वयि मृजे स्वाहा। यथाप प्रवता यति। यथा मासा अहर्जरम्। एव मा ब्रह्मचारिण। धातरायातु सर्वत स्वाहा। प्रतिवेशोऽसि प्रमा भाहि प्रमा पद्यस्व ॥३॥

अर्थ—जो वेदाचा [छदसा] प्रतिपादन करावयाचा मुख्य विषय [ऋषभ] आहे, जो ह्या विश्वाचें रूप धारण करता झाला (विश्वरूप.), आणि जो वेदापासून [छदोभ्य] उत्पन्न झालेल्या अमृतापासून म्हणजे ज्ञानापासून जीवाच्या ठिकाणीं [अधि] प्रगट झाला [सबभूव] म्हणजच प्रगट होत असतो, तो इद्र म्हणजे जीवनमुक्त आत्मा मला बुद्धीने [मेधया] म्हणजे बुद्धि देऊन सतुष्ट करो हे देवा, मी अमृताला म्हणजे आनदातिशयाला धारण करणारा [धारण] होवो माझें शरीर चालण्यास समर्थ [विचर्षणम्] म्हणजे आपले सर्व व्यापार करण्यास समर्थ असो माझी जिह्वा फार गोड भाषण करणारी असो [मधुमत्तमा], मी कानानी पुष्कळ (ज्ञान) [भूरि] ऐको [विश्रुवम् छादस लुङ्] बुद्धीने उघडा केलेला [अपिहित] म्हणजे उघडा केला जाणारा ब्रह्माचा तू कोश म्हणजे ठेवा आहेस माझ्या ज्ञानाचें [श्रुत] रक्षण कर आणि वस्त्र, गाई, व अन्नपान नेहमी [सर्वदा] देणारी [आवहती] आणि वाढविणारी [वितन्वाना] आणि शरीरास [आत्मन] दीर्घायुष्य [चीरम्] करणारी [कुर्वाणा] अशी श्री म्हणजेच लक्ष्मी आहे म्हणून [तत] ता लक्ष्मी

मला दे. केसाळ प्राण्यांनी [लोमशां] म्हणजे मेंढरांनी व इतर पशूंनी युक्त [पशुभिः सह] अशी लक्ष्मी मला दे अशी प्रार्थना करून अग्नी- मध्ये आहुति टाकावी [स्वाहा]. (पुढील ही प्रत्येक प्रार्थना करून अग्नीमध्ये आहुति टाकावी असा पुढील सर्व "स्वाहा" शब्दांचा अर्थ आहे.) माझ्याकडे ब्रह्मचारी म्हणजे शिकणारे शिष्य चोहोकडून [आ] येवोत. माझ्याकडे विशिष्ट म्हणजे श्रेष्ठ बुद्धीचे [वि] ब्रह्मचारी येवोत. माझ्याकडे पुष्कळ [प्र] ब्रह्मचारी येवोत. माझे ब्रह्मचारी म्हणजे शिष्य दमाचे आचरण करोत. माझे ब्रह्मचारी दमाचें आचरण करोत. मी लोकांमध्ये [जने] यशस् म्हणजे कीर्ति मिळवो [असानि—अस् ह्या ध्वादि धातूचा अर्थ मिळविणें असा आहे]. धनवानापेक्षाहि [वस्यसः] मी मोठा व्हावें (अर्थात् कीर्तिने) मोठा व्हावें [श्रेयान् असानि]. हे भगा! त्या तुझ्यामध्ये मी प्रवेश करो आणि तो तूं माझ्यामध्ये प्रवेश कर. हे भगा! ज्याला आनंदरूपी हजारों शाखा आहेत, त्या तुझ्यामध्ये मी आपलें दुःख धुवून [निमृजे] टाकतो. ज्याप्रमाणे पाणी सखल जमिनीकडे [प्रवता] जातें किंवा मास हे संवत्सराकडे [अहर्जरम्] जातात, तसे हे धातर् माझ्याकडे ब्रह्मचारी चोहीकडून येवोत. तूंच आश्रयाचें स्थान [प्रतिवेशः]. तूं मला चांगल्या रीतीने [प्र] दिसूं लाग [भाहि]. तूं मला चांगल्या रीतीने प्राप्त हो [प्रपद्यस्व].

टिप्पणी—"इंद्र" ब्रह्मज्ञानाने ब्रह्माशीं परमसाम्य पावलेला मुंडक ३ । १ । ३ येथे वर्णिलेला जीवन्मुक्त आत्मा. असा अर्थ केल्याशिवाय "ब्रह्मणः कोशोऽसि मेधयाऽपिहितः" ह्या पुढील वाक्याचा उत्तम अर्थ लागत नाही.

चीरम्—हें "चिर" याचें छांदस रूप आहे. याचा दीर्घकाळ असा अर्थ आहेच. दीर्घ आयुष्य असा अर्थ येथे फार चांगला जुळतो म्हणून आम्ही तसा अर्थ केला आहे.

वस्यसः—वसीयसः

"ब्रह्मण कोशासि मेधयाऽपिहित "--मेधया पिहित असा पदच्छेद कोणी करतात पण त्यानें चांगला सरस अर्थ निघत नाही-- म्हणून "मेधया अपिहित" असा पदच्छेद करून "बुद्धीने उघडा केला जातो असा" असा अर्थ आम्ही केला आहे कारण जीवन्मुक्तावस्थेचें स्वरूप बुद्धीनेच ज्ञात होतें, आणि जीवन्मुक्तावस्थाच ब्रह्माचा कोश म्हणजे द्रव्यनिधि आहे कारण त्या अवस्थेंतच परमानंदाचा अनुभव येतो

"अहर्जरम्" अहानि जीर्यंते यस्मिन् स ■ संवत्सर

शम-- मनोनिग्रह दम-इंद्रियनिग्रह

## शीक्षावल्ली अनुवाक ५

भूर्भुव सुवरिति वा एतास्तिस्रो व्याहृतय । तासामुह-स्मैता चतुर्थीम् । माहाचमस्य प्रवेदयते । मह इति । तद् ब्रह्म । स आत्मा । अंगान्यन्या देवता । भूरिति वा अयं लोक । भुव इत्यंतरीक्षम् । सुवरित्यसौ लोक ॥१॥ मह इत्यादित्य । आदित्येन वाव सर्वे लोका महीयते । भूरिति वा अग्नि । भुव इति वायु । सुवरित्यादित्य । मह इति चंद्रमा । चंद्रमसा वाव सर्वाणि ज्योतींपि महीयते । भूरिति वा ऋच । भुव इति सामानि । सुवरिति यजूंपि ॥२॥ मह इति ब्रह्म । ब्रह्मणा वाव सर्वे वेदा महीयते । भूरिति वै प्राण । भुव इत्यापान । सुवरिति व्यान । मह इत्यन्नम् । अन्नेन वाव सर्वे प्राणा महीयते। ता वा एताश्चतस्रश्चतुर्धा। चतस्रश्चतस्रो व्याहृतय । ता यो वेद । स वेद ब्रह्म । सर्वेऽस्मै देवा बलिमावहंति ॥३॥

अर्थः—भूः, भुवः आणि सुवर् ह्या तीन व्याहृति आहेत. त्या व्याहृतीपैकीच ही चवथी व्याहृति "मह" ही माहाचमस्य नांवाचा ऋषि सांगतो. मह हेंच ब्रह्म आहे. मह हा आत्मा आहे आणि इतर देवता म्हणजे भूः, भुवः आणि सुवर् ह्या व्याहृति त्यांचीं अंगें होत. हा लोक म्हणजे पृथ्वी हीच भूः, अंतरीक्ष हेंच भुवः, आणि तो लोक म्हणजे सूर्य चंद्र जेथे फिरतात तो लोक सुवर्, आणि सूर्य हाच महः. सूर्यामुळेच सर्व लोक मोठेपणास प्राप्त होतात. (सूर्यामुळेच अंतरीक्षांतून पाऊस पडतो आणि त्यानेच सूर्यप्रकाशाच्या सहाय्याने पृथ्वीवर पिकें उत्पन्न होतात. एकूण अन्नपाणी सूर्यामुळे उत्पन्न होतें हा भाव आहे.) अग्नि म्हणजे जागृतावस्था ही भूः, वायु म्हणजे स्वप्नावस्था ही भुवः, सूर्य म्हणजे निद्रावस्था ही सुवर्, चंद्रमा म्हणजे प्रकाश मन हें महः. चंद्रामुळेच म्हणजे प्रकाश मनामुळेच ह्या सर्व ज्योतींना मोठेपणा प्राप्त होतो. (प्रकाश मनामुळेंच जागृति, स्वप्न व निद्रा ह्यांना मोठेपणा येतो हें उघडच आहे.) ऋग्वेद हाच भूः, सामवेद हा भुवः, यजुर्वेद हा सुवर्, ब्रह्म म्हणजे ब्रह्मज्ञान हेंच महः, ब्रह्माने म्हणजेच ब्रह्मज्ञानानेच सर्व वेदांना मोठेपणा प्राप्त होतो. (ब्रह्मज्ञान वेदांमध्ये आहे म्हणूनच वेद मोठे असा भाव आहे). प्राण हाच भूः, अपान हा भुवः, व्यान हा सुवर्, आणि अन्न( ह्यांत पाण्याचा अंतर्भाव होतोच हें समजलें पाहिजे) हेंच महः. अन्नानेच सर्व प्राण मोठेपणास प्राप्त होतात. त्या ह्या चार प्रकारच्या [ चतुर्धा ] चौकड्या [ चतस्रः ] म्हणजे सोळा [ चतस्रश्चतस्रः ] व्याहृति जो जाणतो तोच ब्रह्म जाणतो आणि त्याला सर्व देव म्हणजे इंद्रियें आनंदरूपी बलि अर्पण करतात. ॥३॥

टिप्पणी—ह्या अनुवाकाचा भाव असा—पहिली चौकडी जाणणारा मनुष्य अन्न आणि पाणी संपादन करील, चवथी चौकडी जाणणारा मनुष्य त्या अन्नाने व पाण्याने प्राणांची जोपासना करील. कारण मन हें प्राणांच्या आधारावर राहतें आणि दुसरी चौकडी जाणल्यामुळे तो मनाचें महत्व जाणतो, तिसरी चौकडी जाणणारा तें मन

ब्रह्म करण्याकरिता वेदांचें अध्ययन करून त्यातून ब्रह्मज्ञान मिळवितो. ह्याप्रमाणे त्याने ब्रह्मज्ञान आणि आयुष्य मिळविल्याने तो परमानंदाचा अनुभव घेतो

ह्या अनुवाकातील चार चौकडींपैकी दुसरी चौकडी दुर्बोध आहे पण तीच फार महत्त्वाची आहे कारण तिचाच पुढील अनुवाकात उपयोग केला आहे ह्या चौकडींत चंद्राने सूर्यास मोठेपणा येतो ही खोटीच वाटणारी गोष्ट सांगितली असल्यामुळे ह्या चौकडींत परोक्षवाद असला पाहिजे हें उघड आहे त्याचा उलगडा केला पाहिजे तो असा चद्र हा मनाचा वाचक आहे ("चद्रमा मनसो जात" ह्या पुरुष सूक्तांतील वचनावरून हे दिसतें) अर्थात् अग्नि, वायु आणि आदित्य म्हणजे अनुक्रमें जागृति, स्वप्न व निद्रा असे अर्थ घ्यावे लागतात निद्रावस्थेंतील जीव हाच ईश्वर होय असें माडुक्यात सांगितलेंच आहे त्या अर्थी तिला आदित्य म्हणता येतें, कारण ईश्वर जग निर्माण करतो त्याप्रमाणे आदित्यहि आपल्या किरणानी पिकें व जीव उत्पन्न करतो स्वप्नावस्था वायूप्रमाणे चचल असते म्हणून तिला वायु म्हणता येतें जागृति ही तर सर्वप्रकाशकच आहे म्हणून तिला अग्नि म्हणता येतें चंद्र म्हणजे तरी सामान्य मन असा अर्थ न घेता ब्रह्म मन असा अर्थ घ्यावा, कारण तेंच चद्राप्रमाणें आनंददायक असतें. जागृति, स्वप्न व निद्रा ह्याना ज्योति म्हणजे प्रकाशक म्हटलें आहे तें पूर्णपणें उपपन्न नाही अशी शका येते, कारण जागृति आणि स्वप्न ह्याना जरी प्रकाशक म्हणता येतें तरी झोपेस तसें म्हणता यत नाही ह्या शकेचें उत्तर असें देता येतें की झोपेंत एक प्रकारचें सुखच प्रकाशित होतें म्हणून झोपेसहि प्रकाशक म्हणता येत.

**शीक्षावल्ली अनुवाक ६**

स य एषोऽतर्हृदय आकाश । तस्मिन्नय पुरुषो मनो-
। मय । अमृतो हिरण्मय । अतरेण तालुके । य एष स्तन

इवावलंबते। सेंद्रयोनिः। यत्राऽसौ केशांतो विवर्तते। व्यपोह्य शीर्षकपाले। भूरित्यग्नौ प्रतितिष्ठति। भुवरिति वायौ ॥१॥ सुवरित्यादित्ये। मह इति ब्रह्मणि। आप्नोति स्वाराज्यम्। आप्नोति मनसस्पतिम्। वाक्पतिश्चक्षुष्पतिः। श्रोत्रपतिर्विज्ञानपतिः। एतत्ततो भवति। आकाशशरीरं ब्रह्म। सत्यात्मप्राणारामं मन आनंदं। शांतिसमृद्धमामृतम्। इति प्राचीनयोग्योपास्स्व ॥२॥

अर्थ—हा जो हृदयांत आकाश आहे, त्या आकाशांत हा मनोमय म्हणजे ज्याला मन आहे असा, आनंदरूप असल्यामुळे [अमृतः] सोन्याप्रमाणे चकाकणारा [हिरण्मयः] हा पुरुष आहे. (ह्यावर कोणी प्रश्न केला "हृदयांत म्हणजे कोठे" त्यावर उत्तर पुढील वाक्यांत आहे.) दोन तालुकांच्या मध्ये तें हृदय आहे [अंतरेण तालुके]. [ह्यावर पुनः कोणी प्रश्न केला "त्या दोन तालुका कोणत्या ?" त्यावर उत्तर पुढील वाक्यांत आहे.) जेथे ही स्तनाप्रमाणे पडजीभ लोंबते ती इंद्रयोनि नांवाची एक तालुका होय. (इंद्र म्हणजे जीवात्मा. त्याची योनि म्हणजे उत्पत्तिस्थान म्हणून इंद्रयोनि) आणि जेथे हा केशांचा अंत [केशांतः] कपाळ आणि शीर्ष ह्यांचा विभाग दाखवीत [व्यपोह्य] वर्तुलाचा आकार धारण करतो [विवर्तते] ती दुसरी तालुका होय. डोक्यांतील मेंदूमध्ये मनोमय पुरुष म्हणजेच जीवात्मा असतो असा भाव आहे. जो विचारी मनुष्य जागृतीच्या ठिकाणीं [अग्नौ] तीच भूः असें मानून प्रतिष्ठित होतो, स्वप्नावस्थेच्या ठिकाणीं [वायौ] तीच भुवः असें मानून प्रतिष्ठित होतो, निद्रेच्या ठिकाणीं [आदित्ये] तीच सुवर् असें मानून प्रतिष्ठित होतो, आणि ब्रह्माच्या ठिकाणीं तेंच महः असें मानून प्रतिष्ठित होतो म्हणजे जागृति, स्वप्न, निद्रा ह्या तीनहि अवस्था योग्य रीतीने कायम राहण्यासाठी कर्म करीत असतो आणि

ब्रह्माचें अद्वैतादिगुण स्वत त आणतो, तो स्वाराज्य म्हणजे स्वातंत्र्य मिळवितो. तो आपल्या मनाच्या पतीला [ मनसः पतिं ] प्राप्त होतो. म्हणजे तो आपल्या मनाचा पूर्णपणें मालक बनतो. तो आपल्या वाणीचा, डोळ्याचा, कानाचा आणि विज्ञानाचा पूर्णपणें मालक बनतो. आणि नंतर तो पुढे वर्णिलेले [ एतत् ] ब्रह्म म्हणजेच ब्रह्म जीव हो होतो ज्याचें आकाश शरीरातच आहे असें ब्रह्म म्हणजे ब्रह्म जीव तो होतो. (ईश्वराचें आकाश सर्व जगात आहे जीवाचें आकाश मागे ह्याच अनुवाक्यात सांगितल्याप्रमाणे शरीरातच मेंदूत आहे ) सत्य म्हणजे ज्ञाता, ज्ञान आणि ज्ञेय ही त्रिपुटी हेंच ज्याचें रूप आहे असें, (ब्रह्मानंदवल्ली अनुवाक ६ ह्यात "सत्य" ह्याची अशीच व्याख्या केली आहे) प्राण हेच आराम म्हणजे विश्रांतीचें स्थान ज्याचें असे, ( झोंपेंत मन व जीवात्मा प्राणामध्ये जाऊन मिळतो आणि विश्रांति घेतो म्हणून त्याला प्राणाराम असें म्हटलें आहे. ) मनातच किंवा मन हेंच ज्याचा आनंद आहे म्हणजे ज्याच्या आनंदाला दुसऱ्या वस्तूच्या प्राप्तीची गरज नाही, मनात आनंद मानल्यानेच ज्याला आनंद होतो असे, शांतिसमृद्ध आणि परमानंदयुक्त [ अमृतम् ] असें तें ब्रह्म आहे असें जाणून [ इति ] त्याची, हे प्राचीनांना योग्य असलेल्या शिष्या, तू उपासना कर म्हणजे तें ब्रह्म तू हो ॥२॥

**टिप्पणें**—"तालुके"—मराठींत "टाळू" या शब्दाचे दोन अर्थ आहेत. एक जेथे पडजीभ लोंबते ती आतील टाळू व दुसरी जेथे केश आहेत ती बाहेरची टाळू. असेच दोन अर्थ संस्कृत भाषेंतहि उपनिषत्काळीं होते असें ' तालुके " या द्विवचनावरून स्पष्ट दिसतें

"हृदय"—म्हणजे छातींतील रक्ताभिसरणेंद्रिय असा अर्थ येथे नाही. "हृदय" म्हणजे अंतस्थ भाग असा सामान्य अर्थ येथे आहे. पुढील वर्णनावरून तो "मेंदू"विषयी योजिला आहे हें स्पष्ट आहे.

"मन आनंद"—बृहदारण्यक ४।१।६ येथेहि असेच विचार आहेत. याचा भाव असा आहे की विषयसंपर्कांशिवायहि तो आनंदात असूं शकतो.

"शांति समृद्धम्"—वासनारहित, कारण वासनांनीच मनुष्याचें मन अशांत म्हणजेच चंचल होतें.

## शीक्षावल्ली अनुवाक ७

पृथिव्यंतरीक्षं द्यौर्दिशोऽवांतरदिशाः । अग्निर्वायुरादित्यश्चंद्रमा नक्षत्राणि । आप ओषधयो वनस्पतय आकाश आत्मा इत्यधिभूतम् । अथाध्यात्मम् । प्राणो व्यानोपानऽपान उदानः समानः । चक्षुः श्रोत्रं मनो वाक् त्वक् । चर्म मांसं स्नायास्थिमज्जा । एतदधिविधाय ऋषिरवोचत् । पांक्तं वा इदं सर्वम् । पांक्तेनैव पाक्तं स्पृणोति ॥

अर्थः—(१) पृथिवी, (२) अंतरीक्ष, (३) द्यौः म्हणजेच स्वर्ग म्हणजे चंद्रसूर्य फिरतात ती जागा. (४) दिशा म्हणजे मुख्य चार किंवा सहा दिशा व (५) या मुख्य दिशांमधील दिशा. ही एक पंक्ति म्हणजे पंचकडी म्हणजे पांचांचा संघ होय. (१) अग्नि, (२) वायु, (३) आदित्य, (४) चंद्र आणि (५) नक्षत्रें ही दुसरी पंचकडी होय. (१) पाणी, (२) औषधी, (३) वनस्पती, (४) आकाश म्हणजे जागा आणि (५) आत्मा म्हणजे ब्रह्म किंवा जीव ही तिसरी पंचकडी होय. या तीन अधिभूत म्हणजे शरीराबाहेरील पंचकड्या सांगितल्या. आता शरीरांतील पंचकड्या सांगतो. (१) प्राण, (२) व्यान, (३) अपान, (४) उदान व (५) समान ही एक पंचकडी होय. (१) डोळे, (२) कान (३) मन, (४) वाणी व (५) त्वचा म्हणजे स्पर्शेंद्रिय ही दुसरी पंचकडी होय. (१) कातडी, (२) मांस, (३) स्नायु, (४) हाडें, (५) मज्जा ही तिसरी पंचकडी होय. हे योजून [ अधिविधाय ] ऋषि म्हणाला, हे

सर्व पांक्त म्हणजे पंजडयांनीं बनलेलें आहे. आधिभौतिक पंजडयांनी आध्यात्मिक पंजडयांना उपकृत करतो.

टिप्पण—बाहेरच्या वस्तू शरीरांतील वस्तूंना उपकृत करतात हें म्हणणें जरी सामान्यतः उपपन्न आहे तरी, येथे सांगितलेल्या बाहेरील वस्तू अनुक्रमाने आंतील वस्तूंस उपकृत करतात ह्याची उपपत्ति लागतां येत नाहीं. प्रश्नोपनिषद् ३ । ८–१० येथे जें सांगितलें आहे तें अनुक्रमाने उपपत्ति लावण्याशीं विरुद्धहि आहे. म्हणून ह्या अनुवाकांत जें शेवटीं सांगितलें आहे त्याची उपपत्ति अनुक्रमाने लावूं नये. जागृति, स्वप्न व निद्रा ह्या तीन अवस्था कमें करून कायम ठेवणें हें जें कर्तव्य मागील अनुवाकांत सांगितलें, तें कर्तव्य बाहेरच्या वस्तूंनी मदत घेऊन आंतील वस्तु सुस्थितींत ठेवल्याशिवाय करतां येणार नाहीं हें सांगण्याकरितां ह्या अनुवाकांतील सिद्धांत सांगितला असें दिसतें.

**शीक्षावल्ली अनुवाक ८**

ओमिति ब्रह्म । ओमितीदं सर्वं । ओमित्येतदनुकृतिर्ह स्म वा अप्यो श्रावयेत्याश्रावयंति । ओमिति सामानि गायंति । ओं शोमिति शस्त्राणि शंसंति । ओमित्यध्वर्युः प्रतिगरं प्रतिगृणाति । ओमिति ब्रह्मा प्रसौति । ओमित्यग्निहोत्रं जानाति । ओमिति ब्राह्मणः प्रवक्ष्यन्नाह ब्रह्मोपाप्नवानीति । ब्रह्मैवोपाप्नोति ॥

अर्थ—"ओम्" ह्या शब्दाने दोन अर्थ आहेत. ओम् म्हणजे ब्रह्म. ओम् म्हणजे हें सर्व जग. ह्या शब्दाचा उपयोग पुढील प्रसंगीं करतात. कोणीहि आज्ञा केली असतां, त्या आज्ञेप्रमाणें करणारा मनुष्य ओम् असें म्हणून [ओमित्येतद्] त्या आज्ञेप्रमाणे करतो [अनुकृतिः] हें प्रसिद्धच आहे [ह स्म वै]. ह्याशिवाय [अपि] ओ म्हणजेच ओम्

देवांना मंत्र ऐकीव [श्रावय] असें म्हटलें असतां [इति] देवांना मंत्र ऐकवितात. ओम् असें म्हणून सामांचें. गायन करतात. ओम् शोम् असें म्हणून नंतर शास्त्र नांवाचे मंत्र म्हणतात. ओम् असें म्हणून अध्वर्यु प्रतिगर म्हणतो म्हणजे कर्में करण्याविषयी ब्रम्हाला परवानगी मागतो आणि ब्रह्माहि ओम् असें म्हणून त्याला परवानगी देतो [प्रसौति]. ओम् असें म्हणून अग्निहोत्राला म्हणजे अग्नींत हवन करण्याला परवानगी देतो. वेदपठन करणारा [प्रवक्ष्यन्] ब्राह्मण मला ब्रह्म मिळो म्हणून ओम् असें म्हणतो [आह] आणि त्याप्रमाणे त्याला ब्रह्मच मिळतें.

टिप्पणी—सर्व कर्में करतांना ब्रह्मवाचक ओम् शब्दाचा उच्चार करावा. विशेषतः वेदपठन करतांना त्याचा उच्चार करावा म्हणजे आपणांस सहाव्या अनुवाकांत वर्णिलेलें ब्रह्म म्हणजे जीवन्मुक्तावस्था मिळावयाची आहे ह्याची मनुष्यास नेहमीं आठवण राहते व त्यास शेवटीं तें ब्रह्मच मिळतें असा ह्या अनुवाकाचा भाव आहे. भगवद्गीतेंतहि "तस्मादोम् इत्युदाहृत्य यज्ञदानतपःक्रियाः । प्रवर्तंते विधानोक्ताः सततं ब्रह्मवादिनाम् " ॥२४॥ अध्याय १७ ह्यांत असेंच सांगितलें आहे.

शीक्षावल्ली अनुवाक ९-१०

ऋतं च स्वाध्यायप्रवचने च । सत्यं च स्वाध्यायप्रवचने च । तपश्च स्वाध्यायप्रवचने च । दमश्च स्वाध्यायप्रवचने च । शमश्च स्वाध्यायप्रवचने च । अग्नयश्च स्वाध्यायप्रवचने च । अग्निहोत्रं च स्वाध्यायप्रवचने च । अतिथयश्च स्वाध्यायप्रवचने च । मानुषं च स्वाध्यायप्रवचने च । प्रजा च स्वाध्यायप्रवचने च । प्रजनश्च स्वाध्यायप्रवचने च प्रजातिश्च स्वाध्यायप्रवचने च । सत्यमिति सत्यवचा

राधीतरः। तप इति तपोनित्यः पौरुशिष्टिः। स्वाध्याय-
प्रवचने एवेति नाको मौद्गल्यः। तद्धितपस्तद्धितपः ॥९॥
अहं वृक्षस्य रेरिवा। कीर्तिः पृष्ठं गिरेरिव। ऊर्ध्वपवित्रो
वाजिनीव स्वमृतमस्मि। द्रविणं सवर्चसम्। सुमेधा अमृतोऽ-
क्षितः। इति त्रिशंकोर्वेदानुवचनम् ॥१०॥

अर्थ—महाप्राप्तीकरितां मनुष्यानें काय करावें ह्याविषयीं अनेक ऋषींचीं अनेक मतें आहेत. कोणी म्हणतात कीं वेदांचें अध्ययन [स्वाध्याय] आणि अध्यापन [प्रवचन] करून त्यांत काय सांगितलें आहे तें [ऋतं] जाणून घ्यावें. कांहीजण असें म्हणतात कीं वेदांचें अध्ययन व अध्यापन करून सत्य काय आहे तें जाणून घ्यावें. वेदांचें अध्ययन व अध्यापन करावें आणि तपहि करावें असें कोणी म्हणतात. (तपः म्हणजे चित्तवृत्तिनिरोधरूपी योग याचणें हा अर्थ येथे आहे; विषयोपभोगनिवृत्ति हा अर्थ येथे जुळत नाहीं कारण तो पुढील वाक्यांतच "दम" ह्या शब्दांत आला आहे.). वेदांचें अध्ययन, अध्यापन आणि "दम" ह्यांचेंच आचरण करावें असें कोणी म्हणतात. (शम म्हणजे मनोनिग्रह म्हणजे मन वासनारहित करणें.) वेदांचें अध्ययन व अध्यापन करावें आणि अग्नींची नैमित्तिक उपासना करावी असें कोणी म्हणतात (नैमित्तिक म्हणजे विवाह, जन्म वगैरे निमित्तानें करावयाची उपासना). वेदांचें अध्ययन आणि अध्यापन आणि यावज्जीव दररोज करावयाचें अग्निहोत्र म्हणजे अग्नीची उपासना करावी असें कोणी म्हणतात. वेदांचें अध्ययन, अध्यापन आणि अतिथींची सेवा एवढेंच करावें असें कोणी म्हणतात. वेदांचें अध्ययन, अध्यापन आणि सर्व मनुष्यांची सेवा [मानुषं च] एवढेंच करावें असें कोणी म्हणतात. वेदांचें अध्ययन व अध्यापन करावें आणि संतति-उत्पन्न करावी म्हणजे संतति उत्पन्न

होण्याचा संभव असेल अशाच प्रसंगीं भार्यागमन करावें अर्थात् इतर प्रसंगीं भार्यागमन करूं नये असें कोणी म्हणतात. वेदांचें अध्ययन अध्यापन करावें आणि भार्यागमन [प्रजनः] करावें मग संतति उत्पन्न होण्याचा संभव असो किंवा नसो, असें कोणी म्हणतात. वेदांचें अध्ययन, अध्यापन करावें आणि पुष्कळ प्रजा ( संतति ) म्हणजे पुत्र पौत्रप्रपौत्र उत्पन्न करावे असें कोणी म्हणतात. रथीतराचा मुलगा असलेला सत्य बोलणारा ऋषि, सत्य बोलणें एवढेंच करावें असें म्हणतो. नेहमी तप करणारा पौरुशिष्टि म्हणतो की तपच करावें. मुद्गलाचा पुत्र नाक नांवाचा ऋषि वेदांचें अध्ययन व अध्यापन एवढेंच करावें असें म्हणतो कारण तेंच तप आहे असें त्याचें म्हणणें आहे. ॥९॥

त्रिशंकु तर वेदांस अनुसरून म्हणतो [ वेदानुवचनं ] की " मी जगद्रूपी वृक्षाचा प्रेरयिता [ रेरिवा ] म्हणजे उत्पन्न करणारा व नियमन करणारा आहे. माझी कीर्ति पर्वताच्या शिखराप्रमाणे [ गिरेः पृष्ठमिव ] उंच आहे. माझें मूळ [ ऊर्ध्व ] पवित्र आहे. ( जीवात्म्याचें मूळ जें ब्रह्म तें पवित्र आहे). त्याप्रमाणे सूर्यांत [ वाजिनि ] अतिशय आनंदरूप [ स्वमृतम् ] असें आत्मतत्त्व आहे तसेंच माझ्यांतहि आहे. आनंदयुक्त [ सुवर्चसम् ] असें ज्ञान [ द्रविणं ] मी आहें. मी सुबुद्धिमान आहें म्हणून मी आनंदरूप आहें आणि दुःखपीडित नाही [ अक्षितः ]. ह्याचा भाव असा की त्रिशंकूच्या मतें मनुष्यानें वर सांगितल्याप्रमाणे मनाची भावनाच ठेवावी, त्याला इतर कांहींहि करण्याची गरज नाही. ॥१०॥

**शिक्षावल्ली अनुवाक ११**

वेदमनूच्याचार्योऽन्तेवासिनमनुशास्ति । सत्यं वद । धर्मं चर । स्वाध्यायान्मा प्रमदः । आचार्याय प्रियधनमाहृत्य प्रजातंतुं मा व्यवच्छेत्सीः । सत्यान्न प्रमदितव्यम् । धर्मान्न प्रम-

दितव्यं । कुशलान्न प्रमदितव्यं । भूत्यै न प्रमदितव्यम् । स्वाध्यायप्रवचनाभ्यां न प्रमदितव्यम् ॥१॥ देवपितृकार्याभ्यां न प्रमदितव्यम् । मातृदेवो भव । पितृदेवो भव । आचार्यदेवो भव । अतिथिदेवो भव । यान्यनवद्यानि कर्माणि तानि सेवितव्यानि । नो इतराणि । यान्यस्माकं सुचरितानि । तानि त्वयोपास्यानि ॥२॥ नो इतराणि । ये के चास्मच्छ्रेयांसो ब्राह्मणः । तेषां त्वयासनेन प्रश्वसितव्यं । श्रद्धया देयम् । अश्रद्धया देयम् । श्रिया देयम् । ह्रिया देयम् । भिया देयम् । संविदा देयम् । अथ यदि ते कर्मविचिकित्सा वा वृत्तविचिकित्सा वा स्यात् ॥३॥ ये तत्र ब्राह्मणाः संमर्शिनः । युक्ताः आयुक्ताः । अलूक्षाः धर्मकामाः स्युः । यथा ते तत्र वर्तेरन् तथा तत्र वर्तेथाः । अथाभ्याख्यातेषु । ये तत्र ब्राह्मणाः संमर्शिनः । युक्ताः आयुक्ताः । अलूक्षाः धर्मकामाः स्युः । यथा ते तेषु वर्तेरन् । तथा तेषु वर्तेथाः । एष आदेशः । एष उपदेशः । एषा वेदोपनिषद् । एतदनुशासनं । एवम् उपासितव्यम् । एवम् चैतदुपास्यम् ॥४॥

अर्थः—मागील दोन अनुवाकांत सांगितलेल्या मतें कांही दखागी, कांही चूक आणि अर्थात् अग्राह्य आहेत. म्हणून त्या आचार्याने शिष्यास वेद शिकवून [अनूच्य] नंतर त्यास उपदेश करावा [अनुशास्ति] की "खरें बोल. धर्माचें (येथील धर्म शब्दाचा अर्थ अग्निधनादि कर्में असा व्याससूत्र "तद्धतोविधानात्" २।४।६ येथे केला आहे. उपसंहार प्रकरण १० पहा.) आचरण कर. वेदांचें अध्ययन आणि अध्यापन [स्वाध्यायात्] करण्यास चुकूं नकोस म्हणजे नियमाने वेदांचें अध्ययन व अध्यापन कर. आचार्यांना प्रिय असलेलें धन दे

होण्याचा संभव असेल अशाच प्रसंगीं भार्यागमन करावें अर्थात् इतर प्रसंगीं भार्यागमन करूं नये असें कोणी म्हणतात. वेदांचें अध्ययन अध्यापन करावें आणि भार्यागमन [ प्रजनः ] करावें मग संतति उत्पन्न होण्याचा संभव असो किंवा नसो, असें कोणी म्हणतात. वेदाचें अध्ययन, अध्यापन करावें आणि पुष्कळ प्रजा ( संतति ) म्हणजे पुत्र पौत्रप्रपौत्र उत्पन्न करावे असें कोणी म्हणतात. रथीतराचा मुलगा असलेला सत्य बोलणारा ऋषि, सत्य बोलणें एवढेंच करावें असें म्हणतो. नेहमी तप करणारा, पौरुशिष्टि म्हणतो की तपच करावें. मुद्गलाचा पुत्र नाक नांवाचा ऋषि वेदांचें अध्ययन व अध्यापन एवढेंच करावें असें म्हणतो, कारण तेंच तप आहे असें त्याचें म्हणणें आहे. ॥९॥

त्रिशंकु तर वेदांत अनुसरून म्हणतो [ वेदानुवचनं ] की " मी जगद्रूपी वृक्षाचा प्रेरयिता [ रेरिवा ] म्हणजे उत्पन्न करणारा व नियमन करणारा आहे. माझी कीर्ति पर्वताच्या शिखराप्रमाणे [ गिरेः पृष्ठमिव ] उंच आहे. माझें मूळ [ ऊर्ध्व ] पवित्र आहे. ( जीवात्म्याचें मूळ जें ब्रह्म तें पवित्र आहे). ज्याप्रमाणे सूर्यात [ वाजिनि ] अतिशय आनंदरूप [ स्वमृतम् ] असें आत्मतत्त्व आहे तसेंच माझ्यांतहि आहे. आनंदयुक्त [ सवर्चसम् ] असें ज्ञान [ द्रविणं ] मी आहें. मी सुबुद्धिमान आहें म्हणून मी आनंदरूप आहें आणि दुःखपीडित नाही [ अक्षितः ]. ह्याचा भाव असा की त्रिशंकूच्या मतें मनुष्यानें वर सांगितल्याप्रमाणे मनाची भावनाच ठेवावी, त्याला इतर कांहीहि करण्याची गरज नाही. ॥१०॥

शिक्षावल्ली अनुवाक ११

वेदमनूच्याचार्योऽन्तेवासिनमनुशास्ति । सत्यं वद । धर्मं चर । स्वाध्यायान्मा प्रमदः । आचार्याय प्रियधनमाहृत्य प्रजातंतुं मा व्यवच्छेत्सीः । सत्यान्न प्रमदितव्यम् । धर्मान्न प्रम-

दितव्यं । कुशलान्न प्रमदितव्यं । भूत्यै न प्रमदितव्यम् । स्वाध्यायप्रवचनाभ्यां न प्रमदितव्यम् ॥१॥ देवपितृकार्याभ्यां न प्रमदितव्यम् । मातृदेवो भव । पितृदेवो भव । आचार्यदेवो भव । अतिथिदेवो भव । यान्यवद्यानि कर्माणि तानि सेवितव्यानि । नो इतराणि । यान्यस्माकं सुचरितानि । तानि त्वयोपास्यानि ॥२॥ नो इतराणि । ये के चास्मच्छ्रेयांसो ब्राह्मणः । तेषां त्वयासनेन प्रश्वसितव्यं । श्रद्धया देयम् । अश्रद्धया देयम् । श्रिया देयम् । ह्रिया देयम् । भिया देयम् । संविदा देयम् । अथ यदि ते कर्मविचिकित्सा वा वृत्तविचिकित्सा वा स्यात् ॥३॥ ये तत्र ब्राह्मणाः संमर्शिनः । युक्ताः आयुक्ताः । अलूक्षाः धर्मकामाः स्युः । यथा ते तत्र वर्तेरन् तथा तत्र वर्तेथाः । अथाभ्याख्यातेषु । ये तत्र ब्राह्मणाः संमर्शिनः । युक्ताः आयुक्ताः । अलूक्षाः धर्मकामाः स्युः । यथा ते तेषु वर्तेरन् । तथा तेषु वर्तेथाः । एष आदेशः । एष उपदेशः । एषा वेदोपनिषद् । एतदनुशासनं । एवम् उपासितव्यम् । एवम् चैतदुपास्यम् ॥४॥

आणि नंतर प्रजातंतूचा छेद होणार नाही अशी क्रिया कर म्हणजे गृहस्थाश्रमाचा स्वीकार कर. सत्य बोलण्याच्या नियमांत चुकूं नकोस, धर्माचरण करण्याच्या नियमांत चुकूं नकोस. आपलें कुशल म्हणजे आत्यंतिक कल्याण करून घेण्याच्या कर्मांत म्हणजे ब्रह्मोपासनेंत चुकूं नकोस. वैभव प्राप्त करून घेण्याच्या कर्मांत [भूत्यै] चुकूं नकोस. अध्ययन व अध्यापन करण्याच्या नियमांत चुकूं नकोस. देवकार्य म्हणजे यज्ञ आणि पितृकार्य म्हणजे श्राद्ध वगैरे करण्याच्या कामांत चुकूं नकोस. आईला देव मानून त्याप्रमाणे तिच्याशीं वाग. बापाला देव मानून त्याप्रमाणें त्याच्याशीं वाग. अतिथीला देव मानून त्याप्रमाणे त्याच्याशीं वाग. जीं अनिंद्य कर्में आहेत त्यांचेंच त्वां सेवन करावें, इतर कर्मांचें सेवन करूं नये. आम्ही करीत असलेलीं कर्में देखील जीं चांगलीं असतील तींच त्वां सेवन करावीं, जीं चांगलीं नसतील तीं त्वां सेवन करूं नयेत. जे आमच्याहून [अस्मत्] मोठे [श्रेयांसः] ब्राह्मण असतील त्यांना देखील आसन वगैरे [आसनेन] देऊन त्वां आपले श्रम परत मिळवावे. (उर्ध्वं प्राणा ह्युत्क्रामन्ति। यूनः स्थविर आयति ॥ प्रत्युत्थानाभिवादाभ्यां। पुनस्तान् प्रतिपद्यते ॥१२०॥ मनुस्मृति अध्याय २ यांतहि अशीच कल्पना आहे.) नेहमी दान कर, मग तें दान तूं श्रद्धेने म्हणजे त्यापासून कल्याण होईल या विश्वासाने दे किंवा तसा विश्वास नसूनहि दे किंवा आपलें मोठेंपण दाखविण्याकरितां [श्रिया] दे किंवा लज्जेने दे किंवा भयाने दे किंवा परत कांहीं मोबदला मिळण्याच्या करारानें [संविदा] दे. चालू असलेल्या आचाराविषयीं [वृत्त] किंवा नवीनच सुरू करावयाच्या कर्माविषयीं जर तुला संशय उत्पन्न झाला [विचिकित्सा] तर, जे ब्राह्मण स्वतंत्रपणें विचार करणारे [संमर्शिनः] धर्मविचारांतच निमग्न झालेले [युक्ताः] अर्थात् यथार्थ ज्ञाते, धर्म सांगण्याच्या अधिकारावर नेमले गेलेले [आयुक्ताः], लोभरहित [अलूक्षाः], धर्माचीच इच्छा करणारे [धर्मकामाः] अर्थात् यथार्थवक्ते व बोलण्याप्रमाणे वागणारे, असतील

तें त्यासंबंधानें असें वागतील तसें वागावें, आणि वेदांमध्यें व मनुस्मृतिमध्यें सांगितलेल्या कृत्याविषयीं संशय असला तरी [अथाभ्याख्यातेषु] असेंच करावें. हीच आमची आज्ञा [आदेश] आहे. हाच आमचा उपदेश आहे. हेंच वेदांचें रहस्य [उपनिषद्] आहे. हीच वेदांची आज्ञा आहे [अनुशासनम्]. ह्याप्रमाणें वागून [एवं] ब्रह्माची मागें सहाव्या अनुवाकांत सांगितलेली उपासना करावी [उपासितव्यम्]. ह्याप्रमाणेंच ह्या ब्रह्माची (एतत्) उपासना करावी. ॥४॥ शेवटची द्विरुक्ति वल्लीची समाप्ति दाखविते.

टिप्पणी—"आसनेन प्रश्वसितव्यम्" ह्याचा "आसने न प्रश्वसितव्यम्" असाहि पदच्छेद करतां येईल. व त्याचा अर्थ "त्याच्या आसनावर बसून त्यां श्वास घेऊं नये" असा करतां येतो. पण वर जो दुसरा अर्थ केला आहे त्यासारखेंच वचन मनुस्मृतींत असल्यामुळें तोच ग्राह्य वाटतो. "अश्रद्धया देयम्" ह्याचा पदच्छेद "अश्रद्धया अदेयम्" असा इतरांनी केला आहे. आणि "श्रद्धा नसेल तर देऊं नये" असा अर्थ केला आहे. पण तो अग्राह्य आहे. "दान" ही गोष्ट कोणत्याहि मनोवृत्तीनें केली तरी ती समाजाला व देणाऱ्या आणि घेणाऱ्या व्यक्तीला हितकरच आहे म्हणून "कोणत्याहि मनोवृत्तीनें का होईना पण दान कर" असाच अर्थ जास्त खरा आहे. "आयुक्ताः"—धर्माधर्म सांगण्याचा अधिकार कोणत्याहि चांगल्या मनुष्यास असतो असें नाहीं. कारण चांगला कोण हाच प्रश्न असतो. समाजसत्तेकडून ज्यांची धर्माधर्म सांगण्याच्या अधिकारावर नेमणूक होते त्यालाच धर्माधर्म सांगण्याचा अधिकार असतो, व त्यांच्या सांगण्याप्रमाणें सर्वांनी वागावें असा ह्या वचनाचा अर्थ आहे. पूर्वी धर्माधर्म सांगण्याच्या कामावर मनु व सप्तर्षि ह्यांची नेमणूक होत असे हें मी "धर्मनिर्णयस्वरूप" ह्या ग्रंथांत पान २२–२४ वर आणि "जैमिन्यर्थदीपिका" ह्या ग्रंथांत १–१–२६ च्या विवरणांत (५) हे

(१०) ह्यांत दाखविलें आहे.- " धर्मरहस्यांत " आणि "The Social Institutions of Ancient India" ह्यांतहि दाखविलें आहे.

" संमर्शिनः "—धर्मग्रंथांत काय सांगितलें आहे एवढाच विचार करून धर्म ठरविणारे ते परतंत्र विचार करणारे असल्यामुळे " संमर्शि " नव्हत. स्वतःच्या बुद्धीनें विचार करून धर्म ठरविणारे तेच स्वतंत्र विचारी अर्थात् खरे संमर्शि होत, सम् हा उपसर्ग हेंच दाखवितो. हरिवंशांत मनुसप्तर्षींना "बुद्धया प्रत्यक्षधर्माणः" असें विशेषण लाविलें आहे. (Social Institutions in Ancient India, पान १८१ पाहा.) त्यानेंहि ह्या अर्थास पुष्टिच येते.

"अधाभ्याख्यातेषु" आणि " वृत्तचिकित्सा "—" अभ्याख्यात " ह्याचा रूढार्थ आज " ज्यावर कोणतें तरी पाप किंवा वाईट कृत्य केल्याचा आरोप आहे तो मनुष्य किंवा स्त्री " असा आहे. वैदिक भाषेंत त्याचा हाच अर्थ असेल असें निश्चयानें म्हणतां येत नाही. आणि यौगिक अर्थ तर फक्त " सांगितलेलें " असा आहे. श्रीशंकराचार्यांनी वरील रूढार्थाचेंच ग्रहण केलें आहे. पण त्यास एक मोठी अडचण आहे. कर्मांविषयी सामान्यतः नियम सांगितल्यानंतर, त्यांतच अभ्याख्यातांशीं करावयाच्या वर्तनाचा अंतर्भाव होत असल्यामुळे पुनः त्यांशीं वर्तन करण्याविषयी तोच नियम सांगणें अनावश्यक व व्यर्थ आहे. उदाहरणार्थ, सर्व जनावरांशीं ममताळूपणानें वागावें असें सांगितल्यानंतर ब्राह्मणाची गाय व्याली असतां तिच्याशीं ममताळूपणानें वागावें असें सांगण्याची गरज रहात नाही. म्हणून श्रीशंकराचार्यांचा अर्थ ग्राह्य नाही. सरळ पाहिल्यास असें दिसतें की वरील वचनांत सर्व कर्मांचे " अभ्याख्यात " व " अनभ्याख्यात " असे दोन वर्ग पाडून प्रथमतः अनभ्याख्यात कर्मांविषयी मनुष्यानें कसें वागावें तें सांगून नंतर अभ्याख्यात कर्मांविषयी कसें वागावें तें सांगितलें आहे. ह्यावरून अभ्याख्यात म्हणजे वेदांमध्ये व मनुस्मृतीमध्ये जीं कर्में

करावींत किंवा न करावींत म्हणून सांगितलीं आहेत तीं, असा अर्थ दिसतो आणि ज्या कर्माविषयी वेदांमध्ये व मनुस्मृतीमध्ये कांही सांगितलें नाही त्यांचेहि "वृत्त" म्हणजे लोकांच्या वर्तनांत म्हणजेच आचरणांत असलेलीं व "कर्म" म्हणजे लोकांच्या आचारांत नसलेलीं असे दोन वर्ग केले असें दिसतें. एकंदरींत, ह्या सर्व प्रकारच्या कर्मा-विषयी स्वतंत्र विचार करणारे [ संमर्शिनः ], धर्माधर्मविचारांत निमग्न झालेले [ युक्ताः ], धर्माधर्म सांगण्याच्या अधिकारावर नेमले गेलेले, [आयुक्ताः], धर्माप्रमाणेच वागण्याची इच्छा करणारे व निर्लोभ [ अलूक्षाः ] असे त्या त्या कर्माविषयी जसें वागतील तसेंच त्वां वागावें हेंच वेदांचें रहस्य [उपनिषद्] होय, असा वरील वचनाचा अर्थ ठरतो. वेदोक्त कर्माविषयीं संशय असल्यास जसें हे ब्राह्मण वागतील तसें वागावें, ह्याचा अर्थ असाच होतो की वेदोक्त धर्मांत बदल करण्याचा अशा ब्राह्मणास अधिकार आहे.

आता आम्ही श्रीशंकराचार्यांच्या अर्थावर जो आक्षेप घेतला तोच आमच्याहि अर्थावर घेतला जाण्याचा संभव आहे. कर्माविषयी व वृत्ताविषयी सामान्यतः सांगितल्यानंतर पुनः वेदोक्त कर्माविषयी व मनुस्मृत्युक्त कर्माविषयी सांगण्याची गरज नाही असा हा आक्षेप येईल. ह्याचा विचार करूं. वेदांचें भारतीय समाजावर विलक्षण वजन असल्यामुळे वेदानें कर्माविषयीं सामान्यतः सांगितलें तरी त्यावर वेदोक्त कर्माविषयी व मनुस्मृत्युक्त कर्माविषयी तें विधान नाही आणि वेद, वेदोक्त कर्मांमध्ये व मनुस्मृत्युक्त कर्मांमध्ये बदल करण्याची परवानगी देत नाही असा गैरसमज होण्याचा फार संभव आहे. म्हणून वेदानेच त्या गैरसमजुतीच्या निराकरणार्थ 'अथाभ्याख्यातेषु' इत्यादि वचन दिलें. असा गैरसमज दोषारोपितांशीं करावयाच्या वर्तनासंबंधानें होऊं शस्त नाही. म्हणजे ह्या वचनाच्या पहिल्या भागांत सांगितलेला सामान्य सिद्धांत हे ब्राह्मण वागतील तसें वागावें हा दोषारोपितास लागत नाही, असा गैरसमज उत्पन्न होण्यास कांहीच कारण नसल्यामुळे, तो गैरसमज

उत्पन्न होत नाही. म्हणून त्याचें निराकरणहि अनावश्यक आहे. ह्यामुळे श्रीशंकराचार्यांचा अर्थ अग्राह्य व आमचा ग्राह्य ठरतो. शेवटच्या वाक्याच्या अर्थाविषयी फार संशय आहे. त्यांत मागील वाक्याची ("एवमुपासितव्यम्" ह्याची) पुनरुक्ति अध्यायसमाप्ति दाखविण्याकरिता केली आहे, असा मी अर्थ केला आहे. परंतु दुसराहि अर्थ संभवतो. "एतत्" म्हणजे धर्मशास्त्र म्हणजे वेद व मनुस्मृति असाहि अर्थ असेल. "अथाभ्याख्यातेषु" ह्या शब्दांत त्यांचा निर्देश आहेत. म्हणून "धर्मशास्त्राचा आचरणांत जो आधार घ्यावयाचा तो वर सांगितल्याप्रमाणे (एवम्) मर्यादित करून घ्यावा" असाहि अर्थ संभवतो. व तोच आम्ही "The rationalistic and realistic interpretation of the Upanishads" ह्यांत दिला आहे.

शीक्षावल्ली अनुवाक १२

शं नो मित्रः शं वरुणः । शं नो भवत्वर्यमा । शं न इंद्रो बृहस्पतिः । शं नो विष्णुरुरुक्रमः । नमो ब्रह्मणे । नमस्ते वायो । त्वमेव प्रत्यक्षं ब्रह्मासि । त्वामेव प्रत्यक्षं ब्रह्मावादिषम् ऋतमवादिषं । सत्यमवादिषम् । तन्मामावीत् । तद्वक्तारमावीत् । आवीन्माम् । आवीद्वक्तारम् ॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥

अर्थ—अनुवाक १ प्रमाणेच ह्याचा अर्थ आहे. फक्त तेथे जेथे जेथे भविष्यकाळ किंवा आज्ञार्थ आहे तेथें तेथे भूतकाळ घ्यावा.

## ब्रह्मानंदवल्ली प्रार्थना

ब्रह्मानंदवल्ली अनुवाक १

ओम् सह नाववतु । सह नौ भुनक्तु । सहवीर्यं करवावहै । तेजस्वि नावधीतमस्तु मा विद्विषावहै । ओम् शांतिः शांतिः शांतिः ॥

अर्थ—ब्रह्म आपणा दोघांसहि सुख देवो. ब्रह्म आपणां दोघांचेंहि रक्षण करूं. आपण दोघे मिळून [सह] वीर्य म्हणजे ज्ञान मिळविण्याचा प्रयत्न करो. आपणां दोघांचें अध्ययन [अधीतम्] तेजस्वी असो. आपण परस्परांचा द्वेष न करो.

टिप्पणी—"भुनक्तु" हें परस्मैपदाचें रूप असल्यामुळे ह्याचा अर्थ रक्षण करो असाच होतो. म्हणून "अवतु" ह्याचा अर्थ पुनरुक्ति टाळण्याकरिता "सुख देवो" असा करावा लागतो.

ब्रह्मानंदवल्ली अनुवाक १ (पुढे चालू)

ओम् ब्रह्मविदाप्नोति परम् । तदेषाऽभ्युक्ता । सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म । यो वेद निहितं गुहायाम् परमे व्योमन् । सोऽश्नुते सर्वान् कामान् । सह ब्रह्मणाविपश्चितेति । तस्माद्वा एतस्मादात्मन आकाशः संभूतः । आकाशाद्वायुः वायोरग्निः । अग्नेरापः । अद्भ्यः पृथिवी । पृथिव्या ओषधयः । ओषधीभ्योऽन्नं । अन्नात्पुरुषः । स वा एष पुरुषोऽन्नरसमयः । तस्येदमेव शिरः । अयं दक्षिणः पक्षः । अयमुत्तरः पक्षः । अयमात्मा । इदं पुच्छं प्रतिष्ठा । तदप्येष श्लोको भवति ॥१॥

अर्थ—जो ब्रह्म जाणतो तो श्रेष्ठ असें साध्य [परं] मिळवितो. ह्याविषयी पुढील ऋचा सांगितली आहे. "ब्रह्म हें सत्य आणि अनंत ज्ञान आहे. तेंच गुहेत, 'अतिशय खोल आकाशांत म्हणजे शरीराच्या अत्यंत खोल भागात [परमे व्योमन्] ठेवलेलें आहे असें जो जाणतो, तो सर्व कामांचा म्हणजे आनंदाचा आणि ज्ञानवान [विपश्चिता] अशा ब्रह्माचा म्हणजे ब्रह्मज्ञ जीवावस्थेतील आनंदाचाहि उपभोग घेतो." हीच ती ऋचा होय [इति]. त्या ह्या आत्माच असलेल्या ब्रह्मापासून प्रथमतः आकाश उत्पन्न झालें. आकाशापासून वायु झाला. वायूपासून

उत्पन्न होत नाही. म्हणून त्याचें निराकरणहि अनावश्यक आहे. ह्यामुळे श्रीशंकराचार्यांचा अर्थ अग्राह्य व आमचा ग्राह्य ठरतो. शेवटच्या वाक्याच्या अर्थाविषयी फार संशय आहे: त्यांत मागील वाक्याची ("एवमुपासितव्यम्" ह्याची) पुनरुक्ति अध्यायसमाप्ति दाखविण्याकरिता केली आहे, असा मी अर्थ केला आहे. परंतु दुसराहि अर्थ संभवतो. "एतत्" म्हणजे धर्मशास्त्र म्हणजे वेद व मनुस्मृति असाहि अर्थ असेल, "अथाभ्याख्यातेषु" ह्या शब्दांत त्यांचा निर्देश आहे. म्हणून "धर्मशास्त्राचा आचरणांत जो आधार घ्यावयाचा तो वर सांगितल्याप्रमाणे (एवम्) मर्यादित करून घ्यावा" असाहि अर्थ संभवतो. व तोच आम्ही "*The rationalistic and realistic interpretation of the Upanishads*" ह्यांत दिला आहे.

शीक्षावल्ली अनुवाक १२

शं नो मित्रः शं वरुणः । शं नो भवत्वर्यमा । शं न इंद्रो बृहस्पतिः । शं नो विष्णुरुरुक्रमः । नमो ब्रह्मणे । नमस्ते वायो । त्वमेव प्रत्यक्षं ब्रह्मासि । त्वामेव प्रत्यक्षं ब्रह्मावादिषम् ऋतमवादिषं । सत्यमवादिषम् । तन्मामावीत् । तद्वक्तारमावीत् । आवीन्माम् । आवीद्वक्तारम् ॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥

अर्थ—अनुवाक १ प्रमाणेच ह्याचा अर्थ आहे. फक्त तेथे तेथे भविष्यकाळ किंवा आज्ञार्थ आहे तेथें तेथे भूतकाळ घ्यावा.

## ब्रह्मानंदवल्ली प्रार्थना

ब्रह्मानंदवल्ली अनुवाक १

ओम् सह नाववतु । सह नौ भुनक्तु । सहवीर्यं करवावहै । तेजस्वि नावधीतमस्तु मा विद्विषावहै । ओम् शांतिः शांतिः शांतिः ॥

मयाच्या आंत विज्ञानमय, विज्ञानमयाच्या आंत आनंदमय जीव व तदाधारभूत ब्रह्म आहे असें पुढे दाखविलें आहे व हाच अर्थ संक्षिप्त-रूपानें "गुहायां परमे व्योमन्" ह्या शब्दांनी दाखविला आहे.

"कामान् सह ब्रह्मणा"—"सह" या शब्दानें "ब्रह्म हा शब्द" "कामान्" ह्याशीं जोडला आहे. म्हणजे वाक्याचा अर्थ "ब्रह्म च कामांश्च समश्नुते" असा होतो. कठ ६। १४ ह्यांत "ब्रह्म समश्नुते" असें म्हटलें आहे तेंच येथेंहि म्हटलें आहे.

ब्रह्मानंद अनुवाक २

अन्नाद्वै प्रजाः प्रजायंते। याः काश्च पृथिवीं श्रिताः। अथो अन्नेनैव जीवंति। अथैनदपियंत्यंततः। अन्नं हि भूतानां ज्येष्ठम्। तस्मात्सर्वौषधमुच्यते। सर्वं वै तेऽन्नमाप्नुवंति। येऽन्नं ब्रह्मोपासते। अन्नं हि भूतानां ज्येष्ठं। तस्मात्सर्वौषध-मुच्यते। अन्नेन भूतानि जायंते। जातान्यन्नेन वर्धंते। अद्य-तेऽत्ति च भूतानि तस्मादन्नं तदुच्यते इति। तस्माद्वा एतस्मा-दन्नरसमयात्। अन्योंतर आत्मा प्राणमयः। तेनैष पूर्णः। स वा एषपुरुषविध एव। तस्य पुरुषविधताम् अन्वयं पुरुषविधः। तस्य प्राण एव शिरः। व्यानो दक्षिणः पक्षः। अपान उत्तरः पक्षः। आकाश आत्मा। पृथिवी पुच्छं प्रतिष्ठा। तदप्येष श्लोको भवति ॥२॥

अर्थ—पृथिवीवर राहणाऱ्या सर्व प्रजा अन्नापासूनच उत्पन्न होतात, अन्नानेच जीवंत राहतात आणि शेवटीं [अंततः] अन्नांतच [एनद्] जाऊन मिळतात [अपियंति]. म्हणजे सर्व प्रजा मरणानंतर इतर जीवांचें अन्न होतात. अन्न हें सर्व भूतांचें वडील [ज्येष्ठं] आहे. म्हणजे सर्व जीवांच्या पूर्वीच अन्न उत्पन्न झालें. म्हणून तें सर्व जीवांच्या

अग्नि झाला. अग्नीपासून पाणी आणि पाण्यापासून पृथिवी उत्पन्न झाली. पृथिवीपासून ओषधि उत्पन्न झाल्या. ओषधीपासून अन्न व अन्नापासून हा मनुष्यदेह [ पुरुषः ] उत्पन्न झाला. तो हा मनुष्यदेह अन्न आणि पाणी [ रस ] ह्यांनी पूर्णपणें भरलेला असा आहे. ( शरीराच्या त्या त्या भागाकडे बोट दाखवून ग्रंथकार आता म्हणतो. ) हेंच त्याचें डोकें [ शिरस् ], उजवा हात हाच त्याची दक्षिण बाजू, डावा हात हाच त्याची डावी बाजू, छाती वगैरे पायांपर्यंतचा भाग हाच त्याचा आत्मा म्हणजे मुख्य भाग आणि पाय हेंच त्याचें पुच्छ अर्थात् प्रतिष्ठा म्हणजे आधार होय. त्याविषयी हा श्लोक देखील आहे. ॥१॥

टिप्पणें—ज्ञानम् अनंतम्—व्याससूत्र " अतोनंतेन तथाहि लिंगं " ( ३।२।२६ ) ह्यावरून दिसतें की ( तेथील आमचें विवरण पहा ) श्रीव्यासांनी " अनंत " हा शब्द "ज्ञानाचें" विशेषण केलें आहे. त्यांचेंच मी अनुकरण केलें आहे. त्यांचें म्हणणें असें—ब्रह्माच्या ठिकाणीं जागृति आणि ज्ञान (मागील २९ व्या सूत्रांत त्यालाच प्रकाश म्हटलें आहे ) पुनः पुनः [ मागील २५ व्या सूत्रांतील " अभ्यासात् " ह्याचा हा अर्थ आहे ] प्रगट होतें, म्हणून ब्रह्म अनंत ज्ञानानें युक्त आहे असें म्हटलें पाहिजे. " अनंत " ह्या ठिकाणीं आनंद " असा मूळचा पाठ असावा असें Deussen चें म्हणणें आहे पण तें अगदीच चूक आहे. कारण ब्रह्म आनंद आहे असें ह्या वल्लींत प्रतिपादिलें नसून जीव आनंद आहे असेंच प्रतिपादलें आहे, असें पुढे दिसून येईल.

' गुहायां परमे व्योमन् "—कठ ३। १०-११ ह्यांत सांगितल्याप्रमाणे इंद्रियांच्या आंत विषयांचीं प्रतिबिंबें, त्यांच्या आंत मन, मनाच्या आंत बुद्धि, बुद्धीच्या आंत अहंकार [महान्] व अहंकाराच्या आंत ब्रह्म [पुरुष] आहे. असें आंत आंत गुहेंतील खोल खोल आकाशांत ब्रह्म आहे. येथेहि तसाच अर्थ आहे. अन्नमय शरीराच्या आंत प्राणमय आत्मा, प्राणमयाच्या आंत मनोमय, मनो-

मयाच्या आंत विज्ञानमय, विज्ञानमयाच्या आंत आनंदमय जीव व तदाधारभूत ब्रह्म आहे असें पुढें दाखविलें आहे व हाच अर्थ संक्षिप्तरूपानें "गुहायां परमे व्योमन्" ह्या शब्दांनी दाखविला आहे.

"कामान् सह ब्रह्मणा"—"सह" या शब्दानें "ब्रह्म हा शब्द" "कामान्" ह्याशीं जोडला आहे. म्हणजे वाक्याचा अर्थ "ब्रह्म व कामांश्च समश्नुते" असा होतो. कठ ६ । १४ ह्यांत "ब्रह्म समश्नुते" असें म्हटलें आहे तेंच येथेंहि म्हटलें आहे.

ब्रह्मानंद अनुवाक २

अन्नाद्वै प्रजाः प्रजायंते । याः काश्च पृथिवीं श्रिताः । अथो अन्नेनैव जीवंति । अथैनदपियंत्यंततः । अन्नं हि भूतानां ज्येष्ठम् । तस्मात्सर्वौषधमुच्यते । सर्वं वै तेऽन्नमाप्नुवंति । येऽन्नं ब्रह्मोपासते । अन्नं हि भूतानां ज्येष्ठं । तस्मात्सर्वौषधमुच्यते । अन्नेन भूतानि जायंते । जातान्यन्नेन वर्धंते । अद्यतेऽत्ति च भूतानि तस्मादन्नं तदुच्यते इति । तस्माद्वा एतस्मादन्नरसमयात् । अन्योंतर आत्मा प्राणमयः । तेनैष पूर्णः । स वा एषपुरुषविध एव । तस्य पुरुषविधताम् अन्वयं पुरुषविधः । तस्य प्राण एव शिरः । व्यानो दक्षिणः पक्षः । अपान उत्तरः पक्षः । आकाश आत्मा । पृथिवी पुच्छं प्रतिष्ठा । तदप्येष श्लोको भवति ॥२॥

अर्थ—पृथिवीवर राहणाऱ्या सर्व प्रजा अन्नापासूनच उत्पन्न होतात, अन्नानेंच जीवंत राहतात आणि शेवटीं [ अंततः ] अन्नांतच [ एनद् ] जाऊन मिळतात [ अपियंति ]. म्हणजे सर्व प्रजा मरणानंतर इतर जीवांचें अन्न होतात. अन्न हें सर्व भूतांचें वडील [ज्येष्ठं] आहे. म्हणजे सर्व जीवांच्या पूर्वींच अन्न उत्पन्न झालें. म्हणून तें सर्व जीवांच्या

भुकेचें शमन करणारें औषध आहे असें म्हटलें जातें. जे अन्नच ब्रह्म म्हणजे आत्यंतिक प्राप्तव्य समजून त्याची उपासना करतात म्हणजे अन्न मिळविण्याचा प्रयत्न करतात, त्यांना सर्व म्हणजेच पूर्ण, भरपूर किंवा आवश्यक तितकें अन्न मिळतेंच. सर्व प्राण्यांच्या पूर्वी अन्न उत्पन्न झालें [ ज्येष्ठं ] म्हणून तें सर्व प्राण्यांच्या भुकेचें शमन करणारें औषध आहे असें म्हटलें जातें. अन्नानेंच जीव उत्पन्न होतात आणि उत्पन्न झाल्यानंतर अन्नानेंच वाढतात. भूतांकडून तें खाल्लें जातें [ अद्यते ] म्हणून आणि भूतांना तें खातें [ अत्ति ] म्हणूनहि त्याला अन्न असें म्हणतात. (येथे अन्नमय कोशाचें वर्णन संपलें हें दाखविण्या करिता आणि अन्नाविषयींचे श्लोकहि संपले हेंहि दाखविण्याकरिता "इति" शब्द योजला आहे). त्या ह्या अन्नरसमय आत्म्याच्या म्हणजे शरीराच्या आंतमध्ये दुसरा प्राणमय आत्मा आहे. त्या प्राणमय आत्म्याने हा अन्नरसमय आत्मा पूर्णपणे भरलेला म्हणजेच व्यापलेला आहे [ पूर्णः ]. तो हा प्राणमय आत्मा पुरुषदेहाकारसारखा आहे. पुरुषदेहाच्या पुरुषविधतेप्रमाणेच [ पुरुषविधतामनु, "अनु" ह्यामुळे "पुरुषविधताम्" येथील द्वितीया विभक्ति झाली आहे.]. हा प्राणमय आत्मा पुरुषविध आहे. म्हणजे देहाप्रमाणेच ह्यास डोकें, दोन बाजू, मध्य व पुच्छ आहे. म्हणजेच प्राण हेंच त्याचें डोकें, व्यान ही त्याची उजवी [ दक्षिण ] बाजू, अपान ही त्याची डावी [ उत्तर ] बाजू, आकाश म्हणजे समान हाच त्याचा आत्मा म्हणजे मुख्य भाग आहे. आणि पृथिवी ही त्याचें पुच्छ म्हणजे आधार [ प्रतिष्ठा ] आहे. त्यासंबंधाने हा पुढील श्लोक देखील आहे. ॥२॥

टिप्पणी:—"अत्ति च भूतानि" ह्याचा "भूतांना अन्न खातें" असा मोघम अर्थ वर केला आहे. पण त्याचा भावार्थ काय, असा प्रश्न येतो. मरणानंतर जीव अन्नांत जाऊन मिळतात हें जें मागे सांगितलें तेंच येथे दुसऱ्या शब्दांनी सांगितलें असें वाटतें. कारण

-मरणानंतर जीव अन्नरूपाला प्राप्त होतो म्हणजे अन्न जीवाला खाऊन आत्मसात् करतें असेंच म्हटलें पाहिजे किंवा पंचमहाभूतांना खाऊन जीवांचें अन्न तयार होतें म्हणून त्याला "भूतानि अत्ति" असेंहि म्हणतां येतें.

"महा" म्हणजे "आत्यंतिक प्राधान्य" असाच अर्थ येथे घ्यावा लागतो.

"मय" प्रत्यय—ह्या वल्लीतील "मय" प्रत्ययांत सर्व शब्दांच्या अर्थाविषयी मोठा वाद आहे. "मय" प्रत्ययाचे विकार आणि प्राचुर्य असे दोन अर्थ आहेत. श्रीशंकराचार्यांच्या मतें ह्या सर्व वल्लींतील सर्व "मय" प्रत्यय विकारार्थी आहेत. व्याससूत्र १।१।१९ वरील भाष्य "इदं त्विह वक्तव्यम्" यापुढचें पहा. आमच्या व श्रीव्यासांच्याहि मतें ते सर्व प्राचुर्यार्थी आहेत. उदाहरणार्थ "अन्नमय" म्हणजे "अन्नाचा विकार" असा अर्थ नसून "अन्नप्रचुर" म्हणजेच "अन्नानेच भरपूर भरलेला" असा अर्थ आहे. आनंदप्रचुर म्हणजे बहुतेक अंशाने आनंदी पण अल्पांशाने तरी दुःखी असा अर्थ श्रीशंकराचार्य घेतात असें वर निर्दिष्ट केलेल्या भाष्यभागातील "अपि च आनंदप्रचुरं इत्युक्ते दुःखास्तित्वमपि गम्यते" ह्यावरून दिसतें. पण तसा अर्थ घेणें अयोग्य आहे, कारण तसाच अर्थ "अन्नप्रचुर" "प्राणप्रचुर" इत्यादि शब्दामध्ये, ज्यांचें अन्न, प्राण वगैरेशीं मिश्रण व्हावें असें दुसरें काही, नसल्यामुळे कांही घेतांच येत नाही. "मय" प्रत्ययाचा अर्थ "विकार" मानल्याने आपत्ति अशी येते की जो विकार आहे तो त्याज्य मानावा लागतो. परंतु येथे तर आठव्या अनुवाकांत "उपसंक्रामति" ह्या शब्दाने मयप्रत्ययवानी विशेषितांचा स्वीकार सांगितला आहे, म्हणून "मय" प्रत्यय प्राचुर्यार्थी मानावा लागतो. ऐतरेयोपनिषद् २१४ येथेहि "मय" प्रत्यय प्राचुर्यार्थकच मानावा लागतो असें आमच्या तेथील टीकेंत दाखविलें आहे. त्याने येथील मय प्रत्यय प्राचुर्यार्थकच

मानावा ह्या सिद्धांतास पुष्टिच येते. श्रीशंकराचार्यांनीहि "उपसंक्रामति" ह्याचा अर्थ "व्यतिरिक्तं न पश्यति" म्हणजे "भिन्न आहे असें पहात नाही" असा केला आहे. अनुवाक ८ वरील त्यांचें भाष्य पहा म्हणजे "उपसंक्रमति" ह्याचा अर्थ त्यांनीहि "त्याग करतो" असा केला नाही. तथापि अन्नमय, प्राणमय, मनोमय आणि विज्ञानमय ह्यांतील "मय" विकारार्थीच आहे असें कांही कारण न देतां ग्रहणच केलें आहे आणि त्यावरून "आनंदमय" येथील "मय"हि विकारार्थीच असला पाहिजे असें प्रतिपादिलें आहे. आमचें म्हणणें ह्या पांचहि शब्दांमध्ये "मय" प्राचुर्यार्थीच मानावा म्हणजे कोणतीच अडचण म्हणजे आपत्ति उत्पन्न होत नाही. श्रीशंकराचार्यांस जी अडचण वाटली ती अशी की "आनंदमय आत्मा" हें निर्विशेष ब्रह्म नसून सविशेष ब्रह्म आहे आणि त्यांच्या मतें सविशेष ब्रह्म प्राप्तव्य म्हणून सांगितलें असणें शक्य नाही. म्हणून त्यांनी आनंदमयाला विकार ठरवून त्याचें त्याज्यत्व दाखविलें. आमच्या मतें निर्विशेष ब्रह्मांत आनंदाचा अनुभवच असत नाही. आनंदानुभव सविशेष ब्रह्मांतच असतो. म्हणून आम्ही आनंदमय म्हणजे आनंदविकार असा अर्थ न घेतां आनंदप्रचुर असा अर्थ घेतला आहे. आणि तें योग्यच आहे. "जीवन्मुक्ति" ही ब्रह्माची सविशेष अवस्था होय आणि तीच "प्राप्तव्य" असें उपनिषदें सांगतात. "आकाश आत्मा" येथील "आकाश" म्हणजे "समान" असाच अर्थ श्रीशंकराचार्यांनी आणि उपनिषद्ब्रह्मयोगी यांनीहि घेतला आहे. त्यास आधार प्रश्नोपनिषद् ३।८ येथे आहे. तेथे द्यु आणि पृथिवी ह्यांमधील आकाशाला बाह्य समान म्हटलें आहे. ह्यावरून येथे शरीरांतील "समानाला" आकाश म्हटलें आहे. "समान"हि पोटांत म्हणजे शरीराच्या मध्यभागांत असतो आणि तो अन्न पचवून शरीराचें पोषण करणारा असल्यामुळे, शरीराचा आत्माच होय असें म्हणतां येते.

"पृथिवी पुच्छ प्रतिष्ठा"—पृथिवी ही प्राणमय आत्म्याची प्रतिष्ठा आहे कारण पृथिवीपासून उत्पन्न होणाऱ्या अन्नावरच प्राण अवलंबून असतात

। ह्या उपनिषदांत "उदाना"विषयी कांही न सांगण्याचें कारण असें दिसतें की प्रश्नोपनिषद् ३।९ प्रमाणे "उदान" हा ह्या देहाच्या धारणास मदत करीत नसून मृत्यूनंतर पुनर्जन्मास घालतो, किंवा प्रश्नोपनिषद् ४।४ प्रमाणे तो जीवाला दररोज निद्रेंत्न जागृतींत आणतो

ब्रह्मानंदवल्ली अनुवाक ३

प्राणं देवा अनु प्राणति । मनुष्या पशवश्च ये । प्राणो हि भूतानामायु । तस्मात्सर्वायुषमुच्यते । सर्वमेव ते आयुर्यंति । ये प्राणं ब्रह्मोपासते । प्राणो हि भूतानामायु । तस्मात्सर्वायुषमुच्यत इति । तस्यैष एव शारीर आत्मा । य पूर्वस्य । तस्माद्वा एतस्मात्प्राणमयात् । अन्योतर आत्मा मनोमय । तेनैष पूर्ण । स वा एष पुरुषविध एव । तस्य पुरुषविधताम् । अन्वय पुरुषविध । तस्य यजुरेव शिर । ऋग् दक्षिण पक्ष । सामोत्तर पक्ष । आदेश आत्मा । अथर्वांगिरस पुच्छ प्रतिष्ठा । तदप्येष श्लोको भवति ।।३।।

अर्थ—अग्नि वगैरे देव, मनुष्य आणि पशु प्राण आपलं कर्म करतो म्हणूनच [अनु] आपली कर्मे करतात [प्राणति] प्राण हेंच जीवाचें आयुष्य होय म्हणूनच त्याला सर्वांचें आयुष्य म्हणतात जे कोणी प्राणच ब्रह्म म्हणजे प्राणाचेंच पोषण व रक्षण करण्यासाठी झटतात, ते सर्व म्हणजे पूर्ण आयुष्य मिळवितात [आयुर्यंति] प्राण हेंच जीवाचें आयुष्य होय म्हणूनच त्याला सर्वांचें आयुष्य म्हणतात

( येथे प्राणाविषयींचे श्लोक संपले असें दाखविण्याकरितां "इति" हा शब्द योजिला आहे ). पूर्वीच्या अन्नमयाचा जो शारीर आत्मा ( म्हणजे जीवात्मा ) तोच ह्या प्राणमयाचाहि होय. ह्या त्या प्राणमयाच्या आंतमध्ये दुसरा मनोमय आत्मा आहे. त्या मनोमय आत्म्याने हा प्राणमय आत्मा पूर्णपणें भरलेला म्हणजे व्यापलेला आहे. तो हा मनोमय आत्माहि पुरुषदेहासारखाच आहे. त्याच्या म्हणजे पुरुषदेहाच्या पुरुषविधतेप्रमाणेच ह्या मनोमय आत्म्याची पुरुषविधता आहे. म्हणजे यजुर् म्हणजे गोड कल्पना हेंच त्याचें डोकें होय. ऋग् म्हणजे चांगल्या वासना ही त्याची दक्षिण बाजू ( उजवी बाजू ), साम म्हणजे चांगल्या भावना म्हणजे अद्वैत भावना वगैरे ही त्याची उत्तर बाजू, आदेश म्हणजे असें कर किंवा असें करूं नकोस असा हुकूम हाच त्याचा आत्मा म्हणजे मुख्य भाग होय. अहंकाराच्या चित्तवृत्ति हाच त्याचें पुच्छ म्हणजे आधार [ प्रतिष्ठा ] आहे. त्यासंबंधी हा पुढील श्लोक देखील आहे. ॥३॥

टिप्पणी—येथे परोक्षवाद-विवरणतत्त्वाप्रमाणेच यजुर् वगैरेंचे अर्थ करावे लागतात हें उघड आहे. वरील अर्थ यजुर् वगैरेंचे मी केले त्याची कारणें प्रश्नोपनिषद् ५।३–७ आणि २।८ ह्यांच्या विवरणांत दिलीं आहेत तीं पहा.

प्राणोपासनेनें पूर्ण आयुष्य मिळतें, मरणराहित्य मिळत नाही. ही गोष्ट येथील वर्णनावरून स्पष्ट होते.

ब्रह्मानंदवल्ली अनुवाक ४

यतो वाचो निवर्तन्ते । अप्राप्य मनसा सह । आनंदं ब्रह्मणो विद्वान् । न बिभेति कदाचनेति । तस्यैष एव शारीर आत्मा । यः पूर्वस्य । तस्माद्वा एतस्मान्मनोमयात् । अन्योंतर आत्मा विज्ञानमयः । तेनैष पूर्णः । स वा एष

पुरुषविध एव । तस्य पुरुषविधताम् । अन्वयं पुरुषविधः । तस्य श्रद्धैव शिरः । ऋतं दक्षिणः पक्षः । सत्यमुत्तरः पक्षः । योग आत्मा । महः पुच्छं प्रतिष्ठा । तदप्येष श्लोको भवति ॥४॥

अर्थः—ज्याला न पोचतां [अप्राप्य] वाणी म्हणजे शब्द परत फिरतात [निवर्तंते] म्हणजे ज्याचें शब्द वर्णन करूं शकत नाहीत, त्या ब्रह्मानंदाला [आनंद ब्रह्मणः] मनाच्या मदतीनें किंवा साधनानें [मनसा सह] जाणणारा मनुष्य [विद्वान्] केंव्हाच भीत नाही ( येथे मनाच्या स्तुतीचा श्लोक संपला हें दाखविण्याकरिता इति शब्द योजला आहे.) पूर्वीच्या प्राणमयाचा जो शारीर आत्मा म्हणजे जीवात्मा तो हा मनोमयाचाहि आहे. त्या ह्या मनोमयाच्या आंत दुसरा विज्ञानमय आत्मा आहे. त्या विज्ञानमय आत्म्यानें हा मनोमय आत्मा पूर्णपणें भरलेला म्हणजे व्यापलेला आहे तो हा विज्ञानमय आत्माहि मनुष्य देहासारखाच आहे. त्याच्या म्हणजे पुरुषदेहाच्या पुरुषविधते-प्रमाणेच हा विज्ञानमय आत्मा पुरुषविध आहे म्हणजेच श्रद्धा म्हणजे प्रमाणाशिवायच सर्वांनीच सत्य मानलेल्या गोष्टी हें त्याचें डोकें, ऋत म्हणजे प्रथायरून होणारें ज्ञान हीं त्याची उजवी बाजू, सत्य म्हणजे प्रत्यक्ष व अनुमान ह्या प्रमाणांनी होणारें ज्ञान ही त्याची उत्तरेची म्हणजे डावी बाजू. योग म्हणजे निर्णयरूपी क्रिया हाच त्याचा आत्मा होय. आणि "महः" म्हणजे अहंकार हा त्याचें पुच्छ म्हणजेच त्याची प्रतिष्ठा म्हणजे आधार आहे (अहंकाराशिवाय बुद्धि कार्य करीत नाही व ज्ञान होत नाही म्हणून अहंकार हा ज्ञानमय आत्म्याची प्रतिष्ठा आहे ) त्याविषयी हा पुढील श्लोकहि आहे ॥४॥

टिपणें—"मनसा सह"—"'यतो वाचो निवर्तंते इत्यादि' श्लोक येथे पूर्वी नव्हताच, येथे दुसरा कोणता तरी श्लोक पूर्वी होता, तो गहाळ झाला म्हणून नवव्या अनुवाकातील श्लोकच येथे कोणीतरी

घातला, कारण येथें वास्तविक मनाची स्तुति असली पाहिजे; परंतु या श्लोकांत तर ब्रह्मानंदाची स्तुति आहे " असें कोणी म्हणण्याचा संभव आहे. पण हें म्हणणें ग्राह्य करण्यापेक्षा या श्लोकाचा अर्थ निराळ्या रीतीनें म्हणजे येथें हा श्लोक मनाच्या स्तुतीचा दर्शक आणि नवव्या अनुवाकांत ब्रह्मानंदाच्या स्तुतीचा दर्शक होईल असा रीतीनें करणें अधिक चांगलें आहे. आणि तशा रीतीनें सरळपणेंच अर्थ करतांहि येतो आणि तो अर्थ उपपन्नहि आहे. तो अर्थ असा—" मनसा सह " हे शब्द " यतः निवर्तंते " यांशीं न जोडतां " ब्रह्मानंदं विद्वान् " यांशीं जोडावे. आणि " सह " याचा अर्थ " साहाय्यभूतेन " असा करावा किंवा "मनसा" ही साधनें तृतीया मानून "सह" याचें "सः ह" असा पदच्छेद करावा. " सह " धातूसनच " साहाय्य " म्हणजे मदत या अर्थीचा शब्द तयार आहे. अर्थात् " सह " याचा अर्थहि " साहाय्यभूतेन " असा असला पाहिजे. किंवा " सः " " ह " अशीं पदें पाडलीं तर "सः" म्हणजे "ब्रह्मविदाप्नोति परं" यांतील "ब्रह्मविद्" असा अर्थ घ्यावा. तो दूरान्वयहि होत नाहीं कारण " ब्रह्मविदाप्नोति परम् " या वाक्याच्या स्पष्टीकरणार्थच सर्व ब्रह्मानंदवल्ली लिहिली आहे. हे दोनहि अर्थ उपपन्न आहेत असें मागें शीक्षावल्ली अनुवाक ६ येथील " मन आनंदं " या पदावरूनच स्पष्ट होतें. मनानें आनंदभावना व अद्वैतभावना केल्यानेच म्हणजे यजुः आणि साम यांनीच ब्रह्मानंदाची प्राप्ति होते. हें पुढें अनुवाक सात व आठ यांत स्पष्टहि केलेंच आहे. हे दोन अर्थ घेतले म्हणजे हा श्लोक येथें येथील संदर्भामुळे मागच्या अनुवाकांतील मनाची आनंदाचें साधन असी स्तुति करणारा होतो. आणि नवव्या अनुवाकांत तेथील संदर्भामुळे मागील अनुवाकांतील

" श्रद्धा "—श्रद्धा म्हणजे प्रमाणाशिवाय जी गोष्ट सर्वांकडूनच सत्य मानली जाते ती जसे भूमितिशास्त्रातील axioms किंवा भगवद्गीतेंत सांगितलेला "नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सत " हा सिद्धांत. प्रमाणाशिवाय सत्य मानलेल्या काही थोडया सिद्धांतावरच सर्व ज्ञान अवलंबून आहे, म्हणून त्यास शिर म्हटलें आहे सर्वांचें ऐकमत्य हेंच त्या श्रद्धा नामक ज्ञानाच्या सत्यत्वाचें प्रमाण आहे ज्या विषयी सर्वांचें ऐकमत्य नाही अशा कांही गोष्टींवर काही लोक प्रमाणाशिवाय विश्वास ठेवीत असले व तिला श्रद्धा म्हणत असले तरी ती खरी श्रद्धा नव्हे ती अंधश्रद्धा होय. उदाहरणार्थ, पुनर्जन्माविषयी श्रद्धा किंवा पितृकर्मांतील पिंड पितराची भूक शांत करतात ही श्रद्धा. ही अशी श्रद्धा येथे अभिप्रेत नाही.

"ऋत" "सत्य"—ह्याचे अर्थ मागेच शीक्षावल्लीच्या पहिल्या अनुवाकाच्या टिप्पणांत सांगितलेच आहेत "सत्य" हे "ऋता"पेक्षा वरचढ आहे हें दाखविण्याकरिताच "सत्या"ला उत्तरपक्ष म्हटलें असावें असें वाटतें

"योग"—"हें असेंच खरें" असा निर्णय झालाच "योग" म्हटलें आहे हा असा निर्णयच विज्ञानाचा आत्मा होय म्हणून "योग" ह्याचा हाच अर्थ घेतला पाहिजे श्रीशङ्कराचार्यांनी "समाधान" हा अर्थ दिला आहे त्याचाहि अर्थ आम्ही करतों तसाच आहे "बुद्धीला जें प्राप्त होतें तें" असा योग ह्याचा व्युत्पत्तिसिद्ध अर्थ होऊ शकतो त्यावरून वर दिलेला अर्थ निघतो.

ब्रह्मानंदवल्ली अनुवाक ५

विज्ञानं यज्ञं तनुते । कर्माणि तनुतेऽपि च । विज्ञानं देवाः सर्वे । ब्रह्म ज्येष्ठमुपासते । विज्ञानं ब्रह्म चेद्वेद ।

तस्माच्चेन्न प्रमाद्यति । शरीरे पाप्मनो हित्वा । सर्वान् कामान् समश्नुते इति । तस्यैष एव शारीर आत्मा यः पूर्वस्य । तस्माद्वा एतस्माद्विज्ञानमयात् । अन्योऽन्तर आत्मा आनंदमयः । तेनैष पूर्णः । स वा एष पुरुषविध एव । तस्य पुरुषविधताम् । अन्वयं पुरुषविधः । तस्य प्रियमेव शिरः । मोदो दक्षिणः पक्षः । प्रमोद उत्तरः पक्षः । आनंद आत्मा । ब्रह्म पुच्छं प्रतिष्ठा । तदप्येष श्लोको भवति ॥५॥

अर्थ—विज्ञानच यज्ञ करतें, विज्ञानच सर्व कर्मे करतें. सर्व ब्राह्मणे लोक [देवाः] विज्ञानालाच सर्वांत मोठें किंवा उत्तम [ज्येष्ठ] प्राप्तव्य[ब्रह्म] समजून त्याची उपासना करतात. विज्ञान हेंच ब्रह्म आहे असें जो जाणतो आणि त्या विज्ञानापासून जर तो चुकत नाही म्हणजे त्या विज्ञानाप्रमाणेंच जो वागतो (उदाहरणार्थ, मद्य घातक आहे असें जाणून मद्य सेवन करणार नाही तर) तो शरीरांतील पापें म्हणजे शारीरिक दुःखें टाकून देऊन सर्व कामांचा उपभोग घेतो. (येथे विज्ञानाच्या स्तुतीचा श्लोक संपला असें दाखविण्याकरितां इति शब्द योजिला आहे.) पूर्वीच्या मनोमयाचा जो शारीर आत्मा म्हणजे जीवात्मा तोच ह्या विज्ञानमयाचा होय. ह्या त्या विज्ञानमयाच्या आंत दुसरा आनंदमय आत्मा आहे. त्या आनंदमय आत्म्याने हा विज्ञानमय आत्मा पूर्णपणें भरलेला म्हणजे व्यापलेला आहे. तो हा आनंदमय आत्माहि मनुष्य देहाकारच्याच आहे. त्याच्या म्हणजे पुरुषदेहाच्या पुरुषविधतेप्रमाणेच हा आनंदमय आत्मा पुरुषविध आहे. म्हणजेच प्रिय म्हणजे इतर जीवांवरील प्रेम हेंच त्याचें शिर आहे. मोद म्हणजे अन्य जीवांच्या सुखासाठी झटण्याचा जो आनंद होतो तो त्याची दक्षिण बाजू होय. प्रमोद म्हणजे अन्य जीवांस सुख झाल्याने जो आनंद होतो तो त्याची उत्तर बाजू होय. आनंद म्हणजे

विषयनिरपेक्ष,आनंद हा त्याचा आत्मा होय. ब्रह्म हेंच त्याचें पुच्छ म्हणजेच त्याची प्रतिष्ठा म्हणजे आधार आहे. त्याविषयी म्हणजे ब्रह्म हें आनंदाचा आधार आहे ह्याविषयी पुढील श्लोक आहे. ॥५॥

टिप्पणी—शारीरिक दुःखांचा नाश करण्याकरिता विज्ञानाची व त्याप्रमाणे वागण्याची आवश्यकता आहे हें उघडच आहे. म्हणूनच विज्ञानाला ज्येष्ठ ब्रह्म असें म्हटलें आहे. "ज्येष्ठ" हें "प्रशस्य" ह्याचें रूप आहे आणि त्याचा अर्थ प्रशस्यतम म्हणजेच सर्वांमध्यें उत्तम म्हणजे चांगलें असा आहे [आपट्यांचा कोश पहा]. ज्येष्ठ म्हणजे सर्वांमध्ये वयाने वडील असाहि अर्थ होतो. पण तो येथे जुळत नाही. "ज्येष्ठ" म्हणजे सर्वांमध्ये मोठे असाहि अर्थ होतो. तोहि अर्थ येथे घेण्यास हरकत नाही. "ज्यायान् पृथिव्याः ज्यायानंतरीक्षात्" (छां. उ ३। १४) येथे हाच अर्थ आहे. "प्रिय" "मोद" "प्रमोद" ह्यांचे अर्थ व्याससूत्र ३ । ३ । १२ ह्यांत श्रीव्यासांनी जे केले असें दिसतें तेच येथे घेतले आहेत. तें सूत्र "प्रियशिरस्त्वाद्यप्राप्तिरुपचयापचयौ हि भेदे" असें आहे. त्याचा अर्थ कोणीहि आपला जीव व दुसरे जीव ह्यांमध्ये भेद मानला तर "प्रियशिरस्त्वादि" येथे सांगितलेल्या गोष्टी त्याला प्राप्त होणार नाहीत आणि त्याच्या आनंदाला भरती व ओहोटी राहील. म्हणजेच आपला जीव व इतरांचे जीव एकच मानल्याने, "प्रिय" "मोद" व "प्रमोद" प्राप्त होतात, असा आहे. ह्या अर्थांनीं, "प्रिय", "मोद" व "प्रमोद" ह्यांचे येथे मी केलेले अर्थच जुळतात.

ब्रह्मानंदवल्ली अनुवाक ६

असन्नेव स भवति । असद्ब्रह्मेति वेद चेत् । अस्ति ब्रह्मेति चेद्वेद संतमेनं ततो विदुरिति । तस्यैष एव शारीर आत्मा यः पूर्वस्य । अथातोऽनुप्रश्नाः । उताविद्वानमुं लोकं प्रेत्य । कश्चन गच्छती ३ । आहो विद्वानमुं लोकं प्रेत्य ।

कश्चित् समश्नुता ३ । सोऽकामयत बहु स्याम् प्रजायेयेति । स तपोऽतप्यत । स तपस्तप्त्वा । इदं सर्वमसृजत । यदिदं किंच । तत्सृष्ट्वा । तदेवानुप्राविशत् । तदनुप्रविश्य । सच्च त्यच्चाभवत् । निरुक्तं चानिरुक्तं च । निलयनं चानिलयनं च । विज्ञानं चाविज्ञानं च । सत्यं चानृतं च । सत्यमभवत् । यदिदं किं च । तत्सत्यमित्याचक्षते । तदप्येष श्लोको भवति ॥६॥

अर्थ—ब्रह्म नाहीच असें जर म्हटलें तर आनंदमय आत्मा [सः] नाहीच असें होतें. ह्याच्या उलट ब्रह्म आहे असें म्हटलें तर आनंदमय आत्मा आहे असें म्हणतां येतें. म्हणून ब्रह्म ही आनंदमयाची प्रतिष्ठा आहे असें वर म्हटलें आहे. (येथे ब्रह्म आनंदमयाची प्रतिष्ठा आहे ह्याची उपपत्ति सांगणारा श्लोक संपला असें दाखविण्याकरितां इति शब्द योजला आहे.) पूर्वीच्या विज्ञानमयाचा जो शारीर आत्मा म्हणजे जीवात्मा तोच ह्या आनंदमयाचा आत्मा होय. आता आम्ही जें वर सांगितलें म्हणजे आनंदप्रचुर आत्म्याचें वर्णन केलें त्यावर [अनु] कांही प्रश्न [प्रश्नाः] उत्पन्न होतात. ते प्रश्न असे (१) अहो, या दुःखद लोकांतून म्हणजे अवस्थेंतून निघून जाऊन [प्रेत्य] त्या लोकास [अमुं लोकं] म्हणजे वर वर्णिलेल्या आनंदप्रचुर अवस्थेस कोणीच अविद्वान् [कश्च अविद्वान्] जात नाही काय ? (२) बरें, ह्या दुःखद लोकांतून म्हणजे अवस्थेंतून निघून जाऊन त्या लोकांस म्हणजे आनंद-प्रचुर अवस्थेस कोणीहि [कश्चित्] विद्वान् उपभोगतोच [समश्नुते] असें तरी आहे काय ? (ह्या प्रश्नांचें उत्तर देण्याकरितांच पुढील आठव्या अनुवाकाच्या अखेरपर्यंतचा ग्रंथ सांगितला आहे. आणि त्यांत असें सांगितलें आहे की (१) अविद्वान् म्हणजे अद्वैत तत्त्व न जाणणारा ह्या आनंदप्रचुर अवस्थेस केव्हाच जात नाही आणि (२) विद्वान् म्हणजे

अद्वैतरूप त्या आनंदप्रचुर- अवस्थेस अनुभवतोय). तो मागे वर्णिलेला आनंदमय आत्माच [सः] मागील काळीं - इच्छा करिता झाला की "आपण एकटेच आहों त्या ऐवजी पुष्कळ व्हावें [बहु स्याम्], मी प्रजांना जन्म द्यावा [प्रजायेय]." तेव्हा मागील काळीं तो तप तपला म्हणजे त्याने तपश्चर्या केली म्हणजेच एकाग्रचित्ताने चिंतन केलें. त्याने तप करून हें जें कांही आहे तें सर्व उत्पन्न केलें. तें उत्पन्न करून त्यांतच त्याने स्वतः प्रवेश केला. आणि त्यांत प्रवेश करून तो सत् आणि त्यत् असा दोन प्रकारचा झाला. (सत् म्हणजे जीवात्मा आणि त्यत् म्हणजे जीवात्मा जिला पाहतो ती सृष्टि) म्हणजेच तो बोलणे [निरुक्तं] आणि न बोलणे [अनिरुक्तं] झाला म्हणजे बोलणारा व न बोलणारा झाला अथवा पळणें [निलयनं] व न पळणें [अनिलयनं] झाला म्हणजे पळणारा व न पळणारा झाला. अथवा जाणणें [विज्ञानं] व न जाणणें [अविज्ञानं] झाला म्हणजे जाणणारा व न जाणणारा झाला. अथवा सत्य म्हणजे जो आहे. ह्याविषयी खात्री आहे. तो जीवात्मा आणि अनृत म्हणजे ज्याच्या अस्तित्वाविषयी अशी खात्री नाही तें बाह्य जगत् तेंहि तो झाला. एकूण सत् आणि त्यत् मिळून तो सत्य झाला. हे जें कांही आहे, त्याला सत्य असें म्हणतात (कारण त्यात सत् आणि त्यत् असे दोन भाग आहेत). ह्याविषयीच हा पुढील श्लोक आहे. ॥६॥

टिप्पणें—सहावा, सातवा आणि आठवा अनुवाक प्रक्षिप्त आहेत असें कोणी म्हणतात. "येथील प्रत्येक अनुवाकाच्या आरंभीं त्या-पूर्वीच्या अनुवाकांत वर्णिलेल्या आत्म्याची स्तुति आहे, तशी सहाव्या-अनुवाकाच्या आरभीं वास्तविक आनंदाची स्तुति पाहिजे होती आणि ती तर नवव्या अनुवाकाच्या आरंभीं आहे. म्हणून ६ वा, ७ वा आणि ८ वा हे तीन अनुवाक प्रक्षिप्त आहेत." असें त्यांचें म्हणणें आहे. पण तें म्हणणें अग्राह्य आहे. कारण ह्या तीन अनुवाकांतील हें वर्णन प्रासंगिक आणि आवश्यकहि आहे. "ब्रह्म पुच्छं प्रतिष्ठा" ह्यांतील सिद्धांताचें

समर्थन करणें आणि आनंदमयावस्था असंभाव्य नाही, ती अद्वैतशास्त्र कामत्यागाने प्राप्त होतेच आणि द्वैत खरें मानणाऱ्यास केव्हाच प्राप्त होत नाही, हें दाखविणें आवश्यक होतें. त्या दोनहि गोष्टी ह्या प्रासंगिक अशा तीन अनुवाकांत ग्रंथकाराने केल्या आहेत. ह्या तीन अनुवाकांतील प्रतिपादन फारच मार्मिक आहे आणि तेंच ग्रंथाचा मुख्य भाग आहे.

"सत्" आणि "त्यत्"—बृहदारण्यक अध्याय २, ब्राह्मण ३ येथेहि हे शब्द आणि त्यांचें वर्णन आलें आहे. परंतु येथे "सत्" ज्या अर्थाने योजला आहे त्या अर्थाने तेथे "त्यत्" योजला आहे. आणि येथे "त्यत्" ज्या अर्थाने योजला आहे त्या अर्थाने तेथे "सत्" योजला आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. येथे "सत्" हा शब्द आत्मा ह्या अर्थानें योजला आहे. कारण "सत्" खालींच दुसरे शब्द "निरुक्त", "निलयन" "विज्ञान" आणि "सत्य" हे लाविले आहेत आणि "सत्" म्हणजे "आत्मा" असें मानलें तरच हे सर्व शब्द यथार्थपणें त्याचीं जुळतात. तसेंच "त्यत्" ह्याला दुसरे शब्द "अनिरुक्त", "अनिलयन", "अविज्ञान" आणि "अनृत" हे लाविले आहेत आणि "त्यत्" म्हणजे "आत्मा जिला पाहतो ती सृष्टि" असें मानलें तरच हे शब्द यथार्थपणें त्याचीं जुळतात. "सत्" आणि "त्यत्" ह्यांना लावलेले शब्द यथाक्रम योजले आहेत म्हणजे "सत्"ला लावावयाचे शब्द पहिल्यांदा व "त्यत्"ला लावावयाचे शब्द दुसऱ्यांदा योजले आहेत हेंहि उघड आहे.

"सः" म्हणजे नुकताच मागील अनुवाकांत वर्णिलेला "आनंदमय आत्मा" हा अर्थ उघड आहे.

"अमुं लोकं" म्हणजे येथेच मागील अनुवाकांत वर्णिलेली "आनंदमयावस्था" हाहि अर्थ उघड आहे.

"प्रेत्य"—"अमुं लोकं" म्हणजे "त्या लोकाला" म्हणजेच "त्या अवस्थेला" असा अर्थ आहे म्हणून "प्रेत्य" याचा अर्थ "ह्या अवस्थेंतून निघून जाऊन" असाच असला पाहिजे. ही

अवस्था म्हणजे "विद्वानाची आनंदमय अवस्था" असा अर्थ आहे, त्या अर्थी "ही अवस्था" म्हणजे "अविद्वानाची दुःखपूर्ण अवस्था" असाच अर्थ असला पाहिजे

"अकामयत" "अतप्यत"—हीं लङाचीं रूपें आहेत "अनद्यतने लङ्" हें पाणिनीचें सूत्रच आहे त्यावरून मागील पुरातन काळीं ही गोष्ट घडली असा अर्थ निघतो हे शब्दहि गौणार्थानें योजिले आहेत मुंडक १।१।८ येथील "तप" ह्यावरील टिप्पण आणि उपसंहार प्यारा ६५ पहा

ब्रह्मानंदवल्ली अनुवाक ७

असद्वा इदमग्र आसीत् । ततो वै सदजायत । तदात्मानं स्वयमकुरुत । तस्मात्तत्सुकृतमुच्यत इति । यद्वै तत्सुकृतं रसो वै [illegible] । रसं ह्येवायं लब्ध्वाऽऽनन्दी भवति । को ह्येवान्यात्कः प्राण्यात् । यदेष आकाश आनन्दो न स्यात् । एष ह्येवानन्दयाति । यदा ह्येवैष एतस्मिन्नदृश्येऽनात्म्ये निरुक्ते निलयनेऽभयं प्रतिष्ठां विन्दते । अथ सोऽभयं गतो भवति । यदा ह्येवैष एतस्मिन्नुदरमन्तरं कुरुते । अथ तस्य भयं भवति । तत्त्वेव भयं विदुषो मन्वानस्य । तदप्येष श्लोको भवति ॥७॥

**अर्थ**—हें सर्व जग पूर्वी असत् म्हणजे अव्याकृत म्हणजेच न उमललेलें किंवा न विकसलेलें असें होतें त्यापासून सत् म्हणजे व्याकृत म्हणजेच उमललेलें किंवा विकसलेलें असें जग उत्पन्न झालें त्या असताने स्वतःच [स्वयं] स्वतःला [आत्मानं] सत् म्हणजे जीवात्मा केलें ('सत्' हा शब्द मागील वाक्यातून अनुवृत्त करावा लागतो) म्हणून, म्हणजे अव्याकृताला व्याकृत केलें म्हणून त्याला म्हणजे जीवाला सुकृत म्हणजे चांगलें बनविलेलें असें म्हणतात [त्यात] [तत्] जें सुकृत म्हणजे चांगलें बनविलेलें म्हणजेच जीवावस्था आहे तो रसच

आहे म्हणजे आनंद देणारा मधुर रसच होय. हा रसाला मिळवूनच हा मागे वर्णिलेला जगताची सृष्टि करणारा आत्मा [ अयं ] आनंदी; म्हणजे आनंदाचा अनुभव घेणारा होतो. शरीरामध्ये [ आकाशे ] ■ आनंद जर नसता तर कोणी श्वास टाकला असता [ अन्यात् ] आणि कोणी उच्छ्वास घेतला असता [ प्राण्यात् ] ? कोणीच जिवंत राहिला नसता असा अर्थ आहे; जीवावस्थेंतच आनंद आहे म्हणूनच प्रत्येक जीव जिवंत राहण्यासाठी झटतो असा भाव आहे. हा जीवच [ एष एव ] आनंदाचा अनुभव घेऊं शकतो [ आनंदयाति ]. मूळ अव्याकृत ब्रह्मावस्थेंत आनंद नाही असा भाव आहे. ( तर मग सर्व जीवांस हा आनंदाचा अनुभव कां येत नाही असा प्रश्न येतो. त्यास उत्तर पुढे दिलें आहे आणि त्यांत आनंदाचा अनुभव न येण्याची दोन कारणें दिलीं आहेत. (१) द्वैतदृष्टीपासून उत्पन्न झालेलें भय आणि (२) कामवासना. त्यांपैकी आता पहिलें सांगतात. ) जेव्हां हा जीवच [ एष एव ] डोळयास न दिसणाऱ्या [ अदृश्ये ] ( कारण दुसरा जीव दृश्य नाही, अनुमेय आहे ) स्वतःहून भिन्न असा भासणाऱ्या [ अनात्म्ये ], बोलणाऱ्या [ निरुक्ते ] व पळणाऱ्या [ निलयने ] इतर जीवांच्या ठिकाणीं भयरहित होईल अशा रीतीने [ अभयं ] प्रतिष्ठा म्हणजे स्थिति अथवा अस्तित्व मिळवितो म्हणजे ते जीवहि मीच आहे, ते जीव स्वतःहून भिन्न नाहीत असा निश्चय करतो तेव्हा तो अभयपदाला प्राप्त होतो. परंतु जेव्हा हा जीव [ एष ] दुसऱ्या जीवाच्या ठिकाणीं [ एतस्मिन् ] अल्प [ अरं ] देखील [ उद् ] भेद [ अंतर ] मानतो [ कुरुते ] तेव्हा त्याला भय प्राप्त होतें. शहाण्या विचार करणाऱ्या मनुष्याच्या दृष्टीने [ विदुषो मन्वानस्य ] हें भिन्नत्व पाहणेंच [ तत्तु एव ] भय आहे. याविषयी पुढील श्लोकहि आहे. ॥७॥

टिप्पणी —"असत्" म्हणजे अव्याकृत किंवा अविकसित आणि सत् म्हणजे व्याकृत किंवा विकसित असे अर्थ आम्ही केले आहेत.

अव्याकृतास "असत्" म्हणण्याचें कारण त्या अवस्थेंत "मी आहें" ही वृत्ति नसल्यामुळे त्या अवस्थेंतील आत्मा जणुं नाहींच असें म्हणतां येतें. व्याकृतास "सत्" म्हणण्याचें कारण त्या अवस्थेंत "मी आहें" अशी वृत्ति असते म्हणून त्या अवस्थेंतीलच आत्म्यास तो आहे असें म्हणतां येतें. "असत्" व "सत्" ह्याचे अर्थ आम्ही केले तसेच श्रीशंकराचार्यांनीहि केले पण "सुकृतं" ह्याचा अर्थ त्यांनी "स्वयं कर्तृ" असा केला आहे. पण त्याचा असा अर्थ होऊं शकत नाही हें अगदी उघडच आहे. "सुकृतं" म्हणजे "चांगलें घनविलेलें" असाच अर्थ होऊं शकतो, तथापि हा अर्थ केल्याने जीवावस्था ही मायाकार्य, म्हणजेच आभासकार्य आहे व म्हणून ती त्याज्य आहे हा जो त्यांचा मुख्य सिद्धांत तो त्याने बाधित होतो म्हणून त्यांनी हा भिन्न अर्थ केला आहे. हा अर्थ आजपर्यंत पंडितांस कसा पटला याचें आश्चर्य वाटतें. (उपसंहार प्यारा ५४ आणि ऐ० उ० ४–२ येथील "सुकृत" ह्यावरील आमचें टिप्पण पाहा).

"यद्वै तत् सुकृतं" ह्यांतील "तत्" हें अव्यय मानून त्याचा "त्यामध्ये" म्हणजे व्याकृत ब्रह्मामध्ये असा अर्थ करावा.

"आनंदयाति" हें "आनंदयति" याचेंच आर्ष रूप होय. "आनंद" या नामापासून "आनंदय्" अशी नामधातु बनते. तिचें हें रूप आहे. ह्याचा अर्थ "आनंद अनुभवतो", "आनंद भोगतो" असा आहे. प्रश्नोपनिषदात ४–२ येथे "आनंदयते" असा शब्द आहे, त्याचा अर्थ असाच प्रस्तरचा करावा लागतो. श्रीशंकराचार्यांनी "एष ह्येवानंदयाति" ह्याचा अर्थ "हा परमात्माच सुख देतो" असा केला आहे. पुढील दोन वाक्यांतील "एष" हा जीववाचक आहे त्या अर्थी हा "एष" ही जीववाचकच असला पाहिजे. "एष" म्हणजे "जीव" असा अर्थ केला म्हणजे "आनंदयाति" ह्याचा अर्थ आम्ही केला तसाच करावा लागतो व करताहि येतोच. ह्यास प्रश्नोपनिषद् ४–२ येथील "आनंदयते" हा शब्द प्रयोगच प्रमाण आहे.

"आकाशे"—मागील पहिल्या अनुवाकांत "परमे व्योमन्" असे शब्द "शरीरांतील अत्यंत खोल भागात" ह्या अर्थी योजलेले आहेत. "व्योम" आणि "आकाश" हे शब्द एकार्थकच आहेत. म्हणून येथे "आकाश" हा शब्द शरीरवाचक घेतला आहे.

ब्रह्मानंदवल्ली अनुवाक ८

भीषास्माद्वातः पवते । भीषोदेति सूर्यः । भीषास्माद्-ग्निश्चेंद्रश्च । मृत्युर्धावति पंचमः इति । सैषानंदस्य मीमांसा भवति । युवा स्यात्साधु युवाध्यायकः । आशिष्ठो दृढिष्ठो बलिष्ठः । तस्येयं पृथिवी सर्वा वित्तस्य पूर्णा स्यात् । स एको मानुष आनंदः । ते ये शतं मानुषा आनंदाः । स एको मनुष्यगंधर्वाणामानंदः । श्रोत्रियस्य चाका-महतस्य । ते ये शतं मनुष्यगंधर्वाणाम् आनंदाः । स एको देवगंधर्वाणामानंदः । श्रोत्रियस्य चाकामहतस्य । ते ये शतं मनुष्यगंधर्वाणामानंदाः । स एकः पितॄणां चिरलोकलोकानामानंदः । श्रोत्रियस्य चाकामहतस्य । ते ये शतं पितॄणां चिरलोकलोकानामानंदाः । स एक आजानजानां देवानामानंदः । श्रोत्रियस्य चाकामहतस्य । ते ये शतमाजानजानां देवानामानंदाः । स एकः कर्मदेवा-नामानंदः । ये कर्मणा देवानपियंति । श्रोत्रियस्य चाका-महतस्य । ते ये शतं कर्मदेवानाम् आनंदाः स एको देवानामानंदः । श्रोत्रियस्य चाकामहतस्य । ते ये शतं देवानामानंदाः स एकः इंद्रस्यानंदः । श्रोत्रियस्य चाकामह-तस्य । ते ये शतमिंद्रस्यानंदाः । स एको बृहस्पतेरानंदः ।

श्रोत्रियस्य चाकामहतस्य । ते ये शतं बृहस्पतेरानंदाः । स एकः प्रजापतेरानंदः । श्रोत्रियस्य चाकामहतस्य । ते ये शतं प्रजापतेरानंदाः । स एको ब्रह्मण आनंदः । श्रोत्रियस्य चाकामहतस्य । स यश्चायं पुरुषे यश्चासावादित्ये स एकः । स य एवंवित् । अस्माल्लोकात्प्रेत्य । एतमन्नमयमात्मानमुपसंक्रामति । एतं प्राणमयमात्मानमुपसंक्रामति । एतं मनोमयमात्मानमुपसंक्रामति । एतं विज्ञानमयमात्मानमुपसंक्रामति । एतमानंदमयमात्मानमुपसंक्रामति । तदप्येष श्लोको भवति ॥८॥

अर्थः—या भितरभावनेवाचून [अस्मात्] उत्पन्न झालेल्या भयामुळेच वायु पवित्र करीत वाहतो, सूर्य दररोज उदय पावतो, अग्नि जाळतो, इंद्र पाणी देतो, पांचवा मृत्युहि प्राण्यांचा संहार करतो. अद्वैतज्ञानाचें महत्त्व दर्शविणारा हा श्लोक संपला असें दाखविण्याकरितां "इति" हा शब्द येथें योजिला आहे. याप्रमाणें भयाचें व अर्थात् दुःखाचें एक कारण "द्वैतबुद्धि" हें दाखवून आतां दुःखाचें व आनंद अनुभवास न येण्याचें दुसरें कारण कामहतत्व हें दाखविण्याकरितां पुढील मंत्र लिहितात. ही पुढे दिलेली ती आनंदाची मीमांसा आहे. एखादा जवान [युवा] चांगला जवान [साधुयुवा] असावा, शिकलेला असावा [अध्यायकः], अतिशय आशायुक्त असावा [आशिष्ठः], अतिशय दृढमनाचा असावा [द्रढिष्ठः], अतिशय बलवान् असावा [बलिष्ठः] आणि वित्ताने पूर्णपणें भरलेली ही सर्व पृथ्वी त्याच्या मालकीची असावी, त्याला जो आनंद होईल तो मनुष्याचा एक आनंद समजावा. मनुष्याचे शंभर आनंद म्हणजे मनुष्यगंधर्वांचा एक आनंद. इतका आनंद निष्काम [अकामहतस्य] विद्वानालाहि [श्रोत्रियस्य] होतो. मनुष्यगंधर्वांचे शंभर आनंद म्हणजे देवगंधर्वांचा एक आनंद.

इतका आनंद निष्काम विद्वानालाहि होतो. देवगंधर्वांचे शंभर आनंद म्हणजे चिरलोक लोकपितरांचा एक आनंद. इतका आनंद निष्काम विद्वानालाहि होतो. चिरलोक लोकपितरांचे शंभर आनंद म्हणजे *आजानजदेवांचा एक आनंद. इतका आनंद निष्काम विद्वानालाहि* होतो. आजानजदेवांचे शंभर आनंद म्हणजे जे कर्मांनें देवत्व पावतात त्या कर्मदेवांचा एक आनंद. इतका आनंद निष्काम विद्वानालाहि होतो. कर्मदेवांचे शंभर आनंद म्हणजे देवांचा एक आनंद. इतका आनंद निष्काम विद्वानालाहि होतो. देवांचे शंभर आनंद म्हणजे इंद्राचा एक आनंद. इतका निष्काम विद्वानालाहि होतो. इंद्राचे शंभर आनंद म्हणजे बृहस्पतीचा एक आनंद. इतका निष्काम विद्वानालाहि होतो. बृहस्पतीचे शंभर आनंद म्हणजे प्रजापतीचा एक आनंद. इतका आनंद निष्काम विद्वानालाहि होतो. प्रजापतीचे शंभर आनंद म्हणजेच ब्रह्मातील आनंद. इतका आनंद निष्काम विद्वानालाहि होतो (*ब्रह्मवेत्त्याला ब्रह्मातील* अपरिमित आनंद होतो असा भाव आहे). म्हणजेच प्रत्येक मनुष्याच्या शरीरांत [पुरुषे] जो आहे आणि सूर्यांत जो आहे तो एकच म्हणजे सर्व मनुष्यांत एकच आत्मा आहे असें जो जाणतो [एवं वित्] तो अज्ञानी मनुष्याच्या या दुःखद अवस्थेंतून [अस्माल्लोकात्] निघून जाऊन [प्रेत्य], *हा अन्नमय आत्म्यास जाऊन पोचतो [उपसंक्रामति],* म्हणजे चांगलें पुष्ट शरीर मिळवितो. तो प्राणमय आत्म्यास जाऊन पोचतो म्हणजे चांगले निरोगी व चिरकाल टिकणारे प्राण मिळवितो. तो मनोमय आत्म्यास जाऊन पोचतो म्हणजे नेहमीं आनंदी राहणारें मन मिळवितो. तो विज्ञानमय आत्म्यास जाऊन पोचतो म्हणजे पूर्ण विज्ञान मिळवितो आणि तो आनंदमय आत्म्यास जाऊन पोचतो म्हणजे द्वैतबुद्धि आणि काम टाकून दिल्यामुळे आनंदचतुर अवस्थेचा अनुभव घेतो म्हणजेच अनुभवांत निर्दिष्ट केलेल्या लोकांस म्हणजेच आनंदमयावस्थेचा अनुभवतो. त्या आनंदमय अवस्थेविषयीं हा पुढील श्लोकहि आहे.

टिप्पणी—ह्या अनुवाकातील श्लोकाचा भावार्थ ब्रह्मवेत्त्या जीवाला ब्रह्मानंद भोगाचा अपरिमित आनंद होतो हाच आहे "उपसंक्रामति" ह्याचा अर्थ ' अतिक्रामति " असा मानून शेवटच्या वाक्याचा अर्थ विद्वान् मनुष्य अन्नमय आत्म्यास टाकून, प्राणमयात जातो, प्राणमयास टाकून मनोमयात जातो, मनोमयास टाकून विज्ञानमयात जातो, विज्ञानमयास टाकून आनंदमयात जातो व शेवटीं आनंदमयासहि टाकून ब्रह्मात जातो असा कोणी करण्याचा सभव आहे पण तें चूक आहे. कारण "उपसंक्रामति" ह्याचा अर्थ "अतिसंक्रामति" असा होऊन शकत नाही श्रीशंकराचार्यांनीहि तसा अर्थ केला नाही. "उपसंक्रामति" ह्याचा अर्थ "जवळ जातो" असाच होऊ शकतो "जवळ जातो" म्हणजेच तें मिळवितो एकूण आनंदमयावस्था ही जरी जीवस्थितीचीच एक अवस्था आहे तरी तीच प्राप्त व होय आणि ती शरीर, प्राण, मन, आणि विज्ञान उत्तम प्रकारचें प्राप्त करून घेतल्याने प्राप्त होते असा या ब्रह्मानंदवल्लीचा भावार्थ आहे ह्या संबधाने ही लक्षात ठेवण्याची गोष्ट आहे की "आनंदमय" ही जीवस्थितिच होय असें श्रीशंकराचार्यहि मानतात, ( पाचव्या अनुवाकाच्या भाष्यातील " तस्मात्कार्यपातत एवानंदमयो, न पर एवात्मा, आनंद इति विद्याकर्मणो फलम्, तद्विकार एवानंदमय " हें वाक्य आणि ब्रह्मसूत्रें १।१।१२-१९ वरील त्यांचें भाष्य पहा ) आणि त्या अवस्थेच्याहि आत असलेल्या ब्रह्माच उपसंक्रमण उपनिषदात सांगितलें नाही शिवाय जीवात्म्यास सुकृत म्हटलें आहे त्या अर्थी बद्दल जीवावस्थाच श्रेष्ठ प्राप्तव्य असें ठरतें

**ब्रह्मानंदवल्ली अनुवाक ९**

यतो वाचो निवर्तंते अप्राप्य मनसा सह । आनंद ब्रह्मणो विद्वान् न बिभेति कुतश्चनेति । एत ■ वाव न

तपति । किमहं साधु नाकरवम् । किमहं पापमकरवम् इति । स य एवं विद्वानेते आत्मानं स्पृणुते । उभे ह्येवैष एते आत्मानं स्पृणुते । य एवं वेद । इत्युपनिषत् ॥९॥

**अर्थ**—ज्याला न पोंचतां [अप्राप्य] वाणी म्हणजे शब्द परत फिरतात [निवर्तंते] म्हणजे शब्द ज्याचें वर्णन करूं शकत नाहीत त्या मागील अनुवाकांत वर्णिलेल्या ब्रह्मानंदाला मनाच्या मदतीनें किंवा साधनानें जाणणारा तो ब्रह्मवेत्ता मनुष्य कशालाच भीत नाही. (*मनाच्या मदतीनें किंवा साधनानें म्हणण्याचें कारण हेंच आहे की मागील दोन अनुवाकांत सांगितलेली अद्वैतभावना आणि अकामहतत्व ह्या दोनहि गोष्टी मनाचेंच कार्य आहेत*). (येथे ब्रह्मानंदाची स्तुति संपली हें दाखविण्याकरितां इति हा शब्द योजला आहे.) असा हा मनुष्यास मी अमकी चांगली कृति कां केली नाही किंवा मी अमकी वाईट कृति (पाप) कां केली, हे दोनहि विचार ताप देत नाहीत (कारण अद्वैत बुद्धीनें म्हणजे सर्वभूतहितार्थ आणि निष्काम बुद्धीनें त्यानें सर्व केलेलें असतें.) असा हा विद्वान् हे दोनहि विचार [एते] आपणाला [आत्मानम्] गोड करून घेतो. [स्पृणुते–हा द्विकर्मक धातु आहे असें मानावें.] हा हे दोनहि विचार आपणाला गोड करून घेतो. अशी ही उपनिषद् संपली.

**टिप्पणी**—"एतं वाव न तपति...पापमकरवमिति" असेच विचार कौषितकी ३ । १ येथें आहेत. आणि बृहदारण्यक ४ । ४ । २२–२३ आणि कौषितकी ३ । ९ येथें आहेत. ह्यांचा अर्थ हीं उपनिषदें स्वैराचाराच परवानगी देतात असा कोणी करतात. तें चूक आहे. त्यांचा खरा अर्थ अद्वैतबुद्धीनें सर्वभूतहितार्थ निष्काम बुद्धीनें केलेलें किंवा न केलेलें कोणतेंहि कर्म चांगलें आहे असा आहे, म्हणजे खरोखर अद्वैतबुद्धीची व निष्कामबुद्धीची स्तुति करणें हा ह्या वचनांचा उद्देश आहे.

## भृगुवल्ली

**भृगुवल्ली अनुवाक १**

भृगुर्वै वारुणिः। वरुणं पितरमुपससार। अधीहि भगवो ब्रह्मेति। तस्मा एतत्प्रोवाच। अन्नं प्राणं चक्षुः श्रोत्रं मनो वाचमिति। तं होवाच। यतो वा इमानि भूतानि जायंते। येन जातानि जीवंति। यं प्रयत्यभिसंविशंति। तद्विजिज्ञासस्व तद्ब्रह्मेति। स तपोऽतप्यत। स तपस्तप्त्वा ॥१॥

अर्थः—वरुणाचा पुत्र [वारुणिः] असलेला भृगु आपला पिता वरुण ह्याकडे गेला आणि हे भगवन् [भगवः] मला ब्रह्म शिकवा [अधीहि] असें म्हणाला [इति]. त्याला म्हणजे वरुणाला भृगूने विचारलें (पुसलें) की अन्न ब्रह्म आहे किंवा प्राण ब्रह्म आहे किंवा चक्षुः ब्रह्म आहे किंवा श्रोत्र ब्रह्म आहे किंवा मन ब्रह्म आहे किंवा वाणी ब्रह्म आहे. त्याला वरुणाने उत्तर दिलें, "ज्यापासून हीं सर्व भूतें उत्पन्न होतात, उत्पन्न झालेलीं भूतें ज्यामुळे जिवंत राहतात आणि ज्याला जाऊन मिळतात तें ब्रह्म होय असें त्याला जाण." तेव्हा तो भृगु एकाग्रचित्ताने विचार करता झाला आणि एकाग्रचित्ताने विचार करून ॥१॥

टिप्पणें—"अधीहि" ह्याचा अर्थ "शीक" असा आहे पण त्याचा उपयोग "शिकीव" ह्या अर्थाने केला आहे. छांदोग्योपनिषद् ७।१ येथेहि असेंच केलें आहे.

"प्रोवाच" ह्याचीं "अन्नं", "प्राणं", "चक्षुः", "श्रोत्रं", "मनः" "वाचं" हीं कर्में होत. "प्रोवाच" ह्याचा अर्थ "पप्रच्छ" असा करावा.

"ब्रह्म"—या व पुढील वल्लींमध्ये ब्रह्म याचा अर्थ प्राप्तव्य—मनुष्याला प्राप्तव्य अशी वस्तु किंवा अवस्था असा आहे. अर्थात् "मनुष्याचें प्राप्तव्य काय" असा भृगूचा सरळ प्रश्न आहे आणि त्याला वरुणाचें सरळ उत्तर असें आहे की "मनुष्य स्वभावतः ज्यापासून उत्पन्न होतो, ज्यामुळे जिवंत राहतो व जें स्वभावतः प्राप्त करून घेतो तेंच त्याचें प्राप्तव्य." "धर्मरहस्यांत" मी पूर्वीच "मनुष्याचा पुरुषार्थ कोणता असावा, मनुष्यानें आपल्या सर्व क्रिया कशाकरितां कराव्या ······या प्रश्नाचें उत्तर देण्याकरितां पाश्चात्य पंडितांनी फार प्रयत्न केले आहेत. पण त्यांपैकी पुष्कळ प्रयत्न अयोग्य दिशेनें झाले आहेत. त्यांनी मनुष्याचा पुरुषार्थ कोणता असावा हें ठरविण्याचा प्रयत्न केला आहे. पण तें बरोबर नाही कारण मनुष्याचा पुरुषार्थ ठरलेलाच आहे. **मनुष्य स्वभावतः ज्याकरितां झटतो तोच त्याचा पुरुषार्थ.** मनुष्यस्वभावाच्या विरुद्ध जरी पुरुषार्थ ठरविला तरी तो त्याला कधीच मिळवितां येणार नाही. म्हणून मनुष्यस्वभावानुरूपच त्याचा पुरुषार्थ ग्रहण करून तो पुरुषार्थ साधण्याचा योग्य मार्ग कोणता आहे हें दाखविण्याकरिताच धर्मशास्त्राची प्रवृत्ति आहे. धर्मशास्त्राची प्रवृत्ति पुरुषार्थ ठरविण्याकरिता नसून पुरुषार्थाचा खरा मार्ग दाखविण्याकरिता आहे." (पान ७-८) हें लिहिलें आहे. उपनिषदांतहि असेंच मत आहे आणि तेंच या अनुवाकांत सांगितलें आहे. छांदोग्यांतहि स्पष्टच सांगितलें आहे की "यदा वै सुखं लभतेऽथ करोति नासुखं लब्ध्वा करोति। सुखमेव लब्ध्वा करोति। सुखं त्वेव विजिज्ञासितव्यम् ॥२२॥ (अध्याय ७). एकूण ह्या वल्लीचा गाभार्थ हाच की "अन्न, प्राण, मन, विज्ञान आणि आनंद हीं पांच प्राप्तव्यें आहेत." त्यांपैकी खरोखर आनंद हेंच मुख्य प्राप्तव्य आहे. तरी पहिलीं चार प्राप्त झाल्याशिवाय तें प्राप्त होतें नाही हें निश्चित आणि उघड आहे म्हणून त्यांनाहि प्राप्तव्येंच

मानलें आहे. हीं पांच प्राप्तव्येंहि खरोखर आदिकारण जें ब्रह्म त्याचाच आविष्कार होत म्हणूनच त्यांना ब्रह्म म्हटलें आहे. ह्या पांचामध्ये श्रेष्ठ "आनंद" होय. म्हणून आनंदमयालाच व्यासाने सूत्र १।१।१२-१९ येथे ब्रह्म ठरविलें आहे. अत्यंत आविष्कृत ब्रह्मच मनुष्याचें आत्यंतिक प्राप्तव्य होय. इतर लोक ह्या वल्लीचा अर्थ निराळा करतात. ते म्हणतात की वरुणाच्या व्याख्येचा विचार करतां करतां भृगूला प्रथम अन्न हेंच ब्रह्म वाटलें पण अधिक विचार करतां तें चूक वाटून प्राण हाच ब्रह्म आहे, असें त्याला वाटलें. पुढे अधिक विचार करतां तेंहि चूक वाटून "मन" हेंच ब्रह्म वाटलें आणि शेवटीं आनंदच ब्रह्म आहे असें त्याने ठरविलें. श्रीशंकराचार्य म्हणतात, "एवं तपसा विशुद्धात्मा प्राणादिषु साकल्येन ब्रह्मलक्षणमपश्यन् शनैः शनैरंतरनुप्रविश्यांतरतमं ब्रह्म विज्ञातवांस्तपसैव साधनेन भृगुस्तस्माद् ब्रह्मविजिज्ञासुना बाह्यांतःकरणसमाधानलक्षणं परमं तपः साधनमनुष्ठेयमिति प्रकरणार्थः" (अनुवाक सहाचें भाष्य पहा) पण हें अग्राह्य आहे. कारण हें म्हणणें बरोबर असतें तर पुढे उपसंक्रमण सांगितलें आहे तें फक्त आनंदाचेंच सांगितलें असतें व इतराचें अतिक्रमण सांगितलें असतें. परंतु येथे पांचहि ब्रह्मांचें उपसंक्रमण सांगितलें आहे. म्हणून पांचहि ब्रह्म खरेंच आहेत म्हणजे खरोखरच प्राप्तव्य आहेत असाच ह्या वल्लीचा भावार्थ मानला पाहिजे.

येथे सांगितलेलें शेवटचें प्राप्तव्य जो "आनंद" तो देखील जीवावस्थेंतील म्हणजे जागृतींतीलच आनंद होय. कारण आनंद शब्दाचा खरा अर्थ तोच आहे. निद्रेसारख्या अद्वैत स्थितीस आनंद कोणीच समजत नाही. दुसरें असें की जागृतींतील आनंदालाच अन्न, प्राण, मन आणि विज्ञान याची गरज आहे आणि हें उपसंक्रमितव्य म्हणजे प्राप्तव्य होत असे उपनिषदच म्हणते. तिसरें असें की वस्तुस्थितींतील क्रमप्रमाणे विज्ञानानंतर हा जागृतींतील आनंद येतो.

ब्रह्मावस्थेंतील म्हणजेच निद्रावस्थेंतील दुःखाभावरूपी आनंद ह्या जागृतींतील आनंदानंतर येतो. व निद्रेचें छांदोग्यांत अभोग्यत्वच दाखविलें आहे. (छांदोग्य ८।११।२-३).

## भृगुवल्ली अनुवाक २

अन्नं ब्रह्मेति व्यजानात् । अन्नाद्ध्येव खल्विमानि भूतानि जायंते । अन्नेन जातानि जीवंति । अन्नं प्रयंत्यभिसंविशंतीति । तद्विज्ञाय । पुनरेव पितरं वरुणमुपससार । अधीहि भगवो ब्रह्मेति । तं होवाच तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व । तपो ब्रह्मेति । स तपोऽतप्यत । स तपस्तप्त्वा ॥२॥

**अर्थ**—अन्न ब्रह्म आहे (प्राप्तव्य आहे) असें त्यानें जाणलें. कारण अन्नापासूनच हीं भूतें (जीव) उत्पन्न होतात, अन्नानेच जिवंत राहतात आणि अन्नच मिळवून [प्रयंति] त्यांत प्रवेश करतात म्हणजे चांगलें अन्नमय शरीर बनतात [अभिसंविशंति]. तें जाणल्यावर (त्या एकाच ब्रह्मानें त्याचें पूर्ण समाधान झालें नाही व इतरांचेंहि होत नाही म्हणून) तो पुनःहि आपला पिता जो वरुण त्याकडे गेला आणि "हे भगवन्, मला ब्रह्म शिकवा" असें म्हणाला. त्याला वरुण म्हणाला, "अरे तपानें ब्रह्म जाणून घे. तप हेंच ब्रह्म आहे म्हणजे एकाग्रचित्तानें विचार करणें हा ब्रह्माचा म्हणजे जगाच्या आद्य कारणाचा आविष्कारच आहे. त्यानें तप केलें आणि तप करून ॥२॥

**टिप्पणी**—"अन्नं प्रयंत्यभिसंविशंति"—मागे दुसऱ्या वल्लींतील दुसऱ्या अनुवाकांतहि असेंच म्हणजे "अथैनदपियंत्यंततः" हे शब्द आहेत. तेथे "अंततः" ह्या शब्दाचा अर्थ "मृत्युकाळीं" असा निश्चित असल्यामुळे त्या अर्थाला अनुरूप असाच "यंति" ह्याचा अर्थ करावा लागला. येथे प्राण, मन, विज्ञान आणि आनंद ह्यांच्या संबंधानें

"यति" व "अभिसंविशंति" ह्याचा जो अर्थ करावा लागतो तदनुरूपच अन्नसंबंधाने "यति" व "अभिसंविशंति" ह्याचा अर्थ केला आहे "अन्न" प्राप्तव्य मानल्यावर देखील पुनः वरुणाकडे जाण्याचें कारण उघड आहे. मनुष्य केवळ अन्नाकरिताच झटतो असें नाही त्याशिवाय इतरहि पुष्कळ गोष्टींकरिता तो झटतो त्या कोणत्या, हा प्रश्न भृगूपुढे आला म्हणून तो पुन वरुणाकडे गेला आणि पुसता झाला.

भृगुवल्ली अनुवाक ३

प्राणो ब्रह्मेति व्यजानात् । प्राणाद्ध्येव खल्विमानि भूतानि जायन्ते । प्राणेन जातानि जीवन्ति । प्राणं प्रयन्त्यभिसंविशन्तीति । तद्विज्ञाय । पुनरेव वरुणं पितरमुपससार । अधीहि भगवो ब्रह्मेति । तं होवाच । तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व । तपो ब्रह्मेति । स तपोऽतप्यत । स तपस्तप्त्वा ॥३॥

**अर्थ**—प्राण हेंच ब्रह्म म्हणजे प्राप्तव्य आहे असें त्याने जाणलें कारण प्राणापासूनच हीं भूतें म्हणजे जीव उत्पन्न होतात (केवळ अन्नाने भूतें उत्पन्न होत नाहीत. प्राण अन्नाचें वीर्य बनवील तर त्यापासून भूतें होतात) उत्पन्न झालेले जीव प्राणामुळेच जीवत राहतात. (प्राणच अन्नाचें रक्तादि बनवितो त्यामुळे जीव जीवत असतात) आणि प्राणामध्येच जाऊन मिळतात म्हणजे सर्व क्रिया करून प्राणरूपच बनतात म्हणजेच आपलें आयुष्य वाढवितात हे जाणल्यावरहि (त्याचें मागील दोन ब्रह्मानी पूर्ण समाधान झालें नाही म्हणून) तो पुन पिता जो वरुण त्याकडे गेला आणि म्हणाला "हे भगवन्, मला ब्रह्म शिकवा" त्याला वरुण म्हणाला, "अरे तपाने ब्रह्म जाणून घे तप हेंच ब्रह्म म्हणजे आदिकारणाचा आविष्कार आहे" त्या भृगूने तप केलें आणि तप करून ॥३॥

भृगुवल्ली अनुवाक ४

*मनो ब्रह्मेति व्यजानात् । मनसो ह्येव खल्विमानि भूतानि जायंते । मनसा जातानि जीवंति । मनः प्रयंत्यभिसंविशंतीति । तद्विज्ञाय । पुनरेव पितरं वरुणमुपससार । अधीहि भगवो ब्रह्मेति । तं होवाच । तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व । तपो ब्रह्मेति । स तपोऽतप्यत । स तपस्तप्त्वा ।।४।।*

**अर्थ**—मन हेंच ब्रह्म आहे असें त्याने जाणलें. कारण मनापासूनच हे जीव उत्पन्न होतात ( केवळ अन्नाने व प्राणाने मनाच्या प्रेरणेशिवाय अन्न खाणें व मैथुन ह्या क्रिया होत नाहीत ). उत्पन्न झालेले जीव मनामुळेच म्हणजे मनाने प्रेरणा करून, निरनिराळीं कर्में शरीराकडून करविल्यामुळेच जिवंत राहतात आणि मनामध्येच जाऊन मिळतात म्हणजे मनोव्यापार करण्याचेंच सामर्थ्य मिळवून मनोव्यापार करीत राहतात. हें जाणूनहि ( त्याचें मागील तीन ब्रह्मांनी पूर्ण समाधान झालें नाही म्हणून ) तो पुनः पिता जो वरुण त्याकडे गेला आणि म्हणाला, "हे भगवन् मला ब्रह्म शिकवा." त्याला वरुण म्हणाला, "अरे, तपाने ब्रह्म जाणून घे" तप हेंच ब्रह्माचा आविष्कार आहे. तेव्हा भृगूने तप केलें आणि तप करून ।।४।।

भृगुवल्ली अनुवाक ५

विज्ञानं ब्रह्मेति व्यजानात् । विज्ञानाद्ध्येव खल्विमानि भूतानि जायंते । विज्ञानेन जातानि जीवंति । विज्ञानं प्रयंत्यभिसंविशंतीति । तद्विज्ञाय । पुनरेव वरुणं पितरमुपससार । अधीहि भगवो ब्रह्मेति । तं होवाच । तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व । तपो ब्रह्मेति । स तपोऽतप्यत । स तपस्तप्त्वा ।।५।।

**अर्थ**—विज्ञान हेंच ब्रह्म आहे असें जाणलें. विज्ञानापासूनच सर्व उत्पन्न होतात. ( विज्ञानाशिवाय मनाला काय करावें कळत नाही अर्थात् अन्न उत्पन्न करणें, मैथुन करणें ह्या क्रिया विज्ञानाशिवाय संभवत नाहीत. ) उत्पन्न झालेल्या प्रजा विज्ञानानेच जिवंत राहतात ( विज्ञानानेच क्रिया योग्यपणें करतां येतात ) आणि विज्ञानांतच जाऊन मिळतात म्हणजे विज्ञान मिळविण्याकरितां बुद्धिव्यापार करून विज्ञान प्राप्त करून घेतात. हें जाणूनहि ( त्यानें मागील चार ब्रह्मांनी पूर्ण समाधान झालें नाही म्हणून ) तो पिता जो वरुण त्याकडे पुनः गेला आणि म्हणाला, "हे भगवन् मला ब्रह्म शिकवा." त्याला वरुण म्हणाला "अरे तपानें ब्रह्म जाणून घे" तप हेंच ब्रह्माचा आविष्कार आहे. तेव्हां भृगूनें तप केलें आणि तप करून ॥५॥

भृगुवल्ली अनुवाक ६

आनंदो ब्रह्मेति व्यजानात् । आनंदाद्ध्येव खल्विमानि भूतानि जायंते । आनंदेन जातानि जीवंति । आनंदं प्रयंत्यभिसंविशंतीति । सैषा भार्गवी वारुणी विद्या । परमे व्योमन् प्रतितिष्ठति । अन्नवानन्नादो भवति । महान् भवति प्रजया पशुभिर्ब्रह्मवर्चसेन । महान् कीर्त्या ॥६॥

**अर्थ**—आनंद हाच ब्रह्म आहे असें जाणलें. कारण त्या आनंदापासूनच विशेषतः मैथुनानंदापासूनच हीं भूतें उत्पन्न होतात आणि आनंदामुळेच जीवंत राहतात ( आनंदानें आयुष्य वाढतें आणि दुःखानें घटतें हें प्रसिद्धच आहे. ) आणि आनंदच प्राप्त करून घेऊन त्यांत प्रवेश करीत असतात. म्हणजे आनंद अनुभवत असतात. ही वरुणानें भृगूस सांगितलेली [ भार्गवी वारुणी ] विद्या आहे. ( ही विद्या किंवा [illegible] ज्ञान खरें कशावरून, ह्याला प्रमाण काय असें विचाराल तर सांगतों, ऐका. ) ही विद्या फार खोल [ परमे ] हृदयांत [ व्योमन् :

हें लुप्तसप्तमीक पद मानून म्हणजे "व्योम्नि" असें मानून त्याचा अर्थ करावा [ प्रतिष्ठित आहे म्हणजे हृदयाची प्रचीति (प्रत्यय) हेंच ह्या विद्येला आधारभूत प्रमाण आहे. जो ह्या विद्येला जाणतो तो मोठ्या पदाला प्राप्त होतो [ प्रतितिष्ठति ]; कारण तो पुष्कळ व चांगलें अन्न उत्पन्न करतो [ अन्नवान् भवति ]; पुष्कळ व चांगलें अन्न खातो [ अन्नादो भवति ]; तो संतति उत्पन्न करून मोठा होतो आणि ब्रह्माचें तेज म्हणजेच खरा आनंद मिळवूनहि तो मोठा होतो. तो कीर्तीनेहि मोठा होतो.

टिप्पण—जागृतीतील आनंद हेंच ब्रह्माचें खरें व मोठें तेज आहे हें उघडच आहे. हा आनंद परावलंबी विषयानंद नसून ब्रह्मानंद-वल्लींत वर्णिल्याप्रमाणे अद्वैतभावनेने व कामत्यागाने उत्पन्न होणारा खरा आनंद होय हेंहि उघडच आहे.

भृगुवल्ली अनुवाक ७

अन्नं न निन्द्यात् । तद्व्रतम् । प्राणो वा अन्नम् । शरीरमन्नादं । प्राणे शरीरं प्रतिष्ठितम् । शरीरे प्राणः प्रतिष्ठितः । तदेतदन्नमन्ने प्रतिष्ठितम् । अन्नवानन्नादो भवति । महान् भवति प्रजया पशुभिर्ब्रह्मवर्चसेन । महान् कीर्त्या । ॥७॥

अर्थ—अन्नाची निंदा करूं नये. तें एक व्रत आहे (हें व्रत केलेंच पाहिजे हा भाव आहे) कारण प्राण हा अन्न आहे म्हणजे प्राण अन्नावर अवलंबून आहे. शरीर अन्न खाणारें [ अन्नादं ] आहे. शरीर प्राणावर अवलंबून आहे आणि प्राण शरीरावर अवलंबून आहे [ प्रतिष्ठितः ]. ह्याप्रमाणे प्राणरूपी अन्न अन्नावर अवलंबून आहे. हें जो जाणतो तो मोठ्या पदास प्राप्त होतो [ प्रतितिष्ठति ]. तो

चांगलें व पुष्कळ अन्न मिळवितो [अन्नवान्]. चांगलें व पुष्कळ अन्न खातो [ अन्नादो भवति ]. संतति मिळवून मोठा होतो. प्रज्ञाचें तेज म्हणजेच खरा आनंद मिळवुन मोठा होतो. तो कीर्तीनेहि मोठा होतो.

भृगुवल्ली अनुवाक ८

अन्नं न परिचक्षीत । तद्व्रतम् । आपो वा अन्नम् । ज्योतिरन्नादं । अप्सु ज्योतिः प्रतिष्ठितं । ज्योतिष्यापः प्रतिष्ठिताः । तदेतदन्नमन्ने प्रतिष्ठितं । स य एतदन्नमन्ने प्रतिष्ठितं वेद प्रतितिष्ठति । अन्नवानन्नादो भवति । महान् भवति प्रजया पशुभिर्ब्रह्मवर्चसेन । महान् कीर्त्या ॥८॥

**अर्थ**—अन्नाचा त्याग करूं नये. हें एक व्रत आहे (हें व्रत केलें पाहिजे हा भाव आहे). कारण कर्में [ आपः ] हीं अन्नच होत ( म्हणजे कर्में अन्नावर अवलंबून असतात). पचनशक्ति [ ज्योतिः ] ही अन्न खाणारी आहे. कर्मांवर पचनशक्ति अवलंबून आहे आणि पचनशक्तीवर कर्में अवलंबून आहेत. ह्याप्रमाणे कर्मरूपी अन्न अन्नावर अवलंबून आहे असें जो जाणतो तो मोठ्या पदास प्राप्त होतो. तो पुष्कळ व चांगलें अन्न मिळवितो, वगैरे मागील अनुवाकाप्रमाणें ॥८॥

**टिप्पणी**—"आपः" "ज्योतिः"—निघंटुमध्ये "कर्म"वाचक नामांमध्ये "आपः" हा शब्द आहे म्हणून येथे "आपः" म्हणजे कर्म असा अर्थ घेतला आहे. ईशावास्योपनिषदांत चवथ्या श्लोकांतहि "अपः" ह्याचा अर्थ कर्म असाच घ्यावा लागला आहे. "ज्योतिः" म्हणजे "अग्नि" हा अर्थ आहेच ( आपट्यांचा कोश पहा ). शरीराच्या प्रकरणांत अग्नि म्हणजे "पचनशक्ति" हाच अर्थ घेतला जातो हें प्रसिद्धच आहे. म्हणून "ज्योतिः" म्हणजे "पचनशक्ति" हाच अर्थ घेणें योग्य आहे.

भृगुवल्ली अनुवाक ९

अन्नं बहु कुर्वीत । तद्व्रतम् । पृथिवी वा अन्नम् । आकाशोऽन्नादः । पृथिव्यामाकाशः प्रतिष्ठितः । आकाशे पृथिवी प्रतिष्ठिता । तदेतदन्नमन्ने प्रतिष्ठितं । स य एतदन्नमन्ने प्रतिष्ठितं वेद प्रतितिष्ठति । अन्नवानन्नादो भवति । महान् भवति प्रजया पशुभिर्ब्रह्मवर्चसेन । महान् कीर्त्या ।।९।।

अर्थः--पुष्कळ अन्न उत्पन्न करावें. हें एक व्रत आहे ( हें व्रत केलें पाहिजे हा भाव आहे ). कारण बुद्धि [ पृथिवी ] ही अन्न होय म्हणजे बुद्धिहि अन्नावर अवलंबून आहे. शरीर [ आकाशः ] हें अन्न खाणारें आहे. बुद्धीवर शरीर अवलंबून आहे आणि शरीरावर बुद्धि अवलंबून आहे. ह्याप्रमाणे बुद्धिरूपी अन्न अन्नावर अवलंबून आहे असें जो जाणतो तो मोठया पदाला प्राप्त होतो. तो पुष्कळ व चांगलें अन्न मिळवितो, वगैरे मागील अनुवाकाप्रमाणे. ।।९।।

टिप्पणी--ह्या अनुवाकांत परोक्षवाद आहे हें उघड आहे. कारण तो मानल्याशिवाय "आकाशोऽन्नादः" ह्याचा उपपन्न अर्थ लागत नाही. "आकाश" म्हणजे "शरीर" असा अर्थ ब्रह्मानंदवल्ली अनुवाक ७ येथेहि घ्यावा लागलाच आहे, त्याप्रमाणेच येथेहि घेतला आहे. "विज्ञानाला" म्हणजेच बुद्धीच्या कार्याला "ज्येष्ठं ब्रह्म" म्हणजे सर्वांमध्ये मोठें ब्रह्म असें ब्रह्मानंदवल्ली अनुवाक ५ मध्ये म्हटलें आहेच. ह्यावरून बुद्धि ही फार मोठी ठरते. "पृथिवी" शब्दाचा अर्थहि "फार मोठी" असा आहेच. म्हणून "पृथिवी" म्हणजे "बुद्धि" असा अर्थ घेतला आहे.

ह्या वल्लींत पहिल्या सहा अनुवाकांत ज्ञान सांगून तें ज्ञान ज्याला झालें आहे त्याने कसें वागावें तें पुढील चार अनुवाकांत

सांगितलें आहे. आणि त्याचें दिग्दर्शन सहाव्या अनुवाकाच्या शेवटीं केलेंच आहे. सातव्या, आठव्या आणि नवव्या अनुवाकाचा भावार्थ हाच आहे की अन्नाशिवाय प्राण टिकत नाही. शरीरकर्मे करूं शकत नाही व ज्ञान कायम ठेवूं शकत नाही, म्हणून, अन्न मिळवा, चांगलें व भरपूर अन्न द्या आणि अन्नाची निंदा करूं नका, म्हणजे अन्न मिष्ट जरी नसलें तथापि प्राणधारक असले तर त्याचा उपयोग करा.

## भृगुवल्ली अनुवाक १०

न कंचन वसतौ प्रत्याचक्षीत । तद्व्रतम् । तस्माद् यया कया च विधया बह्वन्नं प्राप्नुयात् । अराध्यस्मा अन्नमित्याचक्षते । एतद्वै मुखतोऽन्नं राद्धम् । मुखतोऽस्मा अन्नं राध्यते । एतद्वै मध्यतोऽन्नं राद्धम् । मध्यतोऽस्मा अन्नं राध्यते । एतद्वा अंततोऽन्नं राद्धम् । अन्ततोऽस्मा अन्नं राध्यते । य एवं वेद । क्षेम इति वाचि । योगक्षेम इति प्राणापानयोः । कर्मेति हस्तयोः । गतिरिति पादयोः । विमुक्तिरिति पायौ । इति मानुषीः समाज्ञाः । अथ दैवीः । तृप्तिरिति वृष्टौ । बलमिति विद्युति । यश इति पशुषु । ज्योतिरिति नक्षत्रेषु । प्रजातिरमृतमानंद इत्युपस्थे । सर्वमित्याकाशे । तत्प्रतिष्ठेत्युपासीत । प्रतिष्ठावान् भवति । तन्मह इत्युपासीत महान् भवति । तन्मन इत्युपासीत मानवान् भवति । तन्नम इत्युपासीत । नम्यंतेऽस्मै कामाः । तद्ब्रह्मेत्युपासीत । ब्रह्मवान् भवति । तद्ब्रह्मणः परिमर इत्युपासीत । पर्येणं म्रियंते द्विषन्तः सपत्नाः । परि येऽप्रिया भ्रातृव्याः । स यश्चायं पुरुषे यश्चासावादित्ये । स एकः । स य एवंविद् ।

अस्माल्लोकात्प्रेत्य । एतमन्नमयमात्मानमुपसंक्रम्य । एतं प्राणमयमात्मानमुपसंक्रम्य । एतं मनोमयमात्मानमुपसंक्रम्य । एतं विज्ञानमयमात्मानमुपसंक्रम्य । एतमानंदमयमात्मानमुपसंक्रम्य । इमाँल्लोकान् कामान्नी कामरूप्यनुसंचरन् । एतत्सामगायन्नास्ते । हा३वु हा३वु हा३वु । अहमन्नमहमन्नमहमन्नम् । अहमन्नादो३ऽहमन्नादो३ऽहमन्नादः । अहं श्लोककृदहं श्लोककृत् । अहमस्मि प्रथमजा ऋता३स्य । पूर्वं देवेभ्योऽमृतस्य ना३भायि । यो मा ददाति स इदेव मा३ वाः । अहमन्नमन्नमदंतमा३ द्मि । अहं विश्वं भुवनमभ्यभवा३म् । सुवर्ण ज्योतीः । य एवं वेद । इत्युपनिषत् ॥१०॥

अर्थः—आपल्या घरीं वसतीस आलेल्या कोणासहि [वसतौ कंचन] नकार सांगूं नये [न प्रत्याचक्षीत]. म्हणजे त्याला अन्न वगैरे देऊन आपल्या घरीं राहूं द्यावें हा भाव आहे. हें एक व्रत आहे म्हणजे हें व्रत केलें पाहिजे हा भाव आहे. तें व्रत आचरण करतां यावें म्हणून [तस्मात्] कोणत्याहि रीतीनें पुष्कळ अन्न मिळवावें. अन्न देणाऱ्याकरितां [अस्मै] पुढील काळासाठीं ह्या व्रतानें, अन्न तयार झालें [अराधि] म्हणजेच होतें असें म्हणतात. जर अतिथिकरितां श्रेष्ठ प्रकारचें [मुखतः] अन्न तयार केलें असेल तर अन्न देणाऱ्याकरितां [अस्मै] श्रेष्ठ प्रकारचें अन्न तयार होतें, जर अतिथिकरितां मध्यमप्रकारचें [मध्यतः] अन्न तयार केलें असेल तर अन्न देणाऱ्याकरितां मध्यम प्रकारचें अन्न तयार होतें, आणि अतिथिकरितां जर कनिष्ठ प्रकारचें [अंततः] अन्न तयार केलें असेल तर अन्न देणाऱ्याकरितां कनिष्ठ प्रकारचें अन्न तयार होतें. जो ह्या प्रकारचें [एवम्] अनुवाक सात, आठ, नऊ व दहा येथे वर्णिलेलें अन्नाचें महत्व जाणतो, त्यानें ("य एवं वेद" ह्या अपूर्ण वाक्याचा संबंध "तत्प्रतिष्ठेत्युपासीत" ह्या पुढील वाक्याशीं आहे,

आणि तेथील "तत्" म्हणजे "अन्न" हेंहि उघड आहे. कारण येथे मागें अन्नाचेंच प्रकरण आहे ब्रह्माचें नाही. म्हणून "तत्प्रतिष्ठेत्युपासीत" ह्या वाक्यांतील "तत्" हें अन्नवाचकच असलें पाहिजे. ) तें अन्न, वाचेमध्ये कल्याणरूपानें म्हणजे गोड बोलण्यानें जें कल्याण होतें त्या कल्याणाच्या रूपानें प्रतिष्ठित आहे, प्राणापानामध्ये योगक्षेम ह्या रूपानें म्हणजे शरीराचें पोषण व रक्षण ह्या रूपानें ( आंत ओढलेली हवा शरीराचें पोषण करते आणि बाहेर सोडलेल्या हवेबरोबर शरीरात उत्पन्न होणारें विष बाहेर निघून जाऊन शरीराचें रक्षण होतें ) प्रतिष्ठित आहे, हातामध्ये कर्मरूपानें प्रतिष्ठित आहे, पायामध्ये गतिरूपानें प्रतिष्ठित आहे, गुदांत मलविसर्जनरूपानें प्रतिष्ठित आहे, ह्या मानुषी समाज्ञा सांगितल्या. आतां दैवी म्हणजे इंद्रियाविषयींच्या समाज्ञा सांगतों--(समाज्ञा म्हणजे fame, reputation म्हणजे कीर्ति, प्रसिद्धि असे अर्थ आपट्याच्या कोशांत दिले आहेत, त्यावरून समाज्ञा म्हणजे प्रसिद्ध गोष्टी म्हणजे सर्वांना माहीत असलेल्या गोष्टी असा अर्थ घ्यावा.), वृष्टींत म्हणजे जिभेनें व मुखानें अन्न खाण्यांत तृप्तीच्या रूपानें अन्न प्रतिष्ठित आहे, (ह्या व पुढील पाच पोट वाक्यांचा अर्थ परोक्षवादविवरणानें करावा लागतो व "प्रजातिरमृतमानंद इत्युपस्थे" ह्याशीं जुळेल अशा रीतीनें करावा लागतो कारण यासारखींच दुसरीं वाक्यें असलीं पाहिजेत हें उघड आहे.) विद्युत्मध्ये म्हणजे पचनशक्तीमध्ये बल रूपानें अन्न प्रतिष्ठित आहे, पशुमध्ये म्हणजे कानामध्ये ऐकिल्या जाणाऱ्या पुरुषाच्या स्वतःच्या कीर्तीच्या रूपानें [यश इति] अन्न प्रतिष्ठित आहे, नक्षत्रांमध्ये म्हणजे डोळ्यामध्ये ज्योतीच्या रूपानें म्हणजे दर्शनशक्तीच्या रूपानें अन्न प्रतिष्ठित आहे, उपस्थात प्रजाति म्हणजे जननक्रिया, प्रजेच्या रूपानें प्राप्त होणारें अमरत्व [अमृतम्] आणि आनंद या तीन रूपांनी अन्न प्रतिष्ठित आहे आणि (थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे) आकाशांत

म्हणजे शरीरांत, शरीरांतील सर्वच गोष्टींच्या रूपानें अन्न प्रतिष्ठित आहे, असें जाणून ["इति"—"तत्प्रतिष्ठेत्युपासीत" ह्या वाक्यांतील "इति"] त्या अन्नाची उपासना करावी म्हणजे मागें सांगितल्याप्रमाणें (१) अन्नं न निंद्यात् (२) अन्नं न परिचक्षीत (३) अन्नं बहु कुर्वीत (४) न कंचन वसतौ प्रत्याचक्षीत हीं चार व्रतें करावीत. असें केल्यानें तो मोठ्या पदास जातो [प्रतिष्ठावान् भवति]. अन्न हेंच बुद्धि [महः] आहे असें समजून अन्नाची उपासना करावी म्हणजे बुद्धीला पोषक होईल असें अन्न सेवन करावें म्हणजे त्याची बुद्धि वाढून ती मोठा होईल. हें अन्नच मन आहे असें समजून अन्नाची उपासना करावी म्हणजे ज्यानें मन पवित्र राहील असें अन्न खावें, त्या अन्नानें मन पवित्र झालें असतां त्याचें आचरण पवित्र होईल व त्यामुळे त्याला लोकांमध्यें मान मिळेल [मानवान् भवति]. तें मी मिळविलेलें अन्न माझें नव्हे [न मे]—एकट्या माझ्या उपयोगाकरितां नसून सर्वांच्या उपयोगाकरितां आहे असें मानून त्या अन्नाची उपासना करावी म्हणजे तें अन्न सर्वांना घालून खावें म्हणजे याचे काम पूर्ण होतात [नम्यंतेऽस्मै कामाः]. तें अन्नच ब्रह्म म्हणजे प्राप्तव्य अशी आविष्कृत ब्रह्मावस्था आहे असें मानून त्याची उपासना करावी म्हणजे सुखकर होईल असेंच अन्न खावें म्हणजे त्यास प्रशस्त ब्रह्म प्राप्त होतें, [ब्रह्मवान् भवति—धनवान् ह्याच्या अर्थाप्रमाणेंच ब्रह्मवान् ह्याचा अर्थ केला पाहिजे] म्हणजे आनंदयुक्त अशी जीवावस्था त्याला प्राप्त होते. (अन्नाशिवाय जागृत्यवस्था म्हणजेच जीवात्मावस्था संभवत नाहीं. म्हणून अन्नच जीवात्मा म्हणजे आविष्कृत ब्रह्म होय. जीवात्मावस्थेंतच आनंदाचा अनुभव असतो म्हणून सुखद अन्न सेवन करणाऱ्यास आनंदयुक्त जीवावस्था अनुभवास येते.) अन्न हेंच ब्रह्माचा मारण्याचा उपाय आहे असें मानून त्याची उपासना करावी म्हणजे शत्रूंना देखील अन्न घालावें म्हणजे त्याच्या भोंवतालचे [परि एनं] त्याचे द्वेष करणारे शत्रु, पापी भाऊ-

[ सपत्नाः ] आणि अप्रिय असलेले चुलत भाऊ [ भ्रातृव्याः ] मरतात म्हणजे ते सर्व त्यांचें वैर करणें टाकून देतात. ('अज्ञाने मारलेला साली पाहतो' ह्या मराठी म्हणींत जी कल्पना आहे तीच येथील वाक्यांत सांगितली आहे.) (येथून पुढे दुसरें प्रकरण सुरू होतें. आनंदाच्या अनुभवास कर्म आणि ज्ञान दोहोंचीहि गरज आहे. त्यांपैकी अन्नोपासनारूपी कर्म येथपर्यंत सांगितलें. आता पुढे ज्ञान सांगून नंतर ज्ञानकर्मसमुच्चयाचें फळ सांगितलें आहे. एकूण ह्या उपनिषदांतहि ज्ञानकर्मसमुच्चयच अभिप्रेत आहे.) प्रत्येक मनुष्याच्या शरीरांत [ पुरुषे ] जो आहे आणि सूर्यांत जो आहे तो एकच म्हणजे सर्व मनुष्यांत जो आहे तो एकच आत्मा आहे असें जो जाणतो तो अज्ञानी मनुष्याच्या ह्या दुःखद अवस्थेंतून निघून जाऊन [ अस्माल्लोकात् प्रेत्य ] त्या अन्नमय आत्म्यास जाऊन पोचून [ उपसंक्रम्य ] म्हणजे चांगलें पुष्ट शरीर मिळवून, तो प्राणमय *आत्म्यास जाऊन पोचून म्हणजे चांगले निरोगी व चिरकाल टिकणारे* प्राण मिळवून, तो मनोमय आत्म्यास जाऊन पोचून म्हणजे पूर्ण विज्ञान मिळवून, तो आनंदमय आत्म्यास पोचून म्हणजे द्वैतबुद्धि व काम टाकून दिल्यामुळे प्राप्त होणाऱ्या आनंदपूर्ण अवस्थेस प्राप्त होऊन म्हणजेच त्या आनंदपूर्ण अवस्थेचा अनुभव घेत, आपणास इष्ट वाटेल तें रूप म्हणजे पोषाख वगैरे धारण करीत [ कामरूपी ], आणि आपणास इष्ट वाटेल तें अन्न खात [ कामान्नी ], ह्या लोकांमध्ये म्हणजे सर्व मनुष्य समाजांमध्ये फिरत (वैरभावाच्या पूर्ण अभावामुळे त्याला कोणीहि कोठेंच अडवायला करीत नाहीत असा भाव आहे) पुढील साम म्हणजे आनंदव्यंजक गाणें म्हणत असतो. (भागवतांत स्कंध ११ अध्याय २ श्लोक २२–२३ येथे हेंच सांगितलें आहे. ते श्लोक असे—त एते भगवद्रूपं विश्वं सदसदात्मकं। आत्मनोऽव्यतिरेकेण पश्यंतो व्यचरन् महीम् ॥२२॥ अव्याहतेष्टगतयः

सुरसिद्धसाध्य–।– गंधर्वयक्षनरकिन्नरनागलोकान् । मुक्तास्चरंति मुनि-चारणभूतनाथ–। विद्याधरद्विजगणा भुवनानि कामम् ॥२३॥) गाण्याचा अर्थ—अहो, आनंद. [हा३वु]; अहो, आनंद; अहो आनंद; मी अन्न म्हणजे अन्नाचा परिपाक आहें, मी अन्नाचा परिपाक [अन्नम्] आहें; मी अन्नाचा परिपाक आहें [अन्नम्]; अन्न खाणाराहि मीच आहें; अन्न खाणारा मीच आहें; अन्न खाणाराहि मीच आहें; श्लोक म्हणजे अन्नाची स्तुति ज्यांत आहे ते वेदांतील मंत्र करणाराहि मीच आहें, श्लोक करणाराहि मीच आहें, श्लोक करणारा मीच आहें. अमृताचा म्हणजे आनंदाचा नाभि म्हणजेच मध्य म्हणजे निर्गमस्थान असलेला, [ना३भायि हें नाभिः याचें छांदस रूप होय] या पाठगाण्या [ऋतस्य] म्हणजे विकास पावणाऱ्या जगाच्या अगदी आरंभी जन्मलेला, "बहुस्याम् प्रजायेय" असें म्हणणारा हिरण्यगर्भ किंवा ईश्वर असा, आणि देवांच्या म्हणजे इंद्रियांच्याहि पूर्वी असलेला मी आहें. ("प्रथमजा," "ऋता३स्य", "ना३भायि" ही "प्रथमजा" "ऋतस्य," "नाभिः" यांची छांदस रूपें होत.) जो मला [मा] दुसऱ्यास खाण्यास देतो तो माझें रक्षण [मा अवाः इदेव] करतो. (कारण खाणारा जीव तरी मीच.) मी अन्न म्हणजेच अन्नाचा परिपाक असूनहि अन्न खाणाऱ्याला खातो. (पृथ्वी, पाणी, हवा ही अन्न खाणारे जे स्थावर वनस्पति त्यांना जंगम जीव खातात त्याचान, म्हणजे "जीवो जीवस्य जीवनम्" याचा येथे निर्देश आहे.) ("आग्नि" हें अग्नि याचें आर्ष रूप होय.) मी अद्वैतदर्शनामुळे सर्व भुवनामध्ये पसरलो ["अभ्यभव३ाम्"—"अभ्यभवम्" याचें आर्ष रूप]. जो हें जाणतो तो सुवर्णाप्रमाणे तेजस्वी होतो [सुवर्णज्योतीः—"सुवर्णज्योतिः" याचें आर्ष रूप] म्हणजे आनंदरूपी तेजानें चमकतो. याप्रमाणे ही उपनिषद् संपली. ॥१०॥

टिप्पणी—"अस्माल्लोकात्प्रेत्य" ह्याचा "इमाल्लोकाननुसंचरन्" ह्याशीं जो विरोध आहे तो टाळण्याकरितां त्याचा अर्थ ह्या अज्ञानाच्या दुःखद अवस्थेंतून निघून जाऊन असा करावा लागतो. श्रीशंकराचार्यांनीहि असाच अर्थ केला आहे. ते म्हणतात, "दृष्टादृष्टेष्टविषयसमुदायो ह्ययं लोकः तस्माल्लोकात्प्रेत्य परावृत्य निरपेक्षो भूत्वा" विद्वानाच्या जागृतीस ब्रह्मलोक म्हटलें आहेच; त्यामुळे अविद्वानाच्या जागृतीस "अयं लोकः" असें म्हणणें भागच आहे. म्हणूनहि ह्या शब्दाचा अर्थ वरप्रमाणे घेतला पाहिजे.

सुवर्णज्योतिः—मुंडक ३।१।३ येथेहि "रुक्मवर्ण" ह्याचा, आनंदपूर्ण असाच अर्थ आहे. बृहदारण्यक २।३।१-६ येथेहि इंद्रगोप, अग्नि, विद्युत् वगैरे पदार्थांची उपमा देऊन आनंदप्राचुर्य वर्णिलें आहे.

"माऽवाः" येथील "अवाः" हें रूप पुढीलप्रमाणे बनलें आहे. "वस्" अदादि ह्याचें लङाचे प्रथम पुरुषाचें "अवस्त्" असें रूप होऊन त्याचा शेवटचा "त्" गळतो व "अवः" असें रूप बनतें. त्याचेंच छांदस रूप "अवाः" असें झालें.

"हा३वु"—हा आनंदवाचक शब्द आहे असें मानावें लागतें. पंचदशी तृप्तिदीप श्लोक २९१-२९७ ह्यांत विशेषतः "अहो सुखं अहो सुखं" ह्यांत जो अर्थ आहे तोच "हा३वु" ह्यांत दिसतो.

व्याससूत्रकर्त्यांच्या मतें हें उपनिषत् सर्वांमध्ये श्रेष्ठ आहे असें दिसतें. कारण आनंदमयाधिकरणाचा (१।१।१२।१९) ३।३।१२ ह्या सूत्राचा विषय ह्या उपनिषदाच्या शेवटच्या दोन वल्ली आहेत.

---

# मांडूक्योपनिषद्

**काल व कर्ता**—ह्या उपनिषदाच्या कर्त्याचा पत्ता अगदीच लागत नाही. आम्ही ज्या क्रमाने उपनिषदांवर भाष्य केलें आहे त्यामध्ये हें शेवटचें ह्यांत संशय नाही. कारण ह्यात उपनिषद्विचाराची वाढ पूर्णावस्थेस गेलेली दिसून येते आणि उपनिषद्विचाराचें सार स्पष्ट, ठसठशीत व थोड्या शब्दांनी सांगितलेलें आहे. ह्यामुळे हें उपनिषद् फारच अलीकडचें किंबहुना श्रीशंकराचार्यांचे आद्यगुरु श्रीगौडपादाचार्य ह्यांनी केलें असें म्हणणारे काही विद्वान् आहेत. तथापि ह्यात सांगितलेल्या चवथ्या अवस्थेचा म्हणजे वस्तुतः ब्रह्माच्या जागृतावस्थेचा पुढील उपनिषदांत, गूढवादाचा (mysticism) अवलंब करून, जो बाऊ करण्यांत आला आहे, तो बाऊ होण्यापूर्वीचें म्हणजे बरेंच जुनें हें उपनिषद् आहे असें आमचें मत आहे. अर्थात् हें उपनिषद इ. स. पूर्वी ११०० ते १००० ह्या काळांत झालें असावें.

**घटनेची योजना**—ह्यात फक्त बाराच वाक्यें आहेत व त्यांत आत्म्याच्या चार अवस्थांचें वर्णन आहे. प्रश्नोपनिषदांत आत्म्याच्या तीन अवस्था स्पष्टपणें आणि चवथी गर्भितपणें वर्णिली आहे. इतर उपनिषदांतहि असेंच केलें आहे. गर्भितपणें म्हणजे ही अवस्था चवथी होय असें स्पष्टपणें न म्हणतां. इतर उपनिषदांनी ही अवस्था चवथी होय असें स्पष्टपणें न म्हणण्याचें कारण असें आहे की वस्तुतः तो जागृतीच आहे. पण तो अद्वैताची जागृति होय म्हणून तिला ह्या उपनिषदांत चवथी अवस्था असें म्हणून तिचें वर्णन केलें आहे.

**मांडूक्योपनिषद् वाक्य १**

ओमित्येतदक्षरमिदं सर्वं तस्योपव्याख्यानं भूतं भवद् भविष्यदिति सर्वमोंकार एव । यच्चान्यत् त्रिकालातीतं तदप्योंकार एव ॥१॥

**अर्थः**—ओं म्हणजे बदलत असलें तरी नाश न पावणारें [अक्षरम्] हें सर्व जगत्; किंवा ओं हें अक्षर (म्हणजे शब्द) हें सर्व जगत् होय; त्याचें स्पष्ट व्याख्यान [उपव्याख्यानं] असें आहे—मागे होतें [भूतम्], आता आहे [भवत्] आणि पुढे होईल [भविष्यत्] म्हणजे बदलणारें आहे तें सर्व "ओम्कार"च होय. तीन कालाच्या पलीकडे असलेलें म्हणजे तीनहि काळीं न बदलतां सारखेंच राहणारें जें दुसरें आहे तें देखील ओंकारच होय. ॥१॥

**मांडूक्योपनिषद् वाक्य २**

सर्वम् ह्येतद् ब्रह्म अयमात्मा ब्रह्म सोयमात्मा चतुष्पाद् ॥२॥

**अर्थ**—ओं नांवाचें हें सर्व ब्रह्मच आहे (ओम्=ब्रह्म हा अर्थ आहे). हा आत्माहि ब्रह्मच. त्या ह्या आत्म्याला चार पाद म्हणजे अवस्था आहेत. ॥२॥

**मांडूक्योपनिषद् वाक्य ३**

जागरितस्थानो बहिःप्रज्ञः सप्तांग एकोनविंशतिमुखः स्थूलभुग्वैश्वानरः प्रथमः पादः ॥३॥

**अर्थ**—जागृतावस्थेंत असलेला, बहिःप्रज्ञ म्हणजे बाहेरच्या जगाचें म्हणजेच विषयांचें ज्ञान ज्याला होतें तो, सात अंग म्हणजे (१) डोळे, (२) कान, (३) नाक, (४) तोंड, (५) जीभ, (६) हात व (७) पाय ज्याला आहेत असा, एकोणवीस (५ ज्ञानेंद्रियें, ५ कर्मेंद्रियें, ५ प्राण आणि मन, बुद्धि, चित्त व अहंकार हीं ४ अशीं १९) मुखें ज्याला आहेत

असा, स्थूल विषयांचा म्हणजे स्वप्नांतील विषयांप्रमाणे सूक्ष्म नसलेल्या विषयांचा उपभोग घेणारा वैश्वानर नांवाचा पहिला पाद होय. ॥३॥

टिप्पणी--" स्थूलभुग् " ह्याचा वर अर्थ केला, त्याहून भिन्न अर्थ केला पाहिजे असें पुढील वाक्यांतील " प्रविविक्तभुक् " ह्या शब्दावरून वाटतें. कारण "प्रविविक्तभुक्" ह्याचा अर्थ " एकटाच उपभोग घेणारा " असा आहे. यावरून " स्थूलभुग् " ह्याचा अर्थ " पुष्कळ मिळून उपभोग घेणारा " असा असेल कां अशी शंका येते. पण स्थूल शब्दाचा तसा अर्थ होऊं शकत नाही. तथापि भोग्य विषय स्थूल असल्यामुळे, पुष्कळ जण मिळून त्याचा उपभोग घेऊं शकतात असा भाव दिसतो. स्वप्नांतील विषय सूक्ष्म असल्यामुळे त्यांचा उपभोग पुष्कळांना मिळून घेतां येत नाही, एकएकट्यालाच त्यांचा उपभोग घेतां येतो असाहि भाव आहे.

**मांडूक्योपनिषद वाक्य ४**

स्वप्नस्थानोऽन्तःप्रज्ञः सप्तांग एकोनविंशतिमुखः प्रविविक्तभुक् तैजसो द्वितीयः पादः ॥४॥

अर्थ--स्वप्नावस्थेंत असलेला, शरीराच्या आंतील विषयांचें म्हणजे बाह्य विषयांच्या आंत धरून ठेवलेल्या प्रतिबिंबांचें ज्याला ज्ञान होतें असा [ अंतःप्रज्ञः ] वैश्वानराप्रमाणेंच सात अंगांचा, एकोणवीस मुखांचा, एकटाच विषयांचा उपभोग घेणारा [ प्रविविक्तभुक् ] तैजस नांवाचा दुसरा पाद होय. ॥४॥

**मांडूक्योपनिषद् वाक्य ५**

यत्र सुप्तो न कंचन कामं कामयते न कंचन स्वप्नं पश्यति तत्सुषुप्तम् । सुषुप्तस्थान एकीभूतः प्रज्ञानघन एवानंदमयो ह्यानंदभुक् चेतोमुखः प्राज्ञस्तृतीयः पादः ॥५॥

अर्थ—जेव्हा दुसऱ्या मनुष्यास निजलेला दिसणारा मनुष्य [ सुप्तः ] कोणत्याहि कामाची इच्छा करीत नाही किंवा कोणतेंहि स्वप्न पाहात नाही तेव्हा त्या स्थितीला सुषुप्ति ( झोप ) असें म्हणतात. (ही झोपेची व्याख्या होय. ही अशी व्याख्या देण्याचें कारण असें आहे की बाहेरून दुसऱ्यास निजलेला दिसणारा मनुष्य केव्हा केव्हा जागाच असतो किंवा केव्हा स्वप्नांतहि असतो. त्याला खरोखर झोपला असें म्हणतां येत नाही. म्हणून खरी झोप कशाला म्हणतात तें सांगणें आवश्यक आहे). सुषुप्तावस्थेंत असलेला, एकरवाला प्राप्त झालेला [ एकीभूतः ] म्हणजे जागृति व स्वप्न ह्या अवस्थेंत ज्याप्रमाणे आत्मा व इतर असें द्वैत दिसतें तें ज्याला दिसत नाही असा, ज्याची ज्ञानशक्ति [ प्रज्ञान ] घन म्हणजे पाणी बर्फ होऊन अप्रवाही बनतें त्याप्रमाणे अप्रवाही म्हणजे अकार्यकर्त्री झालेली असते असा (' स्वप्नजाग्रमनःस्पंदनानि घनीभूतानि ' असें श्रीशंकराचार्य म्हणतात.), झोपेंतील दुःखाभावरूपी आनंदाचा उपभोग घेणारा [ आनंदभुक् ] पण खरोखर आनंदाचा विकारच [ आनंदमयः ] मागें सांगितलेल्या एकोणनीस मुखांपैकी चित्त हें एकच मुख ज्याला आहे असा, प्राज्ञ नांवाचा तिसरा पाद होय. ॥५॥

टिप्पणी:—"आनंदभुक्" "आनंदमय"—झोपेंत खरा आनंद नसतो, दुःखाभाव असतो. जागृतींतच खरा आनंद असतो. म्हणून झोपेंतील दुःखाभावाला आनंदाचा विकार म्हणतां येतें. म्हणून "आनंदमय" ह्यांतील "मय" प्रत्यय विकारार्थी मानून त्या शब्दाचा अर्थ केला आहे. श्रीशंकराचार्यांनीहि असाच अर्थ केला आहे. ते म्हणतात, "मनसो विषयविषय्याकारस्पंदनायासदुःखाभावाद् आनंदमयः आनंदप्रायो नानंद एव।" ह्या वरील कारणांमुळेच "आनंदभुक्" ह्याचा अर्थ झोपेंतील दुःखाभावरूपी आनंद भोगत असलेला" असा करावा लागतो. टीकाकार ब्रह्मयोगिन्हि म्हणतो की "मयटो-विकारार्थत्वादानंदविकारो नानंद एव"

"प्राज्ञ"—हा शब्द पुढील वाक्यांतील "सर्वज्ञ" ह्या शब्दाप्रमाणेंच गौणार्थानें योजिला आहे. व्याससूत्र २ । ३ । २९ येथे येथील "प्राज्ञ" शब्द गौणार्थानें योजला आहे असें मानलें आहे. (तेथील शांकर भाष्य पहा.)

"चेतोमुखः" दुःखाभावरूपी आनंद गौणत्वानेंहि चित्त पाहिजेच अशा समजुतीने "चेतोमुख" म्हटलें आहे.

मांडूक्योपनिषद् वाक्य ६

एष सर्वेश्वर एष सर्वज्ञ, एषोंतर्याम्येष योनिः प्रभवाप्ययौ हि भूतानां ॥ ६ ॥

अर्थः—हा निद्रावस्थेंतील आत्माच, सर्वांचा ईश्वर म्हणजे सर्वांचें नियमन करणारा, सर्वज्ञ, सर्वांच्या आत राहून त्यांचें नियमन करणारा [अंतर्यामी], सर्वांचें उत्पत्तिस्थान [योनिः] म्हणजे प्रकृतिकारण आणि सर्व भूतांची उत्पत्ति म्हणजे निमित्तकारणहि आहे. (प्रभव) व नाश करणारा (अप्यय) आहे.

टिप्पणीः—"सर्वज्ञः"—झोपेंतील अद्वैतस्थितींत ज्ञानच संभव नाही, तर मग ह्या स्थितीतील आत्म्याला "सर्वज्ञ" असें विशेषण कसें लाविलें हा प्रश्न येथे येतो. त्याचें उत्तर असें. जगाची व देहाची चमत्कारिक रचना सर्वज्ञच करूं शकेल म्हणून त्याला सर्वज्ञ हें विशेषण लाविलें आहे; जागृतींत जसें ज्ञान असतें तसें त्याला असतें म्हणून नव्हे. अर्थात् येथे "सर्वज्ञ" हा शब्द गौणार्थानें योजिला आहे, हें त्या प्रश्नाचें उत्तर आहे. ईक्षणविषयीहि असेंच ठरतें. उपसंहार प्यारा ६५ पहा.

निद्रा हीच ब्रह्माचें स्वरूप म्हणजे मूळचें रूप; आणि जागृति, स्वप्न व चतुर्थावस्था हीं रूपें त्या मूळ रूपाचा विकास होत, असा

ह्याचा अर्थ आहे. उपसंहार प्यारा ४९ पहा. "रामतापिन्यां उत्तरतापिन्युपनिषद्" ह्या उपनिषदांतील द्वितीय खंडात आणि "नृसिंहतापिन्या पूर्वतापिन्युपनिषद्" ह्या उपनिषदांतील चवथ्या उपनिषदांत मांडुक्यांतील पहिली सात वाक्यें जशींचीं तशींच घेतलीं आहेत. "नृसिंहतापिन्यां उत्तरतापिन्युपनिषत्" ह्या उपनिषदांत प्रथम खंडांत हींच वाक्यें स्पष्टीकरणार्थ थोडा थोडा बदल करून दिलीं आहेत. तेथे निद्रावस्थेच्या वर्णनांत "प्राज्ञस्तृतीयः पादः" असें वाक्य आहे. त्यावरून आम्ही मांडुक्यांतील ६ व्या वाक्याचा जसा अर्थ केला तसाच ह्या उपनिषत्कारानेहि केला असें दिसतें.

मांडूक्योपनिषद् वाक्य ७

नांतःप्रज्ञं न बहिःप्रज्ञं नोभयतः प्रज्ञं न प्रज्ञानघनम् न प्रज्ञम् नाप्रज्ञम्। अदृश्यमव्यवहार्यमग्राह्यमलक्षणमचिंत्यमव्यपदेश्यमेकात्मप्रत्ययसारं प्रपंचोपशमं शांतं शिवमद्वैतं चतुर्थं मन्यंते स आत्मा स विज्ञेयः ॥७॥

अर्थ—हा चवथा पाद स्वप्नावस्थेप्रमाणे अंतःप्रज्ञ नाही. हा जागृतीप्रमाणे बहिःप्रज्ञ आहे असेंहि म्हणतां येत नाही. (कारण जागृतीप्रमाणेच तो सर्व पहात असतो तरी तें आत्माच होय, आत्म्यांतच आहे अशी त्याची भावना असते) तो उभयतः प्रज्ञहि नाही म्हणजे एकाच वेळीं स्वप्नाप्रमाणे अंतःप्रज्ञ व जागृतीप्रमाणे बहिःप्रज्ञ असाहि तो नाही. हा पाद सुषुप्तिप्रमाणे प्रज्ञानघनहि नाही आणि प्रज्ञ म्हणजे सर्वज्ञहि नाही. हा पाद अप्रज्ञहि नाही कारण पुढे दाखविल्याप्रमाणे त्यास अद्वैताचें ज्ञान झालेलें असतें. हा पाद अदृश्य आहे, कारण अमका मनुष्य ह्या पादाच्या स्थितींत आहे हें दुसऱ्यास समजणें कठीण आहे. हा पाद अव्यवहार्य आहे कारण द्वैतबुद्धीचा मनुष्य जसा व्यवहार करतो तसा व्यवहार तो अद्वैतबुद्धीचा मनुष्य करूं शकत नाही.

"प्राज्ञ"—हा शब्द पुढील वाक्यांतील "सर्वज्ञ" ह्या शब्दाप्रमाणेंच गौणार्थानें योजिला आहे. व्याससूत्र २ । ३ । २९ येथे येथील "प्राज्ञ" शब्द गौणार्थानें योजला आहे असें मानलें आहे. (तेथील आमचें भाष्य पहा.)

"चेतोमुखः" -दुःखाभावरूपी आनंद भोगण्यासहि चित्त पाहिजेच अशा समजुतीनें "चेतोमुख" म्हटलें आहे.

मांडूक्योपनिषद् वाक्य ६

एष सर्वेश्वर एष सर्वज्ञ, एषोंतर्याम्येष योनिः प्रभवाप्ययौ हि भूतानां ॥ ६ ॥

*अर्थः—हा निद्रावस्थेंतील आत्माच, सर्वांचा ईश्वर म्हणजे सर्वांचें नियमन करणारा, सर्वज्ञ, सर्वांच्या आंत राहून त्यांचें नियमन करणारा. [अंतर्यामी], सर्वांचें उत्पत्तिस्थान. [योनिः] म्हणजे प्रकृतिकारण आणि सर्व भूतांची उत्पत्ति म्हणजे निमित्तकारणहि आहे.* (प्रभव) व नाश करणारा (अप्यय) आहे.

टिप्पणीः—"सर्वज्ञः"—झोपेंतील अद्वैतस्थितींत ज्ञानच संभव नाहीं, तर मग ह्या स्थितींतील आत्म्याला "सर्वज्ञ" असें विशेषण कसें लाविलें हा प्रश्न येथे येतो. त्याचें उत्तर असें. जगाची व देहाची चमत्कारिक रचना सर्वज्ञच करूं शकेल म्हणून त्याला सर्वज्ञ हें विशेषण लाविलें आहे; जागृतींत जसें ज्ञान असतें तसें त्याला असतें म्हणून नव्हे. अर्थात् येथे "सर्वज्ञ" हा शब्द गौणार्थानें योजिला आहे, हें त्या प्रश्नाचें उत्तर आहे. ईक्षणाविषयींहि असेंच ठरतें. उपसंहार प्यारा ६५ पहा.

निद्रा हीच ब्रह्माचें स्वरूप म्हणजे मूळचें रूप; आणि जागृति, स्वप्न व चतुर्थावस्था हीं रूपें त्या मूळ रूपाचा विकास होत, असा

ह्याचा अर्थ आहे. उपसंहार प्यारा ४९ पहा. "रामतापिन्यां उत्तरतापिन्युपनिषद्" ह्या उपनिषदातील द्वितीय खंडांत आणि "नृसिंहतापिन्यां पूर्वतापिन्युपनिषद्" ह्या उपनिषदांतील चवथ्या उपनिषदात मांडुक्यांतील पहिली सात वाक्यें जशींचीं तशींच घेतलीं आहेत. "नृसिंहतापिन्यां उत्तरतापिन्युपनिषत्" ह्या उपनिषदांत प्रथम खंडांत हींच वाक्यें स्पष्टीकरणार्थ थोडा थोडा बदल करून दिलीं आहेत. तेथे निद्रावस्थेच्या वर्णनांत "प्राज्ञस्तृतीयः पादः" असें वाक्य आहे. त्यावरून आम्ही मांडुक्यांतील ६ व्या वाक्याचा जसा अर्थ केला तसाच ह्या उपनिषत्कारानेहि केला असें दिसतें.

मांडूक्योपनिषद् वाक्य ७

नांतःप्रज्ञं न बहिःप्रज्ञं नोभयतः प्रज्ञं न प्रज्ञानघनम् न प्रज्ञम् नाप्रज्ञम्। अदृश्यमव्यवहार्यमग्राह्यमलक्षणमचिंत्यमव्यपदेश्यमेकात्मप्रत्ययसारं प्रपंचोपशमं शांतं शिवमद्वैतं चतुर्थं मन्यंते स आत्मा स विज्ञेयः ॥७॥

अर्थ—हा चवथा पाद स्वप्नावस्थेप्रमाणे अंतःप्रज्ञ नाही. हा जागृतीप्रमाणे बहिःप्रज्ञ आहे असेंहि म्हणतां येत नाही. (कारण जागृतीप्रमाणेच तो सर्व पहात असतो तरी तें आत्माच होय, आत्म्यांतच आहे अशी त्याची भावना असते) तो उभयतः प्रज्ञहि नाही म्हणजे एकाच वेळीं स्वप्नाप्रमाणे अंतःप्रज्ञ व जागृतीप्रमाणे बहिःप्रज्ञ असाहि तो नाही. हा पाद सुषुप्तिप्रमाणे प्रज्ञानघनहि नाही आणि प्रज्ञ म्हणजे सर्वज्ञहि नाही. हा पाद अप्रज्ञहि नाही कारण पुढे दाखविल्याप्रमाणे त्यास अद्वैताचें ज्ञान झालेलें असतें. हा पाद अदृश्य आहे, कारण अमका मनुष्य ह्या पादाच्या स्थितींत आहे हें दुसऱ्यास समजणें कठीण आहे. हा पाद अव्यवहार्य आहे कारण द्वैतबुद्धीचा मनुष्य जसा व्यवहार करतो तसा व्यवहार तो अद्वैतबुद्धीचा मनुष्य करूं शकत नाही.

हा पाद अग्राह्य आहे कारण ह्याचें स्वरूप समजणें कठीण आहे. हा पाद अलक्षण आहे. कारण वस्तुतः तो जागृतीच असल्यामुळे त्याचें जागृतीहून भिन्नत्व दाखविणारें लक्षण कोणतेंच नाही. हा पाद अचिंत्य आहे कारण ह्याच्या स्वरूपाची कल्पना करणें कठीण आहे. हा पाद अव्यपदेश्य आहे; कारण वस्तुतः तो जागृतीहून भिन्न नसल्यामुळें त्याचें दुसरें नांव ठेवतां येत नाही. ह्या पादाचें स्वरूप असें आहे. —सर्व भूतांमध्ये एकच आत्मा आहे असा प्रत्यय असणें हेंच ह्या पादाचें सार म्हणजे मुख्य भाग आहे, म्हणजेच स्वरूप आहे. ("प्रत्यय" या शब्दावरून हा पाद म्हणजे जागृतीच होय असें ठरतें, कारण प्रत्यय म्हणजे बुद्धीचा निश्चय हा जागृतींतच राहूं शकतो. तो प्रज्ञानघन नाही हें मागे सांगितलें त्यावरूनहि ह्यांत बुद्धि काम करीत असते अर्थात् हा पाद जागृतीच होय असें ठरतें.) ह्या पादांत प्रपंचाचा म्हणजे द्वैतबुद्धिमूलक व्यवहाराचा नाश होतो. हा पाद शांत आहे, कारण ह्यांत वासना नाश पावतात. हा पाद शिव आहे, कारण ह्यांत आनंदाची पराकाष्ठा असते. हा अद्वैत आहे, कारण ह्यांत जें जें दिसतें तें तें दुसरें नव्हेच असें तो समजतो. हा चवथा पाद होय असें फक्त कोणी मानतात. (वस्तुतः तो जागृतीच होय. हाच खरा आत्मा होय [स आत्मा]. हाच जाणून घेतला पाहिजे [स विज्ञेयः]. ॥७॥

टिप्पणी—या चतुर्थपादाच्या वर्णनांत "एकात्मप्रत्ययसारम्" आणि "मन्यंते" हे दोन शब्द फारच महत्त्वाचे आहेत. "एकात्मप्रत्ययसारं" याविषयी श्रीशंकराचार्यांनी लिहिलें आहे की "एकात्मप्रत्ययसारं जाग्रदादिस्थानेष्वेकोऽयमात्मेत्यव्यभिचारी यः प्रत्ययस्तेनानुसरणीयम् । अथवैक आत्मप्रत्ययः सारं प्रमाणं यस्य तुरीयस्याधिगमे तत्तुरीयमेकात्मप्रत्ययसारम् ।" याचा अर्थ असा—"जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति या तीनहि अवस्थांमध्ये एकच न ढळणार

आत्मा आहे असा जो प्रत्यय, त्या प्रत्ययानें ज्यांचें अनुसरण म्हणजे ज्ञान करून ध्यावयाचें असतें असा जो तो एकात्मप्रत्ययसारः; किंवा दुसराहि अर्थ असा करतां येतो की, एक आत्मप्रत्ययच म्हणजे स्वतःचा अनुभवच ज्यांच्या ज्ञानाविषयीं प्रमाण आहे तो. " याप्रमाणे या शब्दाचा अर्थ केला तर तुर्यावस्थेचें स्वरूप स्पष्टपणें किंवा प्रत्यक्ष वर्णन करणारा एकहि शब्द वाक्यांत रहात नाहीं म्हणून आम्ही केलेलाच अर्थ ग्राह्य ठरतो. " प्रत्यय " हा जागृतीतच असतो म्हणून एकात्मप्रत्ययसारं या विशेषणावरून ही एक प्रकारची जागृतीच होय असें ठरतें. आमचा अर्थ इतर उपनिषदांत प्राप्तव्य स्थितीचें जें वर्णन आहे त्याशीं जुळतो. ( उपसंहार प्यारे ३४-४१ पाहा.) या "एकात्मप्रत्ययसारं " याचा अर्थ बरोबर न समजल्यामुळेच या चतुर्थावस्थे-विषयीं गूढार्थ भाषा मांडूक्यकारिकांत व इतरत्रहि योजिली गेली आहे. खरोखर पाहतां ही चतुर्थावस्था म्हणजे सर्वत्र भूतांमध्ये एकच आत्मा जो स्वतःमध्ये आहे तोच आहे हें जाणण्याची जागृति होय. संक्षेपानें बोलावयाचें म्हणजे ती अद्वैतज्ञानाची जागृति होय.

" मन्यंते " ह्याचा श्रीशंकराचार्यांनी केलेला अर्थ तर अजीबात चूक आहे. " मन्यंते " याचें स्वारस्य त्यांना बरोबर समजलें नाहीं. इतर पादांच्या वर्णनांत " मन्यंते " असा शब्द नाहीं मग तो येथेच कां अशी शंका त्यांनाहि आली असें " चतुर्थं मन्यंते। प्रतीयमानपादत्रयरूपवैलक्षण्यात् " ह्या वाक्यावरून दिसतें. पण ह्या शंकेचें ह्या वाक्यांत श्रीशंकराचार्यांनी दिलेलें उत्तर बरोबर नाहीं. कारण प्रतीयमानपादत्रयाहून हा पाद जर विलक्षण आहे तर इतरास जसें प्रथमः, द्वितीयः, तृतीयः म्हटलें तसेंच ह्यासहि चतुर्थः असें सरळच म्हटलें पाहिजे होतें. त्याला चवथा मानतात [ मन्यंते ] असें म्हणण्याची गरजच नव्हती. " मन्यंते " ही भाषा गुळमुळीत आहे. तिचा अर्थ " मानतात " पण खरोखर नाहीं असाच होतो. " मानलेला

-मुलगा" म्हणजे खरा मुलगा नव्हे, असाच अर्थ आहे. त्याप्रमाणेच येथेहि ही चवथी अवस्था मानतात पण खरोखर ही जागृतीच अर्थात् विशिष्ट प्रकारची जागृति असा अर्थ आहे.

ह्या सातव्या वाक्याच्या आम्ही केलेल्या विवरणावरून, ह्या तुर्यावस्थेविषयी पुष्कळांनी गूढवादाचा अवलंब करून जो गैरसमज करून घेतला आहे तो नाहीसा होईल अशी आशा करतों. ह्या गूढवाद्यांचें म्हणणें असें दिसतें की "तुर्यावस्थेंत निद्रेप्रमाणेच अद्वैतावस्था असते तथापि तुर्या निद्रेहून भिन्न आहे." (द्वैतस्याग्रहणं तुल्यमुभयोः प्राज्ञतुर्ययोः । बीजनिद्रायुतः प्राज्ञः सा च तुर्ये न विद्यते ॥१३॥ गौडपादाचार्यकृत मांडूक्यकारिका ) अद्वैत सारखेंच तर भिन्नत्व कशें हें मोठें गूढच आहे. खरोखर पाहतां निद्रेंत द्वैत स्वरूपतः नसतेंच आणि तुर्येत द्वैत दिसतें तरी तें खोटें आहे असा निश्चय असतो, म्हणजे द्वैत फलतः नसतें. जसें आरशांत दुसरा दिसतो तरी तो पाहणाऱ्याहून भिन्न नाही असा निश्चय असतो. म्हणून आरशांतील प्रतिबिंबानें वाकोल्या दाखविल्या तरी त्यापासून राग येत नाही. असें भिन्नत्व निद्रा व तुर्या ह्यांमध्ये मानणें भाग आहे व तसें भिन्नत्व मानलें तर तुर्या म्हणजे एक विशिष्ट प्रकारची जागृति ठरते.

मांडूक्योपनिषद् वाक्य ८

सोऽयमात्माध्यक्षरमोंकारोऽधिमात्रं पादा मात्रा, मात्राश्च पादा अकार उकारो मकार इति ॥८॥

अर्थः—तो हा आत्मा अक्षराच्या दृष्टीने [अध्यक्षरम्] ओंकार आहे. आणि मात्रांच्या दृष्टीने [अधिमात्रं] त्या आत्म्याचे पाद ओंच्या मात्रा होत, आणि अकार, उकार, आणि मकार ह्या ओंच्या तीन मात्रा आत्म्याचे तीन पाद होत. म्हणजे आत्म्याला 'ओम्' हें नांव आहे आणि त्याच्या तीन पादांना म्हणजेच जागृति, स्वप्न आणि निद्रा ह्या तीन अवस्थांना अ, उ आणि म् हीं नावें आहेत.

**मांडूक्योपनिषद् वाक्य ९**

जागरितस्थानो वैश्वानरोऽकारः प्रथमा मात्राप्तेरादिमत्वाद्वाप्नोति ह वै सर्वान् कामान् आदिश्च भवति य एवं वेद ॥९॥

**अर्थ**—जागृतावस्थेंतील वैश्वानर हा पाद ओंकाराची पहिली मात्रा "अकार" ही होय. ह्या वैश्वानर पादाला "अ" हें नाव देण्याचें कारण असें आहे की तो "आदिमान्" आहे म्हणजे तीनहि पादामध्ये पहिला किंवा मुख्य आहे आणि "आदिमान्" ह्या शब्दाच्या आरंभीचें अक्षर 'अ' हें आहे. किंवा दुसरेहि कारण आहे. सर्व कामाची "आप्ति" म्हणजेच प्राप्ति त्याला होऊं शकते आणि "आप्ति"च्या आरंभीचें अक्षर "अ" हेंच आहे. "आदिमत्" शब्दाच्या किंवा "आप्ति" शब्दाच्या पहिल्या अक्षरावरून ह्या पादाला 'अ' हें नाव दिलें हा भाव आहे. (जागृतींतच मनुष्य काम मिळवूं शकतो हाच अर्थ प्रश्नोपनिषदांत "महिमानमनुभवति" ह्या शब्दांनी व्यक्त केला आहे हें उघड आहे ) जो हे जाणतो तो सर्व काम मिळवितो आणि सर्वांमध्ये पहिला ( मुख्य ) होतो. ॥९॥

**मांडूक्योपनिषद् वाक्य १०**

स्वप्नस्थानस्तैजस उकारो द्वितीया मात्रोत्कर्षादुभयत्वाद्वोत्कर्षति ह वै ज्ञानसंततिं समानश्च भवति नास्याब्रह्मवित्कुले भवति य एवं वेद ॥१०॥

**अर्थ**—स्वप्नावस्थेंतील तैजस हा पाद ओंकाराची दुसरी मात्रा उकार ही होय. ह्या तैजसाला "उ" हें नाव देण्याचें कारण असें आहे की त्यात उभय म्हणजे दोनहि जागृति व निद्रा ह्या अंशतः आहेत. ( निद्रेंतील आत्म्याप्रमाणे स्वप्नांतील आत्म्याचें शरीर एकाच ठिकाणीं

पडून राहते आणि जागृतींतील आत्म्याप्रमाणे. स्वप्नांतील आत्म्याचें मन व बुद्धि काम करते ) आणि "उभय" या शब्दाचें पहिलें अक्षर "उ" हें आहे. किंवा दुसरेंहि कारण आहे. स्वप्नावस्थेंतील जीव आपणांमधून नवीन नवीन कल्पनांचा किंवा देखाव्यांचा उत्कर्ष करतो म्हणजे नवीन नवीन कल्पना किंवा देखावे बाहेर काढतो. आणि "उत्कर्ष" या शब्दाचें पहिलें अक्षर "उ" हें आहे. "उभय" किंवा "उत्कर्ष" या शब्दाच्या पहिल्या अक्षरावरून या पादाला "उ" हें नांव दिलें आहे. जो हें जाणतो तो ज्ञानांची म्हणजे सिद्धांतकल्पनांची (Theories, Hypothesis) संतति म्हणजे परंपरा बाहेर काढतो आणि अद्वैतसिद्धांतकल्पना काढून तो सर्वभूतांशीं, आणि ब्रह्माशीं किंवा ईश्वराशीं समान होतो. आणि ह्याच्या कुलांत कोणीच अब्रह्मवेत्ता रहात नाही. स्वप्नाच्या अनुभवावरून मनुष्य जागृतींतहि कल्पना करणें शिकतो आणि चांगल्या कल्पना करून आनंदाचा अनुभव घेतो असा भाव आहे. प्रश्नोपनिषद् ५।४ मध्येहि ह्याच भाव आहे.

मांडूक्योपनिषद् वाक्य ११

सुषुप्तस्थानः प्राज्ञो मकारस्तृतीया मात्रा मितेरपीतेर्वा
मिनोति ह वा इदं सर्वमपीतिश्च भवति य एवं वेद ॥११॥

अर्थ—निद्रावस्थेंतील प्राज्ञ हा पाद ओंकाराची तिसरी मात्रा "मकार" ही होय. या पादाला हें नांव देण्याचें कारण असें आहे की प्रांत जागृति व स्वप्न ह्या दोन्ही अवस्थांची "मिति" म्हणजेच "अपीति" होते ( "मिति" आणि "अपीति" हे शब्द एकार्थक आहेत असा उपनिषदाचा अर्थ आहे. ) म्हणजे प्रांत जागृति व स्वप्न ह्या दोनहि अवस्था पाण्यांत मीठ विरतें त्याप्रमाणें विरून जातात. आणि "मिति" या शब्दाच्या आरंभीं "म्" हें अक्षर आहे.

"मिति": ह्या शब्दाच्या पहिल्या अक्षरावरून "म्" हें नांव दिलें आहे. हें जो जाणतो तो हें सर्व जग आपणामध्ये विरवून घेतो [मिनोति] आणि द्वैताचा "अपीति" म्हणजे द्वैताला विरवून घेणारा होतो. म्हणजे द्वैत खोटें आहे असें मानतो. झोपेंत द्वैत नाहीसें होतें त्या अर्थी द्वैत खोटें आहे असें तो मानतो.

टिप्पणीः—"मिति" आणि "मिनोति" ह्यांतील धातु "निर्मिमीते" म्हणजे उत्पन्न करतो किंवा "मिमीते" म्हणजे मोजतो ह्यांतील धातूहून भिन्न आहे व त्याचा अर्थहि भिन्न आहे, म्हणजे "अपीति" आहे असें उपनिषदच्च स्पष्ट सांगतें. जागृतीच्या वर्णनांत जसें अकारादि दोन शब्द दाखविले आहेत किंवा स्वप्नाच्या वर्णनांत जसे उकारादि दोन शब्द दाखविले आहेत तसे येथें मकारादि दोन शब्द दाखविले नाहीत. ह्यावरून "मिति" व "अपीति" हे शब्द समानार्थक आहेत असाच उपनिषदाचा अर्थ होतो. कौषीतकी उपनिषदात ३।१ येथे "मीयते" ह्या शब्दांत येथीलच "मि" धातु आहे. "अपीति" म्हणजे दुसऱ्यांत कशांत तरी जाऊन मिळणें, दुसऱ्यांत विरणें असा अर्थ आहे, हें छान्दोग्योपनिषदांतील ६।८।१ येथील "स्वपिति" शब्दाच्या निर्वचनावरून स्पष्ट आहे.

**मांडूक्योपनिषद् वाक्य १२**

अमात्रश्चतुर्थोऽव्यवहार्यः प्रपंचोपशमः शिवोऽद्वैत एवमोंकार आत्मैव, संविशत्यात्मनात्मानम् य एवं वेद ॥१२॥

**अर्थः**—अव्यवहार्य, प्रपंचोपशम, शिव आणि अद्वैत (ह्या चार विशेषणांचे अर्थ मागे दिलेच आहेत), अशा ह्या चवथ्या पादाची "ओम्" ह्या अक्षरांत कोणतीच मात्रा [अमात्रः] नाही. (कारण खरोखर हा पाद भिन्न पाद नसून जागृतीचाच एक प्रकार आहे.) ह्याप्रमाणें

म्हणजे आत्माच [आत्मैव] म्हणजे चतुर्थपादांतील जीवच (सात या वाक्यात चतुर्थपादाला " स आत्मा " असें म्हटलें आहे, त्यावरून येथील " आत्मा " शब्दाचा अर्थ " चतुर्थपादातील जीव " असा होतो ) ओंकार होय. म्हणजे चतुर्थावस्थेंतील जीवाचें नाव " ओम् " हें आहे, हा भाव आहे. जो हें जाणतो म्हणजे ह्या उपनिषदात सांगितलेलें जाणतो तो आत्म्याने म्हणजे जीवात्म्याने आत्म्यात म्हणजे ब्रह्मात म्हणजे सर्वभूतांच्या जीवात प्रवेश करतो. म्हणजे इतर सर्व जीवांना आत्मवत् मानून अत्यंत उन्नतावस्थेस पावतो असा भाव आहे. प्रश्नोपनिषद् ४ । १०-११ येथे " स सर्वज्ञः सर्वो भवति " असें म्हणून त्यातीलच अर्थ सांगण्याकरिता " स सर्वज्ञः सर्वमेवाविवेश " असेंहि म्हटलें आहे. त्यावरून या उपनिषदांतील ह्या वाक्याचा कोणता अर्थ आहे तें समजतें.

# कौषीतक्युपनिषद्

ह्या उपनिषदाकडे टीकाकारांचें लक्ष फारच कमी असल्यामुळे ह्याचे पाठ फार भ्रष्ट झालेले आहेत मजजवळ ह्याच्या तीन प्रति आहेत (१) अडयारच्या लायब्ररीने प्रसिद्ध केलेली हीच मुख्य मानली आहे. म्हणजे हिचाच पाठ इतरांशीं तुलना करून शुद्ध करून घेतला. (२) भद्रावीस उपनिषदांची एक छापील प्रत मजजवळ आहे तीमधील उपनिषद (३) नागपुर युनिव्हर्सिटी लायब्ररींतून आणलेली आनंदाश्रम ग्रंथावलि ग्रंथांक २९ "ह्यात छापलेली ह्याचा अनुक्रमें १।२।३ असा निर्देश केला आहे तिसऱ्यावर शंकरानंदाची टीका आहे व त्या प्रतींतील पाठ जास्त चांगले दिसतात. पाठसंशयप्रसंगीं तीनहि प्रतींतील पाठांचा विचार करून जो पाठ ग्राह्य वाटतो तोच प्रथमत जाड अक्षरांनी येथे दिला आहे आणि "पाठविचार" या प्रकरणात त्याविषयी विचार केला आहे.

**कर्ता व काल** —ह्या उपनिषदाचा कर्ता कौषीतकि नांवाचा ऋषि असावा व हें उपनिषद् बृहदारण्यक व छांदोग्य ह्यापूर्वी झालें असाव कारण छांदोग्य १।५ येथे कौषीतकि व त्याचा पुत्र ह्याचा निर्देश आहे आणि बृहदारण्यक ३।५।१ येथे कहोल कौषीतकेय म्हणजे कौषीतकिपुत्र कहोल ह्याचा निर्देश आहे शिवाय कौषीतक्युनिषद् ४ आणि बृहदारण्यकोपनिषद् २।१ ह्यांची तुलना करितां असें दिसतें की कौषीतक्युपनिषद् ४ चें खंडन करण्याकरिताच बृ० २।१ तयार केलें आहे

**घटनेची योजना:**—*प्राणाचें व प्राणोपासनेचें म्हणजेच प्राणाच्या* जोपासनेचें महत्त्व वर्णन करणें हाच ह्या उपनिषदाचा विषय आहे. याचे चार अध्याय आहेत. पहिल्यांत ज्ञानी व अज्ञानी ह्यांच्या दोन प्रकारच्या गति वर्णिल्या आहेत व ज्ञानी ब्रह्मलोकास जातो असें वर्णिलें आहे. दुसऱ्या अध्यायांत ब्रह्मलोकास गेलेल्याचीं कृत्यें वर्णिलीं आहेत. पुढील दोन अध्यायांत प्राणाचें महत्त्व, प्राणोपासनेचें महत्त्व आणि प्राणोपासना वर्णिली आहे. ही प्राणोपासना म्हणजे उपासकाच्या एकट्याच्या प्राणाची उपासना नसून सर्वांच्या प्राणाची उपासना आहे. दुसऱ्या अध्यायांत प्राणाच्या जोपासनेस सहाय्यभूत होणारीं कांहीं कर्में सांगितलीं आहेत. मरण जवळ आलें असतां काय करावें तें २।१० मध्ये दिलेलें आहे.

## कौषीतक्युपनिषद् अध्याय पहिला

अध्याय १ खंड १.

चित्रो ह वै गार्ग्यायणिर्यक्ष्यमाण आरुणिं वव्रे । स ह पुत्रं श्वेतकेतुं प्रजिघाय याजयेति । तं हासीनं पप्रच्छ गौतमस्य पुत्रास्ति संवृतं लोके यस्मिन्माधास्यस्यन्यतमो वाध्वा तस्य लोके धास्यसीति । स होवाच नाहमेतद्वेद हंताचार्यं पृच्छानीति । स [redacted] पितरमासाद्य पप्रच्छेति । मा प्राक्षीत् कथं प्रत्यब्रवाणीति स होवाचाहमप्येतन्न वेद सदस्येव वयं स्वाध्याय-मधीत्य हरामहे यन्नः परे ददत्येह्युभौ गमिष्याव इति ॥१॥

**अर्थ:**—गार्ग्याचा पुत्र [ गार्ग्यायणि ] चित्र ह्याला यज्ञ करावयाचा होता म्हणून [यक्ष्यमाणः] त्यानें आरुणीला त्या कामाकरितां निवडलें [वव्रे]. आरुणीनें आपला पुत्र श्वेतकेतु ह्याला त्याजकडून यज्ञ करीव [याजय] असें सांगून पाठविलें [प्रजिघाय]. येऊन बसलेल्या

[आसीनं] श्वेतकेतूला चित्राने विचारलें, "गौतमाच्या पुत्रा! ज्या लोकीं तूं मला नेऊन ठेवशील [धास्यसि] त्या लोकांत संवृत आहे काय? [अस्ति] म्हणजे त्या लोकांत गेल्यानंतर त्यांतून बाहेर निघण्यास मार्ग नाही म्हणून परत फिरून ह्या लोकीं पुनः यावें लागतें अशी स्थिति आहे काय? किंवा त्या लोकांतून बाहेर निघण्यास दुसरा [अन्यतम] म्हणजे ब्रह्मलोकास नेणारा रस्ता [अध्वा] आहे? त्या रस्त्याच्या [तस्य] लोकांत म्हणजे ज्यांतून बाहेर निघण्यास दुसरा म्हणजे ब्रह्म-लोकास नेणारा रस्ता आहे त्या लोकांत मला नेऊन ठेवशील।" असें विचारलें गेलें असतां श्वेतकेतु म्हणाला, "हें म्हणजे ह्या प्रश्नाचें उत्तर मला माहीत नाही. मी आपल्या आचार्याला म्हणजे बापाला विचारूं काय? [पृच्छानि] (त्याला तसें करण्याची परवानगी मिळाली असतां) तो बापाकडे जाऊन [आसाद्य] असें म्हणजे पुढे सांगितल्याप्रमाणे [इति] पुसता झाला [पप्रच्छ]. "मला राजाने विचारलें. मी कसें बोलावें" हें [इति] विचारलें. बाप म्हणाला "मलादेखील हें माहीत नाही. आपण सभेंत वेदपाठ म्हणून जें द्रव्य दुसरे आपणांस देतात तें घेतो [हरामहे]. (आपणांस वेदांचा अर्थ कळत नाही हा भाव दिसतो). चल आपण दोघेहि चित्रालाच विचारण्यास जाऊं.

पाठविचार "गौतस्य पुत्र" आणि "इति" ह्यांमधील पाठ निरनिराळ्या प्रतींत निरनिराळा आहे. आम्ही इन्न मधील पाठ घेतला आहे.

टिप्पण—कठोपनिषदाच्या विवरणांत आम्ही "गौतमा"ची वंशावळी दिली आहे. तीवरून दिसेल कीं गौतमाचा पुत्र "अरुणि", "अरुणीचा" पुत्र "उद्दालक" आणि उद्दालकाचा पुत्र श्वेतकेतु होय. येथे ज्याला "आरुणि" म्हटलें आहे तो "अरुणि"चा पुत्र "उद्दालक" असला पाहिजे. ह्यालाच "गौतम" म्हटलें आहे. कारण गौतम म्हणजेच गौतमाच्या वंशांत जन्मलेला असाहि अर्थ

आहेच. ह्याच श्वेतकेतूचा आणि त्याचा बाप उद्दालक आरुणि ह्याचा निर्देश छां. ६ । १ आणि ६ । ८ येथेहि आहे आणि तेथे "उद्दालक" फार ज्ञानी होता असें दाखविलें आहे. आणि येथे तर तो केवळ वेद घोंडपाठ म्हणणारा होता असें दाखविलें आहे. मला वाटतें की ह्या प्रसिद्ध असलेल्या कुरुंतील पुरुषांचा आपल्या आपल्या ग्रंथाशीं अनुरूप असा निर्देश - उपनिषत्कारांनी केला. त्या निर्देशांत सत्य किती असेल तें सांगणें कठीण आहे.

अध्याय १ खंड २

स ह समित्पाणिः चित्रं गार्ग्यायणिं प्रतिचक्राम उपायानीति । स होवाच ब्रह्मार्होऽसि गौतम यो मामुपागादेहि व्यैव त्वा ज्ञपयिष्यामीति । स होवाच ये वै के चास्माल्लोकात् प्रयांति चंद्रमसमेव ते सर्वे गच्छंति । तेषां प्राणैः पूर्वपक्ष आप्यायते । अथापरपक्षेण प्रजनयति । एतद्वै स्वर्गस्य द्वारं यश्चंद्रमास्तं यःप्रत्याहतमतिसृजते । य एनं न प्रत्याह तमिह वृष्टिर्भूत्वा वर्षति । स इह कीटो वा पतंगो वा शकुनिर्वा शार्दूलो वा सिंहो वा मत्स्यो वा परश्वा वा पुरुषो वाऽन्यो वैतेषु स्थानेषु प्रत्याजायते यथाकर्मं यथाविद्यम् । तमागतं पृच्छति कोऽसीति । तं प्रतिब्रूयात् ॥२॥

अर्थ—वेव्हा तो "आरुणि" हातांत समिधा घेऊन [समित्पाणिः] गार्ग्यपुत्र चित्राकडे गेला आणि मला तुजजवळ शिकण्याकरितां येऊं दे असें [ उपायानीति ] म्हणाला, म्हणजे मला शिकीव असें म्हणाला. त्याला चित्र म्हणाला "हे गौतमा, तूं मला म्हणजेच ब्रह्मज्ञान घेण्यास योग्य आहेस [ ब्रह्मार्हः ], कारण तूं शिकण्याकरितां मी बाह्मण नसूनहि माझ्याकडे आलास ("यो न मामुपागाः" असा पाठ ३ मध्ये

आहे तो घेतला तर "कारण तूं मानास म्हणजे गर्वास गेला नाहीस. मी ब्राह्मण असून क्षत्रियाकडे शिकण्यास कसा जाऊं असा गर्व तूं केला नाहीस" असा अर्थ होईल ). ये मी तुला शिकवितों [ ज्ञपयिष्यामि किंवा "ज्ञापयिष्यामि" असा दुसरा पाठ आहे त्याचाहि अर्थ तोच आहे ]. तो चित्र म्हणाला "जे कोणी ह्या लोकांतून जातात, ते सर्वहि चंद्राकडेच म्हणजे चंद्रलोकांतच जातात. त्यांच्या प्राणांनी पूर्वपक्षांत म्हणजे शुक्लपक्षांत चंद्र वाढत जातो [ आप्यायते ] आणि दुसऱ्या पक्षांत म्हणजे कृष्णपक्षांत [ अपरपक्षेण ] त्यांनाच पुनः जन्मवितो म्हणजे जन्मास घालतो. हा जो चंद्रमा आहे [redacted] स्वर्गलोकाचें म्हणजे ब्रह्मलोकाचें द्वार आहे. कारण जो [ यः ] त्याच्या प्रश्नाला उत्तर देतो त्या उत्तर देणाऱ्याला [ तम् ] तो चंद्र पलीकडे ब्रह्मलोकांत जाण्याकरिता [ अति ] सोडून देतो [ सृजते ]. परंतु जो त्याच्या प्रश्नाला उत्तर देत नाही त्याला वृष्टिचें रूप धारण करून [ वृष्टिर्भूत्वा ] ह्या लोकांत [ इह ] वर्षतो म्हणजे टाकतो. तो ह्या लोकात [ इह ] त्याच्या त्याच्या कर्माप्रमाणे [ यथाकर्म ] आणि ज्ञानाप्रमाणे [ यथाविद्यम् ] किडा, पतंग, शकुनि, वाघ ( शार्दूल ), सिंह, मत्स्य, सर्प [ परश्वा ], पुरुष किंवा दुसरा कोणी होऊन ह्या ठिकाणीं [ एतेषु स्थानेषु ] पुनः जन्म घेतो [ प्रत्याजायते ]. त्या चंद्रलोकांत आलेल्याला चंद्र पुसतो "तूं कोण आहेस ?" त्याला पुढीलप्रमाणे उत्तर द्यावें. ॥२॥

पाठविचार—पुढील खंडांत चंद्राच्या प्रश्नाला उत्तर कोणतें द्यावें तें सांगून, तें उत्तर देणाऱ्यास चंद्र पलीकडे जाण्यास सोडून देतो [ अतिसृजते ] व तो त्यानंतर ब्रह्मलोकांस जातो असें सांगितलें आहे. अर्थात् जो उत्तर देत नाही तोच ह्या लोकीं परत येतो असा अर्थ स्पष्ट आहे. ह्यास अनुसरूनच ह्या खंडांतहि सांगितलें असलें पाहिजे म्हणून "य एनं .. ...वर्षति" ह्या वाक्यांत "एनं" यापुढे "न" हा शब्द १ ला अनुसरून आम्ही घातला आहे.

"अथापरपक्षे न प्रजनयति" ह्या पाठाऐवजी "अथापरपक्षेण प्रजनयति" असा पाठ आम्ही घेतला आहे. पूर्वपक्षांत चंद्रलोकीं जाणाऱ्या जीवांच्या प्राणांनी चंद्र वाढतो असें म्हटलें आहे. अर्थात् अपरपक्षांत ह्याच्या उलट त्याने घालवून दिलेल्या प्राणामुळेच चंद्र क्षीण होतो असा अर्थ असला पाहिजे व तो अर्थ येण्याकरिता आम्ही योजलेला पाठ जरूर आहे. कारण ज्याला तो जन्म देतो त्याला तो आपल्या लोकांतून घालवितोच.

"यः प्रत्याह" हा ३ मधील पाठ आहे. "यप्रत्याह" ह्या १ व २ मधील पाठापेक्षा तो अधिक चांगला आहे म्हणून तोच घेतला आहे.

"ब्रह्माहोंसि" हा २ मधील पाठ आहे. १ व ३ मध्ये "ब्रह्मा-धोंसि" असा पाठ आहे. तो संदर्भाशी चांगला जुळत नाही.

१ मध्ये "त इह कीटोवा" इत्यादि पाठ आहे. परंतु २ आणि ३ मध्ये "स इह कीटोवा" इत्यादि पाठ आहे तोच पाठ आम्ही घेतला आहे कारण त्यानेच योग्य अर्थ होतो.

टिप्पण—"समित्पाणिः" हातांत समिधा घेऊन जाणें हें तेव्हा गुरूला शरण जाण्याचें चिन्ह मानलें जात असे. मुंडक १।२। १२ पहा.

अध्याय १ खंड ३

विचक्षणादृतवो रेत आभृतं पंचदशात्प्रसूतात् पित्र्यवतः ।
तन्मा पुंसि कर्तर्येरयध्वं पुंसा कर्त्रा मातरिमा निषिक्तः ॥
स जायमान उपजायमानो द्वादश त्रयोदश उप मासः ।
द्वादशत्रयोदशेन पित्रा संतद्विदेहं प्रतितद्विदेहम् ॥

तन्म ऋतवोऽमर्त्य आभरध्वम् ।
तेन सत्येन तपसर्तुरस्यार्तवोऽस्मि ॥
कोऽसि त्वमस्मीति तमतिसृजते ।

स एतं देवयानं पथानमासाद्याग्निलोकमागच्छति । स वायुलोकं स वरुणलोकं स आदित्यलोकं स इंद्रलोकं स प्रजापतिलोकं स ब्रह्मलोकम् । तस्य ह वा एतस्य ब्रह्मलोकस्यारो ह्रदो मुहूर्तान्विष्टिका विरजा नदील्योवृक्षः सालज्ज सस्थानमपराजितमायतनमिंद्रप्रजापती द्वारगोपौ विभुप्रमितम् विचक्षणसद्यमितौजा पर्यंकः प्रिया च मानसी प्रतिरूपा च चाक्षुषी पुष्पाण्यादायाऽवयत्यौ चैव जगत्यंबा चांबायवी चाप्सरसोऽम्बया नद्यः समित्थं विदागच्छति । तं ब्रह्माहाभिधावति मम यशसा विरजा पारयन्नयं पारं न वाऽय जिगीष्यतीति ॥२॥

**अर्थ**—" हे ऋतूंनो [ ऋतवः ] बऱ्या वाईट जीवाची निवड करण्यात कुशल असलेल्या [ विचक्षणात् ] पितृलोकाचा स्वामी असलेल्या [ पित्र्यवत ] पधराव्यानंतर म्हणजेच पधराव्या तिथीनंतर [ पंचदशात् ] प्रसरणाऱ्या म्हणजे जीवास जन्मास घालणाऱ्या [ प्रसूतात्—कर्तरि क्त ] चद्रापासून तुम्ही धान्यात रेत गोळा केलें [ आभरध्वम ] त्या रेताला म्हणजे मला [ मा ] तुम्ही कर्त्या जो पुरुष [ पुंसि ] त्यामध्ये टाकलें [एरयध्वम् ]. त्या कर्त्या पुरुषाकडून मी [ मा—ही " अस्मत् "ची प्रथमा मानावी मराठींत " मी " हें रूप प्रथमेच आहेच ] मातेच्या ठिकाणीं टाकला गेलों ॥

जन्मलेला तो मी [ जायमान ] ज्याला बारा महिने व कधी कधी तेराहि महिने असतात अशा बापामुळे [ द्वादशत्रयोदशेन पित्रा ]

म्हणजे संवत्सरांमुळे, बारा महिने [ द्वादश मासः—द्वितीया विभक्ति "मास्" प्राची ] आणि मध्येच उत्पन्न होणाऱ्या [ उप ] तेराव्या महिन्यांतहि वाढणारा [ उपजायमानः ] होय, तें [ तत् ] मी चांगलें [ सम् ] जाणतों [ विदे ] आणि त्याच्या विरुद्धहि [ तत् प्रति ] मी जाणतों म्हणजे त्याला बाधक अशीं प्रमाणेंहि मी जाणतों. ॥

तर मग [ तत् ] हे ऋतूंनो, माझ्या [ मे ] अमरत्वाकरिता [ अमर्त्यवे ] माझें पोषण करा [ आभरध्वम् ] ( "मर्त्यु" म्हणजे दुःख व "अमर्त्यु" म्हणजे "आनंद" असा अर्थ केला तर "माझ्या आनंदाकरिता माझें पोषण करा" असा अर्थ होईल व तो अधिक चांगला आहे. मर्त्यु म्हणजेच मृत्यु व मृत्यु म्हणजे दुःख असें उपसंहार प्यारा २८ येथे दाखविलेंच आहे. )

त्या सत्य म्हणजे सत्याचें ज्ञान करून देणाऱ्या तपानें म्हणजे पश्चात्तापाने केलेल्या विचारानें म्हणजे वर "संसद्दिदे प्रतितद्दिदे" यांत निर्दिष्ट केलेल्या साधकबाधक विचारानें मी म्हणतों की "मी ऋतु आहें, मी ऋतुपासून उत्पन्न झालेला आहें." येथे चंद्र पुनः विचारतो की तूं कोण आहेस ? तेव्हा उत्तर द्यावें की "मी तूंच आहें" असें उत्तर देणाऱ्याला [ तम् ] पलीकडे जाण्यास तो सोडून देतो [ अतिसृजते ]. तेव्हा तो ह्या देवयान मार्गावर प्राप्त होऊन [आसाद्य] अग्निलोकांत जातो, तेथून तो वायुलोकास जातो, तेथून तो वरुणलोकास जातो, तेथून तो आदित्यलोकास जातो, तेथून तो इंद्रलोकास जातो, तेथून तो प्रजापतिलोकास जातो, तेथून तो ब्रह्मलोकास जातो. त्या ब्रह्मलोकांत "आर" नांवाचा तलाव [ ह्रदः ] आहे, मुहूर्त हेंच अन्विष्टिका म्हणजे विटा म्हणजेच विटांनी बांधलेला किल्ला आहे, विरजा नांवाची नदी आहे, इल्य नांवाचा वृक्ष आहे, सालज्य नांवाचें शहर [संस्थान] आहे, अपराजित नांवाचें घर [आयतन] आहे, इंद्रप्रजापति नांवाचे दोन द्वारपाळ आहेत, विभु नांवाचें प्रमित म्हणजे आगारांतील अंगण

आहे ("प्रमित" म्हणजे मोजलेलें म्हणजेच मर्यादित केलेलें अशा मूळ अर्थावरून "आवारांतील आंगण" असा अर्थ होतो), विचक्षणा नांवाची आसंदी (म्हणजेच बैठक, दिवाणखाना, सर्व लोक एकत्र मिळण्याची जागा, सभास्थान) आहे, अमितौजाः नांवाचा पलंग [पर्यंकः] आहे, मानसी नांवाची प्रिया आहे, आणि चाक्षुषी नांवाची प्रतिरूपा (?) आहे, आणि [चैव] त्या दोघी फुलें घेऊन [पुष्पाणि आदाय] त्यांची माळ करीत (गुंफत) असतात [आवयतौ]. अंबा नांवाच्या नदीसह जगती, अम्बा आणि अम्बायवी ह्या तीन अप्सरा आहेत. त्या ब्रह्मलोकाला जो हें जाणतो म्हणजे मी ऋतु आहें, आर्तव आहें, मी चंद्रच आहें हें जो जाणतो तो येतो. त्याला ब्रह्म स्वागत करण्यास सामोरा जातें [अभिधावति]; माझ्या यशानेच विरजानदी ओलांडूं शकणारा [पारयन्] तो, मी सामोरा गेलों नाही तर त्या नदीचा पार जिंकण्याची इच्छाहि करणार नाही. म्हणून, [इति] त्याला स्वागत करण्यास ब्रह्म सामोरा जातें [अभिधावति]. ॥३॥

**पाठविचारः**—"पिप्यवतः"—"पिप्यापतत्" असा पाठ १मध्ये आहे व "पित्रावतः" असा २मध्ये आहे. ३मध्ये "पिप्यवतः" असाच पाठ आहे व तोच ग्राह्य दिसतो. 'पिप्यः पितृलोकः यस्य अस्ति सः पिप्यवान्" असा विग्रह करावा. "पिप्यवान्" म्हणजे पितृलोकाचा स्वामी.

"*तन्मा*—"*स्तनमा*" *असा पाठ* १ *मध्ये* आहे. "*तन्मा*" असा पाठ २ व ३ मध्ये आहे व तोच ग्राह्य दिसतो.

"निषिक्तः"—हा १ आणि ३ मधील पाठ होय. २ मध्ये "सिषिक्तः" असा पाठ आहे. तो उघडच अग्राह्य आहे.

"प्रतितद्विदेहम्" हें वाक्यच १ मध्ये गळलें आहे. आम्ही तें २ आणि ३ मधून घेतलें आहे.

"तम"—हा २ आणि ३ मधील पाठ आहे. १ मध्ये "तव" असा पाठ आहे. त्याचा अर्थ लागत नाही म्हणून तो अग्राह्य आहे.

"आभरध्वम्"—हा ३ मधील पाठ होय. १ मध्ये "आरभध्वम्" आणि "आभरध्वम्" असे दोनहि पाठ दिले आहेत.

"त्वमस्मीति"—हा २ मधील पाठ आहे. १ मधील पाठ "त्वमसीति" असा आहे. त्याला कांही अर्थ नाही. २ मधील संपूर्ण पाठ "कोऽस्मि त्वमस्मीति" असा आहे. त्याचा अर्थ, "चंद्र विचारतो 'मी कोण आहे?' त्यास उत्तर द्यावें की 'तूं मीच होय'." हाहि अर्थ चांगला आहे. म्हणून २ मधील संपूर्ण पाठ घेण्यास हरकत नाही. ३ च मधील पाठ "कोऽसि त्वमस्मीति" असाच आहे.

"स एतं"—हा २ व ३ मधील पाठ आहे. हा १ मधील पाठ "तमेतं" ह्यापेक्षा अधिक चांगला आहे.

"देवयानं" हा २ व ३ मधील पाठ आहे. १ मधील पाठ "देवयजनं" असा आहे. येथे वर्णिलेल्या पंथाला "देवयान" असेंच इतर सर्व ठिकाणीं म्हटलें आहे म्हणून "देवयान" हाच पाठ ग्राह्य आहे.

"मुहूर्तान्विष्टिकाः"—"मुहूर्तान्वेष्टिहा" "मुहूर्तान्योष्टिहा" आणि "मुहूर्तो येष्टिहा" असे पाठ उपलब्ध आहेत. खरा पाठ व त्याचा अर्थ काय आहे हा येथे मोठाच बिकट प्रश्न आहे. "मुहूर्तान्विष्टिकाः" असा पाठ मी घेतो; त्याचा पदच्छेद आर्ष संधि मानून "मुहूर्ताः अन्विष्टिकाः" असा घ्यावा आणि अर्थ मुहूर्त ह्याच अन्विष्टिका म्हणजे विटा म्हणजे "विटांनी बांधलेला किल्ला" असा करावा. अधिक चांगली कल्पना कोणास सुचली तर ती ग्राह्य होईल.

"विचक्षणासंदी"—"विचक्षणासंधी" असा पाठ २मध्ये आहे आणि १ मध्ये "विचक्षणसंधी" असा पाठ आहे. पण पुढे पांचव्या

संडांत " विचक्षणामासंदीम् ", असे शब्द आहेत. त्यावरून खरा पाठ " विचक्षणासंदी " असाच ठरतो आणि ३ मध्ये हाच पाठ आहे.

" आवयत्यौ चैव "—" आवयतौ वै च " " आवयतौ चैव " असे पाठ १ मध्ये आहेत आणि २ व ३ मध्ये " आवयतौ वै च " असाच पाठ आहे. " आवयत्यौ " असा पाठ बेलवेलकर आणि रानडे घेतात असें त्यांच्या भाषांतरावरून दिसतें. " वे " म्हणजे विणणें, किंवा गुंफणें ह्या धातूपासून हा शब्द झाला आहे.

" जगत्यंबा चांबायवी च "—१ मध्ये पाठ " जगन्यंबा चांबायवाश्च " असा आहे. २ मध्ये " जगत्यंबाश्चांबावयवाश्च " असा पाठ आहे. ३ मध्ये " जगान्यंबा चांबायवीश्च " असा पाठ आहे. पुढे दिलेल्या परोक्षवाद विवरणाला अनुकूल असा पाठ मी घेतला आहे.

" नद्या "—" नद्यः " असाच पाठ १, २ व ३ येथे आहे. त्याने कोणताच अर्थ लागत नाही म्हणून " नद्या " असा पाठ मी घेतो.

' तमित्थंविदागच्छति—हा २ व ३ मधील पाठ आहे. १ मध्ये " तमित्थविधा गच्छंति " हा पाठ आहे. दोनहि पाठांचा अर्थ बहुतेक सारखाच आहे. पण २ मधील पाठ ग्राह्य वाटतो कारण पुढील वाक्यांत ब्रह्मलोकीं जाणाऱ्याचा एकवचनी निर्देश आहे, तसाच या वाक्यांतहि एकवचनी निर्देश असला पाहिजे.

" अभिधावति "—" अभिधावत " असा पाठ १, २ व ३ मध्ये आहे. शुद्ध पाठ " अभिधावति " असाच असला पाहिजे.

पारयन्नदीं पारं—१ मध्ये " पालयन्नदीं प्रापं " असा पाठ आहे. २ मध्ये " वायं नदीं प्रापन् " असा पाठ आहे. ३ मध्ये " वा अयं नदीं प्रापन्नत्रा अयं जरयिष्यतीति " असें संपूर्ण वाक्य आहे. तीनहि पाठांस कांहीच अर्थ नाही म्हणून मी वरील पाठ कल्पिला.

टिप्पणी—" पंचदशात् प्रसृतात् " मागील खंडांतील " अपरपक्षेण प्रजनयति " यांत जो अर्थ आहे तोच यांत आहे. " प्रसृत " यांत कर्तरि क्त आहे.

येथील देवयान पंथाचें वर्णन छांदोग्य ४।१५ व ५।१० यथील वर्णनाहून भिन्न आहे; त्यांची एकवाक्यता करण्याचा प्रयत्न व्याससूत्रें ४।३।२-३ आणि ३।१।१२-२१ यांत केलेला आहे. पण तसा प्रयत्न करण्याची गरज नाही. कारण मरणोत्तर अवस्थेविषयी उपनिषदांमध्ये मतभेद आहेत हें अगदी उघड आहे, व त्या मतभेदामुळे मरणपूर्व कर्तव्यें तीं एकमतानें सांगतात त्यांत कोणतीच हानि होत नाही. मरणोत्तर अवस्था केवळ कल्पनीयच असल्यामुळे मतभेद संभवतात.

" जिगीष्यति "—" जिगीषिष्यति " असें व्याकरणशुद्ध रूप होतें. त्याचाच आर्ष प्रयोग " जिगीष्यति " हा मानावा.

अध्याय १ खंड ४ आणि ५

तं पंचशतान्यप्सरसां प्रतिधावन्ति शतं माल्यहस्ताः शतं चूर्णहस्ताः शतं वासोहस्ताः शतं फणहस्ताः । तं ब्रह्मालंकारेणालंकुर्वंति । स ब्रह्मालंकारेणालंकृतो ब्रह्मविद्वान् ब्रह्माभिप्रैति । स आगच्छत्यारं ह्रदं तं मनसात्येति । तमृत्वा संप्रतिविदो मज्जंति । स आगच्छति मुहूर्तान्येष्टिहास्तेऽस्मादपद्रवंति । स आगच्छति विरजां नदीं तां मनसैवात्येति । तत्सुकृतदुष्कृते धूनुते तस्य प्रिया ज्ञातयः सुकृतमुपयन्त्यप्रियादुष्कृतम् । तद्यथा रथेन धावयन् रथचक्रे पर्यवेक्षत एवमहोरात्रे पर्यवेक्षते एवं सुकृतदुष्कृते सर्वाणि च द्वंद्वानि । स एष विसुकृतो विदुष्कृतो ब्रह्मविद्वान् ब्रह्मैवाभिप्रैति ॥४॥ स आगच्छतील्यं वृक्षं तं ब्रह्मगंधः प्रविशति । स आगच्छति

सालज्जं संस्थानं तं ब्रह्मरसः प्रविशति । स आगच्छत्यपराजितमायतनम् तं ब्रह्मतेजः प्रविशति । स आगच्छतींद्रप्रजापती द्वारगोपौ तावस्मादपद्रवतः । स आगच्छति विभुप्रमितं तं ब्रह्मयशः प्रविशति । स आगच्छति विचक्षणामासंदीं, सा प्रज्ञा प्रज्ञया हि विपश्यति । स आगच्छत्यमितौजसं पर्यंकं स प्राणः । तस्य भूतं भविष्यच्च पूर्वौ पादौ, श्रीश्चेराचापरौ, बृहद्रथंतरे अनूच्ये, भद्रयज्ञायज्ञीये शीर्षण्ये, ऋचश्च सामानि च प्राचीनातानानि, यजूंषि तिरश्चीनानि, सोमांशव उपस्तरणम्, उद्गीथ उपश्रीः, श्रीरुपबर्हणम् । तस्मिन् ब्रह्मास्ते । तमित्यंवित्पादेनैवाग्र आरोहति । तं ब्रह्माहकोऽसीति । तं प्रतिब्रूयात् ऋतुरस्म्यार्तवोऽस्म्याकाशात् योनेः संभूतो भार्यायै रेतः संवत्सरस्य तेजो भूतस्य भूतस्य त्वमात्माऽसि यस्त्वमसि सोऽहमस्मीति । तमाह कोऽहमस्मीति ॥५॥

**अर्थ**—त्याला पांचशें अप्सरा सामोरा येतात. त्यापैकीं शंभरांच्या हातांत माळा असतात, शंभरांच्या हातांत सुगंधचूर्ण (बुक्का) असतें, शंभरांच्या हातांत डोळ्यांत घालण्याचें अंजन असतें, शंभरांच्या अंगांत घालण्याचे कपडे असतात आणि शंभरांच्या हातांत फण म्हणजे डागिने असतात. त्या अप्सरा त्याला ह्या पांच प्रकारच्या ब्रह्माच्या अलंकारांनीं अलंकृत करतात. ह्याप्रमाणें ब्रह्माच्या अलंकारांनीं अलंकृत केलेला तो ब्रह्मवेत्ता ब्रह्माकडेच जाण्यास निघतो [ अभिप्रैति ]. तो आर नांवाच्या तलावाजवळ येतो. त्या तलावास तो मनानेच ओलांडून जातो. त्या तलावाजवळ आलेले संशयात्मे म्हणजे संशयग्रस्त लोक [ संप्रतिविदः ] बुडून जातात. ( ह्याचा अर्थ असा नाहीं की

संशयात्मे त्या तळ्यापर्यंत येतात. (ह्याचा खरा अर्थ असा की तो संशयात्मा नसतो म्हणून तो त्या तळ्यांत बुडत नाही.) तो मुहूर्तरूपी विरांनी बांधलेल्या किल्ल्याजवळ येतो तेव्हा तो मुहूर्तच ह्यापासून [अस्मात्] पळून जातात. (म्हणजे त्याला त्यानंतर काळाचें भान असत नाही असा भाव दिसतो.) नंतर तो विरजा नांवाच्या नदीजवळ येतो, आणि तिला तो मनानेंच ओलांडून जातो (म्हणजे तो वासनारहित होतो असा भाव आहे). ही नदी ओलांडल्यामुळे तो सुकृत व दुष्कृत हे दोनहि झाडून टाकतो. त्याचें सुकृत त्यावर प्रेम करणाऱ्या [प्रियाः] त्याच्या नातलगांकडे जातें आणि दुष्कृत त्यावर प्रेम न करणाऱ्या [अप्रियाः] त्याच्या नातलगांकडे जातें. ("प्रिय आणि "अप्रिय" ह्यांचे जे अर्थ येथे केले आहेत त्याचें कारण असें आहे की तो सर्वांवर सारखेंच प्रेम करतो.) (ह्याचेंच आता स्पष्टीकरण करतात.) रथांत बसवून [रथेन] मनुष्यास धावविणारा [धावयन्] रथचक्रांकडे ज्याप्रमाणे पाहतो, म्हणजे रथ चालण्यास रथाचीं दोनहि चाकें आवश्यक आहेत असें मानतो, त्याप्रमाणेच समाजाचा व्यवहार सुस्थितीत चालण्यास दिवस आणि रात्र हे दोनहि आवश्यक आहेत असें तो मानतो. ह्याप्रमाणेच सुकृत आणि दुष्कृत व प्रेम आणि द्वेष, दया आणि क्रूरता, क्षमा आणि सूड हीं व अशींच इतर द्वंद्वें ह्याकडेहि तो ह्याप्रमाणेच पाहतो, म्हणजे हे सर्व समाजसुस्थितीला आवश्यक आहेत असें तो मानतो. अर्थात् त्यांचा तो योग्य प्रसंगीं उपयोग करतो पण त्याचा उपयोग ज्या अर्थी स्वतःकरिता न करतां समाजहितार्थ करतो, वासनारहित बुद्धीने करतो त्या अर्थी त्यांचें पापपुण्य त्याला चिकत नाही. किंवा त्यापासून त्याला सुखदुःख लागत नाही आणि वासना उत्पन्न होत नाहीत. हाच तो सुकृत दुष्कृत दोनहि झाडून टाकतो ह्याचा अर्थ आहे. ह्याप्रमाणे तो सुकृतरहित व दुष्कृतरहित झालेला ब्रह्मवेत्ता ब्रह्माकडेच जातो (आम्ही केलेला हा अर्थ बरोबर

आहे याचें प्रमाण तृतीयाध्यायांतील पहिल्या खंडांतील " त्रिशीर्षाणं त्वाष्ट्रम्‌ . . . मुतं नीलं वेत्ति " हीं वाक्येंच आहेत. कारण यांतहि हेच विचार आहेत. सर्वभूतहिताकरिता केलेलीं सर्व कृत्यें चांगलींच असा भाव आहे.) ॥४॥ तो इल्यं नांवाच्या झाडाजवळ येतो तेव्हां ब्रह्म-गंधाचा त्यांत प्रवेश होतो. पुढें तो सालज्य नांवाच्या शहराजवळ येतो तेव्हां ब्रह्मरस म्हणजेच ब्रह्मानंद त्यांत प्रवेश करतो. तो अपराजित नांवाच्या घराजवळ येतो तेव्हां त्यांत ब्रह्मतेज प्रवेश करतें. तो इंद्र व प्रजापति नांवाच्या द्वारपाळाजवळ येतो, तेव्हां ते त्याच्यापासून पळून जातात. तो विभु नांवाच्या आवारांतील आंगणांत येतो तेव्हां ब्रह्मयश त्यांत प्रवेश करतें. तो विचक्षणा नांवाच्या बैठकींत येतो. विचक्षणा म्हणजे प्रशान्न होय. प्रज्ञेनेच सर्व जाणतो [ विपश्यति ]. तो अमितौजस नांवाच्या पलंगाजवळ येतो. तो पलंग म्हणजे प्राणच होय. त्या प्राणरूपी पलंगाचे भूत आणि भविष्य (म्हणजे मागें केलेल्या क्रिया व पुढें केल्या जाणाऱ्या क्रिया ) हे पूर्वेकडचे दोन पाय होत. श्री म्हणजे संपत्ति आणि इरा म्हणजेच इला म्हणजे पृथिवी हे त्याचे पश्चिमेकडील दोन पाय होत. ( इरा म्हणजे अन्न असाहि अर्थ होतो. ऐतरेयोपनिषद् १.३ येथें " अन्न " असाच अर्थ आहे. येथेंहि तो अर्थ करता येतो.) बृहत् साम आणि रथंतर साम हे त्या पलंगाचे अनूच्य म्हणजे बाजूचे दोन फाटे होत. (श्वास आणि उच्छ्वास यानाच बृहत् आणि रथंतर म्हटलें असावें. कारण बृहत् आणि रथंतर हीं साम म्हणजे गाणीं होत आणि गाणीं म्हणणें हें श्वासोच्छ्वासाचेंच कार्य आहे.) भद्रयज्ञ म्हणजे महायज्ञ म्हणजेच अन्न खाणें आणि यज्ञीय म्हणजे त्या यज्ञास मदत करणारें असें दुसरें कार्य म्हणजे पाणी पिणें हे त्याचे डोक्याकडचे व पायाकडचे फाटे होत. (" भद्रयज्ञ-यज्ञीये " असें रूप वास्तविक पाहिजे होतें. " भद्रयज्ञायज्ञीय " हें त्याचेंच छांदस रूप मानावें. विश्वमित्रासारखें हें रूप बनलें असें

-मानावें. "शीर्षण्य" ह्या शब्दाचा वास्तविक अर्थ डोक्याकडचा फाटा असाच आहे. परंतु पायाकडच्या फाटयाकडेहि डोकें ठेऊन निजतां येतेंच म्हणून पायाकडच्या फाटयासहि शीर्षण्य म्हटलें असावें किंवा येथें पाठभ्रंश झाला असेल आणि मूळ पाठ "पादशीर्षण्ये" असा असेल.) ऋचा आणि साम हे मंत्र त्या पलंगाच्या पूर्व पश्चिम दिशेतील [ प्राचीन ] दोऱ्या (नवारी) [ आतानानि] होत आणि यजुर्मंत्र हे दक्षिणोत्तर दिशेतील [ तिरश्चीनानि ] दोऱ्या (नवारी) होत. ( ऋचा, साम आणि यजुस् हे शब्द परोक्षवाद पद्धतीनें योजिले आहेत,हें उघड आहे. पण त्यांचा अर्थ काय व तो कां हें मला अजून समजलें नाही. हा पलंग म्हणजे प्राण हें जर निश्चित आहे तर ऋचा, साम, यजुस् आणि पुढील वाक्यांतील सोमांशव, उद्गीथ आणि श्री हे प्राणक्रियात्मक असले पाहिजेत आणि प्राणक्रिया अन्न पचविणें, शरीर वाढविणें आणि शरीरास आलेला थकवा नाहींसा करणें, रोगहरण करणें, कर्मेंद्रियांस आपलें आपलें काम करण्यास शक्ति देणें आणि ज्ञानेंद्रियांस आपलें आपलें काम करण्यास शक्ति देणें ह्या आहेत. ह्यांस अनुक्रमें ऋचा वगैरे अक्षरास. पण ऋचा वगैरेंचा असा अर्थ कां करावा हें मला सांगतां येत नाही. फक्त सोमांशवः आणि श्रीः ह्यांविषयी सूचना करतां येतात. त्या अशा—सोम म्हणजे चंद्र, चंद्राच्या किरणांनी ओषधि वाढतात म्हणून चंद्रास ओषधीश असेंहि नांव दिलें गेलें आहे आणि ओषधींचें कार्य रोगहरण करणें आहे म्हणून "सोमांशवः" म्हणजे रोगहरण करण्याची क्रिया असा होऊं शकतो; श्रीः म्हणजे शोभा आणि ज्ञानेंद्रियांस शक्ति देणें हीच प्राणाची मुख्य शोभा होय.) चंद्राचे किरण हें उपस्तरण गादीवरचें आंथरुण [उपस्तरण] (म्हणजेच चादर) होय, उद्गीथ हीच उश्री म्हणजे गादी होय आणि श्री हेंच उपबर्हण म्हणजे डोक्याखाली टेंकण्याची उशी होय. अशा या पलंगावर [ तस्मिन् ] ब्रह्म राहतें [आस्ते]. हें जाणणारा, त्या पलंगावर प्रथमतः

[अग्रे] पायांनी चढतो.-त्याला ब्रह्म म्हणतें, "तूं कोण आहेस?" तेव्हा त्याला उत्तर द्यावें की "मी ऋतु आहें, मी आर्तव आहें, आकाशरूपी, उत्पत्तिस्थानापासून [योनेः] उत्पन्न झालेला आहें. भार्येकरिता म्हणजेच भार्येंत टाकलेलें रेत मी आहें. मी संवत्सराचें तेज म्हणजे सार आहें. तूं प्रत्येक जीवाचा [भूतस्य भूतस्य] आत्मा आहेस. अर्थात् माझाहि आत्मा आहेस. जो तूं आहेस तोच मी आहें." (तूं अनाविर्भूत ब्रह्म आहेस आणि मी जीव आविर्भूत ब्रह्म आहे आणि हा अविर्भाव, संवत्सराच्या ऋतूंमुळे रेत उत्पन्न झाल्याने आणि रेताची शरीररूपी परिणति झाल्याने झाला हा भाव आहे.) त्याला ब्रह्म म्हणतें, "मी कोण आहें?". ॥५॥

**पाठविचारः**—"फणहस्ता"—१मध्ये "फणहस्ताः," "पला-हस्ताः" "कणाहस्ताः" असे पाठ दिले आहेत २ मध्ये "कणाहस्ता" असा पाठ आहे. ३ मध्ये "फन्हस्ताः" आणि "फणहस्ताः" असे पाठ दिले आहेत. "फल्हस्ता" असा पाठ बेलवेलकर आणि रानडे ह्यांनी घेतला असें दिसतें. आम्ही ब्रह्मयोगीनें घेतल्याप्रमाणे "फणहस्ता" असा पाठ घेऊन "फण" म्हणजे 'दागिने' असा अर्थ घेतला आहे व तोच मागच्या व पुढच्या वाक्यार्थी जुळतो.

"मुहूर्तान्विष्टिकाः"—१ मध्ये "मुहूर्तान्विहष्टिहाः" असा पाठ आहे. २ व ३ मध्ये "मुहूर्तान्येष्टिहा" असा पाठ आहे. आम्ही तिसऱ्या खंडातील आम्ही घेतलेल्या पाठास अनुरूप असा पाठ येथे घेतला आहे.

"सुकृतदुष्कृते सर्वाणि च द्वंद्वानि" हा २ मधील पाठ आहे. १ मध्ये असें सांगितलें आहे की चार हस्तलिखितांत असाच पाठ आहे पण एकांत "सुकृतदुष्कृते धुनुते सर्वाणि च द्वंद्वानि" असा पाठ आहे. ब्रह्मयोगीच्या टीकेवरूनहि त्याने हा पाठ घेतला नव्हता असें दिसतें.

१ "ब्रह्मरसः प्रविशति"—हा ३ मधील पाठ आहे. १ मध्ये "ब्रह्म से प्रविशति" असा पाठ आहे. २ मध्येहि असाच पाठ आहे. हा पाठ निरर्थक आहे. "गंधा" नंतर "रसा"ची कल्पना येते म्हणून आम्ही "ब्रह्मरसः" असा पाठ घेतला.

"पर्यंकं स प्राणः" हा २ मधील पाठ होय. १ मध्ये "पर्यंकं तं स प्राणः" असा पाठ आहे. अशाहि पाठ घेण्यास हरकत नाही. त्यांत "तं" हें "पर्यंकम्" याचें विशेषण मानावें एवढेंच.

"शीर्पण्ये" हा ३ मधील पाठ आहे. "शीर्षण्यम्" असाच पाठ १ व २ मध्ये आहे. पण पलंगास एकूण पाटे चार असतात. त्यांपैकी दोन मागील वाक्यांत वर्णिले आहेत. बाकीचे दोन ह्याच वाक्यांत वर्णिले असले पाहिजेत. म्हणून "शीर्पण्ये" असा पाठ घ्यावा, किंवा "पादशीर्पण्ये" असा पाठ घ्यावा.

"प्राचीनातानानि"—हा ३ मधील पाठ आहे. १ मध्ये "प्राचीनागानम्" असा पाठ आहे. २ मध्ये "प्राचीनातानं" असा पाठ आहे. पाट्यानंतर पलंगाच्या उभ्या व आडव्या दोन्यांचें वर्णन पाहिजे, त्याना "आगाना" पेक्षा "आतान" हाच शब्द अधिक योग्य आहे. आणि त्यावें पुढील वाक्यांत आहे त्याप्रमाणें अनेकवचन असलें पाहिजे हेंहि उघड आहे.

"भार्यायै रेतः"—हे शब्द २ मध्ये आहेत. १ मध्ये त्या ऐवजीं "हाव एतत्" असा पाठ आहे. ३ मध्ये "भाया" एवढाच पाठ आहे. २ मधील पाठच मागील तिसऱ्या खंडातील अर्थाशीं अनुरूप असा आहे म्हणून ग्राह्य आहे.

१०१ टिप्पणः—सुकृतदुष्कृत टाकून देण्याविषयी बादरायण सूत्रांत अधिकरणें आहेत (४।१।१३–१९ पहा). तीं व त्यावरील आमचें विवरण पहा.

अध्याय १ खंड ६

सत्यमिति ब्रूयात् । किं तत्सत्यमिति । यदन्यद्देवेभ्यश्च प्राणेभ्यश्च तत् सद्, यद्देवाश्च प्राणाश्च तद्यं, तदेतया वाचाऽभिव्याह्रियते सत्यमिति । एतावदिदं सर्वं, इदं सर्वमसीत्येवैनं तदाह । तमाह केन पौंस्नानि नामान्याप्नोतीति । प्राणेनेति ब्रूयात् । केन स्त्रीनामानीति । वाचेति । केन नपुंसकनामानीति । मनसेति । केन गंधानिति । प्राणेनेति ब्रूयात् । केन रूपाणीति । चक्षुषेति । केन शब्दानिति । श्रोत्रेणेति । केनान्नरसानिति । जिह्वयेति । केन कर्माणीति । हस्ताभ्यामिति । केन सुखदुःखे इति शरीरेणेति । केनानंदं रतिं प्रजातिमिति । उपस्थेनेति । केनेत्या इति । पादाभ्यामिति । केन धियो विज्ञातव्यं कामानिति प्रज्ञयेति प्रब्रूयात् । तमाह यो वै खलु मे ह्यसावयंते लोक इति । सा या ब्रह्मणि चितिर्या व्यष्टिरतां चितिं जयति तां व्यष्टिं व्यश्नुते य एवं वेद य एवं वेद ॥६॥ इति प्रथमोऽध्यायः ॥

अर्थः—" तूं सत्य आहेस " असें त्या ब्रह्मास सांगावें. " तें सत्य काय आहे " असें ब्रह्म पुनः विचारतें. त्यास तें हा उत्तर असेंच द्यावें की [इत्येवैनं तदाह] "प्राणांहून आणि इंद्रियांहून [देवेभ्यः] म्हणजे इंद्रियांची ज्ञानशक्ति व क्रियाशक्ति ह्यांहून जें भिन्न [अन्यत्] आहे तें सत् होय. आणि जें प्राण आणि इंद्रियशक्ति तें 'यम्' होय. म्हणून तें दोनहि मिळून ह्या वाणीनें " सत्य " असें म्हटलें जातें. हें जगत् एवढेंच [एतावत्] आहे. हें सर्व तूंच आहेस. " त्याला ब्रह्म पुनः विचारतें (तमाह) " तूं ब्रह्म पुल्लिंगी [पौंस्नानि] नामें कशान

मिळवितें" (पुल्लिंगी नामे ब्रह्माबद्दल कां योजतात ? असा ह्या प्रश्नाचा भाव आहे) त्यास उत्तर द्यावें की "प्राणानें" म्हणजे "ब्रह्माचाच आविर्भाव असलेला जो प्राण, त्याचें "प्राण" हें नांव हें पुल्लिंगी आहे, म्हणून ब्रह्माला पुल्लिंगी नामें लावतात. पुनः ब्रह्म विचारतें "ब्रह्माला स्त्रीलिंगी नामें कां लावतात?" ह्यावर उत्तर द्यावें की "वाचेनें म्हणजे ब्रह्माचा आविष्कार जी वाचा तिचें वाचा हें नांव स्त्रीलिंगी आहे म्हणून ब्रह्माला स्त्रीलिंगी नावें लावतात." ब्रह्म पुनः विचारतें, "ब्रह्माला नपुंसकलिंगी नावें कां लावतात?". त्यावर उत्तर द्यावें की, "मनानें म्हणजे ब्रह्माचाच आविष्कार जें "मन" त्याचें "मनस्" हें नांव नपुंसकलिंगी आहे म्हणून ब्रह्माला नपुंसकलिंगी नावें लावतात." ब्रह्म पुनः विचारतें "ब्रह्म गंध कशानें अनुभवतें?" त्यावर उत्तर द्यावें की "प्राणेंद्रियानें." "रूपं कशानें पाहतें?" त्यास उत्तर द्यावें की "डोळ्यानें." "शब्द कशानें ऐकतें?" ह्या प्रश्नास उत्तर द्यावें की "कानानें." "अन्नरसाची चव कशानें घेतें?" त्यास उत्तर द्यावें की "जिभेनें." "कर्मे कशानें करतें?" त्यास उत्तर द्यावें की "हातांनीं." "सुखदुःखें कशानें अनुभवतें?" ह्या प्रश्नास उत्तर द्यावें की "शरीरानें." "मैथुनाचा काम [आनंद] मैथुन [रति] आणि संतति [प्रजाति] कशानें मिळवितें?" ह्यास उत्तर द्यावें की "उपस्थानें." "गति [इत्या] कशानें मिळवितें?" त्यास उत्तर द्यावें की "पायांनीं." "बुद्धीनें [धियः] जाणावयाची गोष्ट [विज्ञातव्यम्] कशानें जाणतो आणि मिळवावयाची प्राप्तव्यें [कामान्] कशानें ठरवितो?" ह्यास उत्तर द्यावें की, "प्रज्ञेनें म्हणजे बुद्धीनें." ह्यानंतर ब्रह्म त्याला म्हणतें, "जो हा माझा लोक आहे तो सर्व तुझाच आहे म्हणजे माझ्या सर्व लोकाचा तूं उपभोग घे." हें जो जाणतो तो ब्रह्माच्या ठिकाणीं जो "एकत्वपणा" [चितिः] आहे त्याला आणि ब्रह्माच्या ठिकाणीं जो "वेगळेपणा" [व्यष्टिः] आहे त्यालाहि जिंकतो म्हणजे, त्या दोहोंचाहि उपभोग घेतो. म्हणजेच द्वैतावस्थेंत राहून अद्वैताचा आनंद अनुभवतो. हाच ब्रह्मलोक

होय आणि हाच मनुष्याने प्राप्त करून घ्यावा हा ह्या अध्यायाचा भावार्थ आहे. ॥६॥

**पाठविचार—** "तमाह यो वै"—हा बेल्वेल्कर आणि रानडे ह्यांनी सुचविलेला पाठ आहे. १ मध्ये "तमाहापैव" असा पाठ आहे आणि २ व ३ मध्ये "तमाहापो वै" असा पाठ आहे. ह्या दोन्हि पाठांस कांही अर्थ नाही. "तमाहाप्वो वै" असाहि पाठ घेतां येईल आणि त्याने संपूर्ण वाक्याचा अर्थ "हा माझा लोक तूं मिळविलास, आता तो तुझाच लोक झाला, असें ब्रह्म त्याला म्हणतें" असा करितां येतो. हा अर्थहि चांगला आहे.

**टिप्पणी—** ह्या अध्यायांत परोक्षवाद आहे हें उघड आहे. तो उलगडला पाहिजे. तो उलगडण्याचें साधनहि पांचव्या खंडांत आहे. विचक्षणा नावाची आसंदी (बैठक, दिवाणखाना, सर्व लोक एकत्र जमण्याची जागा) ही प्रज्ञा आणि अमितौजाः नावाचा पर्यंक (पलंग) हा प्राण होय असें तेथे स्पष्ट म्हटलें आहे. ब्रह्म हें प्राणरूपी पर्यंकावर प्रज्ञारूपी आसंदींत निजलें आहे असें ब्रह्मलोकाचें तेथे (पांचव्या खंडात) वर्णन आहे. ह्यावरून देवयानाने प्राप्त होणारा ब्रह्मलोक हें स्थान नसून आत्म्याची विशिष्ट प्रकारची अवस्था आहे हें उघड आहे. ही अवस्था कोणती ? "जीव" व "ब्रह्म" एकच अर्थात् सर्व जीव एकच अशी रात्री [ प्रत्यय ] जींत असते अशी जीवाची अवस्था हाच ब्रह्मलोक असें "यस्त्वमसि सोऽहमस्मि" (अध्याय १ खंड ५) ह्यावरून स्पष्ट आहे. बृहदारण्यकोपनिषद् ४।३।३३ येथील "एष ब्रह्मलोकः सम्राट्" ह्या वाक्यांत तरी हेंच सांगितलें आहे. कारण मी ब्रह्म आहें असें म्हणणारा मनुष्य निष्काम होतोच. अशा प्रत्ययाची अवस्था जागृतींतच असते. म्हणून ब्रह्मलोक म्हणजे ब्रह्मज्ञाची म्हणजे अद्वैतज्ञाची जागृतीच होय असें ठरतें. ह्यावरून चंद्रलोक म्हणजे सुषुप्ति हें सहजच ठरतें कारण ब्रह्मज्ञ व ब्रह्मानभिज्ञ हे दोघेहि दररोज सुषुप्तींत म्हणजेच

चंद्रलोकांत जातात व हेंच "ये वै के चास्माल्लोकात्प्रयांति चंद्रमसमेव ते सर्वे गच्छंति" (अ. १, खंड २) ह्या वाक्यांत सांगितलें आहे. येथील "अस्माल्लोकात्" म्हणजे जागृतींतून हेंहि आता उघड आहे. असें ह्या परोक्षवादाचें विवरण आहे. छांदोग्योपनिषदांत (८।३) "अहरहर्वा एवंवित्स्वर्गं लोकमेति" असें म्हटलें आहे, त्यानेंहि या वरील सिद्धांतास पुष्टिच येते; कारण तेथेहि स्वर्ग म्हणजे ब्रह्मज्ञाची जागृति असाच अर्थ आहे (तेथील आमचें विवरण पहा). ह्या येथील परोक्षवादाचें दुसरेंहि विवरण होऊं शकतें. तें असें की "मृत्यूनंतर सर्वच जीव निद्रेसारख्या स्थितीचा अनुभव घेतात व नंतर अज्ञ इहलोकांत जन्मतात म्हणजे अज्ञच जन्मतात आणि ब्रह्मज्ञ ब्रह्मलोकांत जन्मतात म्हणजे ब्रह्मज्ञच जन्मतात." म्हणजे ह्या परोक्षवादाचें एक विवरण रात्रि व दिवस म्हणजे निद्रा व जागृति ह्यांचा फेरा असें आहे व दुसरें मृत्यु व जन्म ह्यांचा फेरा असें आहे. ब्रह्मज्ञहि छां० ३।१४ ह्यांत सांगितलेल्या शांडिल्यमताप्रमाणें मृत्यूनंतर जन्मतात. पण ब्रह्मज्ञच जन्मतात म्हणून ते ब्रह्मलोकांत जातात असा ह्या अध्यायांतील परोक्षवादाच्या दुसऱ्या विवरणाचा अर्थ आहे. जे ब्रह्मज्ञ नसतात ते मृत्यूनंतर कीट, पतंग, किंवा पुरुष म्हणजे पशु किंवा मनुष्य होतात असें अ. १ खं. २ ह्यांत सांगितलेंच आहे.

ह्या परोक्षवादांतील सर्वच शब्दांचें विवरण मला सुचलें नाही. पण त्यांचें ज्यांचें सुचलें तें दाखविलें. चतुर्थ खंडांतील पांच प्रकारच्या अप्सरा व त्यांच्या जवळील माळा वगैरे पदार्थ म्हणजे पांच ज्ञानेंद्रियें व त्यांमार्फत मिळणारे उपभोग्य विषय होत हें उघड आहे. प्रज्ञा म्हणजे जागृतींतील चैतन्य हें खंड ६ च्या मधील "केन धियो ज्ञातव्यमित्यादि" वाक्यांवरून स्पष्ट आहे, ह्या स्थितींतच पांच प्रकारच्या विषयांचें ज्ञान, बुद्धीने प्राप्त होणारें ज्ञान आणि आनंदानुभव हे सर्व येऊन एकत्र मिळतात म्हणून तिलाच आसंदी म्हणणें योग्य आहे.

जगती, अम्भा व अम्भावयवी ह्या तीन अप्सरा म्हणजे अनुक्रमें निद्रा, जागृति व स्वप्न ह्याच असाव्यात "अम्भाया अवयवा इव अवयवा यस्या सा अंबावयवी" असा विग्रह होतो आणि ह्यावरून हें दिसतें इतर शब्दांचें विवरण मला करता आलें नाही तें पुढील शोधकांनी करावें

## कौषीतक्युपनिषद् अध्याय २ रा

अध्याय २ खंड १

प्राणो ब्रह्मेति ह स्माह कौषीतकी । तस्य ह वा एतस्य प्राणस्य ब्रह्मणो मनोदूतवाक्परिवेष्ट्रीचक्षुर्गोप्तृ श्रोत्र संश्रावयितृ । तस्मै वा एतस्मै प्राणाय ब्रह्मण एता सर्वा देवता अयाचमानाय बलिं हरंति । तथो एवास्मै सर्वाणि भूतान्ययाचमानायैव बलिं हरंति । य एवं वेद तस्योपनिषन्न याचेदिति तद्यथा ग्रामं भिक्षित्वाऽलब्ध्वोपविशेन्नाहमतो दत्तमश्नीयामिति । य एवैनं पुरस्तात् प्रत्याचक्षीरंस्त एवैनमुपमंत्रयते ददाम त इति । एष धर्मोऽयाचतो भवत्यन्यतरास्त्वेवैनमुपमंत्रयते ददाम त इति ।। प्राणो ब्रह्मेति ह स्माह पैंग्य । तस्य वा एतस्य प्राणस्य ब्रह्मणो वाक्परस्ताच्चक्षुरारुंधे, चक्षु परस्ताच्छ्रोत्रमारुंधे, श्रोत्र परस्तान्मन आरुंधे, मन परस्तात्प्राण आरुंधे । तस्मै वा एतस्मै प्राणाय ब्रह्मण एता सर्वा देवता अयाचमानाय बलिं हरंति तथो एवास्मै सर्वाणि भूतान्ययाचमानाय बलिं हरंति । य एवं वेद तस्योपनिषद् न याचेदिति तद्यथा ग्रामं भिक्षित्वाऽलब्ध्वोपविशेन्नाहमतो दत्तमश्नीयामिति । य

एवैनं पुरस्तात्प्रत्याचक्षीरन्त एवैनमुपमंत्रयंते ददाम त इति एष धर्मोऽयाचतो भवत्यन्यतरांस्त्वेवैनम् उपमंत्रयंते ददाम त इति ॥१॥

अर्थ—कौषीतकीने असें सांगितलें आहे की, प्राण हाच ब्रह्म आहे, त्या ह्या ब्रह्म असलेल्या प्राणाचा मन दूत आहे, वाणी गृहकृत्य करणारी आहे [ परिवेष्ट्री ], डोळे रक्षण करणारे आहेत आणि कान माहिती देणारे [ संश्रावयितृ ] आहेत. त्या ह्या ब्रह्म असलेल्या प्राणाला या सर्व देवता (म्हणजे इंद्रियें) तो कांही मागत नसला तरी बलि देतात. त्याप्रमाणेच मागील अध्यायांत सांगितल्याप्रमाणे जो ब्रह्म लोकांत गेलेला असेल त्याला [ अस्मै ] सर्व भूतें तो मागत नसला तरी [ अयाचमानाय ] बलि देतात ( कारण तो सर्वभूतांचा प्राणच असतो ), हें जो जाणतो त्यानें पाळावयाचा नियम किंवा त्याला केलेला उपदेश [ उपनिषद् ] असा आहे की "त्यानें कोणास कांही मागूं नये." ज्याप्रमाणे [ यथा ] एखादा मनुष्य, गावांत भिक्षा मागतां मागतां [ भिक्षित्वा ] कांही न मिळाल्यामुळे [ अलब्ध्वा ] 'मला आतां कोणी कांही दिलें तरी मी तें खाणार नाही' असें म्हणून [ इति ] एका ठिकाणीं बसून राहतो, तेव्हा, ज्यांनी पूर्वी त्याला आम्ही तुला भिक्षा देत नाही असें सांगितलें होतें [ प्रत्याचक्षीरन् ] तेच आम्ही तुला देतों असें म्हणतात, त्याप्रमाणेच तें घडतें [ तत् ] म्हणजे न मागणाऱ्या ब्रह्मलोकस्थाला इतर मनुष्य बलि आणून देतात. न मागणाऱ्याला धर्म म्हणजे धर्मफल मिळतें की दुसरे त्याला "आम्ही तुला देतों" असें म्हणतात. पैंग्यानें असें सांगितलें आहे की "प्राण हाच ब्रह्म आहे." त्या ह्या ब्रह्म असलेल्या प्राणाच्या वाणीला डोळा पलीकडे [ परस्तात् ] धरून ठेवतो [ आरुंधे ], डोळ्याला कान पलीकडे धरून ठेवतो, कानाला पलीकडे मन धरून ठेवतें आणि मनाला पलीकडे प्राण धरून ठेवतो म्हणजे प्राणामुळेच मन आपलें

काम करूं शकतें, मनामुळेच श्रोत्र आपलें आपलें काम करूं शकतें. म्हणजे ऐकूं शकतें, कानाने ऐकल्यावरच डोळ्याने आवाज कोठून येतो तें मनुष्य पाहतो आणि डोळ्याने पाहिल्यानंतरच पाहिलेल्या वस्तूविषयी बोलतो म्हणजे प्राणामुळेच हीं सर्व इंद्रियें काम करतात ( हा भाव आहे ). म्हणूनच हीं सर्व इंद्रियें [ देवताः ] ब्रह्म असलेल्या त्या प्राणाला तो कांहीं मागत नाहीं तरी बलि देतात. (पुढील वाक्यांचा अर्थ मागल्याप्रमाणेच करावा) ॥१॥

पाठविचारः—"दूतम् वाक्परिवेष्ट्री चक्षुर्गोप्तृ"—१ मध्ये पाठ "भूतं वाक्यं परिवेष्टृ चक्षुः" असा आहे. २ व ३ मध्ये "दूतं वाक्परिवेष्ट्री चक्षुर्गोप्तृ" असा पाठ आहे. हाच ग्राह्य आहे, कारण ह्याचाच अर्थ होऊं शकतो. "दूतम्" हें पद नपुंसकलिंगी आहे हीच थोडी अडचण आहे, पण "मनम्" हें पद नपुंसकलिंगी आहे म्हणून "दूत" हें पदहि नपुंसकलिंगी केलें असें म्हणतां येतें.

"अयाचतः" १ मध्ये "अयाचितो" आणि "अयाचतो" असे दोनहि पाठ दिले आहेत. २ व ३ च मध्ये "आयाचतो" असाच पाठ आहे.

"अन्यतराः"—"अन्यतरः" असाच पाठ १।२ मध्ये आहे. तो व्याकरणदृष्टया चूक आहे म्हणून "अन्यतराः" असा पाठ मी घेतला आहे. "अन्यतरे" असा पाठ पाहिजे काय ? "अन्यतः" असा पाठ ३ मध्ये आहे, तो अग्राह्य आहे हें उघडच आहे.

टिप्पण—"वाक् परस्ताच्चक्षुररुंधे"—येथे "वाक्" हा शब्द प्रथमांत आहे तरी त्याचा द्वितीयांतासारखा अर्थ करावा लागतो. कारण "मनः परस्तात्प्राण आरुंधे" ह्यांत मागाहून आलेला "प्राण" प्रथमांत आहे तो कर्ताच मानावा लागतो. व "मनः" हें प्रथमतः आलें तें कर्मच मानावें लागतें. त्याप्रमाणे "वाक् परस्ताच्चक्षुररुंधे"

ह्यांतहि मागाहून आलेला "चक्षुः" हा कर्ता व पहिल्याने आलेला शब्द "वाक्" हें कर्म मानलें पाहिजे.

या खंडांत प्राणच ब्रह्म आहे असें म्हटलें आहे. त्यानें कारण उघड आहे. तें असें. प्राण असेल तरच जीवात्म्याचे व्यापार म्हणजे जागृतींतील चैतन्याचे व्यापार चालूं शकतात. ते व्यापार चालतील तरच जीवात्म्याचे व्यापार म्हणजे जागृतींतील चैतन्याचे व्यापार चालूं शकतात. ते व्यापार चालतील तरच ब्रह्माचें ज्ञान व ब्रह्मसुखाचा अनुभव येईल. ह्याच कारणामुळे पहिल्या अध्यायांत ब्रह्म प्राणरूपी पर्यंकावर प्रज्ञारूपी आसंदींत निजलें आहे असें म्हटलें आहे. अर्थात् ज्याला ब्रह्मोपासना करावयाची आहे त्याने प्रथम प्राणोपासना केली पाहिजे. प्राणोपासनेकरिता द्रव्य आणि इतर पुष्कळ साधनें पाहिजेत तीं कशीं मिळवावीं ! तीं भीक मागून मिळवूं नयेत असें या खंडांत सांगितलें आहे. न मागतां कोणी देतील तर घ्यावींत किंवा स्वतःच्या श्रमानें मिळवावीं असा भाव दिसतो. जो दुसऱ्याकरिता झटेल त्याला दुसरेहि न मागतांच देतील असाहि भाव आहेच.

पुढील खंडांत द्रव्य मिळविणें वगैरे करितां मानसिक क्रियेचें म्हणजे दैविक उपाय सांगितलें आहेत.

अध्याय २ खंड २

अथात एकधनावरोधनम् । यदेकधनमभिध्यायात् पौर्णिमास्यां वाऽमावास्यां वा शुद्धपक्षे वा पुण्ये नक्षत्रेऽग्निमुपसमाधाय परिसमूह्य, परिस्तीर्य, पर्युक्ष्योत्पूय दक्षिणं जान्वाचाच्य, स्रुवेण वा चमसेन वा कंसेन वैता आज्याहुतीर्जुहोति—वाङ्नाम देवताऽवरोधिनी सा मेऽमुष्मादिदमवरुंधां तस्यै स्वाहा, प्राणो नाम देवताऽवरोधिनी सा मेऽमुष्मादिदमवरुंधाम् तस्यै स्वाहा, श्रोत्रं नाम देवताऽवरोधिनी

सा मेऽमुष्मादिदमवरुधाम् तस्य स्वाहा मनो नाम देवता-ऽवरोधिनी सा मेऽमुष्मादिदमवरधाम् तस्यै स्वाहा प्रज्ञा नाम देवताऽवरोधिनी सा मेऽमुष्मादिदमवरुधाम तस्यै स्वाहेति । अथ धूमगंधम् **प्रजिघ्रायाज्यलेपेनाङ्गान्यनुविमृज्य वाचयमोऽभिप्रव्रज्यार्थं** ब्रूयात् दूतं वा प्रहिणुयाल्लभते हैव ॥

**अर्थ**—आता एक म्हणजे पुष्कळ धन मिळविण्याचा उपाय सांगतों जर एक धन मिळविण्याची इच्छा असेल तर, पौर्णिमेस, किंवा अमावास्येस, किंवा शुक्लपक्षांत पुण्य नक्षत्रीं अग्नीचें आधान करून [ उपसमाधाय ] परिसमूहन, परिस्तरण व पर्युक्षण करून आणि घृत संस्कृत करून [ उत्पूय ] आणि उजवा [ दक्षिण ] गुडघा जमिनीवर टेकून [ दक्षिण जानु आचाच्य ] स्रुव्याने, चमचाने किंवा कसाने म्हणजे प्याल्याने पुढे सांगितलेल्या तुपाच्या आहुतींचें हवन करावें—"वाक्" नावाची देवता धन मिळवून देणारी [ अवरोधिनी ] आहे ती मला अमक्या पुरुषापासून [ अमुष्मात्—ह्या ठिकाणी त्या पुरुषाचें नाव घ्यावें ] हें इतकें धन [ इदम्–किती धन पाहिजे तें येथे म्हणावें ] मिळवून देवो [ अवरुधाम्–हें "अवरुद्धाम्" ह्याचें आर्ष रूप आहे ] तिला ही आहुति अर्पण करतो [ स्वाहा ] "प्राण" नावाची देवता धन मिळवून देणारी आहे ती मला अमक्या पुरुषापासून हें इतकें धन मिळवून देवो, तिलाहि आहुति अर्पण करतो "चक्षु" नावाची देवता धन मिळवून देणारी आहे, ती मला अमुक्या पुरुषापासून हें इतकें धन मिळवून देवो तिलाहि आहुति अर्पण करतो ह्याप्रमाणेच "श्रोत्र" "मन" आणि "प्रज्ञा" ह्या देवतांनाहि आहुति द्याव्यात. नंतर त्या आहुतींच्या धुराच्या गंधाचा वास पुष्कळदा घेऊन, [ प्रजिघ्राय ] व तुपाचा लेप अंगास लावून मुकाट्याने [ वाचयम ] त्या पुरुषाकडे जाऊन [ अभिप्रव्रज्य ] आपलें कार्य [ अर्थ ] म्हणजे धन कशाकरिता पाहिजे व किती पाहिजे तें त्यास सांगावें किंवा दूत

पाठवून त्याकडून तें सांगवावें म्हणजे ते तितकें धन मिळतेंच. ( धन चांगल्या कार्याकरिता पाहिजे असेल व धन मिळविण्याची इच्छा करणाराहि चांगला म्हणजे अद्वैतबुद्धि असेल तरच हें साधेल हा अर्थ उघड आहे आणि हा अर्थ येथे गर्भितहि आहे. कारण ह्या द्वितीय अध्यायांतील सर्व उपाय पहिल्या अध्यायांत सांगितल्याप्रमाणे ज्याला ब्रह्मलोक प्राप्ति झाली असेल त्याकरिता सांगितले आहेत. ) ॥२॥

**पाठविचार**—" उत्पूर्वदक्षिणं " हा ३ मधील पाठ आहे. " पूर्वदक्षिणं " असा पाठ १ व २ मध्ये आहे त्यापेक्षा ३ मधील पाठ चांगला दिसतो.

"जान्वावाच्य"—हा १ मधील पाठ आहे. तेथेच "जान्ववाच्य" "जान्याच्य" असेहि दुसरे पाठ आहेत. २ व ३ मध्ये "जान्वाच्य" असा पाठ आहे. "अव" उपसर्ग ज्यांत आहे तो पाठ चांगला.

" अवरुंधाम् "—हा २ व ३ मधील आहे. १ मध्ये "अवरुंधा" असा पाठ आहे. दोनहि पाठ व्याकरण दृष्ट्या अशुद्ध आहेत. व्याकरण-शुद्ध पाठ " अवरुंद्धाम् " असा पाहिजे. " अवरुंधाम् " असा पाठ घेऊन तो आर्ष प्रयोग समजावा.

" प्रजिघ्राय "—१ व २ मध्ये " प्रजिधाय " असा पाठ आहे. व्याकरणशुद्ध पाठ " आघ्राय " किंवा " प्रघ्राय " असा होईल, किंवा समंध्र प्रत्ययानंतर ल्यप् केल्यास " प्रजेघ्राय्य " किंवा प्रजाघ्राय असा होईल. " प्रजिघ्राय " असा पाठ घेऊन तो आर्ष प्रयोग मानावा.

" वाचंयमः "—हा २ व ३ मधील पाठ आहे. १ मध्ये " वाचंयतः ", " वाचायमः " आणि " वाचंयमः " असे पाठ दिले आहेत. शुद्धपाठ " वाचंयमः " असाच आहे.

" अभिप्रव्रज्य "—हा ३ मधील पाठ होय. " अभिप्रवृज्य " असा पाठ १ व २ मध्ये आहे. " व्रज् " धातूचेंच येथे रूप पाहिजे व तें " अभिप्रव्रज्य " असेंच होतें.

"लभते हैव"—हा २ व ३ मधील पाठ आहे. १ मध्ये "लभेतेहैव", असा पाठ आहे त्यात "इह" शब्द आहे. तो निरर्थक आहे म्हणून त्याचा त्याग केला.

टिप्पण—"एक"—"एक" ह्याचा "मुख्य" असा अर्थ आहे. "मुख्य" असण्याकरिता तें धन पुष्कळ असलेंच पाहिजे म्हणून "एक" म्हणजे "पुष्कळ" असा मी अर्थ केला आहे.

अध्याय २ खंड ३

अथातो दैवस्मरः । यस्य प्रियो बुभूषेद् यस्या वा येषां वा यासां वैतेषाम् एतस्मिन् पर्वणि अग्निमुपसमाधायै-तयैवावृता आज्याहुतीर्जुहोति—वाचं ते मयि जुहोमि असौ स्वाहा, प्राणं ते मयि जुहोमि असौ स्वाहा, चक्षुस्ते मयि जुहोम्यसौ स्वाहा, श्रोत्रं ते मयि जुहोम्यसौ स्वाहा, मनस्ते मयि जुहोम्यसौ स्वाहा, प्रज्ञानं ते मयि जुहोम्यसौ स्वाहेति। अथ धूमगंधं प्रजिघ्रायाज्यलेपेनाङ्गान्यनुविमृज्य वाचंयमोऽभिप्रव्रज्य संस्पर्शम् जिगमिषेत् अपि वाताद्वा संभाषमाण-स्तिष्ठेत् प्रियो हैव भवति स्मरंति हैवास्य ॥३॥

**अर्थ**—आता दुसऱ्याला आपलें स्मरण ज्याने राहील असा दैवी उपाय सांगतों. ज्याचा, जिचा किंवा ज्या स्त्रियांचा किंवा पुरुषांचा प्रिय होण्याची इच्छा असेल [बुभूषेत्], त्यांच्या करिता म्हणजे त्यांना उद्देशून [एतेषाम्] ह्याच म्हणजे मागील खंडात सांगितलेल्या पर्वावर म्हणजे मागील सुमुहूर्तावर अग्नीचें आधान करून ह्याच म्हणजे मागील खंडात सांगितलेल्या रीतीने किंवा क्रमाने [आवृता] तुपाच्या आहुतींचें हवन करावें.—तुझी (येथे ज्याचा प्रिय व्हावयाचें आहे त्याचें नाव घ्यावें) वाणी हा मी (येथे स्वतःचें नाव घ्यावें) [असौ]

त्यांच्यामध्ये [मयि] हवन करतों असें म्हणून आहुति टाकावी [स्वाहा]. अशाच आहुति प्राण, चक्षुः, श्रोत्र, मनस्, आणि प्रज्ञानें ह्यांच्याकरिता टाकाव्या. नंतर त्या आहुतींच्या धुराचा गंध पुष्कळदा घेऊन आणि अंगास तुपाचा लेप लावून मुकाट्याने अभीष्ट मनुष्याकडे जाऊन त्यास स्पर्श करण्याची इच्छा करावी म्हणजे प्रयत्न करावा किंवा त्याच्याशीं बोलत अशा ठिकाणीं उभें रहावें कीं वारा आपल्या आंगावरून त्याच्या आंगावर जाईल [वातात्]. ह्याने तो अभीष्ट मनुष्याचा प्रिय होतोच, तें अभीष्ट मनुष्य त्याची आठवण करीतच राहतें. ॥१॥

**पाठविचार**—"देवस्मरः"—हा २ मधील पाठ आहे. १ मध्ये "दैवं स्म वो" असा पाठ आहे. त्याला कांहीच अर्थ नाही म्हणून तो अग्राह्य आहे. ३ मध्ये "देवः स्मरः" असा पाठ आहे. तोहि ग्राह्य आहे.

"बुभूषेत् यस्या वा येषाम् वा यासां वा"—१ मध्ये "बभूषे यस्यैव येषां" असा पाठ आहे. २ मध्ये "बभूषे यस्यै वा एषाम्". ह्या दोनहि पाठांस कांही अर्थ नाही. ३च मधील पाठ आम्ही घेतला आहे. "प्रतिप्राय," "वाचंयमः" आणि "अभिप्रमज्य" ह्याबद्दल मागील खंडांत लिहिलें तेंच येथेहि लिहावयाचें आहे.

"स्मरंति हैवास्य"—हा २ मधील पाठ आहे. १ मध्ये "स्मरंती हैव भवति स्मरंती हैव स्यात्" आहे. त्याचा अर्थ "ती अभीष्ट स्त्री स्मरतच राहील, स्मरतच राहील" असा आहे. हा पाठ अग्राह्य आहे. कारण खंडाच्या आरंभीं स्त्रीयेकरिताच हें साधन सांगितलें असें म्हटलें नसून, सामान्यतः कोणाहिकरिता सांगितलें असें म्हटलें आहे. ३ मधील टीकेंतहि "स्मरंति हैवास्य" असाच पाठ दिसतो.

**टिप्पण**—बहुशाला देखील दुसरें मनुष्य किंवा स्त्री वश करून घेण्याची जरूरी असतेच. त्याच्याकरिता हा उपाय सांगितला आहे.

अध्याय २, खंड ४

अथातः सांयमनम् प्रातर्दनमांतरमग्निहोत्रमिति यदाचक्षते । यावद्वै पुरुषो भाषते न तावत्प्राणितुं शक्नोति प्राणं तदा वाचि जुहोति । यावद्वै पुरुषः प्राणिति न तावद् भाषितुं शक्नोति वाचं तदा प्राणे जुहोति । एते अनंते अमृते आहुती जाग्रच्च स्वपंश्च संततमव्यवच्छिन्नं जुहोति अथ या अन्या आहुतयोऽन्तवत्यस्ताः कर्ममय्यो भवंति । एतद्ध वै पूर्वे विद्वांसोऽग्निहोत्रं न जुहवांचक्रुः । उक्थं ब्रह्मेति स्माह शुष्कभृंगारः । तदृगित्युपासीत सर्वाणि हास्मै भूतानि श्रैष्ठ्याय अभ्यर्चंते । तद्यजुरित्युपासीत सर्वाणि हास्मै भूतानि श्रैष्ठ्याय युंजते । तत्सामेत्युपासीत सर्वाणि हास्मै भूतानि श्रैष्ठ्याय संनमंते । तच्छ्रीरित्युपासीत तद्यश इत्युपासीत तत्तेज इत्युपासीत । तद्यथैतच्छास्त्राणां श्रीमत्तमं यशस्वितमम् तेजस्वितमम् भवति । तथैवैवं विद्वान् सर्वेषाम् भूतानां श्रीमत्तमो यशस्वितमो तेजस्वितमो भवति । तदेवं ऐष्टकं कर्ममयमात्मानम् अध्वर्युः संस्करोति । तस्मिन् यजुर्मयं प्रवयति यजुर्मयः, ऋङ्मयं होता ऋङ्मयः, साममयमुद्गाता । स एष सर्वस्यै त्रयीविद्याया आत्मा । एष उत एवास्यात्मा । एतदात्मा भवति य एवं वेद ॥४॥

**अर्थः**—ज्याला [पद] सांयमन, प्रातर्दन, किंवा आंतर अग्निहोत्र म्हणतात तें आता सांगितलें जातें. जोंपर्यंत मनुष्य बोलत असतो तोंपर्यंत तो श्वास आंत ओढूं [प्राणितुं] शक्त नाही. अर्थात् तेव्हा तो प्राणाचें वाचेंत हवन करीत असतो. जोंपर्यंत मनुष्य श्वास आंत घेत असतो [प्राणिति] तोंपर्यंत तो भाषण करूं शक्त नाही, अर्थात् तेव्हा

तो प्राणामध्ये वाचेचें हवन करीत असतो. ह्या कधी न संपणाऱ्या (अर्थात् मरणापर्यंत न संपणाऱ्या) आनंद देणाऱ्या [अमृते] आहुती, जागा असो [जाग्रत्] किंवा झोपेंत असो [स्वपन्] मनुष्य एकसारख्या [सततम्] खंड न पडूं देतां [अव्यवच्छिन्नम्] हवन करीत असतो. (हेंच तें सांयमन, प्रातर्दन किंवा आंतर अग्निहोत्र होय.) परंतु [अथ] ज्या दुसऱ्या म्हणजे अग्नीमध्यें टाकावयाच्या आहुति आहेत, त्या कर्ममय असल्यामुळे [कर्ममय्यः] संपणाऱ्या [अंतवत्यः] आहेत. पूर्वीचे विद्वान् लोक हें म्हणजे अग्नीमध्यें आहुति टाकण्याचें अग्निहोत्र करीत नव्हते. (किंवा "अग्निहोत्रं जुहवांचकुः" असा पाठ घेतला तर, "पूर्वीचे विद्वान् लोक हेंच म्हणजे आंतर अग्निहोत्रच करीत होते" असा अर्थ करावा.) शुष्कभृंगार नांवाचा ऋषिहि उक्थं म्हणजे प्राणच ब्रह्म आहे असें म्हणाला. प्राण हाच ऋग्वेदांतील मंत्र होत असें मानून त्याची उपासना करावी. अशी उपासना जो करतो त्याची सर्व भूतें श्रेष्ठपणा मिळविण्याकरितां [श्रेष्ठ्याय] पूजा करतात [अभ्यर्चंते]. प्राण हाच यजुर्वेदांतील मंत्र होत असें मानून त्याची उपासना करावी. अशी उपासना जो करतो त्याला सर्व भूतें येऊन मिळतात [युंजते] म्हणजे त्याशीं सहकार्य करतात. प्राण हाच सामवेदांतील मंत्र असें मानून त्याची उपासना करावी. अशी उपासना जो करतो त्याला सर्व भूतें पूर्णपणें नम्र होतात [संनमंते]. प्राण हाच श्री आहे असें मानून त्याची उपासना करावी. प्राण हाच यश आहे असें मानून त्याची उपासना करावी.' प्राण हा तेजस् आहे असें मानून त्याची उपासना करावी, म्हणजे त्या उपासनेने [तद्] जसें हें उपनिषद् शास्त्र सर्व शास्त्रांमध्यें श्रीमत्तम, यशस्वितम, आणि तेजस्वितम आहे त्याप्रमाणेंच हें जाणणारा अर्थात् त्याप्रमाणें वागणारा सर्व भूतांमध्यें, श्रीमत्तम यशस्वितम आणि तेजस्वितम होतो. म्हणून [तत्] ह्या रीतीने म्हणजे प्राण हाच ऋग्, यजुर्, साम, श्री, यश आणि तेजस् आहे असें मानून उपासना करून [एवम्] विटांमध्यें ठेवलेल्या अग्नीची उपासना

करणाऱ्या [ऐष्टकम्—इष्टका म्हणजे वीट यावरून "ऐष्टक" हा शब्द झाला.] आणि कर्ममय अशा आपल्या आत्म्याला अध्वर्यु पवित्र करतो [संस्करोति], त्या प्राणामध्येच [तस्मिन्] यजुर्मय यज्ञकर्ता, यजुर्मय कर्म म्हणजे यजुर्वेदाने करावयाचें कर्म गुंफतो [प्रतनुति], ऋङ्मय होता ऋग्वेदाने करावयाचें कर्म गुंफतो, आणि सामवेदाने करावयाचें कर्म उद्गाता गुंफतो. हा प्राणच त्रयी विद्येचा म्हणजे तीन वेदांतील विद्येचा आत्मा म्हणजे सार आहे. (छान्दोग्योपनिषद् १ । ११ पहा. तेथे त्रयी विद्येच्या देवता प्राण, सूर्य आणि अन्न ह्या सांगितल्या आहेत. प्राणाकरिताच सूर्य अन्न उत्पन्न करतो म्हणून त्रयीवर देवता प्राण हा एकच). हा प्राणच ह्या शरीराचा [अस्य] आत्मा आहे. जो हें जाणतो तो प्राणच ज्याचा आत्मा आहे असा [तदात्मा] होतो म्हणजे प्राणोपासना करतो असा भाव आहे. ॥५॥

**पाठविचार**—"सांयमनम्"—१ मध्ये "सायमशं" असा पाठ आहे व २ मध्येहि असाच पाठ आहे. या पाठाला कांही अर्थ नाही म्हणून मी "सांयमनम्" असा पाठ ३ मधील पाठास अनुसरून घेतला आहे.

"यदाचक्षते"—"चाचक्षते" असा पाठ १ व ३ मध्ये आहे. "आचक्षते" असा पाठ २ मध्ये आहे. "यदाचक्षते" हा पाठ अर्थसौकर्यासाठी आम्ही कल्पिला आहे.

"भाप्ते"—हा पाठ ३ मधील आहे. १ व २ मध्ये "भासते" असा पाठ आहे. त्याला येथे काहीच अर्थ नाही म्हणून तो अग्राह्य आहे.

"भापितुम्"—हा पाठ २ व ३ मध्ये आहे. १ मध्ये "भातुं" हा पाठ आहे, त्याला येथे कांही अर्थ नाही म्हणून तो त्याज्य आहे.

"अमृते आहुती"—हा २ मधील पाठ आहे. १ व ३ मध्ये "अमृताहुती" असा पाठ आहे. त्याचाहि अर्थ भिन्न होत नाही.

"स्वपंच" १, २ व ३, येथे हा पाठ आहे. "स्वरूपं" असाहि पाठ १ मध्ये आहे. तो निरर्थक व त्याज्य आहे.

"न"—हा शब्द १ व २ मध्ये नाही. ३ मध्ये आहे. कसाहि पाठ घेतला तरी "पूर्वीचे विद्वान् आंतर अग्निहोत्र करीत होते, अग्नींत आहुती टाकण्याचें अग्निहोत्र करीत नव्हते" असाच अर्थ घ्यावा लागतो. "न" घेतला तर "एतद्" याचा अर्थ अग्नींत आहुती टाकावयाचें अग्निहोत्र असा घेतला पाहिजे आणि "न" न घेतला तर "एतद्" याचा अर्थ आंतर अग्निहोत्र असा घेतला पाहिजे. कारण प्रकरण आंतर अग्निहोत्राचें असल्यामुळे त्याचीच या वाक्यांत स्तुति असली पाहिजे.

"उक्थं ब्रह्मेति स्माह शुष्कभृंगारः" हा २ व ३ मधील पाठ आहे. १ मधील पाठ "अथ कथं ब्रह्मेति। शुष्क भृंगारम्" असा आहे. २ व ३ येथील पाठाचा अर्थ सरळ व सुकर आहे. म्हणून तोच पाठ घेतला.

"अभ्यर्चते" आणि "युंजते"—या ठिकाणी "अभ्यर्च्यते" आणि "युज्यंते" असेच पाठ आहेत. पण ते चूक दिसतात. कारण पुढील वाक्यांत "संनमंते" हा जसा कर्तरि प्रयोग आहे आहे तसेच कर्तरि प्रयोग येथेहि असले पाहिजेत. आणि अर्थाला कर्तरि प्रयोगच जुळतात.

"श्रीरित्यु"—१ व २ मध्ये पाठ "श्रीरयु" असाच आहे. तो व्याकरणदृष्ट्या अशुद्ध आहे. म्हणून हा पाठ मी ३ मधील पाठास अनुसरून घेतला.

"तदेवम्"—१ मध्ये "तदेतन्" असा पाठ आहे आणि २ व ३ मध्ये "तमेतम्" असा पाठ आहे. आम्ही चांगला अर्थ जुळण्यासाठी "तदेवम्" हा पाठ कल्पिला.

"तदेवम्" यापुढील सर्व पाठ २ प्रमाणे घेतला आहे. फक्त "होता ऋध्यत्यम्" याच्या ठिकाणीं "होता ऋध्यतः" असा पाठ

घेतला. १ मधील पाठ फारच भ्रष्ट झालेला आहे. ३ मधील पाठहि २ मधील पाठासारखाच आहे. फक्त "होता कळाये" असा पाठ तेथे आहे.

**टिप्पण**--येथे सांगितलेले, आंतर अग्निहोत्र म्हणजे आयुष्य होईल तितके वाढविणें हेंच होय. म्हणजे अध्याय ३ खंड १ यांत प्रतर्दनाने सांगितलेली प्राणोपासनाच होय. म्हणून त्याला प्रातर्दन अग्निहोत्र म्हटलें आहे. पण हें खोटें नाही.. त्याला इन्द्रियाचें संयमन करावें लागतें. खाणें, पिणें, मैथुन, विहार नियमित असेल, क्रोधादि मनोविकार ताब्यांत असतील तरच आयुष्य वाढतें. म्हणून त्याला संयमन पाहिजे म्हणून त्याला संयमन अग्निहोत्र असें म्हटलें आहे. प्रातर्दन व आंतर हें नांव स्पष्टार्थच आहे. या खंडाचा अर्थ हाच आहे, की "'बोलणें' व 'श्वास घेणें' या क्रियाच अग्निहोत्र आहे म्हणून शहाणे लोक अग्नींत आहुती टाकून करावयाचें अग्निहोत्र करीत नाहीत."

"उक्थं" म्हणजे प्राण. ऐतरेय अध्याय १ खंड ४ येथे "इतेतदुक्थां इ प्राण एव। प्राण उक्थमित्येव विद्यात्" असें स्पष्ट म्हटलें आहे.

अध्याय २ खंड ५

अथातः सर्वजितः कौषीतकेः त्रीण्युपासनानि भवंति। यज्ञोपवीतं कृत्वाऽप आचम्य त्रिरुदपात्रं प्रसिच्योद्यंतमादित्यमुपतिष्ठेत् "वर्गोऽसि पाप्मानं मे वृङ्ग्धीति", एतयैवा, वृता मध्ये संतम् "उद्वर्गोऽसि पाप्मानं म उद्वृङ्ग्धीति", एतयैवावृताऽस्तंयंतम् "संवर्गोऽसि पाप्मानम् मे संवृङ्ग्धीति"; यदहोरात्राभ्याम् पापं करोति सं तद्वृङ्क्ते। अथ मासि मासि अमावास्यायां पश्चाच्चंद्रमसं दृश्यमानम् उपतिष्ठेतैतयैवावृता हरिततृणाभ्यामथ वाक् प्रत्यस्यते—

" यन्मे सुसीमं हृदयमधिचंद्रमसि श्रितम् ॥
तेनामृतत्वस्येशान माहं पौत्रमघं रुदम् ॥ "

न ह्यस्मात्पूर्वाः प्रजाः प्रयंतीति नु जातपुत्रस्य । अथाजातपुत्रस्य " आप्यायस्व समेतुते ", सं ते पयांसि समुयंतु वाजाः ", " यमादित्या अंशुमप्याययंति " इत्येतास्तिस्र ऋचो जपित्वा " नास्माकं प्राणेन प्रजया पशुभिराप्यायस्व, योऽस्मान् द्वेष्टि यं च वयं द्विष्मः तस्य प्राणेन प्रजया पशुभिराप्याययस्वे " ति दैवीमावृतमावर्त आदित्यस्यावृतमन्वावर्त इति दक्षिणं बाहुमन्वावर्तते ॥५॥

अर्थ—आता सर्व जिंकणाऱ्या म्हणजे मिळविणाऱ्या कौषीतकीच्या तीन उपासना आहेत (त्या सांगतों). यज्ञोपवीत घालून [कृत्वा], तीनदा पाण्याचें आचमन केलेल्या पाण्याच्या मडक्यांत पाणी भरून [प्रसिच्य], उगवणाऱ्या सूर्याची आराधना ' वर्गोऽसि पाप्मानं मे वृंग्धि " ह्या मंत्रानें करावी. (मंत्राचा अर्थ, " तूं वर्ग म्हणजे पाप बाहेर काढणारा आहेस, तरी माझें पाप बाहेर काढ " असा आहे.) ह्याच रीतीनें [एतया एव आवृता] आकाशामध्ये म्हणजे मध्यान्हीं असलेल्या [मध्ये संतं] सूर्याची आराधना "उद्वर्गोऽसि पाप्मानं मे उद्वृंग्धि " ह्या मंत्रानें करावी. (ह्या मंत्राचा अर्थहि वरच्या मंत्रासारखाच आहे.) ह्याच रीतीनें अस्तास जाणाऱ्या सूर्याची आराधना " संवर्गोऽसि पाप्मानं मे संवृंग्धि " ह्या मंत्रानें करावी (ह्याहि मंत्राचा अर्थ वरच्याप्रमाणेंच आहे.) ह्याप्रमाणें आराधना केल्यास, दिवसा आणि रात्रीं केलेलें पाप ती आराधना [तत् म्हणजे उपस्थानं] पूर्णपणें [सम्] बाहेर काढते [वृंक्ते]. ही कौषीतकीची पहिली उपासना होय. आता दुसरी सांगतों [अथ]. ह्याच रीतीनें प्रत्येक महिन्याच्या अमावस्येस, पश्चिमेस दिसणाऱ्या चंद्राची

आराधना करावी म्हणजे गवताच्यां हिरव्या दोन काड्यांसह [ हरित-तृणाभ्याम् ] पुढील वाणी म्हणजे " यन्मे सुसीमं " इत्यादि मंत्र फेंकावा. ( मंत्राचा अर्थ—ज्या अर्थी माझें चांगली सीमा असलेलें [ सुसीमं ] म्हणजेच चांगलें हृदय चंद्रावरच आश्रित आहे म्हणजे चंद्राकडेच रक्षणार्थ शरण गेलेलें आहे, त्या अर्थी [ तेन ] हे अमृताच्या ईश्वरा [ ईशान ] म्हणजे अमृतत्व देण्यास समर्थ असलेल्या चंद्रा, पुत्राच्या मरणाबद्दल [ पौत्रं अघं ] ( रडण्याचा प्रसंग मजवर न येवो. ) ही आराधना करणाऱ्या [ अस्मात् ] प्रजा त्याच्या पूर्वी मरत नाही [ न प्रयंति ], ही दुसरी उपासना [ इति नु ] ज्याला पुत्र झाले आहेत त्याच्याकरिता सांगितली. आता ज्याला पुत्र झाले नाहीत त्याच्याकरिता ही तिसरी उपासना सांगतों. (ही तिसरी उपासना पुढील खंडाच्या अखेरपर्यंत सांगितली आहे. ) " आप्यायस्व समेतुते " इत्यादि ऋग्वेद १।९१।१६ येथील मंत्र ) " सं ते पयांसि समुयंतु वाजाः " इत्यादि (ऋग्वेद १।९१।१८ येथील मंत्र ) आणि " यमादित्या अंशुमाप्याययंति " इत्यादि ( अथर्ववेद ७।८१।६ येथील मंत्र ) ह्या तीन ऋचांचा जप करून " नास्माकं प्राणेन...... आप्यायस्व " ही प्रार्थना करावी. ( ह्या प्रार्थनेचा अर्थ—आमच्या प्राणांनी, प्रजांनी किंवा पशूंनी तूं वाढूं नकोस, जो आमचा द्वेष करतो आणि म्हणून ज्याचा आम्ही द्वेष करतों त्याच्या प्राणांनी, प्रजांनी आणि पशूंनी तू वाढ. ) आणि मी दैवी वर्तुल [ आवृतम् ] फिरवितो [ आवर्ते ], आदित्याचा वर्तुल फिरवितो [ अन्वावर्ते ] असें म्हणत आपला उजवा हात बाटोळा फिरवावा [ अन्वावर्तेत ]. ॥५॥

**पाठविचार**—" कौषीतकेः " हा २ व ३ मधील पाठ आहे. १ मध्ये " कौषीतकिः " असा पाठ आहे. तो अर्थहीन व अग्राह्य आहे.

" आवृताहरित "—हा २ व ३ मधील पाठ आहे. १ मध्ये आवर्ता हरित" असा पाठ आहे. तो अर्थहीन व अग्राह्य आहे.

"वाक् प्रत्यस्यते"—१ मध्ये "वा वृत्तः स्यात्" असा पाठ आहे. २ व ३ मध्ये "वाक् प्रत्यस्यति" असा पाठ आहे. सार्थ व व्याकरणशुद्धपाठ "वाक् प्रत्यस्यते" असाच असूं शकतो.

"यन्मे सुशीमे"····"रुदम्" ह्याच्या १ मधील पाठ फारच भ्रष्ट दिसतो. २ व ३ ह्यांत पाठ बहुतेक सारखाच आहे. म्हणून २ मधील पाठच घेऊन त्यांत दोन ठिकाणीं सुधारणा केली. "यसे" च्या ठिकाणीं "यन्मे" असा पाठ घेतला. आणि "ईशानम्" च्या ठिकाणीं "ईशान" असा पाठ घेतला. अर्थाकरितां असें करणें आवश्यकच आहे. "रुदं च्या" ठिकाणीं "रुदम्" असा पाठ १ मध्यें आहे. तोहि अग्राह्य नाहीं. त्यानेहि अर्थ तोच राहतो.

"इति नु जात पुत्रस्य"—१ व २ मध्येंहि "इति न जात पुत्रस्य" असा पाठ आहे. तो ह्या व पुढील खंडाच्या अर्थाशीं जुळत नाहीं म्हणून "इति नु जात पुत्रस्य" असा पाठ ३ मधील पाठास अनुसरून घेतला.

"अथाजातपुत्रस्य"—हा २ व ३ मधील पाठ आहे. १ मधील पाठ "अथ जातपुत्रस्य" आहे. तो पुढील वाक्याशीं व खंडाशीं जुळत नाहीं म्हणून अग्राह्य आहे.

"आप्यायस्व समेतु ते"—हा २ व ३ मधील पाठ आहे. १ मधील पाठ "यं यं समेत्वातु" हा कोणत्याच ऋचेशीं जुळत नाहीं म्हणून अग्राह्य आहे.

"नारमाकम्···आप्यायस्वेति" ह्याचा २ मधील पाठ अर्धाच आहे. १ व ३ मधील पाठ पूर्ण आहे. पण त्यांत "आप्यायिष्ठाः" ह्याच्या ठिकाणीं २ ला अनुसरून "आप्यायस्व" असा पाठ घेतला.

"दैवी "अन्वावर्तते" हा ३ मधील पाठ आहे. १ व २ पाठ भ्रष्ट झालेला आहे हें उघड आहे.

टिप्पणी—दैवी वर्तुळ किंवा सूर्याचा वर्तुळ म्हणजे "सूर्याच्या किरणांनीं धान्य पिकणें, तें खाणें, त्याचें रेत होणें, त्याची प्रजा होणें, ती मरणें व तिचें शरीर पुनः सूर्यकिरणांनीच धान्यांत शिरणें, हें होय.

"दक्षिण बाहु फिरविणें." हें संततिकरिता करावयाच्या सर्व क्रियांचें निर्देशक प्रतीक मानलें आहे असें दिसतें.

**अध्याय २ खंड ६**

अथ पौर्णमास्यां पुरस्ताच्चंद्रमसं दृश्यमानमुपतिष्ठेतैतयैवावृता—सोमोराजासि विचक्षणः पंचमुखोऽसि प्रजापतिः ब्राह्मणस्त एकं मुखं तेन मुखेन राज्ञोऽत्सि तेन मुखेन मामन्नादं कुरु । राजा त एकं मुखं तेन मुखेन विशोऽत्सि तेन मुखेन मामन्नादं कुरु । श्येनस्त एकं मुखं तेन मुखेन पक्षिणोऽत्सि तेन मुखेन मामन्नादं कुरु । अग्निस्त एकं मुखं तेन मुखेनेमं लोकमत्सि तेन मुखेन मामन्नादं कुरु । सर्वाणि भूतानीत्येव पंचमं मुखं तेन मुखेन सर्वाणि भूतान्यत्सि तेन मुखेन मामन्नादं कुरु । मास्माकं प्राणेन प्रजया पशुभिरवक्षेष्ठाः योऽस्मान् द्वेष्टि यं च वयं द्विष्मः तस्य प्राणेन प्रजया पशुभिरवक्षीयस्वेति स्थितिः । दैवीमावृतमावर्ते आदित्यस्यावृतमन्वावर्ते इति दक्षिणं बाहुमन्वावर्तते । अथ संवेश्य नु जायायै हृदयमभिमृशेत् । यत्ते सुसीमे हृदये हितमंतः प्रजापतौ । मन्येऽहं मांतद्विद्वांसं माहं पौत्रमघं रुदम् ॥ इति । न ह्यस्मात्पूर्वाः प्रजाः प्रयन्ति ॥६॥

**अर्थः**—मागील खंडांतील विधि 'अमावास्येस पश्चिमेस चंद्र दिसतो तेव्हां केल्यानंतर [अथ] पौर्णिमेस पूर्वेकडे दिसणाऱ्या चंद्राची आराधना त्याच रीतीनें करावी. तिचा मंत्र असा—"शहाणा [विचक्षणः] सोमराजा तूं आहेस. पांच मुखांचा प्रजापति तूं आहेस. "ब्राह्मण" हा तुझें एक मुख आहे. त्या मुखानें तूं क्षत्रियांना [राज्ञः] खातोस. त्या मुखानें तूं मला अन्नाद म्हणजे अन्न खाणारा कर. राजा हा तुझें एक

(दुसरें) मुख आहे. त्या मुखानें तूं वैश्यांना [ विशः ] खातोस. त्या मुखानें तूं मला अन्नाद कर. श्येन म्हणजे लक्षणेनें श्येनपक्षी बाळगणारे पारधी तुझें एक ( तिसरें ) मुख आहे. त्या मुखानें तूं पक्षी म्हणजे लक्षणेनें त्यांची शिकार करतात ते सर्व प्राणी तूं खातोस. त्या मुखानें तूं मला अन्नाद कर. अग्नि म्हणजेच पचनशक्ति हें तुझें एक (चवथें) मुख आहे. या मुखानें तूं या लोकाला म्हणजे ह्या लोकांतील सर्व वस्तूंना (यथेच मरन् कोणत्याना कोणत्या तरी प्राण्याचें अन्न आहेत म्हणून असें म्हटलें आहे. ) तूं खातोस. त्या मुखानें तूं मला अन्नाद कर. सर्व भूतें पांच महाभूतें हेंच पांचवें मुख आहे. ह्या मुखानें तूं सर्व भूतांना म्हणजे जीवांना मृत्यूनंतर खातोस. त्या मुखानें तूं मला अन्नाद कर. आमच्या प्राणानें प्रजांनी किंवा पशूंनी तूं वाढूं नकोस [अवक्षेष्ठाः] जो आमचा द्वेष करतो व ज्याचा आम्ही द्वेष करतों त्याच्या प्राणानें, प्रजांनी आणि पशूंनी तूं वाढ [अवक्षीयस्व]. ह्या रीतीनें [ इति ] समाजाला स्थिति राहील म्हणजे समाज सुस्थितींत कायम राहील. "मी देवी वर्तुल फिरवितों मी आदित्याचा वर्तुल फिरवितों." असें म्हणून आपला उजवा हात फिरवावा. नंतर भार्येच्या ठिकाणीं गर्भ ठेवून [संवेश्य], भार्येच्या हृदयावरून म्हणजे गर्भस्थानावरून हळूहळू हात फिरवावा [ अभिमृशेत् ] आणि म्हणावें की "तुझ्या चांगल्या [ सुसीमे ] प्रजारक्षण करणाऱ्या [ प्रजापतौ ] हृदयांत म्हणजे गर्भस्थानांत आंत जें ठेविलें आहे, त्याला जाणणारा [ तद्विद्वांस ] म्हणजेच त्याचें महत्त्व जाणणारा मी आहें [ मां ] असें मी [ अहम् ] मानतों [ मन्ये ]. म्हणून पुत्राच्या मरणामुळें रडण्याचा प्रसंग मजवर न येवो." ही उपासना करणाऱ्याची प्रजा त्याच्यापूर्वी मरत नाही. ॥ ६ ॥

**पाठविचार—१** मधील पाठ फारच भ्रष्ट झालेला आहे. २ मधील पाठ बहुतेक शुद्ध आहे व तोच किंचित् सुधारून येथे घेतला आहे. १ मध्ये जेथे जेथे "उरिय" आहे तेथे तेथे २ मध्ये "अरिस"

आहे व तेंच ग्राह्य आहे. १ मध्ये जेथे जेथे "अन्नादं" आहे तेथे तेथे २ मध्ये "अन्नादं" आहे व तेंच ग्राह्य आहे. कारण पुत्रोत्पत्ति-प्रकरणांत "अन्नाद" हाच शब्द जुळतो आणि त्याशीं "अस्थि" हाच जुळतो. ३ मधील पाठ बहुतेक २ मधील पाठासारखाच आहे, पण थोडा जास्त भ्रष्ट आहे.

"अवक्षेप्ता:" आणि "अवक्षीयस्व"—हे २ व ३ मधील पाठ होत. १ मध्ये "अपक्षिप्ता:" आणि "अपक्षीयस्व" असे पाठ आहेत. हीं दोनहि एकाच धातूचीं रूपें असलीं पाहिजेत आणि त्या धातूचा अर्थ "पाडणें" असा असला पाहिजे हें उघड आहे. हा अर्थ "अप" ह्या उपसर्गानें येऊं शकत नाहीं. "अव" या उपसर्गानें येऊं शकतो. म्हणून २ मधीलच पाठ ग्राह्य आहेत. ही तुदादि गणांतील "क्षि" "निवासगत्योः" ही धातू होय. हेंहि उघड आहे.

"अन्वावर्ते"—अन्वावर्तते" असाच पाठ १ व २ मध्येंहि आहे. पण मागील खंडांत अशाच ठिकाणीं १ मध्ये "अन्वावर्ते" असा पाठ आहे. येथेहि १ मध्ये "अन्वावर्त" असाच पाठ आहे.

"रुदम्"—१ मध्ये "रुहं" असा पाठ आहे. तोहि अग्राह्य नाहीं. त्यानें "मी पुन्हा मरणाच्या शोकाला न चढो" म्हणजे वर केला तोच अर्थ होतो.

"प्रयंति"— "प्रेति" असाच पाठ १, २ व ३ मध्येंहि आहे. तो व्याकरणदृष्ट्या अशुद्ध म्हणून "प्रयंति", हा पाठ बदलिला. पांचव्या अशाच ठिकाणीं "प्रयंति" असाच पाठ आहे.

"संवेदय"—"संवेदयन्" हा पाठ २ मध्ये आहे. तो व्याकरणदृष्ट्या चूक आहे. ३ मध्येंहि "संवेदयन्" असाच पाठ आहे.

**टिप्पणी**—अन्न खाल्ल्याशिवाय प्रजा उत्पन्न होऊं शकत नाहीं म्हणून "अन्नादं कुरु" अशी प्रार्थना या खंडांत सांगितली

आहे. अन्न साध्यास मिळणें देखील, ज्ञानवृद्धि करणारा व राजास योग्य सल्ला देणारा ब्राह्मण, रक्षण करणारा राजा, शेती व उद्योग करणारा वैश्य, पारधीच्या प्राण्यांची पारख करणारे पारधी ह्यांवर अवलंबून आहे. पंचमहाभूतांशिवाय अन्न उत्पन्नच होत नाही आणि पचनशक्तीशिवाय अन्न असूनहि खातां येत नाही म्हणून सोमरूपी प्रजापतीचीं पांच मुखें कल्पिलीं आहेत असें दिसतें.

अध्याय २ खंड ७

अथ प्रोष्यायन् पुत्रस्य मूर्धानमभिमृशति—
"अंगादंगात् संभवसि हृदयाधिजायसे ॥
आत्मा वै पुत्रनामासि स जीव शरदः शतम् ॥"
असाविति नामास्य गृह्णाति । मा छेत्ता मा व्यथिष्ठाः शतं शरद आयुषो जीव पुत्र । ते नाम्ना मूर्धानमभिजिघ्राम्यसाविति त्रिर्मूर्धानमभिजिघ्रेत् । गवाम् त्वा हिंकारेणाभिहिंकरोमीति त्रिर्मूर्धानमभिहिंकुर्यात् ॥७॥

अर्थ—आता, प्रवासांत राहून [ प्रोष्य ] परत येणाऱ्या [ आयन् ] बापानें प्रवासास जाण्याचे वेळीं पुत्राचें डोकें परवसावें [ अभिमृशेत् ] म्हणजे डोक्यावरून हलूहलु हात फिरवावा. (आणि पुढील आशीर्वाद त्यास द्यावा.) "माझ्या प्रत्येक अंगापासून तूं उत्पन्न झालास. माझ्या हृदयापासून तूं झालास. पुत्र नांवाचा आत्माच तूं आहेस. तो तूं शंभर वर्षे जिवंत रहा." हा आशीर्वाद देतांना "तूं अमका [ असौ ] (गोविंदा, रामा किंवा कृष्णा) असें त्याचें नांव घ्यावें. (आशीर्वाद पुढें चालू.) "तूं मरून माझ्या वंशाचा छेद करणारा [ छेत्ता ] होऊं नकोस. तूं व्यथित म्हणजे रोगी किंवा दुःखी होऊं नकोस. हे पुत्रा, आयुष्याचीं शंभर वर्षे जिवंत राहा. तुझें नांव घेऊन [ ते नाम्ना ] हा अमका मी [ असौ ] तुझ्या डोक्याचें अवघ्राण

करतों " असें म्हणून [इति] तीनदा पुत्राच्या डोक्यानें अवघ्राण करावें. आणि गाईच्या हिंकाराने मी तुझा हिंकार करतों असें म्हणून तीनदा पुत्राच्या डोक्याला हिंकार करावा. ॥७॥

**पाठविचार**—"प्रोष्यायन्"–हा २ व ३ मधील पाठ होय. १ मध्ये "प्रोष्यापनः" असा पाठ आहे त्याला कांही अर्थ नाही.

"नामासि" हा २ मधील पाठ आहे. १ मध्ये "मा विष" असा पाठ आहे. तो निरर्थक आहे. ३ मध्ये "मा विथ" असा पाठ आहे. तोहि चांगला आहे. त्याने "पुत्र हा आत्माच आहे. तूं माझें रक्षण केलेंस" असा अर्थ होतो.

"गराम्" हा ३ मधील पाठ आहे. १ व २ मध्ये "गवा" असा पाठ आहे. तो निरर्थक आहे.

**टिप्पणी**—प्रवासांतून परत आल्यानंतर वाचयाला हा आशीर्वाद आहे असा अर्थ "उपनिषद् ब्रह्मयोगिन्", याने केला आहे तो चूक आहे. प्रवासांत जाण्यापूर्वीच असा आशीर्वाद देणें जरूर आहे म्हणून मी तदनुरूप अर्थ केला आहे. आणि "प्रोष्यायन्" ह्याचा तसाच अर्थ होतो.

"गराम्" म्हणजे "गाई करतात तसा".

अध्याय २ खंड ८

अयातो दैवः परिमरः। एतद्वै ब्रह्म दीप्यते यदग्निर्ज्वलति, अथैतन्म्रियते यन्न ज्वलति, तस्यादित्यमेव तेजो गच्छति वायुं प्राणः। एतद्वै ब्रह्म दीप्यते यदादित्यो दृश्यतेऽथैतन्म्रियते यन्न दृश्यते, तस्य चंद्रमसमेव तेजो गच्छति वायुं प्राणः। एतद्वै ब्रह्म दीप्यते यच्चंद्रमा दृश्यते, अथैतन्म्रियते यन्न दृश्यते, तस्य विद्युतमेव तेजो

**गच्छति वायुं प्राणः । एतद्वै ब्रह्म दीप्यते यद्विद्युद्विद्योतते, अथैतन्म्रियते यन्न विद्योतते तस्य वायुमेव तेजो गच्छति वायुम् प्राणः । ता वा एताः सर्वा देवता वायुमेव प्रविश्य वायौ सृप्ता न मूर्च्छन्ते तस्माद्वैव पुनरुदीरत इत्यधिदैवतम् । अथाध्यात्मम् । एतद्वै ब्रह्म दीप्यते यद्वाचा वदति, अथैतन्म्रियते यन्न वदति, तस्य चक्षुरेव तेजो गच्छति प्राणं प्राणः । एतद्वै ब्रह्म दीप्यते यच्चक्षुषा पश्यति, अथैतन्म्रियते यन्न पश्यति तस्य श्रोत्रमेव तेजो गच्छति प्राणं प्राणः । एतद्वै ब्रह्म दीप्यते यच्छ्रोत्रेण शृणोति, अथैतन्म्रियते यन्न शृणोति तस्य मन एव तेजो गच्छति प्राणं प्राणः । एतद्वै ब्रह्म दीप्यते यन्मनसा ध्यायति, अथैतन्म्रियते यन्न ध्यायति तस्य प्राणमेव तेजो गच्छति प्राणं प्राणः । ता वा एताः सर्वा देवताः प्राणमेव प्रविश्य प्राणे सृप्ता न मूर्च्छन्ते तस्माद्वैव पुनरुदीरते । तद्यदिह वा एवं विद्वांसं उभौ पर्वतौ अभिप्रवर्तेयाताम् तुतूर्षमाणौ दक्षिणश्चोत्तरश्च न हैवैनं स्तृण्वीयाताम् । अथ य एनं द्विषन्ति यांश्च स्वयं द्वेष्टि ॥ एवं सर्वे परितो म्रियते ॥८॥**

अर्थ—आतां देवांचे चोहीकडे दिसून येणारें मरण वस्तुतः कसें असतें त्याचें वर्णन करतो. अग्नीचें जें पेटणें तें ह्या ब्रह्माचें दीपणेंच होय, अग्नीचें न पेटणें तें ह्या ब्रह्माचें मरण होय, जेव्हा अग्नि पेटत नाही तेव्हा अग्निरूपानें प्रकट होणाऱ्या ब्रह्माचें म्हणजेच अग्नीचें तेज आदित्यांत जाऊन मिळतें आणि प्राण वायूंत जाऊन मिळतो. आदित्याचें जें दिसणें तें ह्या ब्रह्माचें दीपणेंच होय, आदित्याचें

जें न दिसणें तें ह्या ब्रह्माचें मरण होय. आदित्य जेव्हा दिसत नाही तेव्हा आदित्यरूपाने प्रकटणाऱ्या ब्रह्माचें तेज चंद्रांत जाऊन मिळतें आणि प्राण वायूंत जाऊन मिळतो. हें जें चंद्राचें दिसणें तें ह्या ब्रह्माचें दीपणेंच होय, चंद्राचें न दिसणें तें ह्या ब्रह्माचें मरणेंच होय. जेव्हा चंद्र दिसत नाही तेव्हा चंद्ररूपाने प्रकटणाऱ्या ब्रह्माचें तेज विजेंत जाऊन मिळते. आणि प्राण वायूंत जाऊन मिळतो. हें जें विजेचे चमकणें तें ह्या ब्रह्माचे दीपणेच होय. विजेचें न चमकणें तें ह्या ब्रह्माचें मरणच होय. जेव्हा वीज चमकत नाही, तेव्हा विद्युद्‌रूपाने प्रकटणाऱ्या ब्रह्माचें तेज वायूतच जाऊन मिळते आणि प्राणहि वायूंत जाऊन मिळतो. त्या ह्या सर्व देवता वायूमध्येच प्रवेश करून, वायूंमध्ये लीन झालेल्या [ सृप्ताः ] म्हणजे मिळून गेलेल्या असतात, नाहीशा होत नाहीत [ न मूर्च्छंते ] म्हणूनच [ तस्मादेव ] पुनः बाहेर येतात [ उदीरते ] म्हणजे पुनः प्रगट होतात. हें देवताविषयी. म्हणजे शरीराबाहेरील वर्णन झाले आतां शरीरातील वर्णन सांगतो. हें जें वाणीचें बोलणें आहे, तें ह्या ब्रह्माचें दीपणेंच होय. वाणीचें न बोलणें हें ह्या ब्रह्माचे मरण होय. जेव्हा वाणी बोलत नाही तेव्हा वाणीरूपाने प्रकट होणाऱ्या ब्रह्माचे म्हणजेच वाणीचे तेज डोळयात जाऊन मिळतें आणि प्राण प्राणात जाऊन मिळतो. डोळयाचें जें पाहणें आहे तें ह्या ब्रह्माचें दीपणेंच होय. डोळयाने न पाहणें हें ह्या ब्रह्माचें मरणच होय. जेव्हा डोळा पहात नाही तेव्हा डोळयाच्या रूपाने प्रगट होणाऱ्या ब्रह्माचें म्हणजेच डोळयाचें तेज कानामध्ये जाऊन मिळतें आणि प्राण प्राणांत जाऊन मिळतो. कानाचे जे ऐकणें आहे ते ह्या ब्रह्माचें दीपणेंच होय. कानाने न ऐकणे हें या ब्रह्माचें मरणच होय. जेव्हा कान ऐकत नाही तेव्हा कानाच्या रूपानें प्रकट होणाऱ्या ब्रह्माचें तेज मनामध्ये जाऊन मिळतें आणि प्राण प्राणांत जाऊन मिळतो. मनाचें जें ध्यान करणें आहे तें ब्रह्माचें दीपणेंच होय. मनाने ध्यान न करणें हें ह्या ब्रह्माचें मरण होय.

जेव्हा मन ध्यान करीत नाही तेव्हा मनोरूपाने प्रकट होणाऱ्या ब्रह्माचे तेज प्राणांतच जाऊन मिळतें आणि प्राणहिं प्राणांत जाऊन मिळतो, त्या ह्या सर्व देवता प्राणांतच प्रवेश करून, *प्राणांतच लीन झालेल्या* [सृप्ताः] म्हणजे मिळून गेलेल्या असतात, नाहीशा होत नाहींत [न मूर्च्छंते] आणि म्हणूनच पुनः बाहेर येतात [उदीरते] म्हणजे प्रकट होतात. (ह्या सर्वाचा भाव हाच आहे की आत्यंतिक विनाश कशाचाच केव्हाच होत नाही. फक्त अप्रकट स्थितींतून प्रकट स्थितींत येणें आणि प्रकट स्थितींतून अप्रकट स्थितींत जाणें हेंच चालू आहे. ) म्हणून जरी [यदि] हें जाणणाऱ्या विद्वानावर, उत्तरेकडचा आणि दक्षिणेकडचा असे दोनही स्वरेने चालून येऊं इच्छिणारे [सुसूर्षमानौ] पर्वत चालून आले तरी ते त्याचे तुकडे करूं शकणार नाहीत [तृण्वीयाताम्] म्हणजे त्याचा नाश करूं शकणार नाहीत. (वास्तविक विद्वान् किंवा अविद्वान् ह्या कोणाचाच असे पर्वत नाश करूं शकत नाहीत. मग विद्वानांचाच नाश करूं शकत नाहीत असें कां म्हटलें व ह्याचा अर्थ काय ? असा प्रश्न येतो. म्हणून ह्याचा अर्थ असा की "नाश होत नाही हे अविद्वान् जाणत नाही म्हणून अशा प्रसंगी नाशाच्या भीतीने तो कर्तव्यभ्रष्ट होतो. परंतु नाश होत नाही हे विद्वान् जाणतो म्हणून तो नाशाच्या भीतीने कर्तव्यभ्रष्ट होत नाही." अशा रीतीने कर्तव्यभ्रष्ट न होणाऱ्यालाच पुढील वाक्यांत सांगितलेलें फळ मिळतें) म्हणून जे त्याचा द्वेष करतात आणि ज्यांचा तो स्वतः द्वेष करतो ते त्याच्या सभोंवतीचे सर्व लोक मरण पावतात. ॥ ८ ॥

पाठविचार--"परिमरः"--हा २ व ३ मधील पाठ आहे. १ मध्ये "परिगरः" असा पाठ आहे. तो घेतला तरी हरकत नाही. त्याचा अर्थ "देवांचें वायुमध्ये किंवा प्राणांमध्ये जाऊन लीन होणें" असा करतां येतो. हीच कल्पना पुढे "सृप्ताः" या शब्दाने सांगितली आहे.

" यदादित्यो "—हा ३ मधील पाठ आहे व तोच ग्राह्य आहे. २ मध्ये " यथादित्यः " आणि १ मध्ये " यथा मर्त्यो " हे पाठ आहेत, ते उघडच अग्राह्य आहेत.

" एतद्वै ब्रह्म दीप्यते यच्चंद्रमा दृश्यते इत्यादि संपूर्ण वाक्यच १ मध्ये गळलें आहे तें २ किंवा ३ मधून घेतलें.

"तृप्ताः" हा २ मधील पाठ आहे व तोच योग्य आहे. "तृप्ताः" हा पाठ निरर्थक आहे, अशाच पुढच्या वाक्यांत " क्लृप्ताः " असा पाठ आहे तोहि निरर्थक व अग्राह्य आहे.

एतद्वै ब्रह्म दीप्यते यच्छ्रोत्रेण शृणोति इत्यादि संपूर्ण वाक्यच १ मध्ये गळले आहे तें २ किंवा ३ मधून घेतलें.

" विद्वांसम् "—" विद्वांसः " असा पाठ आहे तो अर्थाशीं जुळत नाही म्हणून " विद्वांसम् " असा पाठ कल्पिला.

" तुत्वर्यमाणौ " हाच व्याकरणशुद्ध पाठ असूं शकतो म्हणून हा मी कल्पिला आहे. हा " त्वर् " धातूचें सनंतांचें रूप आहे. १ मध्ये पाठ " तस्त्वर्यमाणौ ", २ मध्ये व ३ मध्ये " तुस्तूर्यमाणौ " असे पाठ आहेत. ते अशुद्ध व अग्राह्य आहेत.

" तृण्वीयाताम् " हा पाठ १ मध्ये दिला आहे. तेथेच " श्रीणि धीयाताम् " असा दुसराहि पाठ दिला आहे. तो अर्थाशीं जुळत नाही. २ मध्ये " स्तृण्वीयाताम् ", असा पाठ आहे. तो " तृण्वीयाताम् " ह्याचेंच भ्रष्ट रूप दिसतो. ३ मध्ये " स्तृण्वीयाताम् " असा पाठ आहे. तोहि अग्राह्य आहे.

**टिप्पणी**—" कर्तव्यकर्म करताना मरणाला भिऊं नये, कारण मरण हें आत्यंतिक नाश नसून फक्त प्राणांत किंवा वायूंत लीन होणें आहे आणि म्हणून मरणानंतर पुनः आविर्भाव होतच असतो " असा ह्या खंडाचा भावार्थ आहे. अशा रीतीने वागल्याने शत्रूंचा मृत्यु होतो असाहि भावार्थ आहेच.

"वायु" म्हणजे हवा हा अर्थ येथे नाही. शरीरांत प्राण म्हणून जी शक्ति आहे तीच अप्रकट स्थितींत शरीराबाहेरहि आहेच. तिलाच "वायु" म्हटलें आहे. सूर्य, चंद्र, अग्नि, वीज ह्यांत प्रकट होणाऱ्या वायूलाहि प्राण असें येथे म्हटलें आहे.

अध्याय २ खंड १ येथील पैंग्यमतांत वाणी, डोळा, कान आणि मन ह्यांचा जो संबंध सांगितला आहे त्याला अनुसरूनच ह्या खंडांतील अध्यात्मदेवतांचें वर्णन आहे.

अध्याय २ खंड ९

अथातो निःश्रेयसादानम् । सर्वा ह वै देवता अहंश्रेयसे विवदमानाः अस्माच्छरीरादुच्चक्रमुः । तद्दारुभूतं शिश्ये । अथ हैनद्वाक् प्रविवेश तद्वाचा वदच्छिश्य एव । अथ हैनच्चक्षुः प्रविवेश तद्वाचा वदच्चक्षुषा पश्यच्छिश्य एव । अथ हैनच्छ्रोत्रं प्रविवेश तद्वाचा वदच्चक्षुषा पश्यच्छ्रोत्रेण शृण्वच्छिश्य एव । अथ हैनम् मनः प्रविवेश तद्वाचा वदच्चक्षुषा पश्यच्छ्रोत्रेण शृण्वन्मनसाध्यायच्छिश्य एव । अथ हैनत् प्राणः प्रविवेश तत्तत् एव समुत्तस्थौ । तद्देवाः प्राणे निःश्रेयसं विचित्य प्राणमेव प्रज्ञात्मानमभिसंस्तूय सहैतैः सर्वैरस्माल्लोकादुच्चक्रमुः । ते वायुप्रतिष्ठाकाशात्मानः स्वर्ययुः । तथो एवैवं विद्वान् सर्वेषां भूतानां प्राणमेव प्रज्ञात्मानं अभिसंस्तूय सहैतैः सर्वैरस्माच्छरीरादुत्क्रामति स वायुप्रतिष्ठाकाशात्मा स्वरेति तद्भवति यत्र ते देवास्तत्प्राप्य तदमृतो भवति यदमृता देवाः ॥९॥

अर्थ—आता आत्यंतिक कल्याण [ निःश्रेयस ] मिळविण्याचा उपाय [ आदानम् ] सांगतो. ह्या सर्व इंद्रियप्राणरूपी देवता "मी

सर्वांमध्ये श्रेष्ठ " "मी सर्वांमध्ये श्रेष्ठ आहे !" हें ठरविण्याकरिता [अहंश्रेयसे] वाद करीत असतां [विवदमानाः] शरीराला सोडून गेल्या. तेव्हा तें शरीर लाकडासारखें निश्चल निजून राहिलें. (झोप आली असतां असें होतें.) नंतर त्यांत वाणीने प्रवेश केला तेव्हा तें वाणीने बोलत तसेंच पडूनच राहिलें [शिश्ये]. नंतर त्यांत डोळ्याने प्रवेश केला तरी तें वाणीने बोलत, डोळ्याने पहात तसेंच पडूनच राहिलें. नंतर त्यांत कानाने प्रवेश केला, तरी तें वाणीने बोलत, डोळ्याने पहात, कानाने ऐकत तसेंच पडूनच राहिलें. नंतर मनाने त्यांत प्रवेश केला, तरी देखील तें वाणीने बोलत, डोळ्याने पहात, कानाने ऐकत आणि मनाने ध्यान करीत तसेंच पडूनच राहिलें. (अशी स्थिति माणूस स्वप्नांत असतो तेव्हा असते.) नंतर प्राणाने त्यांत प्रवेश केला, तेव्हा (तत्) लागलीच [तत एव] तें शरीर उठून उभें राहिलें. (असें मनुष्य जागा होतो तेव्हा होतें.) त्यावरून [तत्] शहाण्या मनुष्यांनी [देवाः] प्राणांमध्येच कल्याण आहे [निःश्रेयसं] असा निश्चय करून [विचित्य] किंवा हें जाणून घेऊन [विदित्वा], प्रज्ञेचा म्हणजे जागृतींतील चैतन्याचा आत्मा म्हणजे आधार जो प्राण त्याचीच स्तुति करून म्हणजे प्राणाचीच उपासना करण्याकरिता ह्या सर्वांसह म्हणजे इंद्रियें, मन व प्राण ह्यांसह ह्या लोकांतून म्हणजे अज्ञांच्या जागृतींतून वर गेले [उच्चक्रमुः]. (कठोपनिषद्, वल्ली ६ श्लोक १०–११ ह्यांत वर्णिलेली इंद्रियमनोबुद्धिव्यापाररहित योगावस्था प्राप्त करून न घेतां, जींत इंद्रियमनोबुद्धिव्यापार चालू असतात अशी, माण्डूक्योपनिषदांत जिला चतुर्थपाद म्हटलें आहे ती जीवैक्यप्रत्ययुक्त जागृति प्राप्त करून घेतली असा भाव आहे.) वायूवर म्हणजेच प्राणावर प्रतिष्ठित असलेलें आकाश म्हणजे ब्रह्म म्हणजेच "जीव" ह्यालाच आत्मा मानणारे [वायुप्रतिष्ठाकाशात्मानः] ते शहाणे लोक, ज्याप्रमाणे, स्वर्गलोकास म्हणजेच ब्रह्मलोकास गेले (ब्रह्मलोक म्हणजे अद्वैताची जागृति हें

मागें दाखविलेंच आहे. ) त्याप्रमाणेच हें जाणणारा सर्वभूतांच्या प्रत्येका ( जागृतीतील चैतन्याचा ) आत्मा (आधार) असलेल्या प्राणाची स्तुति करून म्हणजे सर्वभूतांच्या प्राणांची उपासना करण्याकरिता, ह्या सर्वांसह म्हणजे इंद्रियमनःप्राणांसह ह्या शरीरांतून वर जातो म्हणजे आपल्या स्वतःच्या शरीराचा अभिमान सोडून सर्वच शरीरांतील प्राणांची उपासना करतो. ( छांदोग्योपनिषद् ८।१२ येथेंहि "अशरीर" म्हणजे स्वशरीराभिमानरहित असा अर्थ केला आहे, तसाच हा अर्थ आहे. ) *ह्याप्रमाणें वायूवर प्रतिष्ठित असलेलें आकाश म्हणजेच "जीव" झालाय आत्मा मानणारा तो स्वर्गलोकास जातो. तो ब्रह्म* [सत्] होतो. जेथे ते देव म्हणजे श्रद्धाणे लोक गेले तेथे जाऊन, त्या देवांना जें अमृत (म्हणजे जो आनंदातिशय ) मिळालें तें त्याला मिळतें. ॥९॥

पाठविचार—"उच्चक्रमुः" २ व ३ मध्ये हा पाठ आहे व तोच ग्राह्य आहे. १ मध्ये "उच्चक्रुगुः" असा पाठ आहे, व त्याचाहि अर्थ तेथील टीकाकाराने "उच्चक्रमुः" सारखाच केला आहे.

"शिश्ये"—१ व २ मध्ये सर्वत्र पाठ "शिश्ये" असाच आहे, पण तो चूक आहे. "शी" चें लिट् "शिश्ये" असेंच होतें. ३ मध्ये शिश्ये असाच पाठ आहे.

"विविश्य" हा २ मधील पाठ होय. ३ मध्ये "विदिश्या" असा पाठ आहे. तोहि घेण्यास हरकत नाही. १ मध्ये "विनिश्य" असा पाठ आहे तो अग्राह्य आहे. आणि त्याचा अर्थ तेथील टीकाकाराने "विविश्य" असाच केला आहे.

"स्वर्येषुः" हा २ मधील पाठ होय. ३ मध्ये "स्वरीषुः" असा पाठ आहे. तोहि घेण्यास हरकत नाही. १ मध्ये "स्वर्बयः" *असा पाठ आहे. तो अग्राह्य आहे हें उघडच आहे.*

"यत्र ते देवाः"—"यत्रैतद्देवा" असा पाठ १ व २ मध्ये आहे व ३ मध्ये "यत्रैतेदेवा" असा पाठ आहे. खरा पाठ "यत्र ते देवाः" असा पाहिजे किंवा ३ मधील पाठ घेऊन "एते" याचा "ते" सारखाच अर्थ करावा.

"स्वरेति"—हा १ व ३ मधील पाठ आहे. २ मध्ये "न स्वरेति" असा पाठ आहे. तो उघडच चूक आहे.

टिप्पण—हा खंड फार महत्त्वाचा आहे. यांत कौषीतकीने आपलें म्हणणें थोडक्यांत स्पष्ट भाषेंत सांगितलें आहे. सर्व भूतांच्या प्राणांची उपासना म्हणजेच जोपासना हेंच साध्य ठरवून क्रिया केल्या म्हणजे त्या योग्यप्रकारच्या होऊन कर्त्यांसहि अत्यानंद प्राप्त होतो असें त्याचें म्हणणें आहे आणि तें सर्वांशीं खरें आहे. कारण एकतर सर्व प्राणांच्या जोपासनेकरितां त्याला स्वतःचें शरीर सुस्थितींत ठेवावें लागतें व तें त्याला आनंददायकच आहे; दुसरें सर्व प्राणांच्या जोपासनेकरितां त्याला स्वतःच्या वासना टाकाव्या लागतात आणि हा वासनात्याग आनंददायकच आहे. शिवाय दुसऱ्या प्राण्यांच्या प्राणांच्या जोपासनेनें त्याचें प्रेम संपादिलें जातें व त्यामुळे त्याच्या अनेक दुःखांचें निवारण होतें, हा गौण फायदाहि आहेच.

अध्याय २ खंड १०

अथातः पितापुत्रीयं संप्रदानमिति यदाचक्षते । पिता पुत्रं प्रेष्यन्नाह्वयति । नवैस्तृणैरगारं संस्तीर्याग्निमुपसमाधायोदकुंभं सपात्रमुपनिधायाहतेन वाससा संप्रच्छन्नः ह्यत एत्य पुत्र उपरिष्टादभिनिपद्यत इंद्रियैरस्येंद्रियाणि संस्पृश्यापिवाऽस्याभिमुखत एवासीत । अथास्मै संप्रयच्छति—वाचं मे त्वयि दधानीति पिता, वाचं ते मयि दध इति पुत्रः । चक्षुर्मे त्वयि दधानीति पिता, चक्षुस्ते मयि

दध इति पुत्रः । श्रोत्रं मे त्वयि दधानीति पिता, श्रोत्रं ते मयि दध इति पुत्रः । मनो मे त्वयि दधानीति पिता, मनस्ते मयि दध इति पुत्रः । अन्नरसान् मे त्वयि दधानीति पिता, अन्नरसांस्ते मयि दध इति पुत्रः । कर्माणि मे त्वयि दधानीति पिता, कर्माणि ते मयि दध इति पुत्रः । सुखदुःखे मे त्वयि दधानीति पिता, सुखदुःखे ते मयि दध इति पुत्रः । आनंदं रतिं प्रजातिं मे त्वयि दधानीति पिता, आनंदं रतिं प्रजातिं ते मयि दध इति पुत्रः । इत्या मे त्वयि दधानीति पिता, इत्यास्ते मयि दध इति पुत्रः । धियो विज्ञातव्यं कामान् मे त्वयि दधानीति पिता, धियो विज्ञातव्यं कामांस्ते मयि दध इति पुत्रः । अथ दक्षिणावृत् उपनिष्क्रामति तं पितानुमंत्रयति—यशो ब्रह्मवर्चसमन्नाद्यं कीर्तिस्त्वाजुषतामिति । अथेतरः सव्यमंसमन्ववेक्षते पाणिनांतर्धाय वसनांतेन वा प्रच्छाद्य स्वर्गांल्लोकान् कामानवाप्नुहीति । स यद्यगदः स्यात् पुत्रस्यैश्वर्ये पिता वसेत्परि वा व्रजेत् । यद्यु वै प्रेयात् यथैवैनं समापयति यथा समापयितव्यो भवति तथा समापयितव्यो भवति ॥१०॥

**अर्थः**—आता बापाने पुत्रास करावयाचें [पितापुत्रीयं] दान [संप्रदानम्] असें ज्याला म्हणतात तें सांगतो. ज्याचें मरण जवळ आलें आहे असा [प्रेष्यन्] बाप पुत्राला जवळ बोलावितो [आह्वयति]. घरांत चोहींकडे नवीन गवत पसरून, अग्नीचें आधान करून आणि पाण्याचें मडकें झांकणासहित [सपात्रम्] आणि नवीन वस्त्रानें झाकलेलें असें जवळ ठेवून तेथें [इतः] बाप येऊन [एत्य] नंतर [उपरिष्टात्]

मुलगा तेथे येतो [निष्पद्यते]. त्याने आपल्या इंद्रियांनी बापाच्या इंद्रियांस स्पर्श करून किंवा बापाच्या समोर [अभिमुखतः] बसावें. नंतर बाप त्याला देतो. तें असें. "माझी वाणी मला तुझ्या ठिकाणीं ठेवूं दे" असें बाप म्हणतो. "तुझी वाणी मी आपल्या ठिकाणीं ठेवतों" असें मुलगा म्हणतो. असेंच डोळा, कान, मनस्, अन्नरस, कर्में, सुखदुःखें, मैथुनाचा काम [आनंदः], मैथुन [रति] आणि प्रजोत्पत्ति, चालणें [इत्या] व बुद्धीने जाणावयाचे विषय आणि काम म्हणजे प्राप्तव्यें ह्या नऊ गोष्टींविषयीं बाप व मुलगा म्हणतो. नंतर मुलगा बापाभोवतीं प्रदक्षिणा करतो [दक्षिणावृत् उपनिष्क्रामति] तेव्हा बाप त्याला आशीर्वाद देतो [अनुमंत्रयते] की "यशस् म्हणजे प्रयत्नांत सिद्धि, ब्रह्मतेजस्, अन्न वगैरे आणि कीर्ति तुला मिळोत." नंतर मुलगा बापाचा उजवा [सव्यम्] खांदा आपल्या पंजाने [पाणिना] झांकून [अंतर्धाय] किंवा वस्त्राच्या दोशाच्या भागाने [वसनांतेन] झाकून त्या बापाकडे पाहतो आणि "स्वर्गलोक व काम तुला मिळोत" असें म्हणतो. नंतर तो बाप जर निरोगी [अगदः] असेल म्हणजे लागलीच मरणार नाही तर त्याने पुत्राच्या ऐश्वर्यांत म्हणजे पुत्राच्या घरीं त्याने दिलेलें अन्नवस्त्र घेत राहावें किंवा घरातून निघून जाऊन फिरत राहावें. जर बाप घरातून निघून जाईल तर तो मेला असता जशी त्याची अंत्यक्रिया करतात [यथा समापयितव्यो भवति] तशी त्याची अंत्य क्रिया करावी. ॥१०॥

पाठविचार—"पितापुत्रीयं संप्रदानं" हा २ व ३ मधील पाठ होय. १ मध्ये "पितापुत्रोयं संप्रदानं" असा पाठ आहे. तो निरर्थक आहे.

"यदाचक्षते"—"याचक्षते" असा पाठ १ व २ मध्ये व ३ मध्येहि आहे. "यदाचक्षते" हा पाठ अर्थसौकर्याकरिता मी घेतला आहे.

"नवैः"—या ठिकाणीं "न नवैः" असा पाठ १ मध्ये आहे. त्यांतील पहिला "न" छापखान्याच्या चुकीनें पडलेला दिसतो. कारण तेथील टीकेंतहि त्याशिवायच अर्थ केला आहे.

"संप्रच्छन्नं ह्यतः" हा १ मधील पाठ आहे. २ मध्ये "संप्रच्छन्नः श्येत" असा पाठ आहे. व ३ मध्ये "संप्रच्छन्नः स्वयं श्येत" असा पाठ आहे. त्याचा कांहीं अर्थ लागत नाहीं म्हणून १ मधीलच पाठ घेतला. "श्येत" म्हणजे "श्वेतः" असा अर्थ ३ च्या टीकेंत आहे. तसेंहि करतां येईल.

"निष्पद्यते" हा २ मधील पाठ आहे. १ मध्ये "निष्पद्येते" असा पाठ आहे, तो अर्थास जुळत नाहीं. ३ मध्ये "निष्पद्यते" असाच पाठ आहे.

"दक्षिणावृत् उपनिष्क्रामति"—हा २ मधील पाठ आहे. ३ मध्ये "दक्षिणावृत् प्राङुपनिष्क्रामति" असा पाठ आहे. १ मध्ये "दक्षिणाप्राक् प्राङ् परिक्रामति" असा पाठ आहे. ह्याचा अर्थ समजत नाहीं. मला वाटतें खरा पाठ "दक्षिणावृत् परिक्रामति" असा असावा. त्याचा अर्थ मी वर केला तोच होतो.

"पितानुमंत्रयति"—"पितानुमंत्रयते" असा पाठ २ व ३ मध्ये आहे तोहि घेण्यास हरकत नाहीं. १ मध्ये दोन पाठ आहेत. त्यांपैकीं "पिता न मंत्रयति" हा उघड उघडच चूक दिसतो. कारण पुढें पित्यानें काय म्हणावयाचें तें दिलेंच आहे.

"वसनांतेन वा" हा २ व ३ मधील पाठ आहे. १ मध्ये "वासनान्तनु या" असा पाठ आहे. तो निरर्थक आहे.

"स यद्यगदः स्यात्" हा २ व ३ मधील पाठ आहे. व तोच ग्राह्य आहे. १ मध्ये "स्वयं ह्येकतः स्यात्" हा पाठ आहे पण तो मागील वाक्यांशीं जुळत नाहीं.

"व्रजेत्"—हा २ व ३ मधील पाठ आहे. १ मध्ये "व्रजेयुः" असा पाठ आहे तो व्याकरण दृष्ट्या अशुद्ध आहे.

"यद्युवै प्रेयात्"—हा ३ मधील पाठ आहे. १ मध्ये "यद्युवै प्रयुज्यात्" असा पाठ आहे. २ मध्ये "यद्युवै प्रेयात्" असा पाठ आहे. तो अग्राह्य आहे.

"यथैवैनम्"—"यदेवैनम्" असा पाठ २ व ३ मध्ये आहे व १ मध्ये "एवैनम्" असा पाठ आहे. पुढे "तथा" आला आहे त्या अर्थी येथे "यथा" असावा म्हणून "यथैवैनम्" असा पाठ आहे किंवा "यदेवैनम्" असाच पाठ घेऊन "यद्" ह्याचा अर्थ "यथा" असा घ्यावा.

टिप्पण—ह्या खंडाचा भावार्थ असा आहे की "मागील नवव्या खंडांत सांगितल्याप्रमाणे सर्व भूतांच्या प्राणांची उपासना करून वृद्धपणीं आपल्या कर्तव्याची जबाबदारी पुत्रावर सोपवून द्यावी. आणि स्वतः बृहदारण्यक १।५।१७ येथे सुचविल्याप्रमाणें पुत्राचें व सर्व समाजाचें अर्थात् उपदेशाने रक्षण करीत पुत्राच्या घरींच राहावें किंवा फिरत राहावें. कारण सर्व भूतांच्या प्राणाची उपासना हें जें कर्तव्य नवव्या खंडांत सांगितलें त्याची समाप्ति मृत्युकाळींच होऊं शकते. पण वार्धक्यामुळे ते पूर्णपणें करतां येत नाही म्हणून तें केवळ उपदेशाने करावें. हें रक्षण-रूपी कर्तव्य जरी कौषीतक्युपनिषदांत स्पष्टपणें सांगितलें नाही तरी गुणोपसंहारन्यायाने तें बृहदारण्यकांतून घेतलें पाहिजे.

"एत्य" आणि "निष्पद्यते" ह्यांचा कर्ता पाणिनीय व्याकरणा-प्रमाणे एकच पाहिजे. पण येथे तो नियम उपनिषत्काराने पाळला नाही.

## दुसऱ्या अध्यायावर टिप्पण

ह्यापूर्वीच्या पहिल्या अध्यायांत ब्रह्मलोकप्राप्तीचें वर्णन केलेलें असल्यामुळे, ह्या अध्यायांत सांगितलेलीं कृत्यें ब्रह्मलोकीं गेलेल्याने

करावींत असा भावार्थ निघतो. पहिल्या खंडांतील "तथो एवास्मै" येथील "अस्मै" ह्याचा अर्थ देखील "ब्रह्मलोकांत गेलेल्याला" असाच होऊं शकतो. खंड १, २ व ३ येथील कर्मामध्ये सिद्धि देखील ब्रह्मवेत्त्यासच होऊं शकते. इतरांस होणें बहुतेक असंभवनीय आहे.

## कौषीतक्युपनिषद् अध्याय तिसरा

**अध्याय ३ खंड १**

प्रतर्दनो ह वै दैवोदासिरिंद्रस्य प्रियं धामोपजगाम युद्धेन पौरुषेयेण च। तं हेंद्र उवाच "प्रतर्दन वरं ते ददानी"ति। स होवाच प्रतर्दन"स्त्वमेव वृणीष्व यं त्वं मनुष्याय हिततमं मन्यसे" इति। तं हेंद्र उवाच "न वै वरम् परस्मै वृणीते त्वमेव वृणीष्वे"ति। "अवरो वै तर्हि किल मे" इति होवाच प्रतर्दनः। अथो खल्विंद्रः सत्या देवतेयाय सत्यं हींद्रः। स होवाच "मामेव विजानीहि एतदेवाहं मनुष्याय हिततमं मन्ये यन्मां विजानीयात् त्रिशीर्पाणं त्वाष्ट्रमहनमरुङ्मुखान् यतीन् सालावृकेभ्यः प्रायच्छं बह्वीः संधा अतिक्रम्य दिवि प्राह्लादीनतृणमहमंतरीक्षे पौलोमान् पृथिव्याम् कालकाश्यांस्तस्य मे तत्र न लोम च मीयते। स यो मां विजानीयान्नास्य केन च कर्मणा लोको मीयते, न मातृवधेन, न पितृवधेन, न स्तेयेन, न भ्रूणहत्यया नास्य पापंचन चकृषो मुखं नील वेत्ती"ति ॥ स होवाच "प्राणोऽस्मि प्रज्ञात्मा, तं मामायुरमृतमित्युपास्स्व, आयुः प्राणः, प्राणो वा

आयुः, **प्राण एवाम्**, यावद्ध्यस्मिन् शरीरे प्राणो वसति ;
तावदायुः प्राणेन ह्येवामुष्मिन् लोकेऽमृतत्वमाप्नोति ॥१॥

**अर्थः**—दिवोदासाचा पुत्र प्रतर्दन हा युद्धानें व पराक्रमानें इंद्राच्या प्रिय लोकास गेला. (ह्याचा अर्थ असा दिसतो की प्रतर्दन इंद्रास युद्धांत मदत करण्याकरिता गेला व त्या मदतीमुळे इंद्र त्यावर संतुष्ट झाला). इंद्र त्याला म्हणाला, "प्रतर्दना, मला तुला वर देऊं दे, म्हणजे तूं मला वर माग". प्रतर्दन म्हणाला, "मनुष्याला जें अत्यंत हितकर आहे असें तुला वाटतें तें तूंच निवडून (वृणीष्व) मला दे." त्याला इंद्र म्हणाला, "दुसऱ्याकरिता कोणी वर निवडीत नसतो. तूंच आपला वर निवड." ह्यावर प्रतर्दन म्हणाला, "मी निवडलेला वर हलका [अवरः] च असेल म्हणून मी स्वतःवर निवडत नाही." त्याला इंद्र ही देवता खरी आहे म्हणून इंद्र त्याच्याशी गेला म्हणजे इंद्रानें आपलें वर देण्याचें वचन पाळलें. (तो वर म्हणजे इंद्रानें पुढें जें ज्ञान सांगितलें तेंच होय.) इंद्र म्हणाला, "मलाच जाणून घे. मला जाणून घेणें हेंच मनुष्याला अत्यंत हितकर आहे असें मी मानतों. मी त्वष्ट्याचा पुत्र त्रिशीर्षा ह्याला मारलें. त्याच्या तोंडावर रोगाचें कोणतेंच चिन्ह नव्हतें [अरुङ्मुखान्] तथापि ज्यांनी संन्यासाश्रम घेतला अशांना [यतीन्] मी सालावृकांना म्हणजे लांडग्यांना खाण्यास दिलें, पुष्कळ करारनामे [संधाः] मोडून [अतिक्रम्य] मी स्वर्गातील [दिवि] प्रल्हादपुत्रांना [प्राह्लादीन्], अंतरीक्षांतील पुलोमपुत्रांना आणि पृथिवीवरील कालकाश्यांना तुकडे तुकडे करून मारलें [अतृणम्]. तथापि त्या कृत्यांमुळे [तत्र] त्या माझे [तस्य मे] केशाहि नाश पावले नाहींत [न मीयते]. जो कोणी मला जाणतो त्याचा लोक म्हणजे आनंदावस्था कोणत्याहि कर्मानें नाश पावत नाही. मातृवधानें, पितृवधानें, चोरीनेंहि त्याचा लोक नाश पावत नाही. कोणतेंहि पाप [पापंचन] करूं इच्छिणाऱ्याचें त्याचें [चकृषः] मुख काळिम्याला

[नीलं] जाणत नाही म्हणजे कोणतेहि पाप करतांना त्याचें मुख लज्जेने काळें होत नाही." इंद्र पुढे म्हणाला, "मी प्रज्ञेचा म्हणजे जागृतीतील चैतन्याचा आत्मा म्हणजे आधार असलेला प्राण आहे. त्या मला आयुष्य व आनंद [अमृतम्] असें समजून माझी उपासना कर; कारण आयुष्य हें प्राणच होय आणि प्राण हें आयुष्यच होय. प्राण हाच अमृत म्हणजे आनंद आहे. जोंपर्यंत ह्या शरीरांत प्राण असतो, तोंपर्यंतच आयुष्य असतें. प्राणानेच त्या लोकांत म्हणजेच ब्रह्मलोकांत आनंद [अमृतत्व] मिळतो. ॥१॥

पाठविचार—"विजानीयात्" हा ३ मधील पाठ आहे व तोच योग्य आहे. १ व २ मध्ये "विजानीयाम्" असा पाठ आहे तो अर्थाशीं जुळत नाही.

"प्राण एवामृतम्"—हा ३मधील पाठ आहे. व तोच योग्य आहे-१मध्ये "प्राण प्राण उवा अमृतं" असा व २मध्ये "प्राण उवाचामृतम्" असा पाठ आहे. ह्यावरून मूळ पाठ "प्राण उवा अमृतम्" असाहि ठरवितां येईल. त्याचाहि अर्थ वर दिल्याप्रमाणेच आहे.

"अथो खल्विद्रः" "हींद्रः" हा १ मधील पाठ आहे. २ व ३ मध्ये "अथो खल्विद्रः सत्यादेवनेयाय सत्यं हींद्रः" असा पाठ आहे. त्याचाहि अर्थ भिन्न नाही. सत्यापासूनच इंद्र ढळला नाही, इंद्र सत्य आहे असा त्याचा अर्थ होतो.

टिप्पणी—"अरुद्मुखान् यतीन्" ह्याचा आम्ही जो अर्थ वर दिला आहे, त्यावरून निरोगी जवान मनुष्यांनी गृहस्थाश्रम न स्वीकारतां संन्यासी व्हावें हें कौषीतकीस मान्य नव्हतें असें स्पष्ट दिसतें. २ । १० येथील संप्रदानकर्मदेखील ज्याला पुत्र आहे व ज्याचें मरण जवळ आहे त्यालाच सांगितलें ह्यावरून वरील सिद्धांतास पुष्टिच येते. "अरुद्मुख यति" ह्याचा आम्ही केला त्याहून भिन्न अर्थहि करतां येतच नाही. "चकृषः" हें "चिकीर्षाः" ह्याचेंच आर्ष किंवा वैदिक रूप होय.

"अमुष्मिन् लोके" ह्याचा अर्थ काय? पुढील खंडांत "अस्मिन् लोके" ह्याचा प्रतियोगी शब्द "स्वर्गे लोके" असा योजिला आहे. म्हणून "अमुष्मिन् लोके" म्हणजे "स्वर्गलोके" हा अर्थ उघड आहे. २।९ येथे "स्वर्" शब्द आलेला आहे. तेथील वर्णनावरून स्वर् अथवा स्वर्गलोक म्हणजे पहिल्या अध्यायांत वर्णिलेला ब्रह्मलोक हें उघड आहे. कौ. १।२ मध्ये "एतद्वै स्वर्गस्य लोकस्य द्वारं यश्चंद्रमाः" असें वाक्य आहे व पुढे ब्रह्मलोकाचेंच वर्णन आहे. ह्यावरूनहि स्वर्गलोक म्हणजेच ब्रह्मलोक असें ठरतें.

अध्याय ३ खंड २

प्रज्ञया सत्यसंकल्पः स यो मामायुरमृतमित्युपास्ते सर्वमायुरस्मिंल्लोक आप्नोत्यमृतत्वमक्षितिं स्वर्गे लोके। तद्धैक आहुरेकभूयं वै प्राणा गच्छंतीति। न हि कश्चन शक्नुयात् सकृद्वाचा नाम प्रज्ञापयितुम् चक्षुषा रूपं श्रोत्रेण शब्दं मनसा ध्यातमिति एकभूयं वै प्राणा एकैकं सर्वाण्येवैतानि प्रज्ञापयंति। वाचं वदंतीं सर्वे प्राणा अनुवदंति, चक्षुः पश्यत् सर्वे प्राणा अनुपश्यंति, श्रोत्रं शृण्वत् सर्वे प्राणा अनुशृण्वंति, मनोऽध्यायत्सर्वे प्राणा अनुध्यायंति, प्राणं प्राणंतं सर्वे प्राणा अनुप्राणंतीति। एवमु हैवैतदिति हेंद्र उवाचास्ति त्वेव प्राणानां निःश्रेयसम् इति) जीवति वागपेतो मूकान् विपश्यामो, जीवति चक्षुरपेतोऽधान् विपश्यामो जीवति श्रोत्रापेतो बधिरान् विपश्यामो. जीवति बाहुच्छिन्नो जीवत्यूरुच्छिन्न इत्येवं हि पश्याम इति प्राणः एव प्रज्ञात्मेदं शरीरं परिगृह्योत्थापयति ॥२॥

अर्थ—प्रज्ञेच्या म्हणजे बुद्धीच्या साधनाने म्हणजे बुद्धीने संकल्पसिद्धीचा मार्ग ठरवून व त्या मार्गाने जाऊन आपले संकल्प सत्य करून घेणारा म्हणजे संकल्पित गोष्टी प्राप्त करून घेणारा जो माझी म्हणजे प्राणाची, प्राणच आयुष्य व आनंद [ अमृत ] समजून उपासना करतो, त्याला ह्या लोकीं पूर्ण [ सर्व ] आयुष्य मिळतें आणि स्वर्गलोकांत म्हणजेच ब्रह्मलोकांत आत्यंतिक आनंद [ अमृतत्वम् ] आणि पूर्णत्व [ अक्षिति ] मिळतें. ( हा स्वर्गलोक मरणापूर्वीच मिळतो हें छांदोग्य ८।३ व कठ ६।१४ व प्यारा ३४ वरून स्पष्ट दिसतें. ) त्या संबंधानें [ तत् ] म्हणजे प्राणासंबंधानें कोणी [ एके ] असें म्हणतात की " प्राण एक होऊनच [ एकभूयं ] चालतात. म्हणजे कोणीहि एकट्या [ सुद्दत् ] वाचेने शब्द [ नाम ] उच्चारूं [ प्रज्ञापयितुम् ] शकत नाही, एकट्या डोळ्याने रूप, एकट्या कानाने शब्द आणि एकट्या मनाने विचार [ ध्यातम् ] जाणूं शकत नाही. सर्व प्राण एक होऊनच ह्या सर्वांपैकी [ सर्वाणि एतानि ] एकएकाचें ज्ञान करून देतात. म्हणजे वाणी बोलत असतां तिच्या बरोबरच दुसरेहि सर्व प्राण म्हणजे इंद्रियें बोलत असतात [ अनुवदंति ], डोळे पाहात असतां दुसरेहि सर्व प्राण त्याबरोबरच पाहात असतात, कान ऐकत असतां त्याबरोबरच दुसरेहि सर्व प्राण ऐकत असतात, मन विचार करीत असतां [ ध्यायत् ] त्याबरोबरच दुसरेहि सर्व प्राण विचार करीत असतात. आणि प्राण जेव्हा गंध घेण्याकरिता श्वास घेतो [ प्राणतम् ] तेव्हा दुसरेहि सर्व प्राण त्याबरोबरच श्वास घेतात. " ( हा येथपर्यंत पूर्वपक्ष झाला. आता ह्याला उत्तर देतात. ) ह्यावर इंद्र म्हणाला " हें असें आहे खरें [ एवम् उ एतत् ]. ( वास्तविक पाहतां एक इंद्रिय काम करतें तेव्हा दुसरीं कांहीच करीत नाहीत, त्यामुळे वर वर्णिलेला भास होतो. ) तथापि मुख्य प्राणाचेंच श्रेष्ठत्व [ निःश्रेयस ] आहे. म्हणजे मुख्य प्राण एकटाच आपलें कार्य करूं शकतो. कारण वाणी नसली तरी मनुष्य जिवंत राहतो, आपण मुके मनुष्य पाहतोंच; डोळे नसले तरी मनुष्य जिवंत

राहतो, आपण आंधळे मनुष्य पाहतोंच; कान नसले तरी मनुष्य जिवंत राहतो, आपण बहिरे मनुष्य पाहतोंच, बाहु तुटले तरी मनुष्य जिवंत राहतो; पाय तुटले तरी मनुष्य जिवंत राहतो. ह्याप्रमाणे आपण पाहतोंच म्हणून प्रज्ञेचा म्हणजे आमृतीतील चैतन्याचा आत्मा म्हणजे आधार जो मुख्य प्राण तोच शरीराला धरून उठवितो. ॥२॥

**पाठविचार**—"स यो मामायुरमृतमित्युपास्ते" १ मध्ये व २ मध्येहि "स यो म आयुरमृतमित्युपास्ते" असा पाठ आहे. ३ मध्ये "स यो ममायुरमृतमित्युपास्ते" असा पाठ आहे. ह्यावरून आम्ही वर दिलेला पाठ कल्पिला.

"ध्यातम्"—हा १ मधील पाठ आहे. २ मध्ये "ध्यानम्" असा पाठ आहे. १ मधील पाठच ग्राह्य आहे. कारण येथे इंद्रियाची क्रिया उद्दिष्ट नसून इंद्रियविषय उद्दिष्ट आहे. ३ मध्ये "धातुं" हा पाठ आहे. तो उघड उघडच अग्राह्य आहे.

"एकभूयं वै प्राणा एकैकम्"—हा १ मधील पाठ होय. २ मध्ये "एकभूयं वै प्राणा भूत्वा एकैकम्" असा पाठ आहे. तोहि पाठ घेण्यास हरकत नाही. त्याच्याहि अर्थ वरप्रमाणेच होतो. ३ मधील पाठ "एकभूयं वै प्राणाः एकैकम्" असाच आहे.

"अस्ति त्वेव"—१ व २ मध्ये पाठ "अस्तीत्येव." असा आहे. परंतु पूर्वपक्ष संपून उत्तरपक्ष सुरू झाला हें दाखविण्यास "तु" शब्द पाहिजे म्हणून "अस्ति त्वेव" हा पाठ ३ मध्ये आहे तोच आम्ही घेतला आहे.

**टिप्पणें**—"अक्षितिम्" हें "अमृतत्वम्" ह्याचें विशेषण मानतां येत नाही. कारण "अमृतत्वम्" हें नपुंसकलिंगी आहे आणि "अक्षिति" ह्याचें नपुंसक रूप "अक्षिति" असें होतें. म्हणून "अक्षितिम्" हा स्वतंत्र शब्द मानावा लागतो. "क्षिति" म्हणजे "कमीपणा" व "अक्षिति" म्हणजे "पूर्णता" असा अर्थ होतो.

" सकृत् " म्हणजे " एकदाच " असा अर्थ घेणें भाग आहे. " एकदाच " असा अर्थ सांप्रत चालू आहे पण तो येथे जुळत नाही.

" प्रज्ञा " हा शब्द बहुतेक जागृतींतील चैतन्य ह्या अर्थानें योजिला आहे. पण कोठे कोठे तो बुद्धि ह्या अर्थानें योजिला आहे. उदाहरणार्थ, ह्या खंडांतच पहिल्यानें तो " बुद्धि " ह्या अर्थानेंच योजिला आहे.

▪ एकभूयं "—"ब्रह्मभूयाय कल्पते" या भगवद्गीतेंतील वाक्यांत "भूय" ह्याचा "भाव" असा अर्थ आहे, तसाच येथेहि आहे. "एकभूयं" हा समास मात्र अव्यय मानून " एक होऊन " असा अर्थ करावा.

▪ प्राणाः " हा शब्द येथे दोन अर्थांनी योजला आहे. कोठे कोठे " प्राण " म्हणजे वाणी वगैरे इंद्रियें असा अर्थ आहे आणि कोठे कोठे " प्राण " म्हणजे " मुख्य प्राण " ज्यामुळे शरीर जिवंत राहतें व इंद्रियें आपापलीं कामें करूं शकतात तो असा अर्थ आहे. आणि कोठे "प्राण" ह्या शब्दांत दोहोंचाहि अंतर्भाव होतो.

अध्याय ३ खंड ३

अथ खलु तस्मादेतदेवोक्थमुपासीत । यो वै प्राणः सा प्रज्ञा, या वा प्रज्ञा स प्राणः । सह ह्येतावस्मिन्शरीरे वसतः सहोत्क्रामतः । तस्यैषैव दृष्टिरेतद्विज्ञानम् । यत्रैतत् पुरुषः सुप्तः स्वप्नं न कंचन पश्यत्यथास्मिन् प्राण एवैकधा भवति तदैनं वाक् सर्वैर्नामभिः सहाप्येति, चक्षुः सर्वै रूपैः सहाप्येति, श्रोत्रं सर्वैः शब्दैः सहाप्येति, मनः सर्वैर्ध्यानैः सहाप्येति । स यदा प्रतिबुध्यते यथाग्नेर्विस्फुलिंगा विप्रतिष्ठेरन्नेवमेवैतस्मादात्मनः प्राणा यथायतनम् विप्रतिष्ठंते प्राणेभ्यो देवाः देवेभ्यो लोकाः । तस्यैषैव सिद्धिरेतद्वि-

ज्ञानम्। यत्रैतत्पुरुष आर्तो मरिष्यन्नाबल्यं न्येत्य मोहं न्येति, तदाहुरुदक्रमीच्चित्तं न शृणोति न पश्यति न वाचं वदति। अथास्मिन् प्राण एवैकधा भवति, तदैनं वाक् सर्वैर्नामभिः सहाप्येति, चक्षुः सर्वैं रूपैः सहाप्येति, श्रोत्रं सर्वैः शब्दैः सहाप्येति, मनः सर्वैर्ध्यातैः सहाप्येति। स यदा प्रतिबुध्यते यथाग्नेः स्फुलिंगा विप्रतिष्ठेरन्नेवमेवैतस्मादात्मनः प्राणा यथायतनं विप्रतिष्ठन्ते प्राणेभ्यो देवा देवेभ्यो लोकाः ॥३॥

**अर्थ**—म्हणून [तस्मात्] खरोखर [अथ खलु] ह्याच शरीरास उठविणाऱ्या प्राणरूपी उपास्याची [उक्थ = उपास्य] उपासना करावी. कारण जो प्राण तोच ती प्रज्ञा होय. किंवा जी प्रज्ञा ती तो प्राण होय. हे दोघे ह्या शरीरांत मिळूनच [सहैव] राहतात आणि मिळूनच शरीरांतून बाहेर जातात. हीच त्या प्राणाची (पुढे दिलेली) दृष्टि म्हणजे पुरावा आहे आणि हेंच (पुढे दिलेलें) विज्ञान म्हणजे त्या पुरुषाने सिद्ध झालेली माहिती आहे. पुरुष झोपीं गेलेला असतो व कोणतेंच स्वप्न पहात नाहीं हें [एतत्] जेथे [यत्र], असतें म्हणजे अशी स्थिति जेव्हा असते तेव्हा [अथ] प्रत्येक इंद्रिय ह्या प्राणाशींच [अस्मिन् प्राणे] एकरूप [एकधा] होतें. म्हणजेच तेव्हा वाणी सर्व शब्दांसह [नामभिः] ह्या प्राणात जाऊन मिळते, डोळा सर्व रूपांसह प्राणामध्ये जाऊन मिळतो, कान सर्व प्रकारच्या आवाजांसह [शब्दैः सह] ह्या प्राणामध्ये जाऊन मिळतो, आणि मन सर्व प्रकारच्या विचारासह [ध्यातैः] ह्या प्राणामध्ये जाऊन मिळतें. आणि जेव्हा तो पुरुष जागा होतो [प्रतिबुध्यते] तेव्हा अग्नींतून ठिणग्या बाहेर पडतात त्याप्रमाणे प्रज्ञेचा आत्मा असलेल्या [आत्मनः] ह्या प्राणांतूनच इंद्रियें [प्राणाः] बाहेर पडून आपापल्या स्थानीं जातात [यथायतनम् विप्रतिष्ठन्ते], त्या इंद्रियांतून देव

अर्थ—तो जेव्हां ह्या शरीरांतून निघून जातो, तेव्हा वाणी ही त्या प्राणाबरोबर निघून जाऊन ह्या शरीरांतून सर्व शब्द घेऊन जाते [ अभिविसृजते ]. कारण वाणीनेच शब्द बोलले जातात [ आप्नोति ] प्राणहि त्या प्राणाबरोबर निघून जाऊन ह्या शरीरांतून सर्व गंध घेऊन जातो [ अभिविसृजते ]. कारण प्राणानेच सर्व गंध जाणले जातात [ आप्नोति ]. कानहि त्या प्राणाबरोबरच निघून जाऊन ह्या शरीरांतून सर्व रूपें घेऊन जातो [ अभिविसृजते ]. कारण डोळ्यानेच सर्व रूपें पाहिलीं जातात [ आप्नोति ]. कानहि त्या प्राणाबरोबरच निघून जाऊन ह्या शरीरांतून सर्व आवाज म्हणजेच आवाजांचें ज्ञान घेऊन जातो, कारण कानानेच सर्व आवाज ऐकले जातात [ आप्नोति ]. मनहि प्राणाबरोबरच निघून जाऊन ह्या शरीरातून सर्व विचार घेऊन जातें, कारण मनानेच सर्व विचार केले जातात. ही प्राणामध्ये सर्व जाऊन मिळण्याची क्रिया [आप्तिः] होय. (हीवरूनहि हेंच सिद्ध होतें की) जो प्राण तीच प्रज्ञा अथवा जी प्रज्ञा तो प्राण. हे दोघे शरीरात मिळूनच [ सह ] राहतात आणि मिळूनच शरीरांतून बाहेर जातात. ( म्हणून बरोबर उपासना प्राणांचीच केली पाहिजे). आता प्रज्ञेंतच सर्व भूतें कशीं एक होतात म्हणजे येऊन मिळतात तें (पुढील खंडांत) दाखवितो. ॥४॥

पाठविचार—"प्राणो" "प्राणेन"—ह्या ऐवजी "प्राणो", "प्राणेन" असे पाठ बहुतेक सर्वत्र आहेत. ते अग्राह्य आहेत. "प्राणो" आणि "प्राणेन" असे पाठ एका हस्तलिखितांत आहे असें १ मध्ये सांगितलें आहे म्हणून आम्ही ते घेतले.

अध्याय ३ खंड ५

वागेवास्या एकमंगमुदूढं तस्य नाम परस्तात्प्रतिविहिता भूतमात्रा । प्राणमेवास्या एकमंगमुदूढं तस्य गंधः परस्ता-

प्रतिविहिता भूतमात्रा । चक्षुरेवास्या एकमंगमुदूढं तस्य रूपं परस्तात्प्रतिविहिता भूतमात्रा । श्रोत्रमेवास्या एकमंगमुदूढं तस्य शब्दः परस्तात्प्रतिविहिता भूतमात्रा । जिह्वैवास्या एकमंगमुदूढं तस्यान्नरसः परस्तात् प्रतिविहिता भूतमात्रा । हस्तावेवास्या एकमंगमुदूढं तयोः कर्म परस्तात्प्रतिविहितां भूतमात्रा । शरीरमेवास्या एकमंगमुदूढं तस्य सुखदुःखे परस्तात्प्रतिविहिता भूतमात्रा । उपस्थ एवास्या एकमंगमुदूढं तस्यानंदो रतिः प्रजातिः परस्तात्प्रतिविहिता भूतमात्रा । पादावेवास्या एकमंगमुदूढं तयोरित्या परस्तात्प्रतिविहिता भूतमात्रा । प्रज्ञैवास्या एकमंगमुदूढं तस्यै धियो विज्ञातव्यं कामाः परस्तात्प्रतिविहिता भूतमात्रा ॥५॥

अर्थ—त्या प्रज्ञेचें वाढलेलें [उदूढं] एक अंग वाणीच म्हणजे बोलण्याची शक्ति होय. तिच्या करितां योजलेली [प्रतिविहिता] बाहेरची [परस्तात्] भूतमात्रा नामें म्हणजे अर्थवान् शब्द होत. त्या प्रज्ञेचें वाढलेलें एक अंग घ्राणच म्हणजे गंध जाणण्याची शक्ति होय. तिच्याकरितां [तस्य] योजलेली बाहेरची भूतमात्रा गंध हे होत. त्या प्रज्ञेचें वाढलेलें एक अंग डोळाच म्हणजे पाहण्याची शक्ति होय. तिच्याकरितां योजलेली बाहेरची भूतमात्रा रूपें होत. त्या प्रज्ञेचें वाढलेलें एक अंग श्रोत्रच म्हणजे ऐकण्याची शक्ति होय. तिच्याकरितां योजलेली बाहेरची भूतमात्रा शब्द म्हणजे आवाज हे होत. त्या प्रज्ञेचें वाढलेलें एक अंग जिव्हाच म्हणजे षड्रस ओळखण्याची शक्ति होय. तिच्या करितां योजलेली बाहेरची भूतमात्रा अन्नरस होत. त्या प्रज्ञेचें वाढलेलें एक अंग हातच म्हणजे कर्मे करण्याची शक्ति होय. तिच्याकरितां योजलेली बाहेरची भूतमात्रा कर्में होत. त्या प्रज्ञेचें वाढलेलें एक अंग शरीरच म्हणजे सुखदुःख जाणण्याची शक्ति होय. तिच्याकरितां

योजलेली बाहेरची भूतमात्रा सुगंध होत. प्रज्ञेचें वाढलेलें एक अंग उपस्थ म्हणजे जननेंद्रियाची शक्ति होय. तिच्याकरितां योजलेली बाहेरची भूतमात्रा मैथुनाचा आनंद [आनंद], मैथुन [रति] आणि प्रजोत्पत्ति [प्रजाति] हे होत. त्या प्रज्ञेचें वाढलेलें एक अंग पायच होत म्हणजे चालण्याची शक्ति होय. तिच्याकरितां योजलेली भूतमात्रा चालणें [इत्या] होय. त्या प्रज्ञेचें वाढलेलें एक अंग बुद्धिच [प्रज्ञा] होय. तिच्याकरितां योजलेली भूतमात्रा बुद्धीनें जाणावयाचे सर्व विषय [ धियो विज्ञातव्यम् ] आणि बुद्धिनें ठरवावयाचीं प्राप्तव्यें [काम] होत. ॥५॥

पाठविचार—"उदूढं" हा पाठ १ व २ मधील होय. ३ मध्ये "उदूहळम्" असा पाठ आहे. "अदूदुहत्" असाहि पाठ कोठें सापडतो, असें १ मधील टिप्पणीवरून दिसतें. "उदूहळम्" याचा अर्थ ३ मधील टीकेंत "दोहलें" असा केला आहे. यापैकी कोणताहि पाठ घेतला तरी अर्थ बहुतेक सारखाच येतो. उदूढ = उद्+वह्+क्तः = म्हणजे वाढलेलें, असा अर्थ होतो. "अदूहम्" असा एक पाठभेद १ मध्ये दिला आहे तो उघडच अग्राह्य आहे.

"धियो विज्ञातव्यं कामाः"—हा पाठ २।३ मधील आहे. १ मध्ये "धियो विज्ञातव्यकामाः" असाहि पाठ आहे तो अग्राह्य दिसतो.

टिप्पणी—या खंडांत वाग्, प्राण वगैरे प्रज्ञामात्रा सांगून त्यांच्या त्यांच्या बाहेर (परस्तात्) असलेल्या भूतमात्रा सांगितल्या आहेत.

प्रज्ञा हा शब्द शेवटच्या वाक्यांत आहे. त्याचा अर्थ बुद्धि असा आहे, आणि इतरत्र मागें असलेल्या प्रज्ञा शब्दांचा अर्थ संवित्–म्हणजे जागृतींतील चैतन्य (consciousness) असा आहे.

कामाः म्हणजे इच्छा, आणि प्राप्तव्यें असाहि अर्थ आहे.

अध्याय ३ खंड ६

प्रज्ञया वाचं समारुह्य वाचा सर्वाणि नामान्याप्नोति। प्रज्ञया प्राणं समारुह्य प्राणेन सर्वान् गन्धानाप्नोति। प्रज्ञया चक्षुःसमारुह्य चक्षुषा सर्वाणिरूपाण्याप्नोति । प्रज्ञया श्रोत्रं समारुह्य श्रोत्रेण सर्वान् शब्दानाप्नोति। प्रज्ञया जिह्वां समारुह्य जिह्वया हि सर्वानन्नरसानाप्नोति। प्रज्ञया हस्तौ समारुह्य हस्ताभ्यां सर्वाणि कर्माण्याप्नोति। प्रज्ञया शरीरं समारुह्य शरीरेण सुखदुःखे आप्नोति। प्रज्ञयोपस्थं समारुह्योपस्थेनानन्दं रतिं प्रजातिमाप्नोति। प्रज्ञया पादौ समारुह्य पादाभ्यां सर्वा इत्या आप्नोति। प्रज्ञयैव धियं समारुह्य प्रज्ञयैवधियोविज्ञातव्यं कामानाप्नोति ॥३॥

**अर्थ**—आत्मा प्रज्ञेने वाणीमध्ये शिरून [ समारुह्य ] वाणीने सर्व शब्द उच्चारतो [ आप्नोति ]. आत्मा प्राणांत शिरून प्राणाने सर्व गंधास अनुभवितो [ आप्नोति ]. आत्मा प्रज्ञेने डोळयामध्ये शिरून सर्व रूपें पाहतो. आत्मा प्रज्ञेने कानामध्ये शिरून कानांनें सर्व आवाज [ शब्दान् ] ऐकतो. आत्मा प्रज्ञेने जिव्हेंत शिरून जिव्हेने सर्व अन्नरसांची चव घेतो. आत्मा प्रज्ञेने हातामध्ये शिरून सर्व कर्मे करतो. आत्मा प्रज्ञेने शरीरामध्ये शिरून शरीराने सुखदुःखें भोगतो. आत्मा प्रज्ञेने उपस्थामध्ये शिरून आनंद, रति व प्रजोत्पत्ति मिळवितो. आत्मा प्रज्ञेने पायामध्ये शिरून सर्व प्रकारच्या गती करितो. आत्मा प्रज्ञेने बुद्धीमध्ये शिरून बुद्धीनेच [ प्रज्ञयैव ] बुद्धीने जाणावयाच्या गोष्टी जाणतो आणि बुद्धीने ठरवावयाची प्राप्तव्यें [ कामान् ] ठरवितो. ॥६॥

**पाठविचार**—" प्राणं " " प्राणेन"—हे पाठ '१ क' मधील आहेत. इतरत्र प्राणं प्राणेन असे पाठ आहेत ते अग्राह्य आहेत, कारण ५ व्या खंडांत अशाच ठिकाणीं " प्राण " असा पाठ आहे.

न हि प्रज्ञाऽपेता वाङ्नाम किंचन प्रज्ञापयेदन्यत्र मे मनोऽभूदित्याह नाहमेतन्नाम प्राज्ञासिषमिति । न हि प्रज्ञापेतः प्राणो गंधं कंचन प्रज्ञापयेदन्यत्र मे मनोऽभूदित्याह नाहमेतं गंधं प्राज्ञासिषमिति । न हि प्रज्ञापेतं चक्षू रूपं किंचन प्रज्ञापयेदन्यत्र मे मनोऽभूदित्याह नाहमेतद्रूपं प्राज्ञासिषमिति । न हि प्रज्ञाऽपेतं श्रोत्रं शब्दं कंचन प्रज्ञापयेदन्यत्र मे मनोऽभूदित्याह नाहमेतं शब्दं प्राज्ञासिषमिति । न हि प्रज्ञापेता जिह्वा अन्नरसं कंचन प्रज्ञापयेदन्यत्र मे मनोऽभूदित्याह नाहमेतमन्नरसं प्राज्ञासिषमिति । न हि प्रज्ञाऽपेतौ हस्तौ कर्म किंचन प्रज्ञापयेतामन्यत्र मे मनोऽभूदित्याह नाहमेतत्कर्म प्राज्ञासिषमिति । न हि प्रज्ञापेतं शरीरं सुखदुःखे किंचन प्रज्ञापयेदन्यत्र मे मनोऽभूदित्याह नाहमेतत्सुखदुःखे प्राज्ञासिषमिति । न हि प्रज्ञाऽपेत उपस्थ आनंदं रतिं प्रजातिं कांचन प्रज्ञापयेदन्यत्र मे मनोऽभूदित्याह नाहमेतमानन्दं रतिं प्रजातिं प्राज्ञासिषमिति । न हि प्रज्ञाऽपेतौ पादावित्यां कांचन प्रज्ञापयेतामन्यत्र मे मनोऽभूदित्याह नाहमेतामित्यां प्राज्ञासिषमिति । न हि प्रज्ञाऽपेता धीः काचन सिद्ध्येन्न प्रज्ञातव्यं प्रज्ञायेत ॥७॥

**अर्थ**—प्रज्ञारहित वाणी कोणत्याहि शब्दाचें [नाम] ज्ञान करून देऊं शकत नाही. माझें मन दुसरीकडे होतें म्हणून ह्या शब्दाचें ज्ञान मला झालें नाही असें म्हणतात. प्रज्ञारहित प्राण कोणत्याहि गंधाचें ज्ञान करून देऊं शकत नाही. माझें मन दुसरीकडे होतें म्हणून

मला गंधाचें ज्ञान झालें नाहीं असें म्हणतात, प्रज्ञारहित डोळा कोणत्याहि रूपाचें ज्ञान करून देऊं शकत नाहीं. माझें मन दुसरीकडे होतें म्हणून हें रूप मी जाणलें नाहीं असें म्हणतात. प्रज्ञारहित कान कोणत्याहि आवाजाचें ज्ञान करून देऊं शकत नाहीं. माझें मन दुसरीकडे होतें म्हणून हा आवाज मी जाणला नाहीं असें म्हणतात. प्रज्ञारहित जिह्वा कोणत्याहि अन्नाच्या रसाचें ज्ञान करून देऊं शकत नाहीं. माझें मन दुसरीकडे होतें म्हणून मी ह्या अन्नरसास जाणलें नाहीं, असें म्हणतात. प्रज्ञारहित हात कोणत्याहि कर्माचें ज्ञान करून देऊं शकत नाहीत. म्हणजेच कोणतेंहि कर्म करूं शकत नाहीत. माझें मन दुसरीकडे होतें म्हणून ह्या कर्माचें ज्ञान मला झालें नाहीं असें म्हणतात. प्रज्ञारहित कोणत्याहि सुखदुःखाचें ज्ञान करून देऊं शकत नाहीं. माझें मन दुसरीकडे होतें म्हणून तें सुखदुःख मी जाणलें नाहीं असें म्हणतात. प्रज्ञारहित उपस्थ कोणत्याहि आनंदाचें, रतीचें किंवा प्रजोत्पत्तीचें ज्ञान करून देऊं शकत नाहीं. माझें मन दुसरीकडे होतें म्हणून हा आनंद, ही रति किंवा प्रजोत्पत्ति मी जाणली नाहीं असें म्हणतात. प्रज्ञारहित पाय कोणत्याहि गतीचें [ इत्यां ] ज्ञान करून देऊं शकत नाहीत म्हणजे कोणतीहि गति करूं शकत नाहीत. माझें मन दुसरीकडे होतें म्हणून मी ही गति जाणली नाहीं म्हणजेच केली नाहीं असें म्हणतात. प्रज्ञारहित बुद्धीदेखील सिद्धि मिळवूं शकत नाहीं म्हणजे ज्ञेयास जाणूं शकत नाहीं. ॥७॥

**पाठविचार**—" प्राणो " हा १क मधील पाठ आहे इतरत्र " प्राणो " असा पाठ आहे. १ क मधील पाठच अधिक योग्य आहे हें उघड आहे.

अध्याय ३ खंड ८

न वाचं विजिज्ञासीत वक्तारं विद्यात् । न गंधं विजिज्ञासीत घ्रातारं विद्यात् । न रूपं विजिज्ञासीत रूपविदं

विद्यात् । न शब्दं विजिज्ञासीत श्रोतारम् विद्यात् । नान्नरसं विजिज्ञासीतान्नरसविज्ञातारम् विद्यात् । न कर्म विजिज्ञासीत कर्तारं विद्यात् । न सुखदुःखे विजिज्ञासीत सुखदुःखयोर्विज्ञातारं विद्यात् । आनंदं रतिं प्रजातिं विजिज्ञासीतानंदस्य रतेः प्रजातेर्विज्ञातारम् विद्यात् । नेत्यां विजिज्ञासीतैतारं विद्यात् । न मनो विजिज्ञासीत मंतारं विद्यात् । ता वा एता दशैव भूतमात्रा अधिप्रज्ञम् । दश प्रज्ञामात्रा अधिभूतम् । यद्धि भूतमात्रा न स्युर्न प्रज्ञामात्रा स्युः । यद्वा प्रज्ञामात्रा न न स्युर्न भूतमात्रा स्युः ॥८॥

अर्थ---वाणीला जाणण्याची गरज नाहीं. वाणी बोलणाऱ्यास म्हणजे प्रज्ञेस जाणून घ्या. म्हणजे ती प्रज्ञा प्राणाशिवाय असूं शकत नाही हें जाणून घ्या. अर्थात् प्राणाचेंच धारणपोषण करा असा भाव आहे. (ह्याप्रमाणेच पुढे गंध, रूप, शब्द, अन्नरस, कर्म, सुखदुःख, आनंद-रतिप्रजाति, गति, आणि मन ह्याविषयीं म्हटलें आहे.......) त्या ह्या दहाहि [ दशैव ] भूतमात्रा प्रज्ञेवर म्हणजेच प्रज्ञामात्रांवर अवलंबून (अधि) आहेत., आणि दहा प्रज्ञामात्रा भूतावर म्हणजे भूतमात्रांवर अवलंबून आहेत. म्हणजे भूतमात्रा नसतील तर प्रज्ञामात्रा असूं शकत नाहीत आणि प्रज्ञामात्रा नसतील तर भूतमात्रा असूं शकत नाहीत.

अध्याय ३ खंड ९ -

न ह्यन्यतरतो रूपं किंचन सिध्येत् । नो एतन्नाना । तद् यथा रथस्यारेषु नेमिरर्पिता नाभावरा अर्पिता एवमेवैता भूतमात्रा प्रज्ञामात्रास्वर्पिताः प्रज्ञामात्राः प्राणे अर्पिताः । स वा एष प्राण एव प्रज्ञात्माऽऽनंदोऽजरोऽमृतो न साधुना

कर्मणा भूयान् नो एवासाधुना कर्मणा कनीयान्। एष ह्येवैनं साधु कर्म कारयति तं यमेभ्यः लोकेभ्य उन्निनीषते। एष उ एवैनमसाधु कर्म कारयति तं यमेभ्य लोकेभ्यः अधो निनीषते। एष लोकपाल एष लोकाधिपतिरेष सर्वेश्वरः स म आत्मेति विद्यात् स म आत्मेति विद्यात्॥९॥

अर्थ—भूतमात्रा व प्रज्ञामात्रा ह्या दोहोंपैकी एकाकडूनच [अन्यतरतः] रूपाची म्हणजे विषयज्ञानाची सिद्धि होत नाही. खरोखर पाहिलें असता, भूतमात्रा, प्रज्ञामात्रा किंवा प्रज्ञा आणि प्राण हें भिन्न [एतत्] अलग अलग [नाना] असूं शकत नाही. ज्याप्रमाणे रथाच्या चाकाची नेमी (वर्तुलाकार लाकडें) अरांवर (उभे दांडे) ठेवलेली असते आणि अरा नाभीवर (म्हणजे मधील वाटोळ्या लाकडाच्या छिद्रांत) ठेवलेल्या असतात, त्याप्रमाणे भूतमात्रा प्रज्ञामात्रांवर ठेवलेल्या असतात आणि प्रज्ञामात्रा प्राणावर ठेवलेल्या असतात. म्हणून हा प्राणच प्रज्ञेला आत्मा आनंद म्हणजे आनंद देणारा, कधी न झिजणारा [अजरः] व कधीहि न मरणारा आहे. [अमृतः]. हा चांगल्या कर्मांनी मोठा होत नाही. किंवा वाईट कर्मांनी लहान होत नाही. (चांगलीं कर्में करण्याची गरज नाही आणि वाईट कर्में करण्यास हरकत नाही असा ह्याचा खरा अर्थ नाही. ह्याचा खरा अर्थ असा आहे की मागे वाईट कर्म केल्याबद्दल पश्चात्ताप करीत बसूं नये आणि मागे चांगलें कर्म केलें असलें तरी त्याच्या गर्वाने पुढून चांगलीं कर्में करणें सोडूं नये. तैत्तिरीयोपनिषद् २। ९ येथे आणि बृहदारण्यकोपनिषद् ४।४।२२-२३ येथील "नैनं कृताकृतेतपतः" ह्या वाक्यांतहि असेच विचार आहेत.) हा प्राणच, ज्याला ह्या लोकांच्या वर न्यावयाचें असेल त्याला जन्मकाळींच योग्य बुद्धी देऊन त्याकडून चांगलीं कर्में करवितो

आणि ज्याला ह्या लोकाच्या खाली न्यावयाचें असेल त्याला जन्मकाळींच हलकी बुद्धि देऊन त्याकडून वाईट कर्में करवितो. (कठोपनिषद् २ । २३ वरील आमची टिप्पणी पाहा. तेथील अर्थाप्रमाणेच येथेहि अर्थ केला आहे. सुबुद्धि किंवा हलकी बुद्धि देणें हें तसा मेंदु बनवून प्राणच करतो आणि त्या बुद्धीनेच मनुष्य चांगलें किंवा वाईट कर्म करतो. म्हणून प्राण चांगलें किंवा वाईट कर्म करवितो असें म्हटलें आहे.) हा प्राणच लोकांचे पालन करणारा, हाच लोकांचा अधिपति, हाच सर्वांचा ईश्वर होय. हाच माझा म्हणजे आपला आत्मा होय, असें जाणावें. हाच आपला आत्मा होय असें जाणावें. अर्थात् प्राणाचीच उपासना करावी असा भाव आहे. ॥९॥

पाठविचार—"यमेभ्यो लोकेभ्य उन्निनीषते"—हा ३ मधील पाठ आहे. १ मधील व्याख्येंतहि हाच पाठ घेतला आहे. पण १ व २ मध्ये "यमन्वानुनेषति" असा पाठ आहे. तो अग्राह्य आहे हें उघडच आहे.

"यमेभ्यो लोकेभ्यः अधो निनीषते"—"यमधो निनीषते" असा ३ मध्ये पाठ आहे. १ व २ मध्ये "यमेभ्यो लोकेभ्यो नुनुत्सते" असा पाठ आहे. ह्या भिन्न पाठांचा विचार करतां आणि "यमेभ्यो लोकेभ्यः उन्निनीषते" ह्या मागील शब्दयोजनेशीं कोणता पाठ जुळेल ह्याचा विचार करतां, मी येथे दिला तोच मूळचा पाठ असावा असें वाटतें. कोणताहि पाठ घेतला तरी अर्थ तोच राहतो.

टिप्पण—"मे" म्हणजे इंद्राचा असा अर्थ न घेतां, ज्याला "मी" "मी" म्हणतों त्याचा म्हणजे प्रत्येक व्यक्तीचा म्हणजेच प्रत्येकानें आपला आपला असा अर्थ घ्यावा. कारण एकंदर प्रतिपादनाचा भाव असाच आहे. ह्या अध्यायात प्राणाचें महत्त्व दाखवून प्राणाचीच उपासना प्रतिपादिली आहे हें उघडच आहे.

## कौषितक्युपनिषद् अध्याय चवथा

ह्या अध्यायांतील संवादासारखाच संवाद बृहदारण्यकोपनिषद् २।१ येथेहि आहे. येथील संवाद पाहूनच बृहदारण्यकोपनिषदांतील संवाद लिहिला गेला असें दिसतें. कारण कौषितकीच्या पहिल्या खंडांतील अनावश्यक भाग "सोऽयमुशीनरेषु........विदेहेषु इति" हा बृहदारण्यकांत गाळला आहे. कौषितकींत ह्या संवादांत प्राण हाच श्रेष्ठ आणि उपास्य ठरविला आहे. त्याचें एक प्रकारचें खंडनच करून "जीवात्मा" हाच श्रेष्ठ आणि उपास्य ठरविण्याकरिता बृहदारण्यकांतील संवाद लिहिला गेला आहे असें मानावें लागतें. कारण असें मानल्या-शिवाय ह्या दोन संवादांमध्ये जो ठिकठिकाणीं फरक आहे त्याची उपपत्ति लागत नाही. ह्या फरकाचा विचार पुढे ठिकठिकाणीं केलाच आहे. आणि ह्या दोन उपनिषदांमधील वादाचें स्वरूपहि पुढे योग्य ठिकाणीं दाखविलें आहे.

अध्याय ४ खंड १

गार्ग्यो ह वै बालाकिरनूचानः संस्पष्ट आस सोऽयमुशीनरेषु संवसन् मत्स्येषु कुरुपांचालेषु काशीविदेहेष्विति स हाजातशत्रुं काश्यमेत्योवाच ब्रह्म ते ब्रवाणीति तं होवाचाजातशत्रुः सहस्रं दद्मस्त एतस्यां वाचि जनको जनक इति वा उ जना धावंतीति ॥१॥

अर्थ—गार्ग्यकुलोत्पन्न प्रख्यात [ संस्पष्ट ] आणि वक्ता [ अनूचानः ] असा बालाकि नांवाचा होऊन गेला. तो उशीनर, मत्स्य, कुरु, पांचाल, काशी आणि विदेह ह्या देशांत फिरत असतां [ संवसन् ] काशीदेशाचा राजा जो अजातशत्रु त्याच्याकडे जाऊन त्याला म्हणाला, "मला तुला ब्रह्म शिकवूं दे." त्याला अजातशत्रु म्हणाला, "ह्या

बोलण्याबद्दलच मी तुला हजार (नाणीं) देतों कारण इतर लोक मजकडे न येतां जनक जनक म्हणत जनकाकडेच धावत जातात." ॥१॥

**पाठविचार**—संस्पष्टं—हा १ व २ मधील पाठ आहे. ३ मध्ये "संस्पृष्ट:" असा पाठ आहे. व त्याचाहि अर्थ तेथील टीका-काराने प्रख्यात असाच घेतला आहे. ह्या अर्थाच्या दृष्टीने "संस्पष्टः" हाच पाठ ग्राह्य दिसतो. "सोऽयमुशीनरेषु संवसन् मत्स्येषु" हा २ मधील पाठ आहे. १ मधील पाठ "सोऽयमुशीनरेषु सत्वमत्स्येषु" असा आहे तो उघड उघड चूक आहे. ३ मधील पाठ "सोऽवसदुशी-नरेषु स वसन् मत्स्येषु" असा आहे. तोहि पाठ घेण्यास हरकत नाही. त्याचा अर्थ थोडा भिन्न होईल एवढेंच.

अध्याय ४ खंड २

स होवाच बालाकिर्य एवैष आदित्ये पुरुषस्तमेवाहमुपास इति । तं होवाचाजातशत्रुर्मामैतस्मिन् समवादयिष्ठाः बृहन् पांडरवासा अधिष्ठाः सर्वेषां भूतानां मूर्धेति वा अहमेतमुपास इति । स यो हैतमेवमुपास्तेऽधिष्ठाः सर्वेषां भूतानाम् मूर्धा भवति ॥२॥

**अर्थ**—तो बालाकि म्हणाला, "आदित्यांत जो हा पुरुष आहे त्याचीच मी उपासना करतों." त्याला अजातशत्रु म्हणाला, "तूं मला ह्याविषयीं बोलूं नकोस. [ समवादयिष्ठाः = सम्+वद्+णिच्+वैदिक लुङ् ] मोठा, पांढऱ्या वस्त्रांचा, सर्व भूतांचा आधार आणि मूर्धा म्हणजे सर्व भूतांमध्ये श्रेष्ठ असें ह्याला मानून मी ह्याची उपासना करतों. जो ह्याची ह्याप्रमाणे उपासना करतो, तो सर्व भूतांचा आधार आणि सर्व भूतांमध्ये श्रेष्ठ होतो. ॥२॥ हें फळ कमी दर्शवितें आहे असा भाव आहे.

**पाठविचार**—" अधिष्ठाः " हा पाठ १ मधील आहे. इतर ठिकाणीं " अतिष्ठाः " हा पाठ आहे. " अतिष्ठाः " व " मूर्धा " यांचा अर्थ एकच असल्यामुळे मीं " अधिष्ठाः " हा पाठ स्वीकारला.

" मैतस्मिन् " हा २ व ३ मधील पाठ आहे. १ मधील पाठ " मैनं तस्मिन् " असा आहे. पण पुढील खंडांत अशाच ठिकाणीं १ मध्येंहि " मैतस्मिन् " असाच पाठ असल्यामुळें येथेंहि तोच स्वीकारला आहे.

अध्याय ४ खंड ३

*स होवाच बालाकिर्य एवैष चंद्रमसि पुरुषस्तमेवाहं ब्रह्मोपास इति । तं होवाचाजातशत्रु मामैतस्मिन् समवादयिष्ठाः सोमो राजान्नस्यात्मेति वा अहमेतमुपास इति स यो हैतमेवमुपास्तेऽन्नस्यात्मा भवति ॥३॥*

**अर्थ**—तो बालाकि म्हणाला, " हा जो चंद्रांत पुरुष आहे त्याचीच ब्रह्म म्हणून मी उपासना करतों. " त्याला अजातशत्रु म्हणाला, " मला ह्याच्याविषयीं बोलवूं नकोस. सोम, राजा व अन्नाचा आत्मा म्हणजेच अन्नाचें कारण अथवा अन्न उत्पन्न करणारा असें ह्याला मानून मी ह्याची उपासना करतों. जो ह्याची ह्याप्रमाणें उपासना करतो तो अन्नाचा आत्मा म्हणजे अन्न उत्पन्न करणारा होतो. " त्याला अन्न भरपूर मिळतें असा भाव आहे. ॥३॥ हें फळ कमी दर्जाचें आहे असा भाव आहे.

**पाठविचार**—" राजान्नस्यात्मा " हा २ व ३ मधील पाठ होय. १ मधील पाठ " राजन्नस्यात्मा " असा आहे. तो उघडउघडच चूक आहे.

अध्याय ४ खंड ४

स होवाच बालाकिर्य एवैष विद्युति पुरुष एतमेवाहं ब्रह्मोपास इति । तं होवाचाजातशत्रुर्मामैतस्मिन् समवादयिष्ठाः तेजस्व्यात्मेति वा अहमेतमुपास इति स यो हैतमेवमुपास्ते तेजस्व्यात्मा भवति ॥४॥

अर्थ—तो बालाकि म्हणाला, "हा जो वीजेंत पुरुष आहे त्यालाच ब्रह्म समजून मी त्याची उपासना करतो." त्याला अजातशत्रु म्हणाला. "तूं मला ह्याविषयीं बोलवूं नकोस. ह्याला तेजस्वी आत्मा मानून मी ह्याची उपासना करतों. ह्याप्रमाणे जो ह्याची उपासना करतो तो तेजस्वी आत्मा होतो. ॥४॥ हें फळ कमी दर्जाचें आहे हा भाव आहे.

पाठविचार—"तेजस्व्यात्मा" हा १ ड १ मधील पाठ आहे १ व २ मध्ये "तेजस्यात्मा" असा पाठ आहे. तो चूक आहे हें उघडच आहे. ३ मध्ये "तेजस आत्मा" असा पाठ आहे तोहि घेता येतो. बृहदारण्यकांत तेजस्वि" असाच शब्द योजला आहे आणि "तेजस्यात्मा" हा "तेजस्व्यात्मा" ह्याचाच प्रमादपाठ असूं शकतो, म्हणून मी "तेजस्व्यात्मा" असा पाठ स्वीकारला.

अध्याय ४ खंड ५

स होवाच बालाकिर्य एवैष स्तनयित्नौ पुरुष एतमेवाहम् ब्रह्मोपास इति तं होवाचाजातशत्रुर्मामैतस्मिन् संवादयिष्ठाः शब्दस्यात्मेति वा अहमेतमुपास इति । स यो हैतमेवमुपास्ते शब्दस्यात्मा भवति ॥५॥

अर्थ—तो बालाकि म्हणाला, "विजेच्या गडगडांत जो पुरुष आहे, त्यालाच ब्रह्म समजून मी त्याची उपासना करतों." त्याला

अजातशत्रु म्हणाला, "तूं मला ह्याविषयीं बोलूं नकोस. त्याला शब्दाचा आत्मा मानून मी त्याची उपासना करतों. जो ह्याप्रमाणे ह्याची उपासना करतो तो शब्दाचा आत्मा होतो म्हणजे मोठयाने व स्पष्टपणें शब्द उच्चारूं शकतो." ॥५॥ हें फळ कमी दर्जाचें आहे हा भाव आहे.

टिप्पण—ह्या खंडास अनुरूप असा खंड बृहदारण्यकांत नाही. ह्याचें कारण मोठें गंभीर असेल असें वाटत नाही.

अध्याय ४ खंड ६

स होवाच बालाकिर्य एवैष आकाशे पुरुषस्तमेवाहमुपास इति । तं होवाचाजातशत्रुर्मामैतस्मिन् समवादयिष्ठाः पूर्ण-मप्रवर्ति ब्रह्मेति वा अहमेतमुपासे इति । स यो है तमेव-मुपास्ते पूर्यते प्रजया पशुभिर्नो एव स्वयं नास्य प्रजा पुराकालात्प्रवर्तते ॥६॥

अर्थ—तो बालाकि म्हणाला, "हा जो आकाशांत पुरुष आहे त्याचीच मी उपासना करतों." त्याला अजातशत्रु म्हणाला, "तूं मला ह्याविषयीं बोलूं नकोस. पूर्ण नाश न पावणारें (अप्रवर्ति) ब्रह्म म्हणून मी ह्याची उपासना करतों. जो ह्याची ह्याप्रमाणे उपासना करतो तो प्रजेने आणि पशूंनी भरविला जातो आणि तो स्वतः किंवा त्या प्रजा कालापूर्वी म्हणजे अकालीं मरत नाही." ॥६॥ हें फळ कमी दर्जाचें आहे हा भाव आहे.

अध्याय ४ खंड ७

स होवाच बालाकिर्य एवैषं वायौ पुरुषस्तमेवाहं उपास इति । तं होवाचाजातशत्रुर्मामैतस्मिन् समवादयिष्ठाः इंद्रो

वैकुंठोऽपराजिता सेनेति वा अहमेतमुपास इति । स यो हैतमेवमुपास्ते जिष्णुर्ह वाऽपराजयिष्णुरन्यतस्त्यजायी भवति ॥७॥

**अर्थ**—तो बालाकि म्हणाला, "वायूमध्ये जो हा पुरुष आहे त्याची मी उपासना करतों." त्याला अजातशत्रु म्हणाला, "तूं मला ह्याच्याविषयीं बोलूं नकोस. ह्याला इंद्र, वैकुंठ किंवा अपराजित सेना मानून मी त्याची उपासना करतों. तो दुसऱ्यास जिंकणारा, शत्रूला अजिंक्य, [अपराजयिष्णुः] आणि शत्रूला जिंकणारा असा होतो. ॥७॥ हें फळ कमी दर्जाचें आहे हा भाव आहे.

**पाठविचार**—"अन्यतस्त्यजायी" हा पाठ ३ मध्ये आहे. बृहदारण्यकांतहि असाच पाठ आहे. १ मध्ये "अन्यतस्त्य जाया" असा पाठ आहे व त्याचा अर्थहि तेथील टीकाकाराने "अन्यतस्त्यजायी" ह्याच्या अर्थासारखाच केला आहे. २ मध्ये "अन्यतस्त्यज्ज्यायान्" असा पाठ आहे. तो अधिक चांगला वाटतो. कारण त्याचा अर्थ "तर मग किंवा अर्थात् [तन्] दुसऱ्यापेक्षा मोठा" असा आणि मागच्या "जिष्णु" ह्याच्या अर्थाहून भिन्न असा अर्थ करतां येतो. मूळ पाठ "अन्यतस्त्यज्ज्यायान्" असाच असेल असेंहि वाटतें.

**टिप्पण**—अन्यतस्त्यजायी = अन्यतस्त्यान् शत्रून् जेतुं शीलं यस्य सः । "अन्यतस्त्यजाया" ही दा प्रत्ययांत प्रथमा समजावी.

**अध्याय ४ खंड ८**

स होवाच बालाकिर्य एवैषोऽग्नौ पुरुषस्तमेवाहमुपास इति । तं होवाचाजातशत्रुर्मैतस्मिन् समवादयिष्ठाः विषासहिरिति वा अहमेतमुपास इति । स यो हैतमेवमुपास्ते विषासहिर्वा एष भवति ॥८॥

**अर्थ**—तो बालाकि म्हणाला, "अग्नीमध्ये जो हा पुरुष आहे त्याचीच मी उपासना करतों." त्याला अजातशत्रु म्हणाला, "तूं मला ह्याविषयीं बोलूं नकोस. शत्रूला दुःसह असें ह्याला मानून मी ह्याची उपासना करतों. जो ह्याप्रमाणे ह्याची उपासना करतो तो शत्रूंना दुःसह होतो." ॥८॥ हें फळ कमी दर्जाचें आहे असा भाव आहे.

**पाठविचार**—"विषासहिः" हाच पाठ सर्वत्र आहे. बृहदारण्यकांतहि हाच पाठ आहे. ३ मध्ये ह्याचा अर्थ "दुःसहो अन्यै." असाहि केला आहे. पण हा अर्थ कसा येतो याचा विचार केला नाही. मला वाटतें की मूळ पाठ "द्विषासहिः" असा असावा व त्याचा अर्थ मी वर केल्याप्रमाणे "द्विषैः असहिः असह्यः दुःसहः" असा असावा.

अध्याय ४ खंड ९

स होवाच बालाकिर्य एवैषोऽप्सु पुरुषस्तमेवाहमुपास इति । तं होवाचाजातशत्रुर्मामैतस्मिन् समवादयिष्ठाः अन्नस्यात्मेति वा अहमेतमुपास इति । स यो हैतमेवमुपास्ते अन्नस्यात्मा भवति । इत्यधिदैवतम् । अथाध्यात्मम् ॥९॥

**अर्थ**—तो बालाकि म्हणाला, "हा जो पाण्यांत पुरुष आहे त्याचीच मी उपासना करतों." त्याला अजातशत्रु म्हणाला, "तूं मला ह्याविषयीं बोलूं नकोस. ह्याला अन्नाचा आत्मा समजून मी ह्याची उपासना करतों. ह्याप्रमाणे ह्याची जो उपासना करतो तो अन्नाचा आत्मा म्हणजे उत्पत्तिकर्ता होतो." (हें फळ कमी दर्जाचें आहे हा भाव आहे.)

येथपर्यंत शरीराबाहेरील देवतांच्या उपासनांविषयीं सांगितलें. आता शरीराशीं संबद्ध असलेल्या देवतांच्या उपासनांविषयीं सांगतों.

**पाठविचार**—" अन्नस्यात्मा " हा पाठ मी कल्पिला आहे. १ मध्ये " नाम्नोऽस्यात्मा " असा पाठ आहे. २ मध्ये " नाम्नास्यात्मा " असा पाठ आहे आणि ३ मध्ये " नाम्न आत्मा " असा पाठ आहे. १ व २ मधील पाठ अशुद्ध आहेत हें उघडच आहे. ते शुद्ध करण्याकरितांच ३ मधील पाठ कल्पिला गेला असें दिसतें. पण त्याने चांगला अर्थ होत नाही. कारण पाण्याचा आणि नामाचा कांहीच संबंध नाही. पाण्याचा मात्र अन्नाशीं, पाण्यानेच अन्न उत्पन्न होतें हा संबंध आहे म्हणून मी " अन्नस्यात्मा " असा पाठ कल्पिला. १ व २ मधील पाठात " स्य " हें अक्षर आहेच. " म्न " हें अक्षर " न्न "चा पाठभ्रंश होऊन होऊं शकतें. म्हणून मूळ पाठ " अन्नस्यात्मा " असावा हेंच संभवतें. " अन्नस्यात्मा " असा प्रयोग खंड ३ मध्ये आहेच, त्यानेहि माझ्या कल्पनेस पुष्टिच मिळते.

बृहदारण्यकांतील पाण्याविषयींच्या खंडांत पाण्यांतील पुरुषाला " प्रतिरूप " मानलें आहे. कौषितकींतील ह्या नवव्या खंडांत बदल करण्याचें कारण " अन्नस्यात्मा " हें फळ मागे तिसऱ्या खंडांत आलें आहे तेंच येथे पुनः सांगणें बृहदारण्यककर्त्यास योग्य वाटलें नाही हेंच दिसतें. ह्यावरूनहि मूळ पाठ " अन्नस्यात्मा " असाच ठरतो.

**टिप्पणी**—कौषितकीच्या नवव्या खंडांत बृहदारण्यककाराने बदल कां केला हा प्रश्न सोडविणें जरूर आहे. " अन्नस्यात्मा " हें फळ कौषितकीच्या तिसऱ्या खंडांत सांगितलें आहे, तेंच बृहदारण्यकांतहि " नास्यान्नं क्षीयते " ह्या शब्दांनी सांगितलें आहे, तेंच पुनः सांगणें बृहदारण्यककर्त्यास आवडलें नाही. म्हणून त्याने दुसरें फळ सांगितलें असावें. पाण्यांत प्रतिबिंबहि [प्रतिरूप] दिसतें ह्यावरून हें दुसरें फळ बृहदारण्यककर्त्याने सांगितलें. पण तें फळ कौषितकीच्या

दहाव्या खंडांत सांगितलें तेंच होय आणि तें तर अध्यात्म विभागांत पडतें. म्हणून बृहदारण्यकांत " इत्यधिदैवतम् । अथाध्यात्मम् " हे शब्द गाळले आणि कौषितकीच्या दहाव्या खंडांतील फळाऐवजी " रोचिष्णुर्भवति " म्हणजे चकचकणारा होतो असें फळ सांगितलें. कारण पाण्यांतील प्रतिबिंबापेक्षा आरशांतील प्रतिबिंब जास्त चकचकित असतें. ह्यावरूनहि दिसतें की कौषितकीच्या ह्या प्रकरणांत सुधारणा करूनच बृहदारण्यकांतील अनुरूप प्रकरण बनविलें. ( सुधारणा योग्य किंवा अयोग्य हा प्रश्न निराळा.)

अध्याय ४ खंड १०

स होवाच बालाकिर्य एवैष आदर्शे पुरुषस्तमेवाहमुपास इति । तं होवाचाजातशत्रुर्मैतस्मिन् समवादयिष्ठाः प्रतिरूप इति वा अहमेतमुपास इति । स यो हैतमेवमुपास्ते प्रतिरूपो हैवास्य प्रजायामाजायते नाप्रतिरूपः ॥१०॥

अर्थ—तो बालाकि म्हणाला, " आरशांत जो हा पुरुष आहे, त्याची मी उपासना करतों." त्याला अजातशत्रु म्हणाला, " मला तूं ह्याविषयीं बोलवूं नकोस. प्रतिरूप म्हणजे प्रतिबिंब समजून मी ह्याची उपासना करतों. ह्याप्रमाणे जो ह्याची उपासना करतो त्याच्या संततीमध्ये त्याचा प्रतिरूप असाच जन्मतो. अप्रतिरूप जन्मत नाही." ॥१०॥ हें फळ कमी दर्जाचें आहे असा भाव आहे.

अध्याय ४ खंड ११

स होवाच बालाकिर्य एवैष प्रतिश्रुत्कायां पुरुषः तमेवाहमुपास इति । तं होवाचाजातशत्रुर्मैतस्मिन् समवादयिष्ठाः द्वितीयोऽनपग इति वा अहमेतमुपास इति । स यो

हैतमेवमुपास्ते विंदते द्वितीयं द्वितीयवान् भवति ॥११॥

**अर्थ**—तो बालाकि म्हणाला, "मनुष्याच्या आवाजाच्या प्रतिध्वनींत [प्रतिश्रुत्कायाम्] जो पुरुष आहे त्याचीच मी उपासना करतों." त्याला अजातशत्रु म्हणाला, "मला तूं ह्याविषयी बोलवूं नकोस. सोडून न जाणारा दुसरा (म्हणजे मदतगार किंवा बायको) म्हणून मी ह्याची उपासना करतों. ह्याप्रमाणे जो ह्याची उपासना करतो त्याला दुसरा मिळतो. तो द्वितीयवान् होतो." ॥११॥ हें फळ कमी दर्जाचें आहे असा भाव आहे.

**पाठविचार**—"द्वितीयं" हा १ मधील पाठ आहे. २ व ३ मध्ये "द्वितीयात्" असा पाठ आहे. तेथे त्याचा अर्थ "भार्याशरीरात्" असा करून "द्वितीयं" हें पद अध्याहृत घेतलें आहे. ह्या पाठांत अध्याहाराची गरज पडते म्हणून हा अग्राह्य आहे.

**अध्याय ४ खंड १२**

स होवाच बालाकिर्य एवैष शब्दः पुरुषमन्वेति तमेवाहमुपास इति । तं होवाचाजातशत्रुर्मामैतस्मिन् समवादयिष्ठाः असुरिति वा अहमेतमुपास इति । स यो हैतमेवमुपास्ते नो एव स्वयं नास्य प्रजा पुराकालात् संमोहमेति ॥१२॥

**अर्थ**—तो बालाकि म्हणाला, "हा जो शब्द म्हणजे आवाज उच्चारण्याची शक्ति नेहमी मनुष्याबरोबरच असते [अन्वेति] त्याचीच मी उपासना करतों." त्याला अजातशत्रु म्हणाला, "तूं मला ह्याविषयी बोलवूं नकोस. "असु" म्हणजे श्वासोच्छ्वास म्हणून मी ह्याची उपासना करतों. जो ह्याप्रमाणे ह्याची उपासना करतो तो स्वतः किंवा त्याची प्रजा कालापूर्वी म्हणजे अकालीं संमोहाला म्हणजे मृत्यूला प्राप्त होत नाही." ॥१२॥ हें फळ कमी दर्जाचें आहे असा भाव आहे.

पाठविचार—"असुः" हा २ व ३ मधील पाठ होय. १ मध्ये "आयुः" असा पाठ आहे व तोच अधिक योग्य आहे; कारण त्याचाच अर्थ श्वासोच्छ्वास असा आहे आणि शब्दोच्चारणास श्वासोच्छ्वासाचीच गरज असते.

टिप्पण—ह्या अध्यायांत शेवटीं जरी प्राणाचीच उपासना सांगितली आहे, तरी ती "प्राण" हा "प्रज्ञेचा" आत्मा म्हणजे जागृतींतील चैतन्याचा आत्मा म्हणून करावयाची उपासना होय. श्वासोच्छ्वास झोपेंतहि चालू शकतो आणि सर्वकाळ झोपेंत राहूनहि प्राण कायम राहूं शकतो. एकूण ह्या खंडांतील उपासना श्वासोच्छ्वास-युक्त प्राणाची होय आणि अध्यायाच्या शेवटीं सांगितलेली उपासना जागृतियुक्त प्राणाची होय. आणि म्हणूनच येथील फळ केवळ आयुष्य आहे आणि तेथील फळ अमृत म्हणजेच आनंद आहे. तेथे तें "सर्वेषां भूतानां श्रैष्ठ्यं स्वाराज्यमाधिपत्यं" ह्या शब्दांनी सांगितलें आहे.

अध्याय ४ खंड १३

स होवाच बालाकिर्य एवैष छायायां पुरुषस्तमेवाहमुपास
इति । तं होवाचाजातशत्रुर्मैतस्मिन् समवादयिष्ठाः मृत्यु-
रिति वा अहमेतमुपास इति । स यो हैतमेवमुपास्ते नो एव
स्वयं नास्य प्रजा पुराकालात्प्रमीयते ॥१३॥

अर्थ—तो बालाकि म्हणाला, "मनुष्याच्या उन्हांतील सावलींत जो पुरुष आहे त्याची मी उपासना करतों." त्याला अजातशत्रु म्हणाला, "तूं मला ह्याविषयीं बोलूं नकोस. मृत्यु म्हणून मी ह्याची उपासना करतों. जो ह्याची ह्याप्रमाणे उपासना करतो, तो स्वतः किंवा त्याची प्रजा अकालीं मरत नाहीं." ॥१३॥ हे फळ कमी दर्जाचें आहे असा भाव आहे.

अध्याय ४ खंड १४

स होवाच बालाकिर्य एवैष शारीरः पुरुषः तमेवाह-मुपास इति । तं होवाचाजातशत्रुर्मामैतस्मिन् समवादयिष्ठाः प्रजापतिरिति वा अहमेतमुपास इति । स यो हैतमेवमुपास्ते प्रजायते प्रजया पशुभिः ॥१४॥

अर्थ—तो बालाकि म्हणाला, "ह्या शरीरांत जो पुरुष आहे. त्याचीच मी उपासना करतों." त्याला अजातशत्रु म्हणाला, "मला तूं ह्याच्याविषयीं बोलूं नकोस. प्रजापति म्हणजे प्रजा उत्पन्न करणारा म्हणून मी ह्याची उपासना करतों. जो ह्याप्रमाणे ह्याची उपासना करतो तो प्रजेने आणि पशूंनी वाढतो." ॥१४॥ हें फळ कमी दर्जाचें आहे, असा भाव आहे.

अध्याय ४ खंड १५

स होवाच बालाकिर्य एवैष प्राज्ञ आत्मा येनैतत्सुप्तः स्वप्न्यया चरति तमेवाहमुपास इति । तं होवाचाजातशत्रुर्मा-मैतस्मिन् समवादयिष्ठाः यमो राजेति वा अहमेतमुपास इति । स यो हैतमेवमुपास्ते सर्वं हास्मै इदं श्रैष्ठ्याय यम्यते ॥१५॥

अर्थः—तो बालाकि म्हणाला, "ज्यामुळे [ येन ] ह्याप्रमाणे [ एतत् ] निजलेला [ सुप्तः ] झोप आणणाऱ्या नाडीनें [ स्वप्न्यया ] फिरतो त्या ह्या झोपेंतल्या आत्म्याचीच [ प्राज्ञ आत्मा ] मी उपासना करतों." त्याला अजातशत्रु म्हणाला, "तूं मला ह्याविषयीं बोलूं नकोस. ह्याला यम म्हणजे नियमन करणारा व राजा म्हणजे अधिकार चालविणारा समजून मी ह्याची उपासना करतों. जो ह्याप्रमाणें ह्याची उपासना करतों, त्याला श्रेष्ठत्व देण्याकरितां [ श्रैष्ठ्याय ] हें सर्व जग

त्याच्या काबूंत ठेवलें जातें [ यम्यते ]. " ॥१५॥ हें फळ कमी दर्जाचें आहे असा भाव आहे.

टिप्पणी —" प्राज्ञ आत्मा " मांडुक्योपनिषदांत झोपेंतील आत्म्याला " प्राज्ञ " म्हटलें आहे, ह्यावरून " प्राज्ञ आत्मा " म्हणजे " झोपेंतील आत्मा " हा अर्थ निश्चित आहे.

" यमो राजा " मांडुक्योपनिषदांतहि झोपेंतील आत्म्याला सर्वेश्वर म्हटलें आहे.

कौषितक्युपनिषदांतील १५ ते १७ ह्या तीन खंडांना अनुरूप अशीं वर्णनें बृहदारण्यकांत नाहीं. ह्या तीन खंडांत प्राज्ञ आत्मा म्हणजे झोप, उजव्या डोळ्यांतील आत्मा म्हणजे जागृति आणि डाव्या डोळ्यांतील आत्मा म्हणजे स्वप्न ह्या उपास्यांचा विचार केला आहे व ते हलके ठरविले आहेत. कारण कौषितकीकारास हे प्राणावरच अधिष्ठित असल्यामुळे प्राणाचेंच श्रेष्ठत्व स्थापन करावयाचें आहे. बृहदारण्यककर्त्यास जागृतीचेंच श्रेष्ठत्व स्थापावयाचें आहे म्हणून त्यानें हीं तीन उपास्यें गाळून अजातशत्रूच्या भाषणांत " स यथोर्णनाभिः " इत्यादि वाक्यांत जागृतीचेंच वर्णन केलें. येथे कौषितकी आणि बृहदारण्यक ह्यांमधील वादाच्या स्वरूपाचें विवरण करणें जरूर आहे. आनंदाचा अनुभव हें मनुष्याचें परम साध्य आहे. आणि तो आनंदाचा अनुभव जागृतींतच येऊं शकतो, पण जागृति ही प्राणावर अवलंबून आहे. कारण प्राण शरीरास जिवंत ठेवील तरच जागृति संभवते. उलट जागृतींतील आनंदानुभवामुळेच अर्थात् त्या आनंदामुळेच प्राणाची म्हणजेच आयुष्याची वृद्धि होते. म्हणून प्राण म्हणजे आयुष्य वाढविणें हेंच कौषितकीकाराप्रमाणें परम साध्य मानलें तरी त्याकरितां जागृतींतील आनंदाकरितां खटपट करावीच लागेल. म्हणजे (१) स्वानंदभावनम्

(२) अद्वैतभावनम् ह्या आमच्या सूत्रांत* सांगितल्याप्रमाणेहि वागावें लागेलच. आणि जागृतींतील आनंद हेंच बृहदारण्यककाराप्रमाणे परम साध्य मानलें तरी प्राण कायम ठेवण्याकरिता (१) विषयानंदत्याग आणि (२) सत्कर्म च ह्या आमच्या सूत्रांत* सांगितल्याप्रमाणेहि वागावें लागेलच. ह्यावरून दिसतें की प्राण वाढविणें किंवा जागृतींतील आनंद अनुभवणें ह्यापैकी कोणतेंहि परम साध्य मानलें तरी वरील चारहि सूत्रांप्रमाणे वागावें लागेल. म्हणजे परिणाम एकच आहे. म्हणून कौषितकी व बृहदारण्यक ह्यांमधील वाद केवळ तात्त्विक स्वरूपाचा आहे. (academical). अर्थात् निरर्थक आहे. प्राणाशिवाय जागृति असूं शकत नाही. म्हणून प्राण हेंच परम साध्य ठरतें असें कौषितकीकाराचें म्हणणें आहे व तें त्याने पुढील १९ व २० ह्या खंडांत सांगितलें आहे. सुषुप्तांमध्ये जागृतीच्या आनंदानुभवाशिवायच प्राण चांगल्या रीतीने राहतो आणि झोपेंतहि असेंच होतें. पण ह्या दोनहि ठिकाणीं आनंद असला तरी आनंदाचा अनुभव नाही. आनंदानुभव जागृतींतच असतो म्हणून जागृतींतील आनंदानुभव हेंच परमसाध्य होय असें बृहदारण्यककर्त्याचें म्हणणें आहे आणि तें त्याने आपल्या विसाव्या खंडांत सांगितलें आहे. दोघांमधील वादाचें जें हें विवरण केलें आहे त्या दृष्टीने बालाकि व अजातशत्रु ह्यांमधील हे वाद वाचल्यास त्यांचा बोध चांगला होईल.

अध्याय ४ खंड १६

स होवाच बालाकिर्य एवैष दक्षिणेऽक्षन् पुरुषस्तमेवाह-मुपास इति। तं होवाचाजातशत्रुर्मामैतस्मिन्। समवादयिष्ठाः नाम्न आत्माऽग्नेरात्मा ज्योतिष आत्मेति वा अहमेतमुपास

---

* उपनिषदांचा उपसंहार प्यारे ९८ ते १०६ पहा.

इति। स यो हैतमेवमुपास्ते एतेषां सर्वेषाम् आत्मा भवति ॥१६॥

**अर्थ**—तो बालाकि म्हणाला, "ह्या दक्षिण डोळ्यांत जो पुरुष आहे त्याची म्हणजे जागृतींतील पुरुषाची मी उपासना करतों." त्यावर अजातशत्रु त्याला म्हणाला, "तूं मला ह्याविषयीं बोलूं नकोस, मी ह्याला नांवांचा [ नाम्नः ] म्हणजे वाणीचा आत्मा, कर्माचा [ अग्नेः ] आत्मा आणि ज्ञानाचा [ ज्योतिषः ] आत्मा समजून ह्याची उपासना करतों. जो ह्याप्रमाणें ह्याची उपासना करतो तो ह्या तिन्हींचा आत्मा होतो. म्हणजे वाणी, कर्म आणि ज्ञान ह्यांत कुशल होतो." ॥१६॥ हें फळ कमी दर्जाचें आहे असा भाव आहे.

**पाठविचार**—"अग्नेः" "ज्योतिषः" हे १ व २ मधील पाठ आहेत. २ मध्ये "अग्निः" आणि "ज्योतिष" असे पाठ आहेत. त्यांचा चांगलासा अर्थ होत नाही म्हणून ते अग्राह्य आहेत.

**टिप्पणी**—दक्षिणेऽक्षन् पुरुषः—मनुष्य जागृति, स्वप्न व निद्रा ह्या तीन अवस्था अनुभवीत असतो. त्या प्रत्येक अवस्थेत आत्मा कोठे कोठे असतो तें ऐतरेयोपनिषदाच्या चवथ्या अध्यायाच्या तिसऱ्या खंडातील "अयमावसथो अयमावसथो अयमावसथो" हीं वाक्यें म्हणतांना मोठ्याने दाखवावयाचें असतें. तीं स्थानें अनुक्रमें डोळे, कंठ आणि हृदय हीं होत असें ब्रह्मोपनिषदांतील "नेत्रे जागरितं विद्यात्कंठे स्वप्नं समाविशेत्। सुषुप्तं हृदयस्थं तु तुरीयं मूर्ध्नि संस्थितम् ॥२१॥ ह्या वचनावरून दिसतें. जागृति, स्वप्न, सुषुप्ति ह्या तीन अवस्थांचीं स्थानें नेत्र, कंठ, हृदय होत हें मानणें योग्यच आहे. कारण जागृतीमध्येच नेत्र उघडे असतात, आणि सुषुप्तीमध्ये फक्त हृदयानीच म्हणजे शरीराच्या मधल्या भागाचीच क्रिया म्हणजे रक्ताभिसारण, श्वासोच्छ्वास आणि अन्नपचन ह्या क्रिया चालूं असतात, हातपाय व मेंदू

यांच्या क्रिया बंद असतात. म्हणून नेत्र व हृदय हीं अनुक्रमें जागृति व निद्रा यांचीं स्थानें ठरतात. जागृति व निद्रा यांमध्ये स्वप्न असतें, त्याप्रमाणेच नेत्र व हृदय यांमध्ये कंठ आहे म्हणून निद्रेंतून जागृतींत येतांना स्वप्नांत जातो. त्याप्रमाणेच हृदयांतून नेत्रांत जातांना आत्मा कंठांतून जातो. अर्थात् कंठ हें स्वप्नाचें स्थान असें ठरतें. (श्री-शंकराचार्यांनी वरील ऐतरेयोपनिषदांतील वचनाच्या भाष्यांत दक्षिण-नेत्र, अंतर्मन आणि हृदय हीं जागृति, स्वप्न आणि निद्रा यांचीं स्थानें सांगितलीं आहेत. त्यांतलें अंतर्मन हें थोडानें दाखवितां येण्याजोगें नसल्यामुळे चूक दिसतें.) नेत्र हें जागृतीचें स्थान एवढें यावरून निश्चित दिसतें. पण येथे खंड १६ व १७ मध्ये दक्षिण नेत्र आणि सव्य नेत्र असा विवेक केला आहे, त्यावरून उजवा डोळा हें जागृतीचें स्थान आणि डावा डोळा हें स्वप्नाचें स्थान असें मानावें लागतें आणि त्यास एक पोषक प्रमाणहि असें आहे की पुढील १७ व्या खंडांतील सव्य नेत्रांतील पुरुषाला "तैजस आत्मा" असें म्हटलें आहे आणि मांडूक्योपनिषदांतहि स्वप्नांतील आत्म्याला "तैजस" म्हटलें आहे. छांदोग्योपनिषद् ४।१५ येथे आणि ८।७ येथे दक्षिण डोळा व सव्य डोळा असा विवेक केला नाही. तथापि बृहदारण्यकोप-निषद् २।३ येथे आणि ४।२ येथे दक्षिण नेत्र व सव्य नेत्र असा विवेक केला आहे. पण तेथील विवेकाचें कारण कौषितकींतील विवेकाच्या कारणाहून भिन्न आहे. तेथे दक्षिण डोळ्यांतील पुरुष म्हणजे महात्म्याची जागृति आणि सव्य डोळ्यांतील पुरुष म्हणजे केवळ जागृति असा अर्थ आहे आणि येथे कौषितकींमध्ये दक्षिण डोळ्यांतील पुरुष म्हणजे जागृति व सव्य डोळ्यांतील पुरुष म्हणजे स्वप्न असा अर्थ आहे. दोन्ही उपनिषदांत "दक्षिण" व "सव्य" या शब्दांत श्लेष आहे. "दक्षिण" म्हणजे चांगला, कुशल, हुशार, विद्वान् आणि "सव्य" म्हणजे वाईट असे दुसरे अर्थ आहेत हें उघड आहे,

"नाम्नः" "अग्नेः", "ज्योतिषः"—जागृतींतच मनुष्य बोलूं शकतो, प्रेरणापूर्वक कर्मे (Volutionary acts) करूं शकतो, आणि जाणूं शकतो म्हणून नाम्नः, अग्नेः आणि ज्योतिषः यांचा अर्थ अनुक्रमें वाणी कर्म आणि ज्ञान असा केला पाहिजे. "नाम्नः" ह्याचा अर्थ "वाणी" हें उघडच आहे. "अग्नि" ही कर्मांची देवता होय असें ईशावास्योपनिषद् श्लोक १६-१९ आणि कठोपनिषद् १।१२-१७ ह्यावरून दिसतें म्हणून अग्नि म्हणजे कर्मे असा अर्थ ठरतो. ज्ञानाला, ज्योतिष् म्हणजे प्रकाश म्हणणें हें उपपन्नच आहे.

अध्याय ४ खंड १७

स होवाच बालाकिर्य एवैष सव्येऽक्षन् पुरुषस्तमेवाहमुपास इति । तं होवाचाजातशत्रुर्मामैतस्मिन् समवादयिष्ठाः सत्यस्यात्मा विद्युत आत्मा तेजस आत्मेति वा अहमेतमुपास इति स यो हैतमेवमुपास्ते एतेषां सर्वेषामात्मा भवति ॥१७॥

**अर्थः**—तो बालाकि म्हणाला, "सव्य डोळ्यांत हा जो पुरुष आहे त्याची म्हणजे स्वप्नांतील पुरुषाची मी उपासना करतों." त्यावर अजातशत्रु त्याला म्हणाला, "तूं मला याविषयीं बोलवूं नकोस. सत्याचा म्हणजे खरेपणाचा, विजेचा म्हणजे चपलपणाचा आणि तेजाचा म्हणजे शक्तीचा आत्मा म्हणून मी त्याची उपासना करतों. जो ह्याप्रमाणें त्याची उपासना करतो तो ह्या सर्वांचा म्हणजे खरेपणा, चपलपणा आणि शक्ति ह्यांचा आत्मा होतो." ॥१७॥ हें फळ कमी दर्जाचें आहे असा भाव आहे.

*टिप्पण*—स्वप्नांतील देखावे व अनुभव मनाची व शरीराची खरी स्थिति दाखवितात म्हणून स्वप्नांत खरेपणा असतो. स्वप्नांतील सर्व घडामोडी विजेसारख्या चपलतेनें घडतात म्हणून स्वप्नांत चपलता

असते. अशक्य वाटणाऱ्या गोष्टीहि स्वप्नांत घडतात म्हणून स्वप्नांत शक्ति ही असतेच.

अध्याय ४ खंड १८

तत उ ह बालाकिस्तूष्णीमास । तं होवाचाजातशत्रु-रेतावन्नु बालाकी इति । एतावद्धीति होवाच बालाकिः । तं होवाचाजातशत्रुर्मृषा वै किल मा संवदिष्ठाः ब्रह्म ते ब्रवाणीति । स होवाच यो वै बालाक एतेषां पुरुषाणां कर्ता यस्य वै तत्कर्म स वै वेदितव्यः । तत उ ह बालाकिः समित्पाणिः प्रतिचक्रामोपायानीति । तं होवाचाजातशत्रुः प्रतिलोमरूपमेव स्यात् यत् क्षत्रियो ब्राह्मणमुपनयेत् एहि व्येव त्वा ज्ञपयिष्यामि इति । तं ह पाणावभिपद्य प्रवव्राज । तौ ह सुप्तं पुरुषमीयतुः । तं हाजातशत्रुरामंत्रयांचक्रे बृहन् पांडरवासः सोमराजन्निति । स उ ह तूष्णीमेव शिश्ये । तत उ हैनं यष्ट्या विचिक्षेप । स तत एव समुत्तस्थौ । तं होवाचाजातशत्रुः क्वैष एतद्बालाके पुरुषोऽशयिष्ट क्वैतद-भूत् कुतएतदागात् इति । तदुह बालाकिर्न विजज्ञौ ॥१८॥

**अर्थ**—त्यानंतर बालाकि उगाच राहिला. तेव्हा त्याला अजातशत्रु म्हणाला, "तुला एवढेच का शिकवावयाचें होतें ?" बालाकि म्हणाला, "होय एवढेच." तेव्हा अजातशत्रु म्हणाला, "तर मग मी तुला ब्रह्म शिकवितों हें तूं मला खोटेंच सांगितलेंस." तो अजातशत्रु पुढे म्हणाला, "हे जे उपास्य पुरुष तूं मला सांगितलेस त्या पुरुषांना ज्याने उत्पन्न केलें [ कर्ता ] आणि त्या पुरुषांचें कर्म [ तत्कर्म ] वास्तविक ज्याचें कर्म होय तोच ( म्हणजे प्राणच ) जाणून घेतला पाहिजे."

तेव्हा (तो जो जाणून घेतला पाहिजे तो बालाकीस माहीत नसल्यामुळे) बालाकि "मला तुझ्याकडे शिकण्यास येऊं दे [उपयानीति]" असें म्हणत अजातशत्रूकडे हातांत समिधा घेऊन आला [प्रतिचक्राम]. तेव्हा अजातशत्रु त्याला म्हणाला, "क्षत्रियाने ब्राह्मणास शिकवावें [उपनयेत्] हे उलटें आहे [प्रतिरूपमिव], तथापि ये मी तुला शिकवितोंच" [एव]. नंतर अजातशत्रूने बालाकीचा हात धरला आणि चालूं लागला. ते दोघे एका झोपीं गेलेल्या मनुष्याजवळ आले. त्याला अजातशत्रूने "हे बृहन्, हे पांडरवासा, हे सोमराजा" अशी हाक मारली. तथापि तो तसाच गुपचिप निजून राहिला. तेव्हा अजातशत्रूने त्याला काठीने मारलें [विचिक्षेप] तेव्हा तो उठून उभा राहिला. तेव्हा बालाकीला अजातशत्रूने विचारलें, "हे बालाके, हा पुरुष, ह्याप्रमाणे [एतत्] कोठे निजला होता, हा पुरुष ह्याप्रमाणे [एतत्] कोठे होता, आणि हा पुरुष ह्याप्रमाणे कोठून आला?" ते बालाकीला माहित नव्हतें. ॥१८॥

**पाठविचार**--"स वै" हा ३ व २ मधील पाठ आहे. १ मध्ये "संवैः" असा पाठ आहे. तो उघडच अग्राह्य आहे.

"विचिक्षेप" हा २ व ३ मधील पाठ आहे. १मध्ये 'च विक्षेप असा पाठ आहे. तो उघडच अग्राह्य आहे.

"विजज्ञौ" हा २ मधील पाठ आहे. ३ मध्ये "विजज्ञे" असा पाठ आहे तोहि ग्राह्यच आहे. पण १ मध्ये "विजिज्ञौ" असा पाठ आहे तो व्याकरणदृष्टया अशुद्ध आहे.

"तदुह" हा २ मधील पाठ आहे. "तत उ ह" असा पाठ १ मध्ये आहे. ह्या दोनहि पाठांचा चांगला अर्थ होत नाही म्हणून ते अग्राह्य आहेत.

"आगात्" हा ३ मधील पाठ आहे. १ व २ मध्ये "अगात्" असा पाठ आहे. तो अग्राह्य आहे हें उघडच आहे.

टिप्पणी—"यस्य वै तत्कर्म" हें वाक्य व्याससूत्र "जगद्वाचित्वात्" १ । ४ । १६ येथें घेऊन त्याचा अर्थ "तत् म्हणजे जगत् हें ज्याचें कर्म आहे तें ब्रह्म" असा केला आहे. पण हा अर्थ अग्राह्य आहे. एकतर "तत्" ह्याच्यामागें लवकरच "पुरुष" म्हणजे बालाकीनें सांगितलेले १६ "उपास्य पुरुष" हा शब्द आहे. म्हणून "तत्" हें सर्वनाम त्या पुरुषांचेंच वाचक असलें पाहिजे. दुसरें श्रीव्यासांच्या अर्थाप्रमाणें "यो वै एतेषां पुरुषाणां कर्ता" आणि "यस्य वै तत् कर्म" ह्या दोघांच्या अर्थामध्ये बहुतेक कांही फरकच रहात नाही. तिसरें, हें प्रकरण खरोखर ब्रह्माचें नसून प्राणाचें आहे हें "अथास्मिन् प्राण एवैकधा भवति" ह्या पुढील खंडांतील वाक्यावरून उघड आहे. "समित्पाणिः" हातांत समिधा घेऊन जाणें हें तेव्हां शिष्यत्वाचें लक्षण समजत असत.

अध्याय ४ खंड १९

तं होवाचाजातशत्रुर्यत्रैष एतद्बालाके पुरुषोऽशयिष्ट यत्रैतदभूत् यत एतदागात् हिता नाम हृदयस्य नाड्यो हृदयात्पुरीततमभिप्रतन्वंति यथा सहस्रधा केशो विपाटितस्तावदण्व्यः पिंगलस्याणिम्ना तिष्ठंति शुक्लस्य पीतस्य लोहितस्य च तासु तदा भवति यदा सुप्तः स्वप्नं न कंचन पश्यति । अथास्मिन् प्राण एवैकधा भवति । तदैनं वाक् सर्वैर्नामभिः सहाप्येति चक्षुः सर्वै रूपैः सहाप्येति श्रोत्रं सर्वैः शब्दैः सहाप्येति मनः सर्वैर्ध्यातैः सहाप्येति । स यदा प्रतिबुध्यते यथाग्नेर्विस्फुलिंगा विप्रतिष्ठेरन्नेवमेतस्मादात्मनः प्राणा यथायतनं विप्रतिष्ठंते प्राणेभ्यो देवा देवेभ्यो लोकाः । तद्यथा क्षुरः क्षुरधाने हितः स्यात् विश्वंभरो वा

विश्वंभरकुलाये एवमेवैष प्रज्ञात्मेदं शरीरमनुप्रविष्ट आ-लोमभ्य आनखेभ्यः ॥१९॥

**अर्थ**—त्याला अजातशत्रु म्हणाला, "हे बालाके, जेथे हा पुरुष ह्याप्रमाणे निजला होता, जेथे ह्याप्रमाणे हा होता आणि जेथून ह्याप्रमाणे हा आला, त्या हिता नावाच्या हृदयाच्या नाडी होत. त्या नाडी हृदयापासून पुरीततपर्यंत म्हणजे हृदयाच्या आवरणापर्यंत पसरलेल्या आहेत. केशाचे हजार भाग केले असतां [ विपाटितः ] केशाजितक्या बारीक होईल तितक्या त्या बारीक आहेत आणि त्या पिंगल, पीत, शुक्ल आणि लोहित रंगाच्या सूक्ष्म रसाने [ अणिम्ना ] त्या भरलेल्या असतात. झोपी गेलेला मनुष्य जेव्हा कोणतेंच स्वप्न पाहत नाही तेव्हा तो त्या नाडीमध्ये असतो आणि [ अथ ] ह्या प्राणातच मिळून गेलेला असतो [ एकधा भवति ]. त्या वेळीं वाणी सर्व शब्दांसह त्या प्राणात जाऊन मिळते, डोळा सर्व रूपांसह त्या प्राणांत जाऊन मिळतो, कान सर्व आवाजासह त्या प्राणात जाऊन मिळतो आणि मन सर्व ध्येयांसह त्या प्राणात जाऊन मिळतें. आणि तेव्हा तो पुनः जागा होतो तेंव्हा अग्नींतून स्फुलिंग म्हणजे ठिणग्या बाहेर पडतात त्याप्रमाणे ह्या प्राणरूपी आत्म्यांतून प्राण म्हणजे निरनिराळ्या इंद्रियांतील प्राण आपल्या आपल्या ठिकाणीं जाण्याकरितां [ यथायतनम् ] बाहेर पडतात, त्या प्राणांतूनच देव म्हणजे त्या इंद्रियांच्या ज्ञानकर्मशक्ति बाहेर पडतात आणि देवांमधूनच लोक म्हणजे जग बाहेर पडतें. ( देवांनाच मागे प्रज्ञामात्रा आणि लोकांना भूतमात्रा म्हटलें आहे. ) वस्तरा ज्याप्रमाणे वस्तऱ्याच्या घरांत म्हणजे त्या घराच्या एका भागांत ठेवलेला असतो, किंवा अग्नि [ विश्वंभरः ] जसा लाकडांत [ विश्वंभर कुलाये ] लाकडाच्या सर्व भागांत ठेवलेला असतो,- त्या दोनहिं प्रमाणे प्रज्ञेचा आत्मा हा प्राण शरीरांत नखापर्यंत आणि केसापर्यंत प्रविष्ट झालेला आहे. ॥१९॥

**पाठविचार**—"यनेष" हा २ व ३ मधील पाठ होय. १ मधील पाठ "यमेवैष" असा आहे. तो अर्थाशीं जुळत नाही म्हणून अग्राह्य आहे.

"आगात्" हा ३ मधील पाठ होय. १ व २ मध्ये "अगात्" असा पाठ आहे. तो अर्थातच अग्राह्य आहे.

"विपादितः" हा २ व ३ मधील पाठ होय. १ मध्ये "विपतितः" असा पाठ आहे. तो उघडच अग्राह्य आहे.

"क्षुरधाने" हा ३ मधील पाठ आहे. १ मध्ये "क्षुरधावे" आणि २ मध्ये "क्षुरध्माने" असे पाठ आहेत ते उघडच अग्राह्य आहेत.

"हितः स्यात्" हा २ मधील पाठ आहे. ३ मध्ये "अवहितःस्यात्" असा पाठ आहे तोहि अग्राह्य नाही. १ मध्ये "होतस्यास्त" असा पाठ आहे तो "हितः स्यात्" ह्याचाच भ्रष्ट पाठ दिसतो.

"प्रज्ञात्मा" हा ३ ए आणि ग येथील पाठ आहे. ३ ए मध्ये तर "स एव प्राण एव प्रज्ञात्मा" असाच पाठ आहे. १ व २ मध्ये "प्राज्ञ आत्मा" असा पाठ आहे. तोहि पाठ घेऊन त्याचा अर्थ "प्रज्ञात्मा" ह्याच्या अर्थासारखाच घेण्यास हरकत नाही. ३ मध्ये "प्रज्ञ आत्मा" असा पाठ आहे. त्याचा अर्थ "जीवात्मा" असा होतो. तो संदर्भाशीं म्हणजे "प्राणे एवैकधा भवति" ह्याशीं जुळत नाही. म्हणून "प्रज्ञ आत्मा" हा पाठ अग्राह्य आहे. प्राणाला "प्रज्ञात्मा" असें विशेषण मागें अनेक ठिकाणीं म्हणजे २।९, ३।१, ३।२ येथे लाविलें आहे म्हणून "प्रज्ञात्मा" हाच खरा पाठ असला पाहिजे.

**टिप्पण**—"विश्वंभर" आणि "विश्वंभरकुलायः" ह्यांचा अर्थ श्रीशंकराचार्यांनी बृहदारण्यकांत १।४।७ येथे केला आहे त्याप्रमाणेच येथे अर्थ घेतला आहे. ३ मधील भाष्यांतहि तसाच अर्थ

घेतला आहे प्राण हाच प्रज्ञेचा आत्मा असल्यामुळे तोच सर्वश्रेष्ठ उपास्य आहे असा ह्या व मागील खंडाचा भाव आहे

अध्याय ४ खंड २०

६। तमेतमात्मानमेत आत्मानोऽन्ववस्यंति यथा श्रेष्ठिन स्वा । तद् यथा श्रेष्ठी स्वैर्भुंक्ते यथा वा स्वा श्रेष्ठिनं भुंजते एवमेवैष प्रज्ञात्मैतैरात्मभि भुंक्ते एव वै तमात्मानम् एते आत्मानो भुंजते । इंद्र एतमात्मानं न विजज्ञौ तावदेनमसुरा अभिबभूवु । स यदा विजज्ञावथ हत्वासुरान् विजित्य सर्वेषां भूतानां श्रैष्ठ्यं स्वाराज्यमाधिपत्यं परीयाय तथो एवैवं विद्वान् सर्वेषां भूतानां श्रैष्ठ्यं स्वाराज्यमाधिपत्यं पर्येति य एवं वेद य एवं वेद ॥२०॥

अर्थ—जसे एखाद्या श्रेष्ठीवर (श्रीमंत मनुष्यावर) त्याचे नोकर [स्वा] अवलंबून असतात तसे हे इंद्रियरूपी आत्मे ह्या प्राणरूपी आत्म्यावर अवलंबून असतात [अन्ववस्यंति] म्हणून [तद्] जसा श्रेष्ठी नोकरामुळे [स्वै] उपभोग घेतो आणि जसे त्याचे नोकर आपल्या श्रेष्ठीचा उपभोग घेतात तसेच प्रज्ञेचा आत्मा असलेला हा प्राण ह्या इंद्रियरूपी आत्म्यामुळे उपभोग घेतो आणि हे इंद्रियरूपी आत्मे त्या प्राणाचा उपभोग घेतात जोपर्यंत इंद्राला या प्राणरूपी आत्म्याचें ज्ञान झालें नव्हतें तोंपर्यंत असुर त्याचा पराभवच करीत होते जेव्हा त्या इंद्राला या प्राणरूपी आत्म्याचें ज्ञान झालें तेव्हा त्याने असुराला मारून व जिंकून सर्वभूतामध्ये श्रेष्ठत्व, स्वाराज्य आणि आधिपत्य मिळविलें (आत्मज्ञानातच मग्न राहून प्राणरक्षणकर्मांकडे लक्ष न दिल्यामुळे इंद्राचा पराभव होत

असे असा भाव आहे. ऐतरेयोपनिषदांत १।१ मध्ये आणि व्याससूत्र "अनभिभवं च दर्शयति" ३।४।३५ यांतहि असेंच सांगितलें आहे.) त्याप्रमाणेच हें जो जाणील तो सर्वभूतामध्ये श्रेष्ठपणा आणि आधिपत्य मिळवितो. ॥२०॥

पाठविचार—"तमेतमात्मानमेत आत्मानोऽन्ववस्यंति" हा ३ मधील पाठ आहे. १ मधील पाठ "तमेतमात्मानमेवमात्मनोऽन्वपश्यंति" असा पाठ आहे व २ मधील पाठ "तमेतमात्मानमेतमात्मनोऽन्ववस्यति" आहे. ३ मधीलच पाठ शुद्ध आहे. "तद्यथा श्रेष्ठी......भुंजते" हा पाठ ३ वरून घेतला आहे. तेथील परस्मैपदाऐवजी मी आत्मनेपद घेतलें एवढाच फरक केला. याचें कारण उघडच आहे.

# ऐतरेयोपनिषद्

**काल व कर्ता:**—ह्या उपनिषदाचा कर्ता " महिदास ऐतरेय " होय असें दिसतें. ह्याचा निर्देश ह्याच उपनिषदात दोन ठिकाणीं ( अ. १ खंड ८ व अ. ३ ख. ७ ) आला आहे आणि छांदोग्यात एका ठिकाणीं ( अ. ३ खं. १६ ) तो ११६ वर्षे वांचला असें म्हटलें आहे. दास हें पद शूद्रालाच लावितात ( मनुस्मृति २ । ३१, ३२ व त्यावरील कुल्लुकभट्टाची टीका पहा) आणि त्याच्या आईचें नांव " इतरा " म्हणजे द्विजातीहून भिन्न असें होतें ह्यावरून तो ब्राह्मणाच्या शूद्र स्त्रीचा पुत्र असून मोठा विद्वान् झाला व त्यानें ऐतरेय ब्राह्मण आणि ऐतरेय आरण्यक ( ह्यातच ऐतरेय उपनिषद् आहे ) हे ग्रंथ केले असें दिसतें. छांदोग्योपनिषदात ह्या ग्रंथकाराचा निर्देश आहे ह्यावरून हें उपनिषद् छांदोग्यापूर्वीचें असावें असें दिसतें.

**घटनेची योजना**—ह्याचे एकूण सात अध्याय आहेत. पहिल्याचे आठ, दुसऱ्याचे चार, तिसऱ्याचे आठ आणि चवथ्याचे तीन खंड आहेत पहिल्या अध्यायाचा पहिला खंड हा सर्व ग्रंथाचा अर्थ समजण्याची किल्ली आहे. कारण त्यात ज्ञानकर्मसमुच्चय प्रतिपादला आहे. पहिल्या तीन अध्यायांत कर्माचें, पुढच्या चार अध्यायांत ज्ञानाचें व एकूण ज्ञानकर्मसमुच्चयाचें प्रतिपादन आहे. पहिल्या तीन अध्यायांवर श्रीशंकराचार्यांचें भाष्य उपलब्ध नाही. उपनिषद् ब्रह्मयोगी ह्यांचें भाष्य सर्व सातहि अध्यायांवर आहे तें अड्यारप्रतींत छापलें आहे. Keith नेंहि इंग्रजी भाषांतरासह सुंदर प्रत छापली आहे.

अध्याय १ खंड १

एष पंथा एतत्कर्म एतद्ब्रह्मैतत्सत्यम् । तस्मान्न प्रमाद्येत् तन्नातीयात् । न ह्यत्यायन् पूर्वे येऽत्यायंस्ते परा बभूवुः । तदुक्तमृषिणा "प्रजा ह तिस्रो अत्यायमीयुः । न्यन्या अर्कमभितो विविश्रे ॥ बृहद्ध तस्थौ भुवनेष्वंतः ॥" प्रजा ह तिस्रो अत्यायमीयुरिति या वै ता इमाः प्रजास्तिस्रो अत्यायमायंस्तानीमानि वयांसि वंगावगधाश्चेरपादाः । न्यन्या अर्कमभितो विविश्र इति ता इमाः प्रजा अर्कमभितो निविष्टा इममेवाग्निम् । बृहद्ध तस्थौ भुवनेष्वंतरितीयद् उ एष बृहद्भुवनेष्वं तरसावादित्यः । पवमानो हरित आविवेश इति वायुरेव पवमानो दिशो हरित आविष्टः ॥१॥

अर्थः—ह्याच पुढे सांगितलेला (ज्ञानकर्मसमुच्चयरूपी) मार्ग आहे. हेंच कर्म म्हणजे कर्तव्य आहे. हेंच ब्रह्म म्हणजे ब्रह्मप्रापक आहे आणि हेंच सत्य म्हणजे सत्या सिद्धीला म्हणजे आनंदाला प्राप्त करून देणारें आहे. त्या रस्त्यापासून चुकूं नये. त्याला टाकून देऊन भटकूं नये. पूर्वीच्या लोकांनी ह्या मार्गास टाकलें नाही. ज्यांनी टाकलें त्यांचा पराभव झाला म्हणजे त्यांना वाईट स्थिति प्राप्त झाली. हेंच ऋषीने म्हणजे ऋग्वेद ८।९०।१४ येथे पुढील वचनांत सांगितलें आहे. तें वचन असें:—

"प्रजा ह तिस्रो अत्यायमीयुः ।
न्यन्या अर्कमभितो विविश्रे ॥
बृहद्ध तस्थौ भुवनेष्वंतर ।
पवमानो हरित आविवेश" ॥

अर्थ—"तीन प्रकारच्या प्रजांनी चुकी केली. चूक न करणाऱ्या दुसऱ्या [न्यन्या] प्रजा समोरून म्हणजे सूर्यासमोर तोंड करून [अभितः] सूर्यांत म्हणजे आत्म्यांत प्रवेश करत्या झाल्या [विविश्रे = विविशिरे]. तो हा मोठा सूर्य भुवनांतच सर्वत्र आहे आणि शुद्ध करणारा [पवमानः] वायु म्हणजे प्राण हा देखील सर्व दिशांना [हरितः] व्यापून राहिलेला आहे." (आता ह्या ऋचेचा एक एक पाद घेऊन त्याचें विवरण उपनिषत्काराने केलें आहे.) "प्रजा [redacted] तिस्रो अत्याय-मीयुः" ह्यांत ज्या तीन प्रकारच्या प्रजांनी चुकी केली असें सांगितलें आहे त्या (१) पक्षी (२) वंग म्हणजेच वनग म्हणजे मोठीं झाडें, व अवगध म्हणजेच अवगाध म्हणजे लहान झाडें, एकूण सर्व स्थावर वनस्पति आणि (३) "इरपादाः" म्हणजेच "उरःपादाः" म्हणजे उराने चालणारे सर्प वगैरे होत. (येथे परोक्षवाद आहे हें उघड आहे. ह्याचें विवरण असें. ज्ञानकर्मसमुच्चय हा जो मार्ग आहे त्यांत चूक करणारे तीन प्रकारचे होतात. (१) केवळ कर्म करणारे, (२) ज्ञान किंवा कर्म कांहीच न करणारे आणि (३) कर्म न करतां किंवा फारच थोडें कर्म करून केवळ ज्ञानाचा आश्रय करणारे. ह्यांनाच अनुक्रमें पक्षी, वनस्पति व सर्प म्हटलें आहे, कारण त्यांचें ह्याशीं साम्य आहे. येथे हें लक्षांत ठेवलें पाहिजे की पक्षी हे नेहमीं कर्मे करीत असतात, वनस्पतींमध्ये ज्ञान किंवा कर्म कांहीच नाही आणि सर्प फारच थोडें कर्म करतात म्हणून पक्ष्यांमध्ये ज्ञान नाही आणि सर्पांमध्ये फक्त ज्ञानच आहे असें मानलें आहे.) "न्यन्या अर्कमभितो विविश्रे" ह्याचा अर्थ असा की ह्या दुसऱ्या म्हणजे चुकी न करणाऱ्या म्हणजे ज्ञानकर्मसमुच्चयमार्गाने जाणाऱ्या प्रजा (म्हणजे मनुष्य) ह्या सूर्यांत म्हणजे ह्याच अग्नींत म्हणजे ह्या शरीरांत पेटणाऱ्या व प्रकाशणाऱ्या आत्म्यांत समोरून प्रवेश करत्या झाल्या. (मांडुक्यांत "संविशत्यात्मनात्मानम्" असें अखेरीस म्हटलें आहे. त्यांतीलच अर्थ येथेहि

आहे. म्हणजे आत्म्याच्या अत्यंत उन्नतावस्थेस पोचतो असा अर्थ आहे.) "बृहद् तस्थौ भुवनेष्वंतर्" ह्याचा अर्थ असा की, ज्यांत त्या प्रजा प्रवेश करतात तो हा मोठा आदित्य म्हणजे आत्मा सर्व भुवनांमध्ये म्हणजे शरीरांमध्ये आंतल्या भागांत आहे. "पवमानो हरित आविवेश" ह्याचा अर्थ असा की, पवमान म्हणजे शुद्ध करणारा वायु म्हणजे प्राण सर्व [हरितः] म्हणजे दिशांमध्ये प्रवेश करून राहिला आहे. ॥१॥

टिप्पण—ह्या खंडांत ज्ञानकर्मसमुच्चयाचें महत्त्व वर्णिल्यानंतर पुढील ग्रंथांत कर्माचें महत्त्व पटविण्याकरितां अन्नाचें व प्राणाचें महत्त्व वर्णिलें आहे. कारण कर्मानींच अन्न उत्पन्न होतें आणि कर्मानींच प्राणाचें रक्षण होतें. पुढील खंडांत अन्नाचें महत्त्व वर्णिलें आहे.

अध्याय १ खंड २

उक्थमुक्थमिति वै प्रजा वदंति तदिदमेवोक्थमियमेव पृथिवीतो हीदं सर्वमुत्तिष्ठति यदिदं किं च । तस्याग्निरर्कोऽन्नमशीतयोऽन्नेन हीदं सर्वमश्नुते । अंतरीक्षमेवोक्थम् अंतरीक्षं ह्या अनुपतन्त्यन्तरीक्षमनुधावयंति तस्य वायुरर्कोऽन्नमशीतयो अन्नेन हीदं सर्वमश्नुते । असावेव द्यौरुक्थममुतः प्रदानाद्धीदं सर्वमुत्तिष्ठति यदिदं किं च तस्यासावादित्योऽर्कोऽन्नमशीतयोऽन्नेन हीदं सर्वमश्नुते । इत्यधिदैवतम् अथाध्यात्मम् । पुरुष एवोक्थमयमेव महान् प्रजापतिरहमुक्थमस्मीति विद्यात् । तस्य मुखमेवोक्थम् यथा पृथिवी तथा । तस्य वागर्को अन्नमशीतयोऽन्नेन हीदं सर्वमश्नुते । नासिके एवोक्थं यथांतरीक्षं तथा । तस्य प्राणोऽर्कोऽन्नमशीतयोऽन्नेन हीदं सर्वमश्नुते । तदेतदूष्मस्य विटपं यदेतन्नासिकाये विनतमिव । ललाटमेवो-

थय यथा यौस्तया तस्य चक्षुरर्कोऽन्नमशीतयोऽन्नेन हीद सर्वमश्नुते । समानमशीतयोऽध्यात्म चाधिदैवत चान्नमेवान्नेन हीमानि सर्वाणि भूतानि समनती ३ अन्नेनेम लोक जनयति अन्नेनामु तस्मात्समानमशीतयोऽध्यात्म चाधिदैवत चान्नमेव । तदिदमन्नमन्नादमियमेव पृथिवीतो हीद सर्वमुत्तिष्ठति यदिद किंच । यद्ध किंचेद प्रेती ३ इ तदसौ सर्वमत्ति यदु किंचात प्रैती ३ तदियं सर्वमत्ति सेयमियाचात्री । अत्ता हाचो भवति। न तस्येशे यन्नाधायद्वैनम् नाद्य ॥२॥

अर्थ—"उक्थ" "उक्थ" असें लोक [प्रजा] म्हणतात म्हणजे "उक्थ" "म्हणजे "स्तोत्र" ह्याच्या मागे लागून "स्तोत्रें" म्हणत नसतात तें सर्व व्यर्थ आहे, कारण खरें उक्थ तर ही पृथ्वीच आहे. कारण हें जें काही आहे तें सर्व हिच्यापासूनच उत्पन्न होतें. (येथे "उत्तिष्ठति यस्मात्तदुक्थम्" ह्या उक्थ शब्दाच्या निर्वचनावरून पृथिवी हीच खरें उक्थ असें अनुमान केलें आहे "उक्थ" ह्याचा रूढार्थ "स्तोत्र" असा आहे ) ह्या पृथ्वीरूपी उक्थाची देवता [अर्क] अग्नि म्हणजे उष्णता आहे (कारण उष्णतेच्या सयोगानेच पृथिवींत अन्न उत्पन्न होतें) आणि अन्न हेंच त्या पृथिवीरूपी उक्थाच्या 'अशीति' म्हणजे स्तोत्रें होत कारण अन्नानेच ह्या सर्वांचा मनुष्य उपभोग घेतो [समश्नुते] हें अतरीक्ष हेंहि एक उक्थ आहे कारण ह्यातच (पक्षी) पृथ्वीवरून उडून जातात [अनुपतति], आणि ह्यातच धावतात [धावयति] (म्हणजे पक्षी त्यात उत्थान करतात म्हणून अतरीक्ष उक्थ होय असा भाव ) त्या अतरीक्षाची वायु म्हणजे हवा ही देवता होय आणि हवेमुळे वाढणारें अन्न हें त्याचीं स्तोत्रें होत कारण अन्नानेच मनुष्य ह्या सर्वांचा उपभोग घेतो हा द्यौ हा एक

"उक्थ"च आहे. कारण त्यापासून [अमुतः] दान मिळाल्यामुळेच म्हणजे पाऊस पडल्यामुळे हें जें कांही आहे तें सर्व उत्पन्न होतें. त्या उक्थाची देवता आदित्य आहे (कारण त्यामुळेच वृष्टीने अन्न होतें). अन्न हें त्या उक्थाचीं स्तोत्रें होत कारण अन्नानेंच मनुष्य ह्या सर्वांचा उपभोग घेतो. ह्याप्रमाणें अधिदैवत म्हणजे शरीराबाहेरील उक्थें सांगितलीं. आता अध्यात्म म्हणजे शरीरांतील उक्थें सांगतों. पुरुष म्हणजे मनुष्य हाच उक्थ आहे. हा पुरुषच मोठा प्रजापति आहे. (कारण तो प्रजा उत्पन्न करतो.) त्याने मी उक्थ आहे असें जाणावें. त्या पुरुषाचें मुख हेंच पृथिवीसारखें उक्थ आहे. त्याची वाणी ही देवता आणि अन्न खाणें हींच स्तोत्रें होत कारण अन्नानेच मनुष्य सर्वांचा उपभोग घेतो. नाकपुड्या ह्या अंतरीक्षासारखें उक्थ आहेत. त्या उक्थाची प्राण म्हणजे खालीवर थोढली जाणारी हवा हीच देवता आणि अन्नांचा वास घेऊन बरें वाईट अन्न निवडणें हीच त्याची स्तोत्रें होत. कारण अन्नानेच मनुष्य सर्वांचा उपभोग घेतो. हें जें नाकपुड्याकरितां म्हणजे नाकपुड्या उंच येण्याकरितां खोल गेलें आहे तें ब्रध्नाचें म्हणजे सूर्याचें म्हणजे आरम्भाचें स्थान [विष्प] आहे. ललाट हेंच द्यौसारखें उक्थ आहे. त्याचा डोळा हीच देवता आहे. डोळ्याने अन्न शोधून काढणें हीच त्याचीं स्तोत्रें होत. कारण अन्नानेच मनुष्य सर्वांचा उपभोग घेतो. अधिदैवतांत किंवा अध्यात्मांत अन्न हें एकच [समानम्] स्तोत्र आहे. कारण अन्नानेच हीं सर्व भूतें जिवंत राहतात [समनंति]. अन्नानेच हा लोक उत्पन्न करतो म्हणजे ह्या लोकीं सुख मिळवितो आणि अन्नानेच म्हणजे अन्नदानानेच तो लोक उत्पन्न करतो म्हणजे त्या लोकीं सुख मिळवितो. म्हणून अधिदैवतांत किंवा अध्यात्मांत अन्न हें एकच स्तोत्र आहे. तें हें अन्न व त्या अन्नाला खाणारे हे सर्व पृथिवीच आहे कारण हिच्यापासूनच जें कांही आहे तें सर्व उत्पन्न होतें. जें कांही हें सूर्यांतून बाहेर निघतें [मितो १ ३] तें सर्व म्हणजे पाणी आणि उष्णता ही पृथिवी

खातें आणि जें काही ह्या पृथिवींतून [अत] निघतें [प्रैति] त्याला सर्व जगत् [तदिद सर्वम्—सर्व प्रतींत "तदियं सर्वं" असाच पाठ आहे तरी तो भ्रष्ट पाठ दिसतो त्याने समंजस अर्थ निघत नाही म्हणून "तदिद" असा पाठ घेऊन मी अर्थ केला आहे] खातें ती ही खाणारी [अत्री] पृथिवी ह्याप्रमाणें [इति] खाच [आद्या] होते खाणाराच खाच होतो जें कशालाहि खात नाही किंवा ज्याला कोणीच खात नाही, त्याच्या काबूत म्हणजे कह्यात [ईशे] कोणीच नसतो म्हणजे ज्याला कोणीच खात नाही किंवा जो कोणालाच खात नाही त्याला ईश्वरत्व प्राप्त होत नाही ॥२॥

एकूण ह्या खंडाचा भाव असा की अन्नाशिवाय अभीष्टसिद्धि नाही म्हणून केवळ स्तोत्रें म्हणत बसणें टाकून देऊन अन्न मिळविण्याकरिता कर्म करा.

**टिप्पणी**—अर्क अशीतय —महाव्रतयज्ञाची देवता अर्क म्हणजे सूर्य आहे. आणि ह्या यज्ञातच म्हणावयाच्या स्तोत्राचे एशी ऐंशी श्लोकाचे तीन सब आहेत म्हणून अर्क म्हणजे "देवता" आणि "अशीतय" म्हणजे स्तोत्रें असा अर्थ होतो किंवा अर्च्यते स अर्क म्हणजे देवता असाहि अर्थ होतो बृहदारण्यक १। २। ७ येथेहि "अर्क" ह्याचा असाच अर्थ आहे

"प्रेतां ३ इ" हे "प्रतें" ह्याचें प्लुतरूप पाणिनीय सूत्र ८। २। १०७ प्रमाणें झालें आहे प्रेतें हें "अदादि" इंर धातूचें रूप आहे "प्रेर्ता ३ इ" हा पाठ आनदाश्रम प्रतींतून व Keith च्या प्रतींतून दिला आहे इतरत्र "प्रेता ३ इ" असा पाठ आहे तो निरर्थक असल्यामुळे अग्राह्य आहे

"ईश"—म्हणजे "ईशत्व" काबू (mastery) असा अर्थ करावा लागतो. मुंडकात "अनीशया" (३।१।२) ह्यातील "ईशा" ह्याचा असाच अर्थ करावा लागला

मागील खंडांत अन्नाचें महत्त्व सांगितल्यानंतर आवा ह्या खंडांत कर्माचें महत्त्व सांगतात; कारण कर्माशिवाय अन्न उत्पन्न होत नाही. ह्या खंडांत "रेतः" म्हणजे "सत्व" "सार" Essence असा अर्थ आहे.

"अयातो रेतसः सृष्टिः। प्रजापतेः रेतो देवाः। देवानां रेतो वर्षम्। वर्षस्य रेत ओषधयः। ओषधीनां रेतोऽन्नम्। अन्नस्य रेतो रेतः। रेतसो रेतः प्रजाः। प्रजानां रेतो हृदयम्। हृदयस्य रेतो मनः। मनसो रेतो वाग्। वाचो रेतः कर्म। तदिदं कर्म कृतम्। अयं पुरुषो ब्रह्मणो लोकः। स इरामयो यद्धीरामयस्तस्माद्धिरण्मयः। हिरण्मयो वा अमुष्मिन् लोके संभवति हिरण्मयः सर्वेभ्यो भूतेभ्यो ददृशे य एवं वेद ॥३॥

अर्थ—आता सारांची उत्पत्ति सांगतों. प्रजापतीचें म्हणजे ब्रह्माचें सार देव म्हणजे अग्नि, वायु, सूर्य, पाणी वगैरे. त्या देवांचें सार पाण्याची वृष्टि. पाण्याच्या वृष्टीचें सार ओषधि. ओषधीचें सार अन्न. अन्नाचें सार रेत म्हणजे शुक्रधातु म्हणजेच बीज. रेताचें सार प्रजा म्हणजे पुत्र किंवा कन्या ही संतति म्हणजेच शरीर. शरीराचें सार हृदय म्हणजे अहंकार किंवा जीवात्मा. हृदयाचें सार मन. मनाचें सार वाणी म्हणजेच इच्छारूपी प्रेरणा (volition). (असें कर किंवा करूं नको असें इंद्रियांना आत्मा सांगतो, त्या सांगण्यालाच म्हणजे प्रेरणेलाच येथे वाणी म्हटलें आहे असें दिसतें. कारण तशा सांगण्याचेंच सार पुढील वाक्यांत म्हटल्याप्रमाणे "कर्म" होऊं शकतें.) वाणीचें म्हणजे प्रेरणेचें सार कर्म. तें हें कर्मच कृत म्हणजे मनुष्याचें कर्तव्य

होय. ( आपटयांच्या कोशांत 'कृत' ह्याचा एक अर्थ aim, object असाहि दिला आहे. त्याचा अर्थ कर्तव्यकर्म असाच आहे. "कृती" ह्या शब्दांतहि "कृत" ह्याचा अर्थ हाच आहे. हें कर्तव्य-कर्म करणारा पुरुषच [ अयम् ] ब्रह्म म्हणजेच परमानंद राहण्याचें ठिकाण [ लोकः ] आहे. म्हणजे अशा पुरुषांतच परम आनंद राहतो. असा पुरुषच इरामय म्हणजे अन्नमय असतो म्हणजे अशा पुरुषासच भरपूर अन्न खावयास व द्यावयास मिळतें. तो इरामय असतो त्यामुळेच तो हिरण्मय म्हणजे आनंदमय असतो. तो त्या लोकींहि हिरण्मयच संभवतो म्हणजे होतो. ज्यानें हें जाणलें तो सर्व भूतांना आनंदमयच म्हणजे आनंद देणाराच दिसला म्हणजे त्या आनंदमय पुरुषापासून सर्व भूतांना आनंदच होतो. ॥३॥

टिप्पण—"इरामयः"—टीकाकार उपनिषद् ब्रह्मयोगिन् ह्यानेंहि ह्याचा अर्थ "अन्नमय" असाच केला आहे.

"हिरण्मयः"—म्हणजे आनंदमय असा अर्थ दिसतो. "सुवर्णज्योति" ह्याचाहि तैत्तिरीय ३।१० येथे असाच अर्थ दिसतो.

अध्याय १ खंड ४

अन्न व कर्म ह्यांचें महत्त्व मागील खंडांत सांगितल्यानंतर आता ह्या व पुढील खंडांत प्राणाचें महत्त्व सांगतात. कारण प्राण असेल तरच कर्मे करतां येतात आणि अन्न पचवितां येतें.

"तं प्रपदाभ्यां प्रापद्यत ब्रह्मेमं पुरुषं यत्प्रपदाभ्यां प्रापद्यत ब्रह्मेमं पुरुषं तस्मात्प्रपदे तस्मात्प्रपदे इत्याचक्षते शफाः खुरा इत्यन्येषां पशूनां। तदूर्ध्वमुदसर्पत्ता ऊरू अभवताम्। उरु गृणीहीत्यब्रवीत्तदुदरमभवत्। उर्वेव मे कुर्वित्यब्रवीत्तदुरोऽभवत्। उदरं ब्रह्मेति शार्कराक्ष्या उपासते

इदयं प्रहेत्यारुणयो महादेव ता २ ३ । ऊर्ध्वं त्वेवोदसर्प-त्तच्छिरोऽश्रयत तच्छिरोऽभवत्तच्छिरसः शिरस्त्वम् । ता वा एताः शीर्षच्छ्रियः श्रिताः चक्षुःश्रोत्रं मनोवाक् प्राणः । श्रयंतेऽस्मिन् श्रियो य एवमेतच्छिरसः शिरस्त्वं वेद । ता अहिंसन्ताहमुक्थमस्म्युक्थमस्मीति ता अब्रुवन् हंतास्माच्छरी-राद्युत्क्रामाम तद्यस्मिन्न उत्क्रांत इदं शरीरं, पत्स्यति तदुक्थं भविष्यतीति । वागुदक्रामदवदन्नश्नन् पिबन्नास्तैव चक्षुरुद-क्रामत् अपश्यन्नश्नन् पिबन्नास्तैव श्रोत्रमुदक्रामदशृण्वन्नश्नन् पिबन्नास्तैव मन उत्क्रामन्मीलित इवाश्नन् पिबन्नास्तैव प्राण उदक्रामत् तत्प्राण उत्क्रांतेऽपद्यत । तदशीर्यताशारीती३ तच्छरीरमभवत्तच्छरीरस्य शरीरत्वम् । शीर्यते ह वा अस्य द्विषन् पाप्मा भ्रातृव्यः परास्य द्विषन् पाप्मा भ्रातृव्यो भवति य एवं वेद । ता अहिंसन्तैवाहमुक्थमस्म्यहमुक्थमस्मीति ता अब्रुवन् हंतेदं पुनः शरीरं प्रविशाम तद्यस्मिन्नः प्रपन्न इदं शरीरमुत्थास्यति तदुक्थं भविष्यतीति । वाक् प्राविशद-शयदेव चक्षुःप्राविशदशयदेव श्रोत्रं प्राविशदशयदेव मनः प्राविशदशयदेव प्राणः प्राविशत्तत्प्राणे प्रपन्ने उदतिष्ठदुक्थ-मभवत् । तदेतदुक्थं ३ प्राण एव । प्राण उक्थमित्येव विद्यात् । तं देवा अब्रुवन् त्वमुक्थमसि त्वमिदं सर्वमसि तव वयं स्मस्त्वमस्माकमसीति । तदप्येतदृषिणोक्तं त्वमस्माकं तव स्मसीति ॥४॥

अर्थ—त्या ह्या पुरुषांत [ तम् इमे पुरुषं ] ब्रह्म पायांच्या अग्रांकडून [ प्रपदाभ्याम् ] शिरलें. ज्या अर्थी ह्या पुरुषांत ब्रह्म

पायांच्या अग्राकडून शिरलें, त्या अर्थी "प्रापद्यत" ह्या शब्दावरून पायांच्या अग्रांना "प्रपदे" "प्रपदे" असें म्हणतात. अन्य पशूंमध्ये ब्रह्म शिरलेंच नाही म्हणून त्यांच्या पायांच्या अग्रांना शफ किंवा खुर असें म्हणतात (भाव असा की पसरट च्यापट पायांमुळेच मनुष्याला इतर प्राण्यापेक्षां श्रेष्ठत्व व ब्रह्म जाणण्याची शक्ति आली). तें ब्रह्म वर [उर्ध्व] सरकलें म्हणून ऊर्ध्व शब्दावरून त्या ऊरु म्हणजे मांड्या झाल्या. उरु म्हणजे त्वा [गृणीहि—आर्षप्रयोग आहे. शुद्धरूप "गिर" असें व्हावें] असें ब्रह्म म्हणालें तेव्हा तें उदर झालें. माझ्याकरितां उरु म्हणजे मोठी जागा कर असें ब्रह्म म्हणालें तेव्हा उरस् म्हणजे हृदय म्हणजे छाति झाली. शार्कराक्ष ऋषीचे शिष्य उदरच ब्रह्म समजून त्याची उपासना करतात. अरुणीचे शिष्य हृदयच (उरस् चाच प्रतिशब्द हृदय आहे.) ब्रह्म समजून त्याची उपासना करतात. ते म्हणजे शर्कराक्ष व अरुणीचे शिष्य [ता ३ इ = ते प्लुत स्वर शंकारहित्य दाखवितो. पाणिनीय सूत्र ८।२।१०७ पहा. पाणिनीय सूत्र ८।२।१०७ प्रमाणे अप्रगृह्य म्हणजे द्विवचन नसलेल्या 'ए'कारास च प्लुति होते. म्हणून "ता ३ इ" हें बहुवचनी "ते" चें प्लुत रूप मानावें. 'ते' म्हणजे शर्कराक्ष व अरुणीचे शिष्य. "ब्रह्मादेव" ह्याचा खरा पाठ "ब्रह्मैव" असा असण्याचा फार संभव आहे. असा पाठभेद कोठे आहे काय ह्याचा शोध व्हावा.] ब्रह्मांतच आहेत, म्हणजे ब्रह्मालाच प्राप्त झाले. [ब्रह्मा ह एवः—सर्व विभक्तिप्रत्ययाच्या ऐवजी वेदांमध्ये डा प्रत्यय लागतो. पाणिनीय सूत्र ७।१।३९ पहा. येथे 'ब्रह्मा' हें सप्तमीचें एकवचन मानावें.]. (ह्यांत संशय नाही). उरस् झालें तरी [त्वेव] तें ब्रह्म वरच सरकलें व त्याने शिराचा (डोक्याचा) आश्रय घेतला. ज्या अर्थी ब्रह्माने शिराचा आश्रय घेतला त्या अर्थी तें "श्रय" शब्दावरून. शिरस झालें म्हणजे डोक्याला "श्रय" शब्दावरून शिरस् हें नांव मिळालें. हेंच शिराचें शिरस्त्व होय. त्या ह्या श्रियः म्हणजे आनंददायक शक्ति म्हणजे डोळे,

कान, मन, वाणी आणि प्राण ह्या डोक्यांत ["शीर्षन्" हें लुप्तसप्तम्यंत पद मानलें पाहिजे] आश्रय घेऊन राहिल्या आहेत. जो हें शिराचें शिरस्त्व जाणतो, त्याच्या ठिकाणीं आनंद [श्रियः] आश्रय घेतात. (ह्याचा भाव असा आहे की जो डोळे वगैरे पांच शक्तींचा योग्य उपयोग करतो तो आनंदाचा अनुभव घेतो. Keith ने "श्रियः" ह्याचा अर्थ Delights असा केला आहे आणि बेलवेलकर आणि रानडे ह्यांनी Excellencies असा केला आहे. "धर्मरहस्यांत" आरंभींच 'श्रि'धातुपासून आनंदवाचक श्रिय, श्रेयस् व निःश्रेयस् हे शब्द झाल्याचें मी दाखविलेंच आहे म्हणून Keith चाच अर्थ मला मान्य मानला आहे.) त्या आनंददायक शक्ति मीच उक्थ आहे, मीच उक्थ आहे असा एकमेकींशीं तंटा करूं लागल्या [अहिंसंत]. त्या म्हणाल्या, आपण ह्या शरीरांतून निघून जाऊं. आपणापैकीं [नः] जी शरीरांतून निघून गेल्यामुळे शरीर पडेल [पत्स्यति] ती उक्थ होईल म्हणजे ठरेल. तेंव्हा वाणी शरीरांतून बाहेर निघून गेली, तरी न बोलत परंतु खात पीत शरीर उभेंच राहिलें. (असें मुक्यांमध्ये होतें). डोळे शरीरांतून निघून गेले तरी न पहात परंतु खात पीत शरीर उभेंच राहिलें (असें अंधळ्यांमध्ये होतें). मन शरीरांतून निघून गेलें तरी निजलेल्या मनुष्याप्रमाणे [मीलित इव; मील् म्हणजे डोळे झाकणें, ह्यावरून ज्यानें डोळे झाकले आहेत तो, म्हणजे निजलेला] विचार न करीत परंतु खातपीत शरीर उभेंच राहिलें (असें पिस्यांमध्ये होतें). प्राण शरीरांतून निघून गेले तेंव्हा मात्र शरीर खालीं पडलें [अपद्यत] (असें मनुष्य निजला म्हणजे होतें). प्राण शरीरांतून निघून गेले तेंव्हा तें पडलें एवढेंच नव्हे तर तें नाशहि पावलें [अशीर्यत] (कारण तें ज्ञानरहितहि झालें). तें नाश पावलें म्हणून "अशारि" ह्या शब्दावरून [अशारीति] तें शरीर झालें. हें शरीराचें शरीरत्व होय. हें जो जाणतो तो त्याचा शत्रु, आणि पापी चुलत भाऊ नाश पावतो व पराजित होतो [पराभवति]. एवढें झालें तरी त्या शक्तींचा मी उक्थ

आहे, मी उक्थ आहे हा वाद चालूच राहिला [ अहिंसंत एव ]. त्या म्हणाल्या, "अहो आपण ह्या शरीरांत पुनः प्रवेश करूं. ज्याने प्रवेश करतांच हें शरीर उठून उभें राहील तो उक्थ होईल म्हणजे ठरेल". तेव्हां वाणीने प्रवेश केला तरी शरीर निजूनच राहिलें. डोळ्याने प्रवेश केला तरी शरीर निजूनच राहिलें. कानाने प्रवेश केला तरी शरीर निजूनच राहिलें. मनाने प्रवेश केला तरी शरीर निजूनच राहिलें. ( हें सर्व स्वप्नामध्ये होतें ) नंतर प्राणाने प्रवेश केला. प्राणाने प्रवेश करतांच शरीर उठून उभें राहिलें (हें जागे होतांना होतें.) म्हणून प्राण उक्थ झाला म्हणजे ठरला. म्हणून हें उक्थ प्राणच होय. प्राण उक्थ होय हेंच जाणून घ्यावें. त्याला देव (म्हणजे इंद्रियें) म्हणाले, "तूं उक्थ आहेस; तूं हें सर्व आहेस; आम्ही तुझे आहोंत; व तूं आमचा आहेस." ऋषीने म्हणजे ऋग्वेदांत देखील म्हटलें की "तूं आमचा आहेस व आम्ही तुझे आहोत." ॥४॥

**टिप्पणी**—येथे आणि कौषितकी उपनिषद् २।९ येथे जो इंद्रियांचा वाद वर्णिला आहे तो खरोखरच घडणाऱ्या गोष्टींचें म्हणजे आंधळेपणा वगैरे व्यंगांचें, झोपेचें, स्वप्नाचें, आणि झोपेंतून जागे होण्याचें काव्यरूपी वर्णन आहे. आणि त्यावरून प्राणाचें महत्त्व ठरविलें आहे. कारण त्या गोष्टींवरून प्राण शरीरांत संचार करतो तेव्हांच शरीर कामें करूं शकतें असें ठरतें.

"उक्थाम् ३" "उक्थम्" ह्याचें प्लुत होऊन हें रूप झालें. पाणिनीय सूत्र ८।२।१०७ पहा.

"त्वमस्माकं तव स्मसि" हें वाक्य ऋग्वेद ८।८१।३२ येथे आहे. "स्मसि" हें "स्मः"चें छांदस रूप होय.

अध्याय १ खंड ५

ह्या खंडांतहि प्राणाचें महत्त्व पटवून देण्याकरितां प्राणाचा इंद्रियांशीं असलेला संबंध वर्णिला आहे.

"तं देवाः प्राणयंत स प्रणीतः प्रातायत प्रातायीर्ती ३ तत्प्रातरभवत् समागादिर्ती ३ तत्सायमभवत् अहरेव प्राणो रात्रिरपानः। वागग्निश्चक्षुरसावादित्यः चंद्रमा मनो दिशः श्रोत्रं स एष प्रहिताम् संयोगोऽध्यात्ममिमा देवता अद उ आविरधिदैवतमित्येतत्तदुक्तं भवति। एतद्ध स्म वै तद्विद्वानाह हिरण्यदन् वैदो 'न तस्येशे यन्मह्यं न दद्युरिति प्रहितां वा अहमध्यात्मे संयोगं निविष्टं वेद' एतद्ध तत्। अनीशानि ह वा अस्मै भूतानि बलिं हरंति य एवं वेद। तत्सत्यम् सत् इति प्राणः ति इत्यन्नम् यं इत्यसौ आदित्यः तदेतत्त्रिवृत्त्रिवृदिव वै चक्षुः शुक्लं कृष्णं कनीनिकेति। ▮ यदि ह वा अपि मृषा वदति सत्यं हैवास्योदितं भवति य एवमेतत्सत्यस्य सत्यत्वं वेद ॥५॥

अर्थ—त्या प्राणाला देवांनी म्हणजे इंद्रियांनी आपणाकडे ओढलें [प्राणयंत]. ओढला गेलेला तो ताणला गेला [प्रातायत:—'तन्' ह्या धातूचें कर्मणि लङ्]. तो ताणला गेला म्हणून प्रातायि ह्या शब्दावरून [प्रातायि इर्ती ३] ती 'प्रातः' झाली. म्हणजे तिला "प्रातः" असें म्हणूं लागले. तो ताणला गेलेला प्राण पुनः पूर्ववत् गोळा झाला म्हणजे आखुड झाला किंवा आकुंचला [समागात्] म्हणून "समागात्" ह्या शब्दावरून [समागात् इर्ती ३] ती "सायं" झाली म्हणजे तिला सायं म्हणूं लागले. इंद्रियांमध्यें ओढून घेतलेला प्राण [प्राणः—प्राणीयते स प्राणः] हा दिवसच होय आणि इंद्रियांमधून बाहेर काढून टाकलेला प्राण [अपानः—अप आनीय ते ▮ अपानः] ही रात्रिच होय. (येथें दिवस हा जागृतिचा वाचक आहे आणि रात्रि ही निद्रावाचक आहे. प्रातःकाल होणें म्हणजे जागे होणें आणि सायंकाळ होणें म्हणजे झोपी जाणें असा अर्थ आहे. प्राण जेव्हां पसरून मन, डोळे, कान वगैरे इंद्रियांना व्यापतो तेव्हां मनुष्य जागा होतो आणि

इंद्रियांचे व्यापार सुरू होतात आणि प्राण पुनः आखुड होऊन इंद्रियांतून निघून जातो तेव्हा मनुष्य निद्रित होतो आणि इंद्रियांचे व्यापार बंद होतात असा ह्या वाक्यांचा अर्थ आहे.) (ते देव कोणते तें आता सांगतात.) वाणी हीच अग्नि, चक्षु हाच आदित्य, मन हेंच चंद्रमा, आणि कान हेच दिशा. शरीरामध्ये घालून ठेवलेल्या [प्रहितां = प्रहितानाम्; "प्रहितां" हें पद "प्रहितानां" असें मानूनच अर्थ करावा लागतो. सर्वांनी असेंच केलें आहे.] अग्नि वगैरे देवतांचा हा संयोगच अध्यात्म होय आणि ह्या अग्नि वगैरे देवताच तें [अदः] प्रत्यक्ष दिसणारें [आविः] अधिदैवत होय, हें सांगितलेंहि आहे. तें जाणणारा [तद्विद्वान्] विदाचा पुत्र [वैदः] हिरण्यदन् नांवाचा ऋषि" (हिरण्याचे म्हणजे सोन्याचे दात ज्याचे आहेत तो) हें सांगता झाला. "जर [यत्] कोणाचीं इंद्रियें मला कांहीच देत नाहीत [दद्युः] तर त्यांच्या कायांत [ईशे] मी रहात नाही, असें प्राण म्हणतो [इति]. (प्राणास अन्नपाणी वगैरे दिल्याशिवाय प्राण कायम रहात नाही हाच अर्थ येथे आहे हें उघड आहे. "ईशे" ह्याचा अर्थ कसा करावा तें मागे ऐतरेय १ । २ येथे सांगितलेंच आहे.) शरीरामध्ये घालून ठेवलेल्या अग्न्यादि देवतांच्या शरीरांतील [अध्यात्मं] संयोगांत निविष्ट केलेला तो प्राण मी जाणतो" हेंच तें म्हणजे हिरण्यदन् वैदाचें म्हणणें आहे. जो हें जाणतो त्याला सर्व भूतें निरुपाय होऊन [अनीशानि] बलि देतात. तें अध्यात्म सत्य आहे. कारण "सत्" हा प्राण आहे, "ति" हें त्याचें अन्न आहे आणि "यं" हें हा आदित्य म्हणजे जीवात्मा होय. (अन्न व प्राण ह्यांवर ज्ञानशक्तिविशिष्ट आत्मा अवलंबून आहे असा भाव आहे). तें हें "त्रिवृत्" म्हणजे तिहेरी किंवा तीन दोऱ्यांनी वळलेला मोठा दोर असतो तसें आहे. डोळाहि "त्रिवृत्" असल्यासारखाच [त्रिवृदिव] आहे. कारण त्यांत पांढरा भाग, त्यांतील काळा भाग आणि त्या काळ्या भागांतील बाहुली [कनीनिका] असे तीन आहेत. जो हें

सत्याचें सत्यत्व जाणतो, तो खोटें बोलला तरी त्यांतून [तस्य] सत्यच बाहेर निघतें [उदितं भवति]. म्हणजे तो खोटें बोलला तरी सत्यार्थ म्हणजे प्राणरक्षणार्थच खोटें बोलतो, त्यामुळे त्यांतून सत्य म्हणजे प्राणरक्षणच उत्पन्न होतें. ।५॥

एकूण ह्या खंडाचा भावार्थ असा आहे की प्राण व अन्न ह्यावरच इंद्रियांचे व आत्म्याचे [आदित्याचे] ज्ञानरूपी व्यापार अवलंबून आहेत.

टिप्पण--" प्रातायीतीं ३ " आणि " समागादितीं ३ " ह्या दोन ठिकाणीं " ति " चा " तीं ३ " झाला तो कां ? व पुढील खंडांतील " नामनि " ह्याचा ' नामनीम् ' का झाला ?

" यन्महां " हा Keith च्या प्रतींतील पाठ आहे. अड्यारच्या प्रतींतील पाठ " यं महां " असा आहे. Keith च्या प्रतींतील पाठाचा अर्थ चांगला सहज होतो म्हणून तोच घेतला आहे.

" प्रहिताम् "--आर्षेय ब्राह्मणांत " प्रहितोः संयोजने " असा शब्दप्रयोग आहे. ह्यांत " प्रहितोः " हें ' प्रहित ' ह्याचें षष्ठीचें द्विवचन दिसतें. त्याप्रमाणे येथेहि " प्रहितां " हें " प्रहित " ह्याचें षष्ठीचें बहुवचन मानतां येतें. वेदांमध्ये अकारांत नामांची षष्ठी व सप्तमी केव्हा केव्हा ह्याप्रमाणे होते असें मानतां येतें. येथील माहिती Keith च्या टिप्पणावरून घेतली आहे.

अध्याय १ खंड ६

ह्या खंडांतहि प्राणाचेंच महत्त्व वर्णिलें आहे.

" तस्य वाक् तंतिर्नामानि दामानि तदस्येदं वाचा तंत्या नामभिर्दामभिः सर्वं सितं सर्वं हीदं नामनी३ सर्वं वाचाभिवदति । वहति ह वा एनं तंतिसंबद्धा य एवं वेद । तस्योष्णिग्लोमानि त्वगायत्री त्रिष्टुभ्मांसमनुष्टुप् स्नावा-

न्यस्थि जगती पंक्तिर्मज्जा प्राणो बृहती स छंदोभिश्छन्नो यच्छंदोभिश्छन्नस्तस्माच्छंदांसीत्याचक्षते । छादयंति ह वा एनं छंदांसि पापात्कर्मणो यस्यां कस्यांचिद्दिशि कामयते य एवमेतच्छंदसां छंदस्त्वम् वेद । तदुक्तमृषिणा । अपश्यं गोपां इत्येष वै गोपा एष हीदं सर्वं गोपायति । अनिपद्यमानमिति न ह्येष कदाचन संविशति । आ च परा च पथिभिश्चरंतमित्या च परा च पथिभिश्चरति । स सध्रीचीः स विषूचीर्वसान इति सध्रीचीश्च ह्येष विषूचीश्च वस्त इमा एव दिशः । आवरीवर्ति भुवनेष्वंतरिति एष ह्यंतर्भुवनेष्वावरीवर्ति । अथो आवृतासोऽवतासो न कर्तृभिरिति । सर्वं हीदं प्राणेनावृतम् । सोऽयमाकाशः प्राणेन बृहत्या विष्टब्धस्तद्यथायमाकाशः प्राणेन बृहत्या विष्टब्ध एवं सर्वाणि भूतानि आ पिपीलिकाभ्यः प्राणेन बृहत्या विष्टब्धानीत्येवं विद्यात् ॥६॥

अर्थ—वाणी ही त्या प्राणाने उत्पन्न केलेली [ तस्य ] दोरी [ तंति ] आहे. आणि नामें म्हणजे अर्थवान् शब्द त्या दोरीच्या गाठी (दामानि) आहेत. त्याच्या वाणीरूपी दोरीने आणि नामरूपी गाठींनी हें सर्व जग बांधलें गेलें आहे [ सितं ]. हें सर्व नामांतच [ नामनीम् इ = नामनि ] आहे. म्हणजे ह्या जगाचा सर्व व्यवहार नामामुळेच चालला आहे. कारण वाणीनेच सर्व सांगतो. जो हें जाणतो त्याला वाणीरूपी दोरीने बांधलेले दुसरे मनुष्य इष्टप्राप्तीकडे घेऊन जातात, म्हणजे जो वाणीचा योग्य उपयोग करतो त्याला इतर पुरुष त्याचें इष्ट प्राप्त करून देतात. वाणीरूपाने किंवा मंत्ररूपाने प्रगट होणाऱ्या त्या प्राणाचें [ तस्य ] उष्णिक् छंद हे केश आहेत, गायत्रीछंद ही त्वचा आहे, त्रिष्टुभ् छंद हें मांस आहे, अनुष्टुभ् छंद हे स्नायु [ स्नावानि ]

चक्षुषा सृष्टौ द्यौश्चादित्यश्च द्यौर्हास्मै वृष्टिमन्नाद्यं संप्रयच्छति आदित्योऽस्य ज्योतिः प्रकाशं करोति एवमेतौ चक्षुःपितरम् परिचरतो द्यौश्चादित्यश्च यावदनु द्यौर्यावदन्वादित्यस्तावानस्य लोको भवति नास्य तावल्लोको जीर्यते यावदेतयोर्न जीर्यते दिवश्चादित्यस्य च य एवमेतां चक्षुषो विभूतिं वेद ।

श्रोत्रेण सृष्टा दिशश्च चंद्रमाश्च दिग्भ्यो हैनमायतीश्च दिग्भ्यो विशृणोति चंद्रमा अस्मै पूर्वपक्षापरपक्षान् विचिनोति पुण्याय कर्मण एवमेते श्रोत्रं पितरं परिचरंति दिशश्च चंद्रमाश्च यावदनु दिशो यावदनु चंद्रमास्तावानस्य लोको भवति नास्य तावल्लोको जीर्यते यावदेतेषां न जीर्यते दिशां च चंद्रमसश्च य एवमेतां श्रोत्रस्य विभूतिं वेद । मनसा सृष्टा आपश्च वरुणश्चापो हास्मै श्रद्धां संनमंते पुण्याय कर्मणे वरुणोऽस्य प्रजां धर्मेण दाधारैवमेते मनः पितरं परिचरंत्यापश्च वरुणश्च यावदन्वापो यावदनु वरुणस्तावानस्य लोको भवति नास्य तावल्लोको जीर्यते यावदेतेषां न जीर्यतेऽपां च वरुणस्य च य एवमेतां मनसो विभूतिं वेद ॥७॥

अर्थः—आता ह्या पुरुषाच्या म्हणजेच विराट् पुरुषाच्या म्हणजे जगद्रूप धारण करणाऱ्या ब्रह्माच्या विभूति सांगतो. त्याच्या वाचेने म्हणजे प्रेरणेने (मागे खंड ३ मध्ये वाचा ह्याचा हाच अर्थ करावा लागला आहे.) पृथिवी व अग्नि म्हणजे उष्णता (मागे खंड २ मध्ये अग्नि म्हणजे उष्णता असा अर्थ करावा लागला आहे आणि तेथे जें अग्नीचें कार्य आम्ही सांगितलें तेंच येथे उपनिषदांत सांगितलें आहे.)

उत्पन्न केली. ह्या पृथिवीमध्ये औषधि उत्पन्न होतात आणि अग्नि त्या औषधींना पिकवितो [स्वदयति]. हें घ्या हें घ्या म्हणत ते पृथिवी व अग्नि आपल्या पितराची म्हणजे विराट् पुरुषाच्या वाणीची सेवा [परिचर्या] करतात. जो ह्या प्रकारची त्या वाणीची विभूति जाणतो त्याचा लोक (म्हणजे सुस्थिति) पृथिवी व अग्नि आहे तोपर्यंत असतो, आणि जोपर्यंत पृथिवी व अग्नि ह्यांचा लोक (म्हणजे सुस्थिति) नाश पावत नाही तोपर्यंत, त्याचा लोक नाश पावत नाही.

विराट् पुरुषाच्या प्राणाने अंतरीक्ष व वायु (म्हणजे हवा) उत्पन्न केलें. अंतरीक्षांतच जीव चालतात आणि अंतरीक्षांतूनच आवाज ऐकतात. वायूच ह्या जीवास [अस्मै] चांगला गंध पोचवितो. ह्याप्रमाणें हे अंतरीक्ष व वायु आपल्या पितराची म्हणजे विराट् पुरुषाच्या प्राणाची सेवा करतात. जो ह्या प्राणाचीहि विभूति जाणतो त्याचा लोक इत्यादि (पूर्वीप्रमाणें).

विराट् पुरुषाच्या डोळ्याने द्यौ आणि सूर्य उत्पन्न केले. द्यौ ह्याला वृष्टि आणि अन्न देते आणि सूर्य ह्याच्या (म्हणजे जीवाच्या) ज्योतीला म्हणजे डोळ्याला प्रकाश करतो (देतो). ह्याप्रमाणें ही द्यौ आणि हा आदित्य आपल्या पितराची म्हणजे विराट् पुरुषाच्या डोळ्याची सेवा करतात. जो ह्या डोळ्याची ही विभूति जाणतो त्याचा लोक इत्यादि (पूर्वीप्रमाणें).

विराट् पुरुषाच्या श्रोत्राने दिशा आणि चंद्र उत्पन्न केले. दिशांपासूनच दुसरा जीव ह्या जीवाकडे येतो [आयर्ती ३ = आयति = आ + इ (भ्वादि) + ति]. दिशांपासूनच जीव आवाज ऐकतो आणि चंद्र ह्याच्याकरितां पुण्य कर्में करण्यासाठी पूर्वपक्ष व अपरपक्ष म्हणजे शुक्लपक्ष व कृष्णपक्ष वेगळे करतो. ह्याप्रमाणें ह्या दिशा आणि हा चंद्र आपल्या पितराची म्हणजे विराट् पुरुषाच्या श्रोत्राची सेवा करतात. जो ह्या श्रोत्राची ही विभूति जाणतो त्याचा लोक इत्यादि (पूर्वीप्रमाणें).

१ विराट् पुरुषाच्या मनाने आपः म्हणजे कर्मे आणि वरुण म्हणजे धर्माचें अनुशासन करणारा अधिकारी निर्माण केला. आपः म्हणजे कर्मे ह्या जीवाला पुण्य कर्मे करण्याची श्रद्धा म्हणजे उत्कट इच्छा देतात [संनमंते] आणि वरुण ह्या विराट् पुरुषाने उत्पन्न केलेल्या [अस्य] प्रजांना धर्माने धरून ठेवतो [दाधार] म्हणजे रक्षण करतो. ह्याप्रमाणें हीं कर्मे आणि वरुण आपल्या पितराची म्हणजे विराट् पुरुषाच्या मनाची, सेवा करतात. जो ह्या मनाची विभूति जाणतो, त्याचा लोक कर्मे आणि वरुण आहे तोपर्यंत असतो आणि जोपर्यंत कर्मे आणि वरुण ह्यांचा लोक म्हणजे सुस्थिति नाश पावत नाही तोंपर्यंत त्याचा लोक नाश पावत नाही. ॥७॥

टिप्पणः—आपः—निघंटु २ मध्ये "अप्" हा शब्द कर्मवाचक सांगितला आहे. ईशावास्योपनिषदांत श्लोक ४ मध्ये 'अपः' म्हणजे 'कर्माणि' असा अर्थ करावा लागला आणि तैत्तिरीयोपनिषदांत भृगुवल्लींतील आठव्या अनुवाकांतहि "अपः" म्हणजे कर्माणि असाच अर्थ करावा लागला आहे.

"दाधार"—हें "दधार" ह्या लिटाच्या रूपाचें छांदस रूप. लिटाचा अर्थ लटासारखाच आहे.

अध्याय १ खंड ८

आपा२ इत्याप इति तदिदं आप एवेदं वै मूलमदस्तूलमयं पितैते पुत्रा यत्र ह क्व च पुत्रस्य तत्पितुर्यत्र वा पितुस्तद्वा पुत्रस्येत्येतत्तदुक्तं भवति । एतद्ध स्म तद्विद्वानाह महिदास ऐतरेय अहं मां देवेभ्यो वेद ओ मद्देवान् वेदेतः प्रदानां ह्येत इतः संभृता इति। स एष गिरिश्चक्षुः श्रोत्रं मनो वाक्प्राणस्तं ब्रह्मगिरिरित्याचक्षते । गिरति ह वै द्विषंतं पाप्मानं भ्रातृव्यं

परास्य द्विषन् पाप्मा भ्रातृव्यो भवति य एवं वेद । स एषो-ऽप्सु स एष प्राण स एष भूतिश्चाभूतिश्च । त भूतिरिति देवा उपासांचक्रिरे ते बभूवुस्तस्माद्धाप्येतर्हि सुप्तो भूर्भूरित्येव प्रश्वसिति । अभूतिरित्यसुरास्ते पराबभूवु । भवत्यात्मना परास्य द्विषन् पाप्मा भ्रातृव्यो भवति य एवं वेद । स एष मृत्युश्चैवामृत च । तदुक्तमृषिणा । अपाङ् प्राङ् एति स्वधया गृभीत इत्यपानेन ह्यय यतोऽपाङ् प्राणेन पराङ्भवति । अमर्त्यो मर्त्येना सयोनिरित्येन हीद सर्व सयोनि मर्त्यानि हीमानि शरीराणी२ अमृतैषा देवता । ता शश्वता निषूचीना वियता न्यन्य चिक्युर्न निचिक्युरन्यम् इति निचिन्वति हैनेमानि शरीराणी २ अमृतैषा देवता । अमृतो ह वा अमुष्मिन् लोके सभवत्यमृत सर्वेभ्यो भूतेभ्यो ददृशे य एवं वेद ॥८॥

**अर्थ**—आप आप' ज्याला म्हणतात तें हेंच मागील खडात वर्णिलेलें "आप" होय हें "अप्"चें म्हणजे कर्म ह्याचें म्हणजे ह्या जगाचें मूळ आहे आणि हें जग त्याचें तूळ म्हणजे बीज आहे हा पुरुष पिता आहे आणि हे मागील खडात वर्णिलेले देव त्याचे पुत्र आहेत जें काही पुत्राचें असतें तें पित्याचेंहि असतेंच आणि जें काही पित्याचें असतें तें पुत्राचेंहि असतेंच असें म्हणतात (कर्म हें पुरुषामध्ये व देवामध्येहि असतेंच अर्थात् देवानीहि कर्म करून बीज निर्मिले असा भाव आहे) तें जाणणारा इतरापुत्र महिदास म्हणाला की, "मी आपणाला [ मा ] पृथिव्यादि देवापासून झालेला जाणतों (मी ह्या देवापासून झालों असें जाणतो) आणि माझ्यापासून [ मत् ] इंद्रिय-रूपी देव (डोळे वगैरे) झाले असें जाणतों (पृथिव्यादिकापासून

शरीरस्थ प्राण व त्या प्राणापासून इंद्रियें झालीं हें उघडच आहे.) ह्या इंद्रियरूपी देवांना ह्या प्राणापासूनच दान म्हणजे शक्तीचें दान मिळतें [ इतः प्रदाना ] म्हणजे ह्या प्राणापासूनच हे इंद्रियरूपी देव पोसले जातात [ संभृताः ]." ह्याप्रमाणे चक्षुः, श्रोत्र, मन, वाणी आणि प्राण ह्यांनी घडलेला हा गिरि म्हणजे राहण्याचें ठिकाण तयार होतें. त्यालाच ब्रह्मगिरि असें म्हणतात ( कारण ह्यांतच ब्रह्म म्हणजे ब्रह्मानंद राहतो). जो हें जाणतो तो आपल्या द्वेष करणाऱ्या पापी शत्रूला [ भ्रातृव्यं ] गिळतो--त्याच्या द्वेष करणाऱ्या पापी शत्रूचा पराभव होतो. तो हा प्राण कर्मांमध्ये [ अप्सु ] आहे म्हणजे स्वतः शरीर धारणपोषण करीत असतो किंवा मनुष्य कर्में करील तरच तो प्राण टिकतो असा भाव दिसतो. तो हा प्राण भूति म्हणजे जिवंत असणें, वैभव किंवा आनंद आहे आणि अभूति म्हणजे मृत्यु, दारिद्र्य किंवा दुःखहि आहे. ( कारण जिवंत मनुष्यास वैभव, दारिद्र्य, सुख, दुःख हे दोनहि आपल्या कर्मानुसार भोगावे लागतात). तो भूति आहे असें मानून देवांनी म्हणजे शहाण्या मनुष्यांनी त्याची उपासना केली, म्हणजे सुखार्थ कर्में केलीं म्हणून ते वैभवसंपन्न म्हणजे मोठे व सुखी झाले [ बभूवुः ]. म्हणूनच झोपेंत मनुष्य भूः भूः असा आवाज करीत श्वासोच्छ्वास घेतो. त्या प्राणाला अभूति म्हणजे दुःख मानून म्हणजे जिवंत राहणें दुःख आहे असें मानून, असुरांनी म्हणजे मूर्खांनी त्याची उपासना केली म्हणजे कर्में टाकून आळसांत वेळ घालविला म्हणून त्यांचा पराभव म्हणजे नाश झाला. जो हें जाणतो तो स्वतः [आत्मना] मोठा होतो [भवति] आणि त्याचा द्वेष करणारा पापी शत्रु नाश पावतो [ पराभवति ]. तो हा प्राण मृत्यु म्हणजे दुःखहि आणि अमृत म्हणजे मृत्युहारक किंवा आनंदहि आहे. त्याविषयी एक ऋषि म्हणतो. (ऋग्वेद १।१६४।३८)

— अपाङ् प्राङेति स्वधया गृभीतः ।
अमर्त्यो मर्त्येना स योनिः ॥
ता शश्वंता विषूचीना वियंता ।
न्यन्यं चिक्युर्न निचिक्युरन्यं ॥

( ह्याचा अर्थः—"स्वधेने म्हणजे अन्नाने धरून ठेवलेला प्राण [स्वधया गृभीतः] मागे [अपाङ्] पुढे [प्राङ्] जातो. मर्त्य अशा शरीराचें व अमर्त्य अशा ह्या प्राणाचें उत्पत्तिस्थान एकच (ब्रह्म) आहे [सयोनिः]. प्राण आणि शरीर हे दोनहि शाश्वत राहणारे [शश्वंता] (प्राण शाश्वत आहे तसेंच शरीर परंपरारूपाने म्हणजे संततिरूपाने शाश्वतच आहे. "प्रजाभिरग्ने अमृतत्वमश्याम्" ह्यात हेंच सांगितलें आहे.) परंतु भिन्न मार्गांनी जाणारे [विषूचीना वियंता] आहेत, म्हणून एकाचें [न्यन्यं] म्हणजे शरीराचें पोषण करतात [निचिक्युः] परंतु दुसऱ्याचें म्हणजे प्राणाचें पोषण करीत नाहीत." आता ह्याचा एक एक पाद घेऊन त्याचें विवरण उपनिषत्कार करतात.) "अपाङ् प्राङेति स्वधया गृभीतः" हें जे म्हटलें आहे तें बरोबरच आहे; कारण [हि] हा [अयम्] प्राण अपानाने अपाङ् आणि प्राणाने पराङ् होतो म्हणजे जातो. (येथे विवरणरूपी उपनिषदाचा पाठ भ्रष्ट झालेला स्पष्ट दिसतो. उपलब्ध पाठ "अपानेन ह्यय यतः प्राणो न पराङ्भवति" तथापि तो मी वर दिल्याप्रमाणे असला पाहिजे. एका प्रतींत "प्राणो न" ह्या ऐवजी "प्राणेन" असा पाठ आहेच असें दिसतें. उपलब्ध पाठाला काही समंजस अर्थ नाही.) "अमर्त्यो मर्त्येना सयोनिः" हें जें म्हटलें आहे तें बरोबरच आहे कारण [हि] ह्या प्राणाशीं [एतेन] हें सर्व जग सयोनि आहे. म्हणजे हीं सर्व शरीरें व प्राण एका ब्रह्मापासूनच उत्पन्न झाले आहेत आणि हीं शरीरें मर्त्य आहेत आणि ही प्राणरूपी देवता अमृता म्हणजे अमर आहे. "ता

धारयंता विभूचीना वियंता। म्यन्यं चिक्युने निचिक्युरन्यम्" हें जें म्हटलें आहे तें बरोबरच आहे. कारण [हि] ह्या शरीरांचें पोषण करतात परंतु ही प्राणरूपी देवता अमरच [अमृत]-आहे, म्हणजे तिला पोसण्याची गरज नाही. जो हें जाणतो तो परलोकीं अमृत म्हणजे आनंदीच होतो आणि (इहलोकींहि) तो सर्वभूतांना अमृतच म्हणजे आनंद देणाराच दिसतो. ॥८॥

टिप्पणें—"अहं" आणि "अप्सु" हे पाठ भंडार प्रतींतून घेतले आहेत. Keith च्या प्रतींत "आहं" आणि "अप्सुः" असे पाठ अनुक्रमें आहेत. ह्या पाठांचा चांगलासा अर्थ होत नाही.

ह्या खंडांत चक्षुः, श्रोत्र, मन, वाणी, आणि प्राण हे ब्रह्मगिरिच होत म्हणजे ब्रह्मानंद अनुभवण्याचीं साधनें होत असें सांगून त्यांचें महत्त्व वर्णिलें आहे. त्यांपैकी प्राण सर्वांत श्रेष्ठ हें मागील खंडांत वर्णिलेंच आहे. त्यास अनुसरूनचा त्याची उपासना करावी असें ह्या खंडांत देवांची व असुरांची हकीकत सांगून सुचविलें आहे. शेवटीं "स्वधया गृभीतः" हें ऋग्वेदांतील वचन उद्धृत करून प्राण अन्नानेच धारण केला जातो म्हणजे कर्म करावें असें स्पष्टपणें सुचविलें आहे. एकूण ह्या खंडांत सर्व अध्यायाचा उपसंहार करून कर्माची आवश्यकता दाखविली आहे.

## अध्याय दुसरा

ह्या अध्यायाच्या पहिल्या दोन खंडांत ऋग्वेदकर्त्यांचीं नांवें आणि सूक्त वगैरे शब्दहि प्राणवाचक आहेत असें त्यांच्या निर्वचनावरून दाखवून वेदांचा खरा कर्ता प्राणच होय असें दाखविलें आहे आणि ह्या रीतीनें प्राणाचें महत्त्व वर्णिलें आहे. वेदांचा खरा कर्ता प्राणच होय हें म्हणणें खरेंच आहे. कारण बुद्धीच वेदादि ग्रंथ करते आणि प्राण असेल तेथेच बुद्धि असते.

एष इमं लोकमभ्यार्चत् पुरुषरूपेण य एष तपति प्राणो वाव तदभ्यार्चत् प्राणो ह्येष य एष तपति शतं वर्षाण्यभ्यार्चत् तस्माच्छतं वर्षाणि पुरुषायुषो भवंति तं यच्छतं वर्षाण्यभ्यार्चत् तस्माच्छतर्चिनः तस्माच्छतर्चिन इत्याचक्षते एतमेव संतम्। स इदं सर्वं मध्यतो दधे यदिदं किं च स यदिदं सर्वं मध्यतो दधे यदिदं किं च तस्मान्माध्यमास्तस्मान्माध्यमा इत्याचक्षते एतमेव संतम्। प्राणो वै गृत्सोऽपानो मदस्स यत् प्राणो गृत्सोऽपानो मदस्तस्माद् गृत्स मदस्तस्माद् गृत्समद इत्याचक्षते एतमेव संतं। तस्येदं विश्वं मित्रमासीद् यदिदं किं च तयदस्येदं विश्वं मित्रमासीद्यदिदं किं च तस्माद्विश्वामित्रः तस्माद्विश्वामित्र इत्याचक्षते एतमेव संतम्। तं देवा अब्रुवन्नयं वै नः सर्वेषां देवानां वाम इति तं यद्देवा अब्रुवन्नयं वै नः सर्वेषां देवानां वाम इति तस्माद् वामदेवस्तस्माद्वामदेव इत्याचक्षते एवमेव संतम्। स इदं सर्वं पाप्मनोऽत्रायत यदिदं किं च स यदिदं सर्वं पाप्मनोऽत्रायत यदिदं किं च तस्मादत्रयस्तस्मादत्रय इत्याचक्षते एतमेव सतम् ॥१॥

**अर्थ**—हा जो तपतो म्हणजे जगास प्रकाशवितो तो तो आत्मा (कठवल्ली ५। १५ पहा) ह्या लोकामध्ये पुरुषरूपाने प्रवेश करता झाला [अभ्यार्चत्], तेंव्हा शरीरास [वाव] हा प्राणच त्यां लोकामध्ये [तत्] प्रवेश करता झाला. कारण जो हा तपतो तो आत्मा प्राणच होय. तो प्राण त्या लोकामध्ये म्हणजे शरीरातच शंभर वर्षे प्रवेश करून

राहिला. म्हणून पुरुषायुषाचीं शंभर वर्षे असतात. ज्या अर्थी [यद्] त्या लोकांत म्हणजे शरीरांत तो शंभर वर्षे प्रवेश करून राहिला त्या अर्थी तो शतर्चिनः होय म्हणून ह्या शरीरांतच राहणाऱ्या [एतमेव सेतं] प्राणालाच शतर्चिनः असें म्हणतात. तो प्राण आपणा स्वतःला [आत्मानम्—हें पद अध्याहृत घ्यावें. Keith ने असेंच केलें आहे असें त्याच्या भाषांतरावरून दिसतें.] हें जें कांही आहे त्या सर्वांच्या मध्यभागीं [मध्यतः—सप्तम्यर्थे तसिल्, ह्यानेच "इदं सर्व" ह्याची द्वितीया झाली आहे.] ठेवता झाला. ज्या अर्थी [यद्] तो प्राण आपणां स्वतःस हें जें काही आहे त्या सर्वांच्या मध्यभागीं ठेवता झाला त्या अर्थी तो माध्यमाः होय. म्हणून ह्याच शरीरांत असणाऱ्या त्या प्राणाला [एतमेव संतम्] माध्यमाः असें म्हणतात.

प्राण हा गृत्स म्हणजे स्तोणारा आहे आणि अपान हा रेतोविसर्ग करणारा असल्यामुळे मद म्हणजे आनंद आहे. (प्रश्नोपनिषत् ३। ५ येथें सांगितल्याप्रमाणें उपस्थांत अपान असतो. आणि मुखांत प्राण असतो. हें लक्षांत ठेवल्यास उपनिषत्काराच्या म्हणण्याची उपपत्ति समजते.) ज्याअर्थी प्राण हा गृत्स आहे आणि अपान मद आहे त्याअर्थी तो प्राण गृत्समद झाला. म्हणून ह्या शरीरांतच राहणाऱ्या प्राणाला गृत्समद असें म्हणतात.

हें जें कांही आहे तें हें विश्व त्याचें मित्र झालें. ज्या अर्थी हें विश्व त्याचें मित्र झालें त्या अर्थी तो विश्वामित्र झाला. म्हणून ह्या शरीरातच असणाऱ्या त्या प्राणाला विश्वामित्र असें म्हणतात.

त्या प्राणाला देव (म्हणजे इंद्रियें) म्हणाले, "हा आम्हा सर्वांचा प्रिय [वामः] आहे". ज्या अर्थी त्याला देव हा आम्हां सर्वांचा वाम आहे असें म्हणाले त्या अर्थी तो वामदेव झाला. म्हणून ह्याच शरीरांतच असणाऱ्या प्राणाला वामदेव असें म्हणतात.

हें जें कांहीं आहे त्या सर्वांला तो प्राण पापापासून म्हणजे मृत्यू-पासून किंवा दुःखापासून रक्षण करता झाला [अत्रायत], ज्या अर्थी हें जें कांहीं आहे, त्या सर्वांला तो पापापासून रक्षण करता झाला [अत्रायत] त्याअर्थी तो अत्रयः झाला- म्हणून ह्या शरीरांतच राहणाऱ्या ह्या प्राणाला अत्रयः असें म्हणतात. ॥१॥

टिप्पणी—ऋग्वेदाचीं दहा मंडलें आहेत. पहिल्या मंडलाच्या कर्त्यांना "शतर्चिनः" म्हणतात. दुसऱ्या ते नवव्या मंडलांच्या कर्त्यांना "गृत्समद", तिसऱ्या मंडलाच्या कर्त्यांस विश्वामित्र, चवथ्याच्या कर्त्यांस "वामदेव", पांचव्याच्या कर्त्यांस "अत्रयः", सहाव्याच्या कर्त्यांस "भारद्वाज", सातव्याच्या कर्त्यांस वसिष्ठ, आठव्याच्या कर्त्यांस "प्रगाथाः", नवव्याच्या कर्त्यांस "पावमानी" आणि दहाव्याच्या कर्त्यांस "क्षुद्रसूक्ताः" आणि "महासूक्ताः" असें म्हणतात.

"एतमेव संतं"—"संतं" ह्याचा अर्थ "वसंतं" ह्याच्या अर्थासारखाच मानून "एतं" हें त्याचें कर्म मानलें आहे. कदाचित् "एतमेव वसंतम्" असाहि खरा पाठ असेल. "वस्" ही धातू क्वचित् सकर्मकहि असते असें आपट्याच्या कोशांत सांगितलें आहेच. आणि "अस्" धातूचा अर्थ केव्हा केव्हा "वस्" धातूच्या अर्थासारखा होतोच.

अध्याय २ खंड २

एष उ एव बिभ्रद्वाजः प्रजा वै वाजः ता एष बिभर्ति यत् बिभर्ति तस्माद्भारद्वाजः तस्माद् भरद्वाज इत्याचक्षते एतमेव संतम् । तं देवा अब्रुवन् अयं वै नः सर्वेषाम् वसिष्ठ इति तं यद्देवा अब्रुवन् अयं वै नः सर्वेषां वसिष्ठ इति तस्माद्वसिष्ठः तस्माद्वसिष्ठ इत्याचक्षत एतमेव संतम् । ॥

इदं सर्वमभिप्रागाद्यदिदं किंच स यदिदं सर्वमभिप्रागाद्यदिदं किं च तस्मात्प्रगाथाः तस्मात्प्रगाथाः इत्याचक्षत एतमेव संतम् । स इदं सर्वं अभ्यपवयत यदिदं किं च स यदिदं सर्वमभ्यपवयत यदिदं किं च तस्मात्पावमान्यस्तस्मात्पावमान्य इत्याचक्षते एतमेव सतम् । सोऽब्रवीत् अहमिदं सर्वमसानि यच्च क्षुद्रं यच्च महदिति ते क्षुद्रसूक्ताश्चाभवन् महासूक्ताश्च तस्मात् क्षुद्रसूक्ताः (महासूक्ताश्च) तस्मात् क्षुद्रसूक्ता इत्याचक्षते (महासूक्ताश्च) एतमेव संतम् । सूक्त बतो वाचेति तत्सूक्तमभवत् तस्मात्सूक्त तस्मात्सूक्तमित्याचक्षत एतमेव संतम् । एष वा ऋगेष ह्येभ्यः सर्वेभ्यो भूतेभ्योऽर्चत स यदेभ्यः सर्वेभ्यो भूतेभ्योऽर्चत तस्मादृक् तस्मादृग्-गित्याचक्षत एतमेव संतम् । एष वा अर्धर्च एष ह्येभ्यः सर्वेभ्योऽर्धेभ्योऽर्चत स यदेभ्यः सर्वेभ्योऽर्धेभ्योऽर्चत तस्मा-दर्धर्च तस्मादर्धर्च इत्याचक्षतः एतमेव सतं । एष वै पदं एष हीमानि सर्वाणि भूतानि पादि स यदिमानि सर्वाणि भूतानि पादि तस्मात् पदं तस्मात्पदमित्याचक्षत एतमेव संतम् । एष वा अक्षरम् एष ह्येभ्यः सर्वेभ्यो भूतेभ्यः क्षरति न चैनमतिक्षरति स यदेभ्य सर्वेभ्यो भूतेभ्यः क्षरति न चैनमतिक्षरति तस्मादक्षरं तस्मादक्षरमित्याचक्षत एतमेव संतम् । ता वा एताः सर्वा ऋचः सर्वे वेदाः सर्वे घोषाः एकैव व्याहृतिः प्राण एव प्राण ऋच इत्येव विद्यात् ॥२॥

**अर्थः**—हा प्राणच [एष उ] वाजाचें भरण करणारा [विभ्रद्वाजः] आहे. वाज म्हणजेच प्रजा. त्याचें हा भरण (पोषण) करतो, ज्या अर्थी

तो भरण करतो त्या अर्थी तो भरद्वाज झाला. म्हणून ह्या शरीरांतच असणाऱ्या ह्या प्राणाला भरद्वाज असें म्हणतात. त्या प्राणाला देव (म्हणजे इंद्रियें) म्हणाले, "हा आम्हां सर्वांमध्ये अतिशय सारवान्–बलवान् [वसिष्ठ] आहे." ज्या अर्थी देव त्याला "हा आम्हां सर्वांमध्ये वसिष्ठ आहे" असें म्हणाले त्या अर्थी तो वसिष्ठ झाला. म्हणून या शरीरांतच राहणाऱ्या प्राणाला वसिष्ठ म्हणतात. हें जें कांही आहे त्या सर्वांकडे म्हणजे सर्वांमध्ये हा प्राण गेला [अभिप्रागात्] म्हणजे शिरला, ज्या अर्थी हा प्राण सर्वांकडे गेला [अभिप्रागात्] त्याअर्थी तो "प्रगाथाः" झाला. म्हणून शरीरांतच राहणाऱ्या त्या प्राणाला "प्रगाथाः" असें म्हणतात.

हें जें कांही आहे त्या सर्वांला हा प्राण पवित्र करता झाला [अभ्यपवयत]. (ज्या वस्तूंत प्राण नसतो ती वस्तू सडते म्हणजे अपवित्र होते म्हणून प्राण, तिला पवित्र करतो असें म्हटलें आहे). ज्या अर्थी हें जें कांही आहे त्या सर्वांला प्राण पवित्र करता झाला, [अभ्यपवयत] त्या अर्थी तो "पावमान्य" झाला. म्हणून ह्या शरीरांतच राहणाऱ्या प्राणाला पावमान्यः असें म्हणतात. तो प्राण म्हणाला, जें क्षुद्र आहे, आणि जें महत् (मोठें) आहे तें सर्व मीच व्हावें. म्हणून त्या वस्तू [ते] क्षुद्रसूक्त व महासूक्त झाल्या. म्हणून प्राण "क्षुद्रसूक्ताः" (व महासूक्ताः) झाला. म्हणून ह्या शरीरांतच राहणाऱ्या प्राणाला क्षुद्रसूक्ताः (व महासूक्ताः) असें म्हणतात. "अहो [वत] तुम्ही प्राणांचें चांगलें वर्णन [सूक्तं] बोललां [अवोचत] असें म्हटल्यामुळे [इति] तें वर्णन सूक्त झालें, म्हणून प्राण हा सूक्त झाला. म्हणून ह्या शरीरांतच राहणाऱ्या प्राणाला सूक्त असें म्हणतात. हा प्राण ऋक् आहे. कारण ह्या सर्व भूतांची ■ त्यांत प्रवेश करून अर्चा (पूजा) करता झाला [अर्चत]. (सायणांनीहि

"स्वप्रवेशेन सर्वभूतार्थ देहं पूजितमकरोत्" असा अर्थ केला आहे. ज्या अर्थी हा ह्या सर्व भूतांची अर्चा करता झाला त्या अर्थी तो ऋक् झाला म्हणून ह्या शरीरांत राहणाऱ्या प्राणाला ऋक् असें म्हणतात.) हा प्राण अर्धर्च आहे. कारण या सर्व अर्थांची म्हणजे शरीररूपी स्थानांची त्यांत प्रवेश करून अर्चा (पूजा) करता झाला. ज्या अर्थी हा ह्या सर्व अर्थांची अर्चा करता झाला त्या अर्थी तो अर्धर्च झाला. म्हणून ह्या शरीरांतच असलेल्या प्राणाला अर्धर्च असें म्हणतात. हा प्राणच पद होय. कारण ह्यानेच ह्या सर्व भूतांमध्ये प्रवेश केला [ पादि ]. ज्या अर्थी ह्या सर्व भूतांत ह्याने प्रवेश केला [ पादि ] त्या अर्थी तो पद झाला. म्हणून ह्या शरीरांत राहणाऱ्या प्राणाला पद असें म्हणतात. हा प्राणच अक्षर आहे. कारण हा ह्या सर्व भूतांकरितां "क्षरति" म्हणजे झरतो आणि ह्याच्यापेक्षा अधिक कोणीच झरत नाही [ न अतिक्षरति]. ज्या अर्थी हा ह्या सर्व भूतांकरितां झरतो आणि ह्याच्यापेक्षा अधिक कोणीच झरत नाही त्या अर्थी तो अक्षर झाला. म्हणून ह्या शरीरांतच असणाऱ्या प्राणाला अक्षर असें म्हणतात. ह्या सर्व ऋचा, हे सर्व वेद, हे सर्व आवाज [ घोषाः ] हे सर्व एकच म्हणजे उच्चारच [व्याहृतिः] म्हणजे प्राणच होत. प्राण हाच ऋचा होय असेंच जाणावें. ॥२॥ भाव असा आहे की ऋचा करणें किंवा म्हणणें हें सर्व प्राणानेंच घडत असल्यामुळे प्राणाचीच उपासना अर्थात् भरण व रक्षण करावें.

टिप्पणी:—वर जे पाठ चौकट अक्षरांत छापले आहेत ते पाठ Keith च्या प्रतीतून घेतले आहेत. अदयार प्रतींत जे ह्या ठिकाणीं आहेत ते छापण्याच्या चुकीमुळे झालेले दिसतात.

"महासूक्तानच" हा शब्द दोनदा कंसांत दिला आहे. तो मूळांत कोणत्याच प्रतींत नाही. पण योग्य अर्थाकरितां त्याची गरज आहे. म्हणून मी तो दोनदा कंसांत दिला आहे.

अध्याय २ खंड ३

मागील दोन खंडांत प्राणाचें महत्त्व वर्णन करून आता पुढील खंडांत प्राणाकरितां आवश्यक असलेलें अन्न उत्पन्न करण्याचें महत्त्व वर्णिलें आहे.

" विश्वामित्रमेतदहः शंसिष्यंतमिंद्र उपनिषसाद । स हान्नमित्यभिव्याहृत्य बृहतीसहस्रं शशंस तेनेंद्रस्य प्रियंधामोपेयाय । तमिंद्र उवाच ऋषे प्रियं वै मे धामोपागाः स वा ऋषे द्वितीयं शंसेति । स हान्नमित्येवाभिव्याहृत्य बृहतीसहस्रं शशंस तेनेंद्रस्य प्रियंधामोपेयाय । तमिंद्र उवाच ऋषे प्रियं वै मे धामोपागाः स वा ऋषे तृतीय शंसेति । स हान्नमित्येवाभिव्याहृत्य बृहतीसहस्रं शशंस तेनेंद्रस्य प्रियं धामोपेयाय। तमिंद्र उवाच ऋषे प्रियं वै मे धामोपागाः वरं ते ददामीति। स होवाच त्वामेव जानीयामिति । तमिंद्र उवाच प्राणो वा अहमस्म्यृषे प्राणस्त्वं प्राणः सर्वाणि भूतानि प्राणो ह्येष य एष तपति स एतेन रूपेण सर्वा दिशो विष्टोऽस्मि तस्य मेऽन्नम् मित्रं दक्षिणं तद्वैश्वामित्रमेष तपन्नेवास्मीतिहोवाच ॥३॥

अर्थ—यज्ञांतील "महाव्रत" नांवाच्या दिवशीं [ एतदहः याचा हा अर्थ घेण्याचें कारण असें आहे की हें उपनिषद् ऐतरेय आरण्यकांतील दुसरें आरण्यक होय आणि सबंध ऐतरेय आरण्यक हें "महाव्रत" दिवसाचा विधि सांगण्याकरितां लिहिलें गेलें हें पहिल्या आरण्यकाच्या पहिल्याच "अथ महाव्रतम्" ह्या वाक्यावरूनच समजून येतें.] मंत्रात्मक स्तुति म्हणणार असणाऱ्या [शंसिष्यंतम्] विश्वामित्राजवळ इंद्र बसला [उपनिषसाद]. तो विश्वामित्र, मंत्रात्मक स्तुतींनी म्हणाऱ्या पक्ष्याच्या पोटांतील हें अन्न होय [अन्नमिति—

Keith ची प्रस्तावना पान २९ प्यारा पहिला पहा. तो असा आहे. " The most characteristic features of the Mahāvrata Sāman and the Mahaduktha is their division according to the form of a bird. The origin of the idea appears to be the theory which appears in the Śatapatha Brāhmaṇa (IX/,2, 35 sq) of the bird-like shape of the fire-altar. Similarly the Mahāvrata Sāman has five parts corresponding to the body, head, right wing, left wing and tail. The Mahaduktha is not so simple, the parts corresponding to the body, neck, head, vertebrae, wings, tail and stomach, but there is a general correspondence with the Sāman, the first verses of each part appearing in the Sāman. Besides these parts there are also three groups each of eighty trikas (त्रिकाः), one in Gāyatri, one in Uṣṇik, and one in Bṛhati metre, which form the food of the bird" ऐतरेय आरण्यकाच्या पांचव्या आरण्यकाच्या दुसऱ्या अध्यायाच्या पहिल्या खंडांत "ग्रीवाः" सांगितल्या आहेत. दुसऱ्या खंडांत " राथंतरो दक्षिणः पक्षः " आणि " बार्हत उत्तर (पक्षः) " आणि " भद्रं पुच्छं " सांगितले आहेत. तिसऱ्या खंडांत " गायत्री तृचाशीति " म्हणजे गायत्री छंदाची ऐंशी त्रिकें, चवथ्या खंडांत " बार्हती तृचाशीतिः " म्हणजे बृहतीछंदाची ऐंशी त्रिकें आणि पांचव्या खंडांत " औष्णिही तृचाशीतिः " म्हणजे उष्णिह् छंदाची ऐंशी त्रिकें सांगितली आहेत. आणि " इत्येतास्तिस्रस्तृचाशीतयः सर्वा अर्धर्च्याः । अन्नमयी-

त्रयः। उदरं वशाः।" म्हणजे ह्या तीन तृचाशीति सर्वच अर्धर्च्य आहेत म्हणजे अर्धे श्लोक आहेत. ह्या तीन अशीति अन्न होय आणि वशा नांवाच्या ऋचा उदर होय, असेंहि सांगितलें आहे. तिसऱ्या अध्यायाच्या पहिल्या खंडांत "ऊरू" सांगितले आहेत. ह्यावरून "अन्नमिति" याचा जो अर्थ येथे केला आहे तो ठरतो.] असें म्हणून बृहतीसहस्र म्हणजे बृहतीसहस्राचा एक भाग (एक भाग आणि पहिली तृचाशीति असा अर्थ करण्याचें कारण असें आहे की तीन तृचाशीतींनाच अन्न हें नाम दिलें आहे आणि त्याचेच तीन भाग आहेत) म्हणजे पहिली तृचाशीति म्हणाला. आणि त्याने तो इंद्राच्या प्रिय धामाला गेला. म्हणजे आनंदाला मिळविता झाला. त्या ऋषीला इंद्र म्हणाला, "हे ऋषे! तूं माझ्या प्रिय धामाला आलास तर आता दुसरा भाग म्हणजेच दुसरी तृचाशीति म्हण." ते-व्हा विश्वामित्राने, मंत्रात्मक स्तुतींनी बनणाऱ्या पश्याच्या पोटांतील हें अन्न होय असें म्हणून बृहतीसहस्र म्हणजे बृहतीसहस्राचा एक भाग असलेली दुसरी तृचाशीति म्हटली. त्याने तो इंद्राच्या प्रियधामाला गेला म्हणजे आनंद मिळविता झाला. त्याला इंद्र म्हणाला, "हे ऋषे! तूं माझ्या प्रिय धामाला आलास तर आता तिसरा भाग म्हणजे तिसरी तृचाशीति म्हण." विश्वामित्राने मंत्रात्मक स्तुतींनी बनणाऱ्या पश्याच्या पोटांतील हें अन्न होय असें म्हणून, बृहतीसहस्र म्हणजे बृहतीसहस्राचा एक भाग म्हणजे तिसरी तृचाशीति म्हटली. त्याने तो इंद्राच्या प्रियधामाला गेला. म्हणजे आनंद मिळविता झाला. त्याला इंद्र म्हणाला, "हे ऋषे! तूं माझ्या प्रिय धामाला आलास तर मी तुला वर देतों." ("वर माग" असा भाव आहे.) विश्वामित्र म्हणाला, "मी तुलाच जाणावें." त्याला इंद्र म्हणाला "हे ऋषे, मी प्राण आहे, तूंहि प्राण आहेस, सर्व भूतेंहि प्राणच आहेत. हा जो प्रकाशतो [तपति] म्हणजे जगास प्रकाशवितो तो जीवात्माहि (स्ट्रोटनिवह) प्राणच होय. तो मी ह्या रूपाने म्हणजे प्राणरूपाने सर्व दिशांत शिरलों आहे. त्या माझा अन्नच दक्षिण म्हणजे बुद्धल म्हणजे सुख देणारा मित्र आहे.

(भाव असा की मला बृहतीसहस्ररूपी अन्न हितकर नसून खरोखर अन्नच हितकर आहे.) आणि तें अन्न जो विश्वाचा म्हणजे जगाचा मित्र असेल तोच उत्पन्न करतो [विश्वामित्रम्]. (म्हणजे भाव असा आहे की जो आपणांस विश्वाचा मित्र समजत असेल त्याने अन्न उत्पन्न करावें.) हा प्रकाशणारा जीवात्मा मीच आहें. ॥३॥

टिप्पण—वर वर्णिलेल्या पद्याच्या सर्वांगाचीं स्तोत्रें मिळून हजार बृहती होतात. बृहतीसहस्रासारखीं स्तोत्रें म्हटल्याने जरी आनंद होत असला तरी खरा आनंद अन्नानेच होतो. म्हणून स्तोत्रें म्हणण्यांतच सर्व काळ न घालवितां अन्न उत्पन्न करा, असा या खंडाचा भाव स्पष्ट आहे.

" विश्वामित्र " हें नांव येथे मुद्दाम योजलेलें दिसतें. त्याचा अर्थ जो आपणास सर्व जगाचा मित्र मानतो, तो असा दिसतो; असाच मनुष्य येथे सांगितल्याप्रमाणे बृहतीसहस्र किंवा कोणतेंहि स्तोत्र म्हटल्यानेइंद्राच्या प्रिय धामास जाईल म्हणजे आनंदाचा अनुभव घेईल. हें स्तोत्र म्हणतांना इंद्र म्हणजे प्राण जवळ बसला (उपनिषदाद) हें म्हणणेंहि योग्यच आहे. कारण प्राणाशिवाय हें कार्य होऊंच शकत नाही. बृहतीसहस्रस्तोत्राची तिसरी तृचाशीति म्हटल्यावर विश्वामित्रास इंद्राने ज्ञान सांगितलें ह्याचाहि सरळ अर्थ असाच होतो की तें स्तोत्र म्हणतां म्हणतां विश्वामित्रास तें ज्ञान झालें.

अध्याय २ खंड ४

सर्व विश्वास आनंद देणारें अन्न उत्पन्न करणाऱ्यास बृहतीसहस्र सारखीं स्तोत्रें म्हणण्याचीहि गरज नाही असें ह्या खंडांत, अशा मनुष्याचें बृहतीसहस्र दुसऱ्याच रीतीने संपन्न होतें असें दाखवून, दाखविलें आहे.

"तद्वा इदं बृहतीसहस्रं संपन्नम् तस्य यानि व्यंजनानि तच्छरीरम् यो घोषः स आत्मा य ऊष्माणः स प्राणः ।

एतद्ध स्म वै तद्विद्वान् वसिष्ठो वसिष्ठो बभूव तत एतन्नामधेयं लेभे । एतदु हैवेंद्रो विश्वामित्राय प्रोवाचैतदु हैवेंद्रो भरद्वाजाय प्रोवाच तस्मात्स तेन बंधुना यज्ञेषु हूयते । तद्वा इदं बृहतीसहस्रं संपन्नम् तस्य वा एतस्य बृहतीसहस्रस्य संपन्नस्य षट्त्रिंशतमक्षराणां सहस्राणि भवंति तावंति शतसंवत्सरस्याह्नाम् सहस्राणि भवंति व्यंजनै रात्रीराप्नुवंति स्वरैरहानि । तद्वा इदं बृहतीसहस्रं संपन्नं तस्य वा एतस्य बृहतीसहस्रस्य संपन्नस्य परस्तात्प्रज्ञामयो देवतामयो ब्रह्ममयोऽमृतमयः संभूय देवता अप्येति य एवं वेद तद्योऽहं सोऽसौ योऽसौ सोऽहम् । तदुक्तमृषिणा । "सूर्य आत्मा जगतस्तस्थुषश्चेति" । एतदु हैवोपेक्षेतोपेक्षेत ॥४॥

अर्थः—त्या अन्न उत्पन्न करणाऱ्या व वाटणाऱ्या विश्वामित्राचें तें [तद्वै] हें [इदं] बृहतीसहस्रस्तोत्र संपन्न होतें म्हणजे सिद्ध होतें. (is accomplished). त्याचें शरीर हें त्या स्तोत्राचीं व्यंजनें होत. आणि त्याचा आत्मा त्या स्तोत्राचे स्वर [घोष] होत आणि त्याचा प्राण हे त्या स्तोत्रांतील श, ष व स हीं अक्षरें [ऊष्माणः] होत. हें जाणणारा वसिष्ठ ऋषी वसिष्ठ म्हणजे धनधान्यसंपन्न झाला व त्यावरून त्याला वसिष्ठ हें नांव पडलें (लेभे). हेंच इंद्राने विश्वामित्राला (मागील खंडांतील हकीकतीप्रमाणें) सांगितलें आणि हेंच इंद्राने भरद्वाजाला सांगितलें. म्हणून म्हणजे उत्पन्न करणें व वाटणें हें बृहतीसहस्रस्तोत्रतुल्य आहे म्हणून स म्हणजे तो इंद्र म्हणजे प्राण त्याच्या त्या मित्रासह [बंधुना] यज्ञांमध्ये बोलाविला जातो. म्हणजे यज्ञांत अवदान केलें जातें. अन्न उत्पन्न करणाऱ्या व वाटणाऱ्या विश्वामित्राचें तें [तद्वै] हें [इदम्] बृहतीसहस्रस्तोत्र दुसऱ्या रीतीनेंहि सिद्ध होतें. तें असें. संपन्न झालेल्या बृहतीसहस्राचीं छत्तीस हजार अक्षरें असतात. आणि शंभर वर्षांचें

म्हणजे मनुष्याच्या आयुष्यांतहि तितकेच दिवस असतात. व्यंजनांनी रात्री मिळवितात आणि स्वरांनी दिवस मिळवितात. म्हणजे आयुष्याचे दिवस हेच जणू काय स्वर आणि रात्री ह्याच जणू काय व्यंजनें ह्या रीतीनेंहि त्याचें बृहतीसहस्रस्तोत्र सिद्ध होतें. हें आयुष्यरूपी बृहती-सहस्रस्तोत्र संपन्न झाल्यानंतर [एतस्य बृहतीसहस्रस्य संपन्नस्य परस्तात्; परस्तात् ह्यामुळे पष्ठी झाली] म्हणजे मनुष्य आयुष्यभर अन्न उत्पन्न करीत व वाटत राहिल्यानंतर जो मी आहें तो तो आहे व जो तो आहे तो मी आहें तें हें जो जाणतो [य एवं वेद तथोऽहं सोऽमी योऽसौ सोऽहम्]; म्हणजे आत्माद्वैत जो जाणतो, तो प्रज्ञामय म्हणजे ज्ञानपूर्ण, देवतामय म्हणजे देवतांप्रमाणें पूज्य, ब्रह्ममय म्हणजे ब्रह्माप्रमाणें सर्वत्र साम्यदृष्टि ठेवणारा व अमृतमय म्हणजे आनंदपूर्ण म्हणजे स्वतःहि आनंदी व दुसऱ्यांनाहि आनंद देणारा असल्यामुळे [संभूय] देवता-मध्ये जाऊन मिळतो म्हणजे पूज्य होतो. ऋषीनेंहि म्हणजे ऋग्वेदांतहि हें सांगितलें आहे (ऋग्वेद १।११५।१). सूर्य म्हणजे परमात्मा हाच सर्व स्थावर [तस्थुषः] व जंगम [जगतः] वस्तूंचा आत्मा आहे. म्हणजे आत्मा एकच आहे हा भाव आहे. ह्याचाच विचार करावा [उपेक्षेत] ह्याचाच विचार करावा. ॥४॥

टिप्पणी—प्रज्ञामय वगैरे येथील शब्दांमध्ये "मय" हा प्रत्यय विकारवाचक मानतांच येत नाही, कारण हे सर्व शब्द निंदावाचक नसून स्तुतिवाचक आहेत हें उघड आहे. म्हणून येथील "मय" प्रत्यय प्राचुर्यवाचक मानावा लागतो. ही गोष्ट तैत्तिरीयोपनिषदांतील ब्रह्मानंद-वल्लींतहि "मय" प्रत्यय प्राचुर्यवाचक मानल्या त्याला पुष्टिच देते.

'संभूय"—ह्याचा "असल्यामुळे" असा जो अर्थ वर केला आहे तो तसा करणें अपरिहार्यच आहे. कारण तो आत्माद्वैतज्ञ मनुष्य जिवंतपणींच प्रज्ञामय, वगैरे असतोच. "स्थित्वाऽस्यां अंतकालेऽपि" ह्या भगवद्गीतेच्या वचनांतहि "त्वा" चा अर्थ बहुतेक असाच आहे.

"वसिष्ठ"—वसु म्हणजे "धनधान्य" ह्या शब्दापासूनच "वसिष्ठ" शब्द झाला हा उपनिषत्काराचा अभिप्राय उघड आहे. म्हणून "वसिष्ठ" ह्याचा अर्थ धनधान्यसंपन्न असाच घेतला पाहिजे.

ह्या खंडांतील "तद्वा इदं बृहतीसहस्रम् ········ अहानि" हें वाक्य मी आपल्या "The Astronomical method and its application to the Chronology of Ancient India" ह्या ग्रंथाच्या ४२३ व्या परिच्छेदांत उद्धृत केलें आहे. त्याचा तेथे केलेला अर्थ येथे केलेल्या अर्थाहून भिन्न आहे. तेथील चूक आहे व येथील अर्थच बरोबर आहे. तेथील अर्थ करतांना मी आळसामुळे संदर्भाचा पूर्ण विचार केला नाही म्हणून तेथील अर्थ चुकला. येथील अर्थावरूनहि वेदमंत्र करतांना मंत्रकर्ते गतवर्षाचे दिवस स्वरांनी व रात्री व्यंजनांनी दाखवीत असतील असें अनुमान करतां येतें.

ह्या अध्यायांत शेवटच्या दोन खंडांत आत्माद्वैत पाहणारा व विद्याचा मित्र बनलेला मनुष्य आयुष्यभर अन्न उत्पन्न करीत आणि यावत् शहिला म्हणजे कर्मे करीत राहिला तर तेंच त्याचें बृहतीसहस्त्रस्तोम होय असें स्पष्ट सांगून आमरण सत्कर्मांची आवश्यकता प्रतिपादिली आहे आणि केवळ स्तोत्रें म्हणण्याचें वैयर्थ्य प्रतिपादिलें आहे.

## अध्याय तिसरा

अध्याय ३ खंड १

"यो ह वा आत्मानं पंचविधमुक्थं वेद यस्मादिदं सर्वमुत्तिष्ठति स संप्रतिवित्। पृथिवी वायुराकाश आपो ज्योतींषीत्येष वा आत्मोक्थं पंचविधमेतस्माद्धीदं सर्वमुत्तिष्ठति एतमेवाप्येति। अयनं ह वै समानानां भवति य एवं वेद। तस्मिन् योऽन्नमन्नादं च वेदा हास्मिन्नन्नादो जायते भवत्य-

स्यान्नम्। आपश्च पृथिवी चान्नमेतन्मयानि ह्यन्नानि भवंति। ज्योतिश्च वायुश्चान्नादमेताभ्यां हीदं सर्वमन्नमत्यायपन-माकाश आकाशे हीदं सर्वं समोप्यते। आवपनं वै समानानां भवति य एवं वेद। तस्मिन् योऽन्नमन्नादं च वेदाहास्मिन्नन्नादो जायते भवत्यस्यान्नम्। औषधिवनस्पतयोऽन्नम् प्राण-भृतोऽन्नादमोषधिवनस्पतीन् हि प्राणभृतोदंति। तेषां .ये उभयतो दंताः पुरुषस्यानुविधां विहितास्तेऽन्नादा अन्नमितरे पशवस्तस्मात्त इतरान् पशूनधीव चरंत्यधीव ह्यन्नेऽन्नादो भवति। अधीव हि समानानां जायते य एवं वेद ॥१॥

अर्थः—हें शरीर [आत्मानम्] ज्यापासून सर्व जगत् उत्पन्न होतें तें पांच प्रकारचें उक्थच होय हें जो जाणतो, तोच खरा जाणता [संप्रतिविद्] होय. पृथिवी, वायु (हवा), आकाश, आप् (पाणी) आणि ज्योतिष (उष्णता) हेंच तें, ज्यापासून सर्व जग उत्पन्न होतें आणि ज्यांत लय पावतें [अप्येति] असें पांच प्रकारचें शरीराला बनविणारें उक्थ [आत्मोक्थ] होय. जो हें जाणतो तो आपल्या-सारख्यांचें [समानानाम्] अयन म्हणजे उत्पत्तिस्थान होतो म्हणजे त्याला संतति उत्पन्न होते. ह्या पांच प्रकारच्या उक्थांतच [तस्मिन्] अन्नहि आहे, अन्नाद म्हणजे अन्न खाणाराहि आहे असें जो जाणतो त्याच्या ठिकाणीं अहो, अन्नाद म्हणजे पुत्र किंवा कन्या उत्पन्न होतें आणि त्यांचें अन्नहि म्हणजे स्तनांतील दूधहि उत्पन्न होतें. ("वेदा-हास्मिन्" ह्याची वेद + अह + अस्मिन् अशीं पदें पाडावीं. "अह" म्हणजे अहो) (पांच प्रकारच्या उक्थांतच अन्न व अन्नाद कसा आहे त्यांचें स्पष्टीकरण पुढील वाक्यांत आहे.) आप् आणि पृथिवी हीं अन्नें होत, कारण अन्नामध्ये हेंच असतात. ज्योतिष् म्हणजे उष्णता आणि वायु म्हणजे हवा हे अन्नाद होत; कारण ह्यांच्या सहाय्यानेच हें सर्व

अन्न खातो म्हणजे पचवितो. आकाश हें ठेवण्याचें ठिकाण [आवपनं]' आहे; कारण आकाशांतच हें सर्व ठेवलें जातें [समोप्यते] हें जो जाणतो तो आपल्यासारख्याचें म्हणजे आपल्या संततीचें आवपन म्हणजे राहण्याचें ठिकाण होतो. एकूण ह्या पांच प्रकारच्या उक्थातच अन्नहि आहे आणि अन्नादहि आहे हें जो जाणतो (तो अन्न उत्पन्न करून खातो व अर्थात्) अहो त्याच्या ठिकाणीं अन्न खाणारा म्हणजे संतति उत्पन्न होते आणि त्याच्याकरितां अन्न म्हणजे स्तन्यहि उत्पन्न होतें. औषधि व वनस्पति हें अन्न होत आणि प्राणी अन्नाद होत; कारण प्राणी औषधिवनस्पतींना खातात. त्या प्राण्यांपैकी जे मनुष्याच्या प्रकाराला अनुसरून [विधां अनु] येलेले असतात म्हणजे ज्यांना खाली वर दोनहिकडे दात असतात ते अन्नाद होत आणि इतर पशु त्यांचें अन्न होत. म्हणून ते उभयदंत प्राणी इतर पशूंवर जणूं चालतात म्हणजे इतर पशूंचा पराभव करतात, कारण अन्नाद नेहमी अन्नापेक्षा वरचढ [अधीव] असतो. जो हें जाणतो तो आपल्यासारख्यांना वरचढ होतो. ॥१॥ (येथे परोक्षवाद आहे असें वाटतें. उभयतो दंत म्हणजे ज्ञान व कर्म ह्या दोहोंचाहि उपयोग करून आनंदाचा अनुभव घेणारा हा इतरांना वरचढ होईल हें उघडच आहे. आणि असाच ह्या वाक्यांचा भाव आहे. म्हणून ह्या खंडात शरीरास उत्पन्न करणाऱ्या अन्नाविषयीं म्हणजे कर्माविषयीं सांगून पुढील खंडांत ज्ञानाविषयीं सांगितलें आहे.)

अध्याय ३ खंड २

"तस्य य आत्मानमाविस्तरां वेदाश्नुते हाविर्भूयः य ओषधिवनस्पतयो यच्च किं च प्राणभृत् (तेषु) स आत्मानमाविस्तरां वेद। ओषधिवनस्पतिषु हि रसो दृश्यते चित्तं प्राणभृत्सु। प्राणभृत्सु त्वेवाविस्तरामात्मा तेषु हि रसोऽपि दृश्यते न चित्तमितरेषु। पुरुषेत्वाविस्तरामात्मा स हि प्रज्ञानेन

संपन्नतमो विज्ञातं वदति विज्ञातं पश्यति वेद श्वस्तनम् वेद लोकालोकौ मर्त्येनामृतमीप्सत्येवं संपन्नः । अथेतरेषां पशूनां अशनापिपासे एवाभिविज्ञानम् न विज्ञातं वदंति न विज्ञातं पश्यंति न विदुः श्वस्तनम् न लोकालोकौ त एतावंतो भवंति यथाप्रज्ञं हि संभवाः ॥२॥

अर्थः—जो पुरुष [ वः ] असादाचा [ तस्य ] अत्यंत जास्त आविर्भूत म्हणजे विकसित झालेला [आविस्तराम्] आत्मा जाणतो तो त्या आविर्भावाचा म्हणजे विकासाचा [ आविर्भूयः—द्वितीया विभक्ति ] उपभोग घेतो. जे ओषधिवनस्पति आहेत आणि जे प्राणी आहेत, त्या सर्वांमध्ये [तेषु; हें पद अध्याहृत घ्यावें लागतें] मी अत्यंत जास्त विकसित [आविस्तराम्] आहे असें तो स्वतःला [आत्मानम्] जाणतो. औषधिवनस्पतींमध्ये रस म्हणजेच पोषक द्रव दिसतो आणि प्राण्यांमध्ये चित्त दिसतें. प्राण्यांमध्येच अतिशय अधिक विकसलेला आत्मा आहे, कारण प्राण्यांमध्ये रसहि असतोच आणि इतरांमध्ये म्हणजे औषधिवनस्पतींमध्ये चित्त नसतें. पुरुषांमध्येच अतिशय विकसलेला आत्मा आहे कारण त्याला प्रज्ञान (म्हणजे बुद्धि) अत्यंत जास्त असते [संपन्नतमः]. तो जाणलेलें बोलतो, जाणलेलें पाहतो, उद्या काय होईल तें तो जाणतो [वेद श्वस्तनं ], तो सुस्थिति [लोकः] आणि दुःस्थिति [अलोकः] जाणतो आणि ह्याप्रमाणे प्रज्ञानाने संपन्न असलेला तो ह्या नाशवंत शरीराने [मर्त्येन] नाश न पावणारें कांही तरी [अमृतम्] मिळविण्याची तो इच्छा करतो. परंतु इतर पशूंना भूक व तहान एवढ्याचेंच ज्ञान असतें; ते जाणलेलें बोलत नाहीत, जाणलेलें पहात नाहीत, ते उद्या काय होईल तें जाणत नाहीत, ते सुस्थिति व दुःस्थिति जाणत नाहीत. ते एवढेच असतात कारण जेवढी त्यांची बुद्धि [यथाप्रज्ञम्] तेवढेंच त्यांचें ज्ञान संभवतें [संभवाः]. ॥२॥

टिप्पणे—"आविर्भूयः"—हा Keith च्या प्रतींतील पाठ होय. अड्यार प्रतीत "आविर्भूय" असाच पाठ आहे.. कोणताहि पाठ घेतला तरी तो "आविर्भूय" ह्या नामाची द्वितीया विभक्ति होय असें मानतां येतें. कारण "सुपाम् सुलुक् इत्यादि" (७।१।३९) पाणिनीय-सूत्राप्रमाणे कोणत्याहि विभक्तिप्रत्ययाचा "स्" म्हणजे विसर्ग होतो किंवा लोपहि होतो. "आविर्भूय" हा शब्द "ब्रह्मभूयाय कल्पते" ह्या भगवद्गीतेंतील वाक्यांतील "ब्रह्मभूय" ह्या नामाप्रमाणेच बनला आहे, व त्याचा अर्थ "आविर्भाव" म्हणजे विकास असा आहे.

"अश्नुते"—"अश्नुते" ह्याचा अर्थ व्यापतो असाहि होतो आणि उपभोग घेतो असाहि होतो. "अत्युत्कटैः पापपुण्यैरिहैव फल-मश्नुते" (हितोपदेश १।८३) "न वेदफलमश्नुते" (मनुस्मृति १।१०९) हीं उदाहरणें आहेत. "अत्र ब्रह्म समश्नुते" हें कठोपनिषदांतहि आहेच (६।१४). तैत्तिरीयोपनिषदांतहि "सोऽश्नुते सर्वान् कामान्" (२।१) ह्यांत त्याचा उपभोग घेतो हाच अर्थ आहे. अश् म्हणजे व्यापणें हा अर्थ येथे जुळत नाही हें उघडच आहे.

अध्याय ३ खंड ३

स एष पुरुषः समुद्रः सर्वं लोकमेति । यद्ध किंचा-श्नुतेऽत्येनं मन्यते । यदंतरीक्षलोकमश्नुतेऽत्येनं मन्यते । यद्यमुं लोकमश्नुवीतात्येवैनं मन्येत । स एष पुरुषः पंचविधस्तस्य यदुष्णं तज्ज्योतिः यानि खानि स आकाशोऽथ यल्लोहितं श्लेष्मा रेतस्ता आपो यच्छरीरं सा पृथिवी यः प्राणः स वायुः । स एष वायुः पंचविधः प्राणोऽपानो व्यान उदानः समानः । ता एता देवताः प्राणापानयोरेव निविष्टाश्चक्षुः श्रोत्रं मनो वागिति प्राणस्य ह्यन्वपायमेता

अपियंति । स एष वाचश्चित्तस्योत्तरोत्तर क्रमो यद्यज्ञः । स एष यज्ञः पंचविधोऽग्निहोत्रं दर्शपूर्णमासौ चातुर्मास्यानि पशुः सोमः । स एष यज्ञानां संपन्नतमो यत्सोम एतस्मिन् ह्येताः पंचविधाः अधिगम्यते यत्प्राक्सवनेभ्यः सैका विधा त्रीणि सवनानि यदूर्ध्वं सा पंचमी ॥३॥

अर्थः—तो हा पुरुष अणूं समुद्र म्हणजे सर्व लोकांपेक्षा मोठा [अति] आहे. (अति ह्या अव्ययामुळे "लोकं" व पुढील वाक्यांतील "एवं" ह्याची द्वितीया झाली आहे.) ज्या कोणत्या वस्तूचा तो उपभोग घेतो त्या वस्तूपेक्षा [एवं] तो आपणास मोठा [अति] मानतो. जरी तो अंतरीक्षलोकाचा उपभोग घेतो तरी त्या अंतरीक्ष लोकापेक्षा तो आपणास मोठें मानतो. तो जरी त्या म्हणजे स्वर्गलोकाचा अनुभव घेईल तरी त्या स्वर्गलोकापेक्षाहि तो आपणास मोठें मानील. एकूण सर्वांपेक्षा मोठें होण्याची त्याला हाव आहे व ती पूर्ण करण्याकरितां तो यज्ञ करतो असा भाव आहे. (पुढील भाग प्रासंगिक (parenthetical) आहे, चालूं विषयाविषयी नाही.) तो हा पुरुष पांच प्रकारचा आहे. त्या पुरुषांत जी ऊष्णता [उष्णं] आहे ती ज्योतिष् होय; त्यांत जीं छिद्रें आहेत तो आकाश होय; त्यांत जें रक्त, श्लेष्मा आणि रेत आहे तें पाणी होय; त्यांत जें शरीर आहे ती पृथिवी होय, आणि त्यांत जो प्राण आहे तो वायु होय. हा जो वायु आहे तोहि पांच प्रकारचा आहे. ते पांच प्रकार म्हणजे प्राण, अपान, व्यान, उदान व समान हे होत. चक्षुः, श्रोत्र, मन आणि वाणी ह्या देवता प्राण व अपान ह्यांमध्येच प्रवेश करून राहतात. कारण प्राण निघून जातांच त्याच्या मागून [अपायं अनु] त्याहि निघून जातात. (येथे प्रासंगिक संपलें.) पण तो यज्ञ तरी वाणीचा व मनाचा [चित्तस्य] उत्तरोत्तर क्रमच आहे, म्हणजे वाणीच्या व मनाच्या क्रियांची परंपराच (Succession) आहे (कारण यज्ञाचा मुख्य भाग देवतांचे गुण मनांत आणून त्यांच्या

स्तुत्यर्थ मंत्र म्हणणें हा होय). (येथे भाव असा आहे की मनुष्याचें सर्व आयुष्य देलील वाणीच्या व चित्ताच्या क्रियांची परंपराच असल्यामुळे मनुष्याचें सर्व आयुष्यहि यज्ञच होऊं शकतें आणि मामुली यज्ञांतील क्रियांचा जसा देवताराधना हेतु असतो तसा आयुष्यांतील क्रियांचा ब्रह्माराधना हा हेतु असेल तर त्या मनुष्याचें सर्व आयुष्य यज्ञच होय.) (येथे पुनः प्रासंगिक असें यज्ञ वगैरेंचें वर्णन सुरू होतें तें पुढील खंडाच्या अखेरपर्यंत आहे). तो यज्ञहि पांच प्रकारचा आहे. ते पांच प्रकार अग्निहोत्र, दर्शपूर्णमास, चातुर्मास्य, पशु आणि सोम हे होत. तो हा सोमयज्ञ सर्व यज्ञामध्ये अत्यंत जास्त संपन्न म्हणजे परिपूर्ण आहे. कारण ह्यांतच हे पांच प्रकार दिसून येतात. ते प्रकार सवनापूर्वीचा एक, तीन सवनें आणि सवनानंतरचा एक (सवन म्हणजे सोमाचा रस काढणें, देवतास अर्पण करणें व पिणें. तें प्रातःसवन, मध्यान्हसवन व सायंसवन असें तीनदां केलें जातें). (मनुष्याचें आयुष्य देखील एक सोमयागच होय. कारण ह्यांतहि (१) शिक्षण घेण्याचें पहिलें वय (२) भर जवानी (३) मध्यम वय (४) उतार वय (५) म्हातारपण असे पांच भाग होतात असा भाव आहे.) ॥३॥

## अध्याय ३ खंड ४

यो ह वै यज्ञे यज्ञं वेदाहन्यहर्देवेषु देवमप्यूह्ह स संप्रतिविद् । एष वै यज्ञे यज्ञोऽहन्यहर्देवेषु देवोऽप्यूह्हो यदेतन्महदुक्थम् । तदेतत्पंचविधं त्रिवृत्पंचदशौ सप्तदशमेकविंशम् पंचविंशमिति स्तोमतो । गायत्रं रथंतरम् बृहद्भद्रं राजनमिति सामतो । गायत्र्युष्णिक् बृहती त्रिष्टुप् द्विपदेति छंदस्तः । तच्छिरो दक्षिणः पक्षः उत्तरः पक्षः पुच्छमात्मेत्याख्यानम् । पंचकृत्वः प्रस्तोति पंचकृत्व उद्गायति पंचकृत्वः प्रतिहरति पंचकृत्व उपद्रवति पंचकृत्वो निधनमुपयंति

तत्स्तोमसहस्रं भवति । एवं होता पंचविधा अनुशस्यंते यत्प्राक् तृचाशीतिभ्यः सैका विधा तिस्रस्तृचाशीतयो यदूर्ध्वं सा पंचमी । तदेतत्सहस्रं तत्सर्वं, तानि दशदशेति वै सर्वमेतावती हि संख्या दश दशतस्तच्छतं दशशतानि तत्सहस्रं तत्सर्वम् । तानि त्रीणि छंदांसि भवंति त्रेधा विहितं वा इदमन्नमशनं पानं खादस्तदेतैराप्नोति ॥४॥

अर्थ—यज्ञावर यज्ञ वरचढ आहे [अभ्यूळ्हम् = अभ्यूढम्] म्हणजे एका यज्ञापेक्षा दुसरा वरचढ आहे, यज्ञांतील एका दिवसापेक्षा दुसरा दिवस वरचढ आहे आणि सर्व देवांमध्ये एकच देव वरचढ आहे असें जो जाणतो तोच खरा जाणता होय. हें जें महदुक्थ आहे तोच कोणत्याहि इतर यज्ञापेक्षा वरचढ यज्ञ आहे, यज्ञांतील इतर कोणत्याहि दिवसापेक्षा वरचढ दिवस आहे, आणि सर्व देवांमध्ये वरचढ देव आहे. स्तोमांच्या दृष्टीने तें त्रिवृत्, पंचदश, सप्तदश, एकविंश किंवा पंचविंश असें पांच प्रकारचें आहे. (स्तोम म्हणजे मंत्रांचा संयोग.) सामांच्या दृष्टीने तें गायत्र, रथंतर, बृहद्, भद्र किंवा राजन असें पांच प्रकारचें आहे. (साम म्हणजे मंत्र गाण्याची चाल.) छंदांच्या दृष्टीने तें गायत्री, उष्णिक्, बृहती, त्रिष्टुप किंवा द्विपदा असें पांच प्रकारचें आहे. डोकें, उजवी बाजू, डावी बाजू, पुच्छ आणि शरीर [आत्मा] असें त्याचें पांच प्रकारचें वर्णन आहे. पांचदा प्रस्ताव करतात, पांचदा उद्गीथ करतात. पांचदा प्रतिहार करतात, पांचदा उपद्रव करतात आणि पांचदा निधन करतात आणि अशा रीतीने हजार स्तोम होतात (स्तोभ म्हणजे सामगायनांत इ, ऊं वगैरे निरर्थक अक्षरें म्हणतात तीं. तीं अक्षरें म्हणूनच प्रस्ताव वगैरें पांच प्रकार केले जातात हें उघड आहे. ह्या स्तोभांवरच छांदोग्योपनिषद् ११३ येथील परोक्षवाद रचला आहे. ह्याप्रमाणे हे पुढे सांगितलेले पांच प्रकार (पांच भाग) म्हटले जातात. तीन

तृचाशीतिच्या पूर्वीचा एक भाग, तीन तृचाशीति आणि तीन तृचाशीतिनंतरचा एक भाग. ते सर्व पांच भाग मिळून हजार (बृहती) होतात. ते दहा दहा मिळून [ तानि दशदशेति वै ] एवढी म्हणजे हजार ही संख्या होते. तें असें, दहादा दहा घेतले म्हणजे सर्व मिळून [ तत्सर्वं ] एक हजार होतात. त्या तृचाशीति [ तानि ] तीन छंदांच्या आहेत. हें अन्न तीन प्रकारचें सांगितलें आहे. चाखावयाचें [ अशनम् ] त्यांस मिळवून नंतर गिळावयाचें [ पानम् ], आणि चावून खावयाचें [ खादः ] हे ते तीन प्रकार होत. हे अन्नाचे तीन प्रकार [ तत् ] ह्या तीन छंदांनी [ एतैः ] मिळवितो. म्हणजे तीन तृचाशीतिरूपी जें अन्न आहे त्याचें गायत्री छंदाचा एक भाग, बृहतीछंदाचा एक भाग आणि ऊष्णिक् छंदाचा एक भाग असे जे तीन भाग आहेत ते जणूं त्या अन्नाचे तीन प्रकारच होत. ॥४॥

अध्याय ३ खंड ५

"तद्वा इदं बृहतीसहस्रं संपन्नम्। तद्वैतदेके नानाछंदसां सहस्रं प्रतिजानते किमन्यत्सदन्यद् ब्रूयामेति। त्रिष्टुप्सहस्रमेके जगतीसहस्रमेके अनुष्टुप्सहस्रमेके। तदुक्तमृषिणा। अनुष्टुभमनु चर्चूर्यमाणमिंद्रं निचिक्युः कवयो मनीषेति। वाचि वै तदेदं प्राणं न्यचायन्नित्येतत्तदुक्तं भवति।' सहेश्वरो यशस्वी कल्याणकीर्तिर्भवितोरीश्वरो ह तु पुरायुषः प्रैतोरिति ह स्माह। अकृत्स्नो ह्येष आत्मा यद्वाग्। अभिहिता प्राणेन मनसेऽभ्यमानो वाचा नानुभवति। बृहतीमभिसंपादयेत् एष वै कृत्स्न आत्मा यद्बृहती। सोऽयमात्मा सर्वतः शरीरैः परिवृतस्तद्यथायमात्मा सर्वतः शरीरैः परिवृत एवमेव बृहती सर्वतश्छंदोभिः परिवृता। मध्यं ह्येषामं-

गानामात्मा मर्त्यं छंदसां बृहती । स हेश्वरो यशस्वी कल्याणकीर्तिर्भवितोरीश्वरो ह न पुरायुपः प्रैतोरिति ह स्माह । कृत्स्नो ह्येप आत्मा यद्बृहती तस्माद्बृहतीमेवाभिसंपादयेत् ॥५॥

ह्या खंडांत मुख्य विषय पुनः चालू केला आहे. ह्या खंडाचा अर्थ करतांना ह्याच्या मागचें वाक्य तिसऱ्या खंडांतील " स एप वाचः चित्तस्योत्तरोत्तरक्रमो यद्यज्ञः " हें मानलें पाहिजे. ह्याप्रमाणें ह्या खंडाचा अर्थ पुढील प्रमाणें होतो.

अर्थ—वाचा आणि चित्त ह्यांचा जो उत्तरोत्तर क्रम आयुष्यभर चालला असतो तोच [तद्] त्या मनुष्यानें आपल्या यज्ञतुल्य आयुष्यानें संपादिलेलें बृहतीसहस्र होय. परंतु दुसरे कोणी आक्षेपक [एक] असें म्हणतात की [प्रतिजानते] (बृहतीसहस्र संपादित होतात हें खरें नाही.) नानाछंदांचें सहस्र संपादित होतात. हें संपादिलेलें सहस्र एक प्रकारचें असून दुसऱ्या प्रकारचें आहे असें कां म्हणावें ? कोणी त्रिष्टुप्सहस्र संपादन करतात, कोणी जगतीसहस्र संपादन करतात, आणि कोणी अनुष्टुप्सहस्र संपादन करतात. (सर्व मनुष्यांचें आयुष्य शंभर वर्षेंच नसतें. कांहींचें जास्त व बहुधा पुष्कळांचें शंभर वर्षांपेक्षा कमीच असतें. अर्थात् त्यांच्या आयुष्ययज्ञांत ३६००० दिवस म्हणजे हजार बृहती न होतां, ३२००० दिवस म्हणजे हजार अनुष्टुप्च होतात. म्हणून हे आक्षेपक म्हणतात की अनुष्टुप्सहस्र होत असतां बृहतीसहस्र होतात असें कां म्हणावें ?) ऋषीनेहि म्हणजे ऋग्वेदामध्येहि असें म्हटलें आहे की (ऋग्वेद १० । १२४ । ९) " इंद्र अनुष्टुपाप्रमाणे [अनुष्टुभमनु] नाचला [चर्चूर्यमानः] असें ब्राह्मण्यांनी [कवयः] आपल्या बुद्धीनें [मनीषा] ठरविलें [निचिक्युः]. (येथें पूर्व पक्ष संपला. येथून उत्तरपक्ष सुरू होतो.) ह्या ऋग्वेदांतील वचनाचा एवढाच अर्थ आहे की [तदुक्तं भवति] तेव्हां [तदा] म्हणजे त्या कवींच्या

काळीं वाणींतच इंद्र म्हणजे प्राण आहे असें ठरविलें [न्यचायन्—चायू ह्या धातूचें लङ्]. त्या ऋषीच्या म्हणण्याचा असाहि अधिक अर्थ आहे की [इति ह स्माह] तो अनुष्टुप् सहस्र संपादन करणारा यशस्वी व कल्याणकीर्ति होईल, तथापि आयुष्य पूर्ण होण्यापूर्वीच मरेल. (कारण त्याने बृहतीसहस्र संपादण्याऐवजी अनुष्टुप्सहस्रच संपादिलें. अनुष्टुपाचीं अक्षरें ३२ व बृहतीचीं ३६ आहेत ह्यावरून हा अर्थ निघतो.) कारण वाणी हा अपूर्ण [अकृत्स्नः] आत्मा आहे. कारण मनुष्य वाणीने अनुभवीत नाही. खरोखर, प्राणाकडून मनाकरितां [मनसे अभि] फेकला जाणारा [अस्यमानः] मनुष्य अनुभवतो म्हणजे मनुष्य मनानें अनुभवतो. म्हणून बृहतीसहस्रच संपादन करण्याचा प्रयत्न करावा. कारण ही बृहती जी आहे ती पूर्ण आत्मा होय. तो हा आत्मा चोहों-कडून [सर्वतः] शरीराच्या अंगांनी [शरीरैः] वेढलेला [परिवृतः] असतो. ज्याप्रमाणे हा आत्मा चोहोंकडून शरीरांगांनी वेढलेला आहे त्याप्रमाणेच ही बृहतीहि चोहोंकडून इतर छंदांनी वेढलेली आहे. कारण हा आत्मा सर्व अंगांच्या मध्यभागीं असतो. आणि ही बृहतीहि छंदांची मध्य आहे. (कारण कांही छंद बृहतीपेक्षा लहान व कांही मोठे आहेत.) बृहतीसहस्रसंपादन करण्याचा प्रयत्न करणारा मनुष्य यशस्वी, कल्याणकीर्ति होईलच, शिवाय तो आयुष्य पूर्ण होण्यापूर्वी मरणार नाही (येथे "ईश्वरो ह तु पुरायुषः प्रैतोः" असाच पाठ सर्व प्रतींत सापडतो. पण खरा पाठ "ईश्वरो ह न पुरायुषः प्रैतोः" असाच घेणें भाग पडतें. कारण त्याशिवाय अनुष्टुप् सहस्र संपादन करणारा व बृहतीसहस्र संपादन करणारा ह्या दोघांमध्ये फरकच दाखविला जात नाही. आणि तसा फरक दाखविणें तर उपनिषत्कारास इष्ट आहे हें उघड आहे. "न" पाठभ्रंशानें "तु" होणेंहि संभवतें. असाच त्या ऋग्वेदाच्या ऋषीच्या म्हणण्याचा अर्थ आहे. [इति ह स्माह] ही जी बृहती आहे तो पूर्ण आत्मा आहे म्हणून बृहतीसहस्रच संपादन करण्याचा प्रयत्न करावा. ॥५॥

टिप्पणी—ह्या खंडाचा जो अर्थ मी केला आहे त्याला फार विरोध सर्वांकडून होईल; पण माझाच अर्थ खरा आहे. कारण महदुक्थाची लांबी ठराविक म्हणजे बृहतीसहस्र आहे हें मागील खंडांतील सहस्र शब्दानें दाखविलेंच आहे. ठराविक लांबी असूनहि ती बृहतीसहस्राएवढी असावी किंवा जगतीसहस्राएवढी असावी किंवा अनुष्टुप्सहस्राएवढी असावी हें म्हणजे यशाशीं जुळत नाही. हें आयुष्य यशाशींच जुळतें. "किमन्यत्सदन्यद् ब्रुयाम्" हें म्हणणेंहि अनिश्चित लांबीच्या आयुष्ययशाशींच जुळतें, निश्चित लांबीच्या महदुक्थाशीं जुळत नाही. म्हणून ह्या खंडाचा अर्थ असा स्पष्ट दिसतो की मनुष्यानें पूर्ण आयुष्यभर म्हणजे शंभर वर्षें जगण्याचा प्रयत्न करावा. "कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतं समाः" हें ईशोपनिषदांत सांगितलें आहे तेंच येथेहि सांगितलें आहे, हें म्हणणें चांगलें जुळतें.

"भवितोः, प्रैतोः"—तो सुन् हा प्रत्यय वैदिक भाषेंत "तुमुन्" ह्या प्रत्ययाच्या अर्थानेच "ईश्वर" शब्दासह येतो. "ईश्वरे तोसुन् कसुनौ ३।४।१३ हें पाणिनीय सूत्र पहा. ईश्वर शब्दासह ह्या प्रत्ययाचा उपयोग भविष्यकाळ दाखविण्याकडे करीत, असें येथील प्रयोगावरून दिसतें.

"तदेंद्रं" सर्वत्र पाठ तदैद्रं असाच आहे. पण त्यांतून चांगला अर्थ निघत नाही. म्हणून "तदेंद्रं" असा पाठ मी घेतला आहे.

अध्याय ३ खंड ६

ह्या खंडांतहि मागील खंडांतील उत्तरपक्षच चालू आहे. पूर्वपक्षानें उद्धृत केलेल्या ऋग्वेद मंत्राचा पूर्वपक्षानें केला त्याहून भिन्न अर्थ करून पूर्वपक्षाचें खंडन मागील खंडांत केलें. आता ह्या खंडांत पूर्व पक्षानें केलेला अर्थ बरोबरच आहे असें मानून पूर्वपक्षाचें खंडन "इंनिर्मिमीते" पर्यंत केलें आहे.

"तद्वा इदं बृहतीसहस्रं संपन्नं तस्य वा एतस्य बृहती-सहस्रस्य संपन्नस्यैकादशानुष्टुभां शतानि भवंति पंचविंशतिश्चानुष्टुभ आत्तं वै भूयसा कनीयः। तदुक्तमृषिणा। वाचमष्टापदीमहमित्यष्टौ हि चतुरक्षराणि भवंति। नवस्रक्तिमिति बृहती संपद्यमाना नवस्रक्तिः। ऋतस्पृशमिति सत्यं वै वागृचा स्पृष्टा इंद्रात् परि तन्वं ममेति तद्वदेवैतद् बृहतीसहस्रमनुष्टुप् संपन्नं भवति तस्मात्तदेंद्रात्प्राणात् बृहत्यै वाचमनुष्टुभं तन्वं सन्निर्मिमीते।

स वा एष वाचः परमो विकारो यदेतन्महदुक्थम् तदेतत् पंचविधं मितममितं स्वरः सत्यानृते इति। ऋग्गाथा कुंब्या तन्मितं। यजुर्निगदो वृथा वाक् तदमितं। सामाथो यः कश्च गेष्णः स स्वरः। ओमिति सत्यं नेत्यनृतम्। तदेतत्पुष्पं फलं वाचो यत्सत्यम्। स हेश्वरो यशस्वी कल्याणकीर्तिः भवितोः पुष्पं हि फलं वाचः सत्यं वदति। अथैतन्मूलं वाचो यदनृतम् तद्यथा वृक्ष आविर्मूलः शुष्यति स उद्वर्तत एवमेवानृतं वदन्नाविर्मूलमात्मानं करोति स शुष्यति स उद्वर्तते तस्मादनृतं न वदेत् दयेत त्वेनेन। पराग्वा एतद् रिक्तमक्षरं यदेतदो ३ मिति तद्यत्किंचोमित्याहात्रैवास्मै तद्रिच्यते स यत्सर्वमोङ्कुर्याद्रिच्यादात्मानम् स कामेभ्यो नालं स्यात्। अथैतत्पूर्णमभ्यात्मं यन्नेति। स यत् सर्वं नेति ब्रूयात्पापिकास्य कीर्तिर्जायेत सैनं तत्रैव हन्यात्। तस्मात् काल एव दद्यात्काले न दद्यात् तत्सत्यानृते मिथुनीकरोति तयोर्मिथुनात्प्रजायते भूयान्भवति। यो वै तां वाचं वेद यस्या एष

विकारः स संप्रतिविद् । अकारो वै सर्वा वाक् सैषा स्पर्शोष्मभिर्व्यज्यमाना बह्वी नानारूपा भवति । तस्यै यदुपांशु स प्राणोऽथ यदुच्चैस्तच्छरीरं तस्मात्तिर इव तिर इव ह्यशरीरम् अशरीरो हि प्राणोऽथ यदुच्चैस्तच्छरीरं तस्मात्तदाविराविर्हि शरीरम् ॥६॥

अर्थ—पूर्वपक्षाने उद्धृत केलेल्या ऋग्वेद मंत्राचा अर्थ इंद्र अनुष्टुभप्रमाणें नावला असा असला तरी हें बृहतीसहस्र संपन्न होतेंच. कारण संपन्न झालेल्या बृहतीसहस्राचे (म्हणजे ३६००० अक्षरांचे ) अकराशें पंचवीस अनुष्टुभ् होतात. (एका बृहतीचीं अक्षरें ३६ व एका अनुष्टुभाचीं अक्षरें ३२ म्हणून १००० बृहतींचे ११२५ अनुष्टुभ् होतात.) मात्र असा की ११२५ अनुष्टुभ् झाले म्हणजे १००० बृहती होतीलच. मोठयानें लहान पकडलें जातेंच [आत्तं] म्हणजे मोठयांत लहानाचा अंतर्भाव होतोच म्हणजे एका बृहतींत एक अनुष्टुभ् होतो व कांही शिल्लक राहतेंच. ऋषीने म्हणजे ऋग्वेदांतहि म्हटलें आहे की "वाचमष्टापदीमहं नवस्रक्तिमृतस्पृशम् ॥ इन्द्रात्परितन्वं ममे"॥ ८।६५।१२. अर्थ—मी इंद्राची ही तनू [तन्वं] म्हणजेच अष्टापदी वाणी म्हणजे अनुष्टुभ् प्रथित वाणी इंद्रापासून झालेल्या [इंद्रात्] सत्य सांगणाऱ्या [ऋतस्पृशं] नवस्रक्तीची म्हणजे बृहतीची केली [परिममे] ) ।( आता ह्या मंत्राचा एक एक भाग घेऊन त्याचें विवरण उपनिषत्कार करतात.) "वाचमष्टापदीमहं" असें म्हणण्याचें कारण असें आहे की अनुष्टुभांत चार अक्षरें आठदा असतात. "नवस्रक्तिम्" असें म्हणण्याचें कारण असें आहे की संपादित केलेल्या म्हणजेच रचलेल्या बृहतीचे चार चार अक्षरांचा एक एक भाग असे नऊ भाग असतात. "ऋतस्पृश" असें म्हणण्याचें कारण असें आहे की ऋचेनें स्पृष्ट झालेली म्हणजे ऋग्वेदांतील वाणी सत्य आहे. "इन्द्रात्परितन्वं ममे" ह्याचा अर्थ असा आहे की "ज्या अर्थी [ यद् एव ] हजार बृहतींचे

अकरांशें पंचवीस अनुष्टुप होतात त्या अर्थी इंद्रसंज्ञक प्राणापासून उत्पन्न झालेल्या बृहतीची [ बृहत्यै—चतुर्थीचा अर्थ षष्ठीसारखा घ्यावा लागतो.] अनुष्टुप् वाणी हीच चांगली तनू [ सत् सत्वं ] निर्माण करतो. ( आता येथून निराळेंच प्रकरण सुरू होतें. येथपर्यंत असें दाखविलें आहे की मनुष्यानें बृहतीसहस्र संपादन करावें म्हणजे शंभर वर्षें जगण्याचा प्रयत्न करावा. आता तो प्रयत्न करणाऱ्यानें कसें वागावें तें दाखविलें आहे. ) हें जें आयुष्यरूपी यज्ञांतील महदुक्थ आहे तें वाणीचा परम म्हणजे श्रेष्ठ विकार म्हणजे विकासच होय. तें पांच प्रकारचें आहे. ते पांच प्रकार मित, अमित, स्वर, सत्य आणि अनृत हे होत. ऋक् म्हणजे ऋग्वेदांतील मंत्र, गाथा म्हणजे प्रसिद्ध गोष्ट सांगणारे श्लोक आणि कुंभ्या म्हणजे आचारशिक्षारूपी श्लोक हे मित होय (कारण मोजक्या अक्षरांत म्हणजे छंदांत ते रचलेले असतात ). यजुस् म्हणजे यजुर्वेदांतील मंत्र, निगद म्हणजे मोठ्यानें म्हणावयाचा यजुर्वेदाचा भाग आणि वृथा वाग् म्हणजे संभाषण हे अमित होत ( कारण ते छंदोबद्ध म्हणजे मोजक्या अक्षरांत केलेले नसतात). साम म्हणजे सामवेदांतील मंत्र आणि गावयाचा जो कोणी श्लोक तो हे स्वर होत (कारण ते सारिगमपधनि ह्या सप्त स्वरांनी बांधलेले असतात). "ओम्" म्हणजे "होय" ह्या अर्थाचें अक्षर सत्य होय आणि "न" म्हणजे नाही ह्या अर्थाचें अक्षर अनृत होय. हें जें सत्य आहे तें वाणीचें पुष्प आणि फल होय. वाचेचें पुष्प आणि फल असलेलें हें सत्य जो बोलतो तो, कल्याणकीर्ति आणि यशस्वी होईल. हें जें अनृत म्हणजे "न" हें अक्षर वाचेचें मूल होय. म्हणून मूल उघडें असलेला [ आविर्मूलः ] वृक्ष जसा शुष्क होतो आणि नाश पावतो [ उद्वर्तते ] तसा तो अनृत बोलणारा मनुष्य आपलें मूल उघडें करतो, तो शुष्क होतो आणि तो नाश पावतो, म्हणून अनृत बोलूं नये; परंतु त्या अनृतानें [ एनेन ] आपलें स्वतःचें रक्षण करावें [दयेत]. (तें कां व कसें व केव्हा करावें हें पुढे सांगितलें आहे). हें जें ओम्

अक्षर आहे तें धन बाहेर घालविणारें [परागु] आणि घर रिकामें करणारें [रिक्तम्—कर्तरि क्तः] आहे. म्हणून ज्या कशाला [यत् किंच] तो ओम् म्हणजे होय असें म्हणतो त्याकरितां [अस्मै] तें त्याचें घर येथेच रिकामें होतें. जर तो सर्वांनाच ओंकार दिल्यामुळे [सर्वं ओंकुर्यात्] स्वतःला [आत्मानं] रिकामें करील तर त्याला काम पूर्वीचे आनंद मिळणार नाहीत. आता हे 'न' म्हणजे "नाही" हें जें अक्षर आहे तें आत्म्याकरितां [अभ्यात्मं] पूर्ण म्हणजे आत्म्याला पूर्ण करणारें [पूर्ण-कर्तरि क्तः] आहे. परंतु सर्वांना तो नाही असें म्हणेल तर त्याची दुष्कीर्ति [पापिका कीर्तिः] होईल व ती त्याला तेथेच मारील. म्हणून योग्य काळीं द्यावें आणि योग्य काळीं देऊं नये. असें केल्याने [तत्] तो सत्य आणि अनृत ह्यांचें मैथुन करवितो. त्याच्या मैथुनाने [मैथुनात्] तो वाढतो [प्रजायते] आणि मोठा होतो. (आता शंभर वर्षे जगूं इच्छिणाऱ्यांचें दुसरेंहि कर्तव्य सांगतात). जिचा महदुक्थ हा विकार म्हणजे विकास आहे, त्या वाणीला जो जाणतो तोच खरा ब्राह्मण [संप्रतिवित्]. अकार हा उच्चारच सर्व वाणी होय. तीच म्हणजे अकार हा उच्चारच स्पर्श म्हणजे क पासून म पर्यंतचे उच्चार आणि ऊष्म म्हणजे ष, श, स हे उच्चार ह्यांच्या रूपांनी प्रगट केली गेली असतां [व्यज्यमाना] पुष्कळ आणि नानारूपाची होते. तिचा हळूहळू म्हणजे दुसऱ्याचा ऐकूं जाणार नाही अशा रीतीने केलेला [उपांशु] उच्चार हाच तिचा प्राण होय आणि मोठ्याने केलेला उच्चार हें तिचें शरीर होय. म्हणून ते उपांशुभाषण गुप्त असल्याप्रमाणे [तिर इव] असतें. कारण अशरीर जें असतें तें गुप्त असल्याप्रमाणेच असतें आणि प्राण अशरीरच आहे. जें उच्चैः म्हणजे मोठ्याने उच्चारलेलें असतें तें शरीर म्हणून तें आविः म्हणजे प्रगट असतें कारण शरीर प्रगटच असतें. ह्याचा भाव असा दिसतो. केव्हा दान करावें व केव्हा दान करणें टाळावें हें असें मागें सांगितलें तसेंच चौल्यासंवंधानेहि येथे सांगितलें आहे. केव्हा सर्वांस ऐकूं जाईल व

समजेल ह्या रीतीने बोलावें व केव्हा कोणासच ऐकूं आणार नाही किंवा एखाद्यासच ऐकूं जाईल अशा रीतीने बोलावें म्हणजे कांही गोष्टी गुप्त ठेवाव्या आणि ह्यांनाच प्राण म्हटलें आहे. ह्यावरून कांही गोष्टी गुप्त ठेवणें हें प्राणरक्षण करण्यासारखेंच आहे म्हणून अशा गोष्टी गुप्त ठेवाव्या असा भाव दिसतो. ज्याला शंभर वर्षे जगावयाचें आहे त्याने आपल्या कांही गोष्टी गुप्त ठेवाव्या व कांही प्रगट कराव्या असा भाव दिसतो.

टिप्पणी—"रिक्तं" आणि "ओंकुर्यात्" हे पाठ Keithच्या प्रतींतून घेतले आहेत. अड्यार प्रतींत "वृत्तं" आणि "ओंकारात्" असे पाठ आहेत. Keith च्या प्रतींतील पाठांचा चांगला अर्थ सहज होतो.

अध्याय ३ खंड ७

तदा इदं बृहतीसहस्रं संपन्नं तद्यशः स इंद्रः स भूताना-मधिपतिः। स य एवमेतमिदं भूतानां अधिपतिः वेद विस्रसा हैवास्माल्लोकात्प्रैतीति ह स्माह महिदास ऐतरेयः प्रेत्येंद्रो भूत्वैषु लोकेषु राजति। तदाहुर्यदनेन रूपेणामुं लोकमभि-संभवती ३ अथ केन रूपेणेमं लोकमाभवती ३। तद्यदेतत् स्त्रियां लोहितं भवति अग्नेस्तद्रूपं तस्मात्त बिभत्सेताथ यदेतत्पुरुषे रेतो मत्र्यादित्यस्य तद्रूपं तस्मात्तस्मात्र विभत्सेत। सोऽयं मात्मेममात्मानममुष्मा आत्मने संप्रयच्छत्यसावात्मा-मुमात्मानमिमस्मा आत्मने संप्रयच्छति तावन्योन्यमभि-संभवतोऽनेनाह रूपेणामुं लोकमभिसंभवत्यमुनो रूपेणेमं लोकमाभवति ॥७॥

अर्थः—त्या म्हणजे मागील खंडांत सांगितल्याप्रमाणे वागल्याने [ तद्वै ] हें बृहतीसहस्र संपन्न केलें आतें म्हणजे शंभर वर्षे आयुष्य

मिळविलें जातें. एवढें मोठें आयुष्य मिळविणें [तत्] हें मोठें यशच आहे आणि एवढें मोठें आयुष्य मिळविणारा इंद्रच होतो व तो सर्व भूतांचा अधिपतिहि होतो. जो याप्रमाणें ह्या इंद्राला व भूतांच्या अधिपतीला जाणतो अर्थात् त्याची ती उन्नतावस्था प्राप्त करून घेतो, तो नाश न पावणाऱ्या शरीरानें [ विस्रसा ] म्हणजे कीर्तिरूपी शरीरानें ह्या लोकांतून जातो आणि ह्या लोकांतून गेल्यानंतर [प्रेत्य] तो इंद्र होऊन त्या लोकांत [एषु लोकेषु] प्रकाशत राहतो, असें महिदास ऐतरेय म्हणाला. येथे जें [ यत् ] कोणी विचारतात [ आहुः ] तें हें होय. [तत् ] जर तो ह्या कीर्तीच्या रूपानें त्या लोकांत राहतो तर ह्या लोकांत कोणत्या रूपानें राहतो. ( ह्या प्रश्नाचें उत्तर असें.) स्त्रीच्या ठिकाणीं जें हें आर्तव रक्त [ लोहितम् ] आहे तें अग्नीचें रूप होय. म्हणून त्याचा तिटकारा करूं नये. पुरुषाचे ठिकाणीं हें जें रेत आहे तें आदित्याचें रूप होय म्हणून त्याचा तिटकारा करूं नये [ बिभत्सेत ]. हा आत्मा म्हणजे पुरुष आपला आत्मा म्हणजे रेत त्या आत्म्याकरितां म्हणजे संतति उत्पन्न होण्याकरितां देतो. तो आत्मा म्हणजे स्त्री आपला आत्मा म्हणजे आर्तव रक्त ह्या आत्म्याकरितां [ इमस्मै ] म्हणजे संतति उत्पन्न होण्याकरितां देते. म्हणून ते दोघे स्त्रीपुरुष एकमेकांशीं [अन्योन्यं] मिळतात [ अभिसंभवतः] व संतति उत्पन्न करतात. एकूण यशोरूपानें [अनेन] अहो [अह] तो त्या लोकीं प्रकाशत राहतो आणि संततिरूपानें तो ह्या लोकीं संततिरूपानें राहतो. ॥७॥

टिप्पणी—'विस्रसा' "स्रंस्" धातूपासून "स्रस्" म्हणजे नाश असा शब्द झाला. "विगता स्रस् यस्मात् तत् विस्रस् कीर्तिरूपं शरीरं तेन" असा "विस्रसा" ह्याचा अर्थ केला पाहिजे. कठोपनिषद् ६ । ४ येथे "विस्रसः" असा शब्द आहे. त्याचा अर्थ तेथे "नाश, मृत्यु" असा करावा लागला आहे.

"इमस्मै"—हा आर्ष प्रयोग आहे.

अध्याय ३ खंड ८

तत्रैते श्लोकाः

यदक्षरं पंचविधं समेति ।
युजो युक्ता अभि यत्संवहंति ॥
सत्यस्य सत्यमनु यत्र युज्यते ।
तत्र देवाः सर्व एकं भवंति ॥१॥
यदक्षरादक्षरमेति युक्तम् ।
युजो युक्ता अभि यत्संवहंति ॥
सत्यस्य सत्यमनु यत्र युज्यते ।
तत्र देवाः सर्व एकं भवंति ॥२॥
यद्वाच ओमिति यच्च नेति ।
यच्चास्याः क्रूरं यदुचोल्वणिष्णु ॥
तद्विधूया कवयो अन्वविन्दन् ।
नामायत्ता समतृप्यञ्छ्रुतेऽधि ॥३॥
यस्मिन्नामा समतृप्यञ्छ्रुतेऽधि ।
तत्र देवाः सर्वयुजो भवंति ॥
तेन पाप्मानमपहत्य ब्रह्मणा ।
स्वर्गं लोकमप्येति विद्वान् ॥४॥
नैनं वाचा स्त्रियं ब्रुवन् ।
नैनमस्त्रीपुमान् ब्रुवन् ।
पुमांसं न ब्रुवन्नेनम् ।
वदन् वदति कश्चन ॥५॥

अ इति ब्रह्म तत्रागतमहमिति । तद्वा इदं बृहतीसहस्रं संपन्नम् तस्य वा एतस्य बृहतीसहस्रस्य संपन्नस्य षट्त्रिंशत-मक्षराणां सहस्राणि भवंति तावंति पुरुषायुषोऽह्नां सहस्राणि भवंति । जीवाक्षरेणैव जीवाहराप्नोति जीवाह्वा जीवाक्षरमिति । अनकाममारोऽय देवरथस्तस्य वागुद्धिः श्रोते पक्षसी चक्षुषी युक्ते मनः संग्रहीता तदयं प्राणोऽधितिष्ठति। तदुक्तमृषिणा । आतेन यातं मनसो जवीयसा निमिषश्चि-ज्जवीयसेति जवीयसेति ॥९॥

अर्थ—ऋषिविषयी हे श्लोक आहेत. ज्याचे ठिकाणीं [ यद् ] पांच प्रकारचें अक्षर म्हणजे अविनाशी वस्तुजात म्हणजे पृथ्वी, आप्, तेज, वायु व आकाश एकत्र होतें [ समेति ], ज्याला जोडलेले घोडे [ युक्ताः युवः ] म्हणजेच इंद्रियें वाहून नेतात, सत्य असलेल्या प्राणाचा सत्य असा जीवात्माहि मागाहून [ अनु ] (बृहदारण्यकोपनिषद् २।१।२० किंवा २।३।६ व आमची टीका पहा.) ज्यांत येऊन मिळतो त्या शरीररूपी रथामध्ये सर्व देव म्हणजे इन्द्रियाधिष्ठातृ अग्नि, सूर्य वगैरे एकत्र होतात. ॥१॥ अक्षर ब्रह्मापासून उत्पन्न झालेला अक्षर प्राण [ अक्षरादक्षरम् ] जोडला गेला असतां [ युक्तम् ] ज्यांत [ यद् ] येतो, ज्याला जोडलेले घोडे वगैरे ( मागील श्लोकाप्रमाणे ) (कठ ३-४ शीं तुलना करा. तेथे हीच उपमा योजिली आहे. ) ॥२॥ वाणीचें जें ओम् म्हणजे होय ह्या अर्थाचें अक्षर आहे आणि न म्हणजे नाही या अर्थाचें अक्षर आहे, तसेंच वाणीचें जें क्रूर म्हणजे हिंसा करण्यास सांगणारें अक्षर आहे आणि जें उल्वणिष्णु म्हणजे उत्पत्ति आणि वाढ अथवा जोपासना किंवा पोषण करण्यास सांगणारें अक्षर आहे त्या दोनहि प्रकारच्या अक्षरांच्या विशिष्ट प्रकारच्या संयोगाने [ वियूया ] म्हणजे मागील सहाव्या खंडांत सांगितल्याप्रमाणे अद्वैत बुद्धीने जास्तीत जास्त जीवांच्या हिताकरितांच कधी दान करून व कधी दान करण्याचें टाळून

आणि कधी हिंसा करून व कधी उत्पत्ति वाढ, ओपासना किंवा पोषण करून शहाण्यांनी शंभरवर्षांचें आयुष्य मिळविलें आणि वेदांमध्ये [श्रुते] प्रामुख्याने उपदेशिलेल्या [अधि] सत्कीर्तीकरितां प्रयत्न करणारे [यत्ताः—कर्तरि क्तः] सत्कीर्तीनें [नामा] तृप्त झाले. ॥३॥. ज्या शरीरांत रहात असतां [यस्मिन्] वेदांमध्ये प्रामुख्यानें उपदेशिलेल्या सत्कीर्तीने ते तृप्त झाले, त्या शरीरात, सर्व काम पुरविणारे [सर्वयुजः] देव राहतात. त्यामुळे [तेन] तो विद्वान् पापांचा म्हणजे दुःखाचा नाश करून ब्रह्माने म्हणजे वेदांच्या साधनाने म्हणजे वेदांतील ज्ञानाने स्वर्गलोकांस जातो. ॥४॥ जो ह्याप्रमाणें स्वर्गास जाऊं शकतो त्या आत्म्याचें वर्णन करणारा [वदन्] कोणीहि [कश्चन], त्याला वाणीने [वाचा] स्त्री किंवा अस्त्रीपुमान् म्हणजे नपुंसक किंवा पुमान् म्हणत [ब्रुवन्] त्याचें वर्णन करीत नाही. ह्याचा *अर्थ असा आहे की शरीर लिंगाने स्त्री पुरुष किंवा त्यांतील* नपुंसक ह्यांपैकी कसेंहि असो आत्मा हा प्रयत्नाने वरील रीतीने स्वर्गलोकाची प्राप्ती करून घेऊं शकतो. ॥५॥ अ म्हणजे ब्रह्म त्यांतच अहम् म्हणजे अहंकार म्हणजे जीवात्मा उत्पन्न झाला (तेव्हाच [तद्दै] हें बृहतीसहस्र आयुष्याचें किंवा स्तोत्राचें संपन्न झालें. त्या संपादित केलेल्या स्तोत्ररूपी बृहतीसहस्राचीं ३६००० अक्षरें असतात. आणि पुरुषाच्या आयुष्याचे दिवसहि तितकेच असतात. जीवाने उच्चारलेल्या अक्षराने जीवाचा म्हणजे आयुष्याचा दिवस मिळवितो आणि जीवाच्या म्हणजे आयुष्याच्या दिवसाने जीवाने उच्चारलेलें अक्षर मिळवितो. म्हणजे बृहतीसहस्रस्तोत्र म्हणणें हें शंभरवर्षे जगणेंच होय (कारण ज्यांत शंभरवर्षे जगण्याचें सामर्थ्य असेल तोच बृहतीसहस्र म्हणूं शकतो); आणि शंभरवर्षे आयुष्य मिळविणें हें बृहतीसहस्रस्तोत्र म्हणणेंच होय. (तें बृहतीसहस्र संपादन करण्याकरितां वरील श्लोकांत वर्णिलेला 'शरीररूपी रथच पाहिजे म्हणून त्याला देवरथ असें नांव देऊन त्या रथाने

ची म्हणजे बृहतीसहस्र संपन्न होईल असें पुढे सांगितलें आहे.) हा शरीररूपी देवरथ सर्व काम पूर्ण करून त्या कामांना मारणारा [मनकाममाराः] आहे. त्याची वाणी ही बैठक [उद्धिः] आहे. कान दोन बाजू आहेत. डोळे हे घोडे आहेत. मन हा त्या घोड्यांना आवरणारा म्हणजे हाकणारा आहे [संग्रहीता]. त्यावर प्राण बसतो. त्याविषयी ऋषीने म्हणजे ऋग्वेदांत म्हटलें आहे. मनापेक्षा वेगवान् अशा त्या रथावर बसून तुम्ही दोघे ईश्वर व जीव या [आयातम्-ऋग्वेद १०।३९।१२] डोळ्याच्या निमेषापेक्षाहि वेगवान् अशा त्या रथाने (ऋग्वेद ८।६२।२) म्हणजे बृहतीसहस्र संपन्न होईल असा भाव आहे. शरीराचा उपयोग शंभर वर्षे जगून सत्कर्मे करण्याकडे करा असें ह्या सर्व खंडाचें तात्पर्य आहे. ॥८॥

टिप्पणें—ह्या खंडांत पुष्कळ पाठभेद आहेत. "वियूया" असा Keith च्या प्रतींत पाठ आहे. अडयार प्रतींत "विधूय" असा पाठ आहे. "च्युतेऽधि" ह्या Keith च्या प्रतींतील पाठाच्या ठिकाणीं अडयार प्रतींत "छृतेऽधि" असा पाठ आहे. "पुमांसं न ह्वन्" या Keith च्या प्रतींतील पाठाच्या ठिकाणीं "पुमांसमन्नुवन्" असा पाठ अडयार प्रतींत आहे. Keith च्या प्रतींतील "जीवाहर्" ह्या ठिकाणीं अडयार प्रतींत "जीवा अहर्" असा पाठ आहे. मी Keith च्या प्रतींतील पाठच स्वीकारले आहेत.

*ह्या खंडांतील श्लोकांचा अर्थ मागील खंडांत जें सांगितलें आहे त्यांशीं जुळेल असाच केला पाहिजे हें "तदेते श्लोकाः" ह्यावरून स्पष्टच आहे. श्लोक ३ व ४ ह्यांचा अर्थ करतांना ही गोष्ट विशेषतः लक्षांत ठेवावी लागली.*

"वियूयाः" "यु" म्हणजे संयुक्त करणें ह्या धातूपासून "यूय" म्हणजे संयोग अशा अर्थाचा शब्द "अप्रभूय" किंवा

"आविर्भूय" ह्यांतील "भूय" "भू" धातूपासून होतो त्याप्रमाणे झाला. त्याला लागलेला "वि" हा उपसर्ग विरुद्धार्थवाचक आहे असें न मानतां "विशिष्ट" अशा अर्थाचा मानावा. "विशिष्टः यूयः" म्हणजे विशिष्ट प्रकारचा संयोग म्हणजे सर्वभूतहितार्थ अद्वैत बुद्धीने केलेला संयोग असा अर्थ "वियूय" ह्याचा करावा. त्याला तृतीयार्थी "डा" प्रत्यय लागून "वियूया" असें रूप बनलें असें मानावें. असें मानून अर्थ केल्याने सहाव्या खंडांत जो अर्थ आहे तोच तिसऱ्या श्लोकाच्या पहिल्या तीन पादांत येतो.

"नामा"—सातव्या खंडांत "विसता" ह्या शब्दाने "अविनाशी अशा सत्कीर्तिरूपी शरीराने" असा अर्थ दाखविला जातो. तोच अर्थ येथे येण्याकरिता "नाम" ह्याचा सत्कीर्ति असा अर्थ केला पाहिजे आणि तसा त्याचा अर्थ होऊं शकतोच. "नामा" हा प्रत्ययाने झालेली तृतीया मानावी.

"उल्वणिष्णु"—ह्याचा अर्थ "क्रूर" ह्याच्या अर्थाच्या उलट, असला पाहिजे हें उघड आहे. "उल्व" म्हणजे गर्भाशय किंवा "उल्वण" म्हणजे मोठा ह्यापासून "उल्वणिष्णु" म्हणजे "उत्पत्ति" करणारा, मोठा करणारा म्हणजे पोषण करणारा" असा शब्द होतो.

शरीररथास मनापेक्षा किंवा निमिषापेक्षा वेगवान् म्हणण्याचें कारण असें दिसतें की शरीराचें आयुष्य फारच वेगाने क्षीण होत असतें.

## अध्याय चवथा

मागील तीन अध्यायांत सत्कर्माचें महत्व वर्णन करून आता पुढील चार अध्यायांत ज्ञान सांगितलें आहे. ह्या पुढील चार अध्यायांनाच उपनिषद् मानल्यामुळे पहिल्या अध्यायाच्या पहिल्या खंडांत जें सर्व अध्यायास एकत्र बांधणारें विवादन आहे तिकडे दुर्लक्ष होऊन हें उपनिषद् केवळ ज्ञानप्रतिपादक अशा गैरसमज होतो.

ह्या खंडांत सृष्टि कशी उत्पन्न झाली तें सांगितलें आहे.

"आत्मा वा इदमेक एवाग्र आसीत् नान्यत्किंचन मिषत्। स ईक्षत लोकान्नु सृजा इति। स इमांल्लोकानसृजत अंभो मरीचीर्मरमपः। अदोंऽभः परेण दिवं द्यौः प्रतिष्ठां तरीक्षं मरीचयः। पृथिवीमरो या अधस्तात्ता आपः। स ईक्षते मे नु लोका लोकपालान्नु सृजा इति। सोऽद्भ्यः एव पुरुषं समुद्धृत्यामूर्च्छयत्। तमभ्यतपत्तस्याभितप्तस्य मुखं निरभिद्यत यथांडं मुखाद्वाग्वाचोऽग्निः नासिके निरभिद्येतां नासिकाभ्यां प्राणः प्राणाद्वायुः। अक्षिणी निरभिद्येतामक्षिभ्यां चक्षुश्चक्षुष आदित्यः। कर्णौ निरभिद्येतां कर्णाभ्यां श्रोत्रं श्रोत्राद्दिशः। त्वङ्निरभिद्यत त्वचो लोमानि लोमभ्य ओषधिवनस्पतयः। हृदयं निरभिद्यत हृदयान्मनो मनसश्चंद्रमाः। नाभिर्निरभिद्यत नाभ्या अपानोऽपानान्मृत्युः। शिश्नं निरभिद्यत शिश्नाद्रेतो रेतस आपः ॥१॥

अर्थ—आरंभी हें जग एकच आत्मा होतें. तें दुसऱ्या कशाच पहात नव्हतें. [मिषत्—मिष् धातूचें वैदिक लङ्. वेदांमध्ये कधी कधी मागें 'अ' लावीत नाहीत.] (असाच अर्थ बृहदारण्यकोपनिषद् १।४।१ येथे "सोऽनुवीक्ष्य नान्यदात्मनोऽपश्यत्" ह्या वाक्यांत सांगितला आहे) त्याने विचार केला [ईक्षत्—वैदिक लङ्] की मी जग [लोकान्] उत्पन्न करावें [सृजै—लोट्]. त्यानें (१) 'अंभः' (२) मरीचि (३) मर आणि (४) आप हे चार लोक उत्पन्न केले ("अपः) हा पाठ Bohtliny याने दिला आहे. इतरत्र "आपः" हा

